Lakshmi Vilas,
Nathan Road, Poona 1.

Dated 17-10.1951.

My friend,

It gives me great pleasure to send the four Volumes of my Life-story for your kind perusal at your leisure time. If you will turn your eye to the introduction and review Chapter 27 ( सिंहावलोकन ) page 338 in the fourth Volume, you, I trust, will get a fair idea of my life from my birth upto the present day.

I would also like to draw your kind attention to the foreword written to the Fourth Volume by Mahamahopadhyaya Prof. D. V. Potdar, who was the President of the Historical Conference held quite recently in Delhi.

The first three Volumes were written by the late Mr. V. N. Joshi, late Shaladhikari, Bhor, and the 4th is written by Raosaheb V. G. Ranade, Ex-Dewan of Bhor.

The first 3 bring the story of my life to the year 1939 and the 4th brings the account practically up-to-date 1949.

I hope you will find the Volumes interesting. With kind regards,

Yours sincerely,

R. S. Pant Sachiv

Raja of Bhor.

To the Osmania University Library, Hyderabad (Deccan).

*With Best Compliments*

***From***

**His Highness Raja Shrimant**

**SIR RAGHUNATHRAO** ***Alias*** **BABASAHEB PANDIT,**

**Pant Sachiv, K. C. I. E.,**

***RAJA OF BHOR***

चित्रांक १



सिंहगडावरील छत्रपति राजाराम महाराजांच्या समाधीचें छायाचित्र. ह्यांच्याच कारकीर्दींत शंकराजी नारायण यांस सचिवपद प्राप्त झालें.

हिज हायनेस

# राजा श्रीमंत सर रघुनाथराव पंडित पंतसचिव

के. सी. आय. ई.

# यांचें चरित्र

## खंड ४ था

लेखक

रावसाहेब विनायक गोविंद रानडे, एम्. ए., एल्एल्. बी.
( माजी दिवाण, सं. भोर )

प्रजाः स्वतन्त्रयांचक्रे शश्वत्सूर्य इवोदितः ।
रघुवंश १७. ७४

१९४९



हिज हायनेस राजा श्रीमंत रघुनाथराव शंकरराव पंडित पंतसचिव, के. सी. आ. ई.
राजा, भोर

# अर्पण पत्रिका

हिज हायनेस

**राजा श्रीमंत सर रघुनाथराव पंडित**

**पंतसचिव**, के. सी. आय. ई.

राजा, भोर

यांच्या ठिकाणीं वसत असलेल्या
प्रजावात्सल्य, प्रगतिप्रियता, समदर्शित्व, उत्कर्षेच्छा,
राजकारणनैपुण्य, दीर्घोद्योगित्व, दमदारपणा,
नीतिमत्ता, क्षमाशीलता, दानशूरत्व,
कुलाभिमानित्व, कालानुवर्तित्व,
इत्यादि सद्गुणांनीं आकर्षित
होऊन, नम्रतापूर्वक व
कृतज्ञताभावनेनें,
लेखकानें
हा ग्रंथ
**श्रीमंत राजेसाहेब यांच्या चरणीं**
अर्पण केला असे.

# पुरस्कार

सुमारें आठ-नऊ वर्षांपूर्वी आमचे स्नेही आणि भोर संस्थानांतील सेवानिवृत्त शाळाधिकारी कै० वा. ना. जोशी यांनीं भोराधिपति श्रीमंत राजेसाहेब रघुनाथराव पंडित पंत सचिव यांचें चरित्र तीन खंडांत लिहून प्रसिद्ध केलें. या चरित्रास कै. जोशी यांनीं आमचेकडून 'पुरस्कार' लिहून मागितला आणि तो आम्हीं मोठ्या आनंदानें लिहून दिला. तो त्यांनीं चरित्राच्या प्रथम खंडाचे प्रारंभीं छापिला आहे.

या पुरस्कारांत आम्हीं सूचित ( पृ. १० ) केलें होतें कीं, श्रीमंत राजेसाहेबांच्या पुढील चरित्राचा आणखी एकादा खंड रा. जोशी यांना पुरा करितां येईल. दुर्दैवानें रा. जोशी हे कैलासवासी झाले. तथापि, त्यांचेच एक मित्र आणि भोर संस्थानाचे सेवानिवृत्त रावसाहेब रानडे, माजी दिवाण, यांनीं आमची सूचना मनावर घेऊन पुढील चरित्रखंड तयार करून प्रकाशित करण्याचें काम पूर्ण केलें, याबद्दल आम्हांस साहजिकच संतोष वाटतो. या नवीन खंडासाठीं रावसाहेब रानडे यांनीं पुनरपि आम्हांकडेच ' पुरस्काराची ' मागणी केली. तेव्हां, पूर्वसंबंध लक्षांत घेऊन, ती पूर्ण करणें आम्हांस प्राप्तच झालें.

मागील पुरस्कारांत आम्हीं 'देशी संस्थानांच्या घटनेंत फार मोठी क्रांति होण्याचे योग सन्निकट आलेले आहेत आणि या क्रांतिप्रसंगीं श्रीमंत राजेसाहेबांसारखे प्रगतिप्रिय नृपती प्रजांच्या वाढत्या आकांक्षांना पोषक असें धोरण अंमलांत आणतील, हें त्यांच्या अलीकडील धोरणावरूनहि स्पष्ट होईल.' असा आमचा अंदाज नमूद केला होता. आमचा हा अभिप्राय भविष्यास कितपत उतरला, तें रावसाहेब रानडे यांच्या या नवीन चरित्रखंडाच्या वाचनानें स्पष्टपणें ठरवितां येईल. आम्हीं अंदाजल्याप्रमाणें ' क्रांति ' तर घडूनच आली. परंतु, ती जितक्या तीव्र वेगानें घडून आली, तें पाहतां परवांच्या मुंबईच्या प्रचंड वादळाची कोणासहि तुलनेसाठीं आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं. वादळ होईल अशी भविष्य सूचना आगाऊ मिळाली होती, हें खरें. परंतु, मुंबईचें परवांचें वादळ ज्या प्रचंड वेगानें कोसळलें, तितकें तें तीव्र होईल याचा मात्र आगाऊ बरोबर अंदाज

कोणालाच आला नाहीं. मुंबईच्या या विलक्षण वादळानें ज्याप्रमाणें प्रचंड वृक्ष उन्मळून पडले, तद्वतच १९४७ सालीं राजकीय वावटळीच्या वेगानें हिंदुस्तानावरील ब्रिटिश सत्ता आमूलाग्र नष्ट झाली; आणि हिंदुस्तानाची गणना जगांतील स्वतंत्र राष्ट्र-मंडळांत होऊं लागली. ही राजकीय वावटळ कोसळणार एवढें सर्वांसच स्पष्ट दिसत होतें. परंतु, तें इतक्या परिणामावर जाईल आणि तें ब्रिटिश सत्तेला हिंदुस्तानांतून उडवून लावील असा अंदाज मात्र कोणाच्यानेंहि बांधविला गेला नव्हता.

ब्रिटिश अधिसत्ताच मोडून पडली; अर्थात्, त्या सत्तेच्या खांद्यावर उभीं राहिलेलीं आमचीं देशी संस्थानें पुढें कोणाच्या आधारावर उभीं राहणार ? प्रजा हाच राज्याचा खरा आधार ! तेव्हां, नवल नाहीं, कीं गाडें त्या मूळपदावर आलें. भारतीय प्रजा तेवढी एक असें आहे, तर संस्थानी म्हणून निराळी ठेविलेली प्रजा मूळच्या प्रजेशीं एकरूप होण्यास्तव आतुर झालेली दिसली, तर त्यांत विपरीत असें काय ? विपरीत जरी कांहीं नाहीं, तरी अंदाजापेक्षां ही क्रांति इतक्या झटपट झाली आणि तिचे निरनिराळे टप्पे, एकामागें एक उलट सुलट चक्रें फिरून, कसे गाठले गेले, त्याचें उत्तम चित्र श्रीयुत रावसा० रानडे यांनीं रेखाटलेल्या हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांच्या प्रस्तुतच्या चरित्रांत आपणांस पहावयास सांपडेल. या अपूर्व क्रांतीचें चित्र ग्रंथरूपानें आणि श्रीमंत राजेसाहेब यांच्या चरित्राचे निमित्तानें हें प्रथमच प्रकट होत आहे म्हटलें, तरी चालेल.

हि. हा. श्रीमंत राजे बाबासाहेब यांनीं या क्रांतीच्या प्रसंगीं आपला मुरलेला धिम्मेपणा बिलकुल सोडला नाहीं. प्रजेचें कल्याण ज्या मार्गानें होईल, तो मार्ग अनुसरण्यास काळवेळ पाहून ते तत्परतेनें कसकसे तयार होत गेले, हें पाहणें उद्बोधक आणि मनोरंजक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

ब्रिटिश सत्तेच्या सासुरवासाचे युगांत खऱ्या देशहितैषी संस्थानिकांचा कसा कोंडमारा होत असेल, त्याची कल्पना प्रत्यक्ष अनुभव असेल त्यालाच येईल. या छोट्या भोर संस्थानच्या इतिहासांतील भाटघर प्रकरणाचा समग्र इतिहास जर लिहिला जाईल, तर या गोष्टीवर झगझगीत प्रकाश पडेल. ज्यांचा प्रदेश आणि उत्पन्नें मोठीं होतीं, त्या संस्थानांची आणि भोरासारख्या बारक्या

कै. महात्मा गांधी



वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।
लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हति ॥—भवभूति.

जगद्वंद्य विभूतीस आमचे प्रणाम असोत.

R. S. Pant Sachiv, राजा, भोर

संस्थानांची अवस्था यांत जमीन अस्मानाचें अंतर आढळून आल्यास, नवल नाहीं. त्यांतून परंपरेनें ज्यांचा मान मोठा, अष्टप्रधानांत ज्यांची जागा, तें सचिवांचें भोर संस्थान जेव्हां अगदीं आकुंचित होऊन एखाद्या जिल्हा कलेक्टराच्या हुकुमतींत नांदूं लागलें असेल, तेव्हां पदाधिष्ठित संस्थानिकांना मनांतून विटंबना आणि विषाद वाटून किती वेदना होत असतील, त्याची कल्पनाच केलेली बरी. या सर्व बिकट परिस्थितीला तोंड देऊन हि. हा. श्रीमंत राजे बाबासाहेब यांचे वडील कै. श्रीमंत रावसाहेब यांनीं संस्थानची शिल्लक वाढविली आणि हि. हा. श्री. राजे बाबासाहेब यांनीं आपल्या दीर्घ कारकीर्दींत संस्थानची इभ्रत, नांवलौकिक आणि मान वाढवून पूल, शाळा, रस्ते वगैरे लोकोपयोगी अनेक कामें साधण्याची कशी तत्परता दाखविली, त्याची हकीकत आपणांस या चरित्रावरून ध्यानीं येईल.

हि. हा. श्रीमंत राजे बाबासाहेबांचा कारकीर्दकाळ हा संस्थानाबाहेर सत्ताधारी परकीय ब्रिटिश आणि स्वराज्य–स्वातंत्र्येच्छु जनता यांच्या तीव्र झगड्याचाच काळ म्हटलें असतां चालेल. या काळांत सत्ताधारी ब्रिटिशांनीं संस्थानिकांवर दाब टाकून लोकशाहीच्या वाढीला पायबंद घाल-ण्याच्या कामीं आंतून कसकसे प्रयत्न केले असतील, तें राजकारणाचें पडद्या-मागील स्वरूप ओळखणारांस निराळें उलगडून सांगावयास नको ! एका तोंडानें संस्थानिकांस प्रगटपणें उपदेश करावयाचा कीं, आतां लोकशाहीचा काळ आहे, तुम्हीं प्रजेचा विश्वास संपादन केला पाहिजे; आणि उलट आंतून संस्थानिकांवर दडपण आणावयाचें आणि लोकशाहीला चिरडून टाकण्याचा उद्योग चालवावयाचा ! अशा कात्रींत संस्थानिक सांपडून त्यांची मोठी विचित्र अवस्था होऊन जाई. हि. हा. श्रीमंत राजेसाहेबांना त्यांचा धिम्मेपणाच या अडचणींतून निभावून जाण्यास उपयोगीं पडला.

भोर संस्थान पडलें पुणें-साताऱ्याला चिकटून ! यामुळें हिंदी जनतेच्या चळवळी आणि लढे यांचा खणखणाट भोरास सतत ऐकूं येत राहिला असला, तर तें साहजिकच म्हणतां येईल. पुण्यांतील अनेक बुद्धिमान् आणि अनुभवी पुढाऱ्यांचें भोर प्रजेच्या पुढाऱ्यांना मार्गदर्शन नेहमींच लाभत गेलें. हि. हा. श्रीमंत राजेसाहेबांनाहि पुणें–सातारा घरासारखाच होता. प्रजापक्षाचे एक पुढारी

श्रीयुत गोपिनाथराव पोतनीस हे आमचे बालमित्रच असल्यामुळें, आम्हांस त्यांची बाजूही त्यांच्या तोडून अनेकवार ऐकावयास मिळलेली आहे. आमचें कार्यक्षेत्र निराळेंच असल्यामुळें, आम्हांला कांहींशा तिऱ्हाईतपणानें उभय बाजूंच्या हालचालींकडे पाहाण्याची संधी मिळालेली आहे. एका प्रसंगीं हिरडस मावळांत श्री छत्रपति शिवाजी महाराजांच्या स्मारकांचे निमित्तानें श्रीयुत गोपीनाथराव यांनीं आग्रह करून आम्हांस शिवाजी उत्सवाचे निमित्तानें हिरडोशीस नेलें असतां, राजा व प्रजा, उभयतांनीं योग्य समजुतीनें वागण्याचें धोरण अंगिकारून चालण्यानें निष्कारण कटुता कशी टळेल, हें आम्हीं उपस्थित मावळे मंडळीस स्पष्ट करून सांगितलें होतें. तें धोरण सांभाळलें गेलें असतें, तर भोरच्या इतिहास कांहींसा निराळा झाला असता. पण, लोकशाहीलाही काहीं रंग असतेच ! होत होत अनेक वळणांनीं आडवळणांनीं योग असा आला कीं, आमचे गोपीनाथपंत भोरचे प्रजापक्षीय मुख्य मंत्री झाले. पण, तोहि अंक संपला ! संपला म्हणजे आटोपला.

देशी संस्थानांच्या विजेच्या तारांचें कुंपण कुशलतेनें ओलांडून, ब्रिटिशांनीं सोडून दिलेला हिंदुस्थान शक्य तितका एकरूप करण्याचें महत्कार्य यशस्वीरीत्या घडवून आणण्याचें श्रेय स्वतंत्र हिंदुस्थान सरकारचे धोरणी मुत्सद्दी सरदार वल्लभभाई पटेल आणि त्यांचे बुद्धिमान् कारभारी श्री. मेनन यांनाच आहे. पण, श्री. वल्लभभाईंनीं पूर्वीं आणि आतां पुन्हां जयपुरास सर्व जनतेस खणखणीतपणानें निक्षून बजावल्याप्रमाणें, या यशाचा वांटा आमच्या हि. हा. श्रीमंत राजेसाहेबांसारख्या देशहितैषी संस्थानिकांकडेहि न दिल्यास, कृतघ्नपणाचा दोष पदरीं आल्यावांचून राहणार नाहीं.

हातचें, परंपरेचें, मानाचें आणि सत्तेचें स्थान सोडतांना कोणालाहि झालें, तरी मनाला कष्ट वाटणारच ! श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या मनोभावना, आपल्या प्रजाजनांचा निरोप घेतांना अगदीं मनोभावें बोलून दाखविल्या आहेत, आणि प्रजेनेंहि पण आपला सद्भाव श्रीमंत राजेसाहेबांना दिलेल्या मानपत्रसमारंभाचे प्रसंगीं व्यक्त केलेला आहे. प्रजापक्षाचे एक पुढारी कै० श्री. शेटे यांच्या स्मारकाची कोनशिला बसविण्यास श्रीमंत राजेसाहेबांसच प्रजा-पुढाऱ्यांनीं पाचारण केलें असतां, श्रीमंत राजेसाहेब मोठ्या आनंदानें गेले; तसेंच, संस्थानाचें

चित्रांक ४



हि. हा. श्रीमंत राजेसाहेबांच्या राज्यकारभाराच्या रौप्य-महोत्सवाच्या समारंभाच्या वेळच्या दरबारचें छायाचित्र

उदक नवीन स्वतंत्र हिंदुस्थानचे प्रतिनिधि ना. श्रीयुत बाळासाहेब खेर यांच्या हातावर समक्ष जाऊन सोडण्याचा प्रांजळपणाहि त्यांनीं दाखविला. या उदाहरणां-वरूनच श्रीमंत राजेसाहेबांचें अंत:करण किती उदार आहे, याचा प्रत्यय येतो. हीं उदाहरणें इतिहासांत खचित संस्मरणीय ठरतील. श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वत: आपल्या मनांत कोणाबद्दल वैरभाव किंवा आकस कसा नाहीं, तें शेटे-स्मारक प्रसंगींच्या भाषणांत व्यक्त केलेंच आहे. उलटपक्षीं, श्रीयुत गोपीनाथपंतांसारख्या त्यांच्या म्हणजे संस्थानी सत्तेच्या विरोधकांच्याहि मनांत श्रीमंत राजेसाहेबांबद्दल आदरभावच सदैव कसा वसत होता, हें आम्ही स्वानुभवानें सांगूं शकतों. मनाच्या मोठेपणाचीं हीं दृश्यें पाहून हिंदुस्थानाची सहिष्णु संस्कृति विशेष मनावर ठसल्याशिवाय राहात नाहीं. इंग्रजांनीं आपली सत्ता सोडली, हा त्यांनीं त्याग केला खरा; पण, ते किती झालें तरी परकीय! परंतु, आमच्या देशी संस्थानिकांनीं वेळ येतांच आनंदानें आपापल्या राज्यावर संतोषानें पाणी सोडलें आणि आपल्या खऱ्या अंत:करणाची परीक्षा दिली, हा त्यांचा थोरपणा केव्हांहि कौतुकास्पद समजला जाईल!

हि. हा. श्रीमंत राजेसाहेबांना आपल्या पूर्वजांचा अभिमान तर आहेच, हें श्री शंकराजी नारायणांचा जो उत्सव त्यांनीं सुरू केला आणि आंबवडयाची त्यांची समाधि मोठी केली, यांवरून स्पष्टच होतो. पण, परवां एका प्रसंगीं समक्ष भेटींत त्यांनीं आम्हांस जेव्हां अगदीं तळमळीनें प्रश्न केला कीं, आमच्या राज्यांतील छत्रपतींची पहिली राजधानी राजगड किल्ला, यासारखीं जीं महनीय व पूज्य ऐतिहासिक स्थळें आहेत, त्यांची व्यवस्था पूर्ववत् चालावी म्हणून काय करावें? तेव्हां, हि. हा. श्रीमंत राजे बाबासाहेबांच्या मनोभावनेचा तो आविष्कार पाहून आम्हांला केवढें समाधान वाटलें! आपली सत्ता गेली, आपण सत्ताधारी असतों, तर हीं जुनीं स्मारकें उर्जिताला आणण्याची मनीषा आपण खचित तडीस नेली असती, मराठी राज्याच्या वैभवाचा स्मारकस्तंभ आपण नसरापूरच्या तिकटयावर उभा केलाच होता. पण, आतां काय? आतां हीं कामें कोण आणि केव्हां करील, हीच शंका आणि काळजी त्यांना ग्रस्त करीत होती, असें आमच्या दृष्टोत्पत्तीस आलें. आतां हा भार नव्या प्रजातंत्र स्वतंत्र हिंदुस्थान सरकारावरच पडणार, हें उघड आहे. त्यांनीं मनावर घेतल्यास, राजगडादिकांचें

नुसतें रक्षणच होईल असें नव्हे, तर तेथें श्री छत्रपति शिवाजी महाराजांच्या अक्षय्य कीर्तीस शोभेल असें भव्य स्मारकहि उभें राहील, असा विश्वास आम्हांस वाटतो. हा विश्वास भोर प्रजा आपल्या प्रतिनिधींमार्फत खरा करून दाखवील अशी आम्हांस आशा आहे.

रावसाहेब रानडे यांनीं परिश्रमपूर्वक हा चरित्र खंड पुरा करून हि. हा. श्रीमंत राजे बाबासाहेब यांचें चरित्र जवळजवळ प्रस्तुत कालापर्यंत आणून ठेवलें आहे. **प्रस्तुत ग्रंथांतील त्यांचें 'सिंहावलोकन' प्रकरण हें या ग्रंथांतील सारभूत प्रकरण जरी वाचक वाचतील, तरी त्यांचा पुष्कळ कार्यभाग होईल.** ते स्वतः संस्थानी नोकरींत असल्यामुळें त्यांचा दृष्टिकोन कोठें कोठें तिकडेच झुकता राहिला असें कोणी म्हटलें, तर त्यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. प्रजापक्ष, लोकपक्ष वगैरे अनेक पक्ष आणि उपपक्ष यांच्या गजबजाटांतून आतां मुक्त होऊन भोर प्रजाजन यापुढील काळांत स्वतंत्र हिंदुस्थानाचे नागरिक म्हणून जर आपला नांवलौकिक वाढवितील, तर त्यांतच सचिव घराण्याचा नांवलौकिक वाढेल असेंच आम्ही समजतों; आणि असें व्हावें यापेक्षां हि. हा. श्रीमंत राजे बाबासाहेब यांचा तरी राज्य सोडण्यांत दुसरा कोणता हेतु असेल ?

**दत्तो वामन पोतदार**

# प्रस्तावना

श्रीमंत राजेसाहेब यांचें चरित्र स. १९३९ इ. पर्यंतचें माझे मित्र कै० वासुदेव नारायण जोशी यांनीं लिहून तें तीन खंडांत ता. १८।८।१९३९ इ. रोजीं प्रसिद्ध केलें. श्रीमंतांचें पुढील चरित्र त्यांच्याच हातून पुरें होईल असें, त्या चरित्राच्या १ ल्या खंडाच्या सुरुवातीस, महामहोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार यांनीं आपल्या पुरस्काराच्या १० व्या पानावर म्हटलें आहे. तशी माझीही इच्छा होती; कारण, म. म. पोतदार यांच्या त्याच पानांतील 'प्रजेच्या वाढत्या आकांक्षांना पोषक असेंच धोरण श्रीमंतांसारखे प्रगतिप्रिय नृपति अंमलांत आणतील,' या इच्छेप्रमाणेंच पुढें सर्व गोष्टी घडून आल्या आहेत; तेव्हां, श्रीमंतांचें त्यानंतरचें चरित्र लिहिण्यास श्रीयुत जोशी यांच्यासारखा श्रीमंतांशीं दीर्घ व निकट परिचय असलेला व कुशल असाच लेखक पाहिजे होता. पण, विधिलिखित तसें नव्हतें. कारण, पूर्वीचें चरित्र प्रसिद्ध झाल्यानंतर ५।६ वर्षांतच ते कालवश झाले.

कै० जोशी यांच्याप्रमाणें माझा श्रीमंतांशीं दीर्घ असा परिचय नाहीं. थोडा निकट असा माझा श्रीमंतांशीं संबंध आला, तो अलीकडील १७।१८ वर्षांतलाच आहे. संस्थानच्या नोकरींत शाळाधिकारी म्हणून मी स. १९०९ इ. सालीं प्रविष्ट झालों. नंतर, स. १९१२ इ. सालीं एम्. ए. झाल्यानंतर कायद्याचा अभ्यास केल्यावर, स. १९१६ इ. सालीं मुन्सीफ (सबजज्ज) च्या कामावर सुधागड तालुक्यांत माझी नेमणुक झाली. स. १९१८ इ. सालीं LL. B. झाल्यानंतर, स. १९२९ इ. पर्यंत मी तिकडेच असल्यानें, दरम्यान श्रीमंत स. १९२२ इ. सालीं गादीवर आले होते, तरी, स. १९२९ इ. सालच्या अखेरीस माझी बदली भोरास होईपर्यंत, श्रीमंतांशीं विशेष व जवळचा असा माझा संबंध येऊं शकला नाहीं. पुढें डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्जाच्या कामांतहि श्रीमंतांशीं फारसा संबंध येण्याचें कारण पडत नसे. परंतु, चीफ सेक्रेटरी व पुढें एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर म्हणून नेमणूक झाल्यावरच काय तो निकटचा संबंध आला; व श्रीमंतांच्या स्वभावाशीं, तसेंच त्यांच्या कामकाजाच्या धोरणाशीं व पद्धतीशीं परिचय होण्याचा मला सुयोग लाभला. याप्रमाणें, श्रीमंतांशीं असलेल्या

परिचयाबाबत जसा कमीपणाचा कांहीं तरी काटा माझ्याकडेच झुकणार आहे, तशीच गोष्ट लेखनकलेबाबतही आहे. कै० जोशांच्यासारखें सोपें व चटकदार असें मला मराठींत लिहितां येत नाहीं, हें कबूल करण्यास मला मुळींच कमीपणा वाटत नाहीं. असें असलें, तरी स. १९४५ इ. च्या मध्याच्या सुमारास मी सेवा-निवृत्त झाल्यावर, श्रीमंतांच्या चरित्रलेखनाचें अर्धवट राहिलेलें मित्रकार्य आपण पुरें करावें, असा विचार माझ्या मनांत एकदा सहजीं येऊन गेला. शिवाय, श्रीमंत राजेसाहेब स. १९३० इ. सालीं विलायतच्या पहिल्या सफरीवर गेले, त्या वेळीं आम्हीं, कै० जोशी व मी, A Short History of the Bhor State या नांवचें एक छोटें पुस्तक इंग्रजींत लिहिलें होतें. त्यांत श्रीमंतांच्या चरित्राचा भाग स. १९२८-२९ इ. पर्यंतचाच आला होता. तो पुरा करावा असेंही मला वाटत होतें. तथापि, प्रकृतिमान, घरगुती कामें, वगैरे कारणांनीं मनांतील विचारास तितकी उत्कटता प्राप्त झाली नाहीं. शिवाय, मुख्य कारण म्हणजे ग्रंथाच्या लेखनास व प्रसिद्धीस चालना देणारा एखादा आनंदाचा विशेष प्रसंग असावा लागतो, तोहि सेवानिवृत्तीच्या वेळेस नव्हता, हें होय. तथापि, दरम्यान स्वस्थ न बसतां, चरित्राच्या इंग्रजी लेखनाची जुळणी करण्याचें काम चालू ठेवलें होतें. नंतर, जसजसें स. १९४७ इ. साल जवळ आलें, व तें साल म्हणजे श्रीमंतांच्या कारकीर्दीच्या रौप्यमहोत्सवाचें वर्ष ही कल्पना आल्याबरोबर, चरित्र-लेखनाच्या दृष्टीनें हा टप्पा आनंदाचा व सर्व बाजूंनीं योग्य असल्यानें, आनंदाच्या प्रसंगाची उणीव दूर होऊन, श्रीमंतांचें स. १९३९ इ. पासून पुढील चरित्र आपणच प्रथम मराठींत लिहून अर्धवट राहिलेलें काम पुरें करावें, असें मनांत ठरविलें. तथापि, ज्यांचें चरित्र लिहावयाचें, त्यांची त्यास मान्यता घेतल्यावांचून पुढें पाऊल टाकणें युक्त नसल्यानें, ती गोष्ट श्रीमंतांजवळ एकदा सहजीं काढली. श्रीमंतांनीं आपली मान्यता लगेच दिली. यामुळें,

"अव्याक्षेपो भविष्यन्त्याः कार्यसिद्धेर्हि लक्षणम्।" रघुवंश १०।६
या वचनाप्रमाणें, मनांत योजलेलें कार्य सिद्धीस जाण्याची खात्री वाटून कामांत एक प्रकारची उमेद आली, व चरित्रलेखनाचा विचार कायम झाला.

श्रीमंतांची मान्यता, अर्थात्, सशर्त होती. त्यांनीं मला दोन सूचना केल्या. त्यांपैकीं पहिली सूचना, थोडक्यांत Paint me as I am अशी होती.

चित्रांक ५


IN HIM I TRUST
SIR RAGHUNATHRAO S. PANDIT PANT SACHIV K.C.I.E.
H.H. RAJA OF BHOR

मोनोग्राम

नाहींत याची मला, स्वानुभवावरून खात्री आहे. यास्तव, यथार्थ-निवेदनासंबंधींचें त्यांचें वरील सांगणें पथ्यकर असल्यानें, मीं तें सांभाळलें आहे. मात्र, ज्या दृष्टीनें मीं हें चरित्र लिहिण्यास घेतलें, त्यांत संपूर्ण म्हणजे स्वभावांतील बारीकसारीक बाजूंचें विस्तारानें—मग, तें दोषात्मक असो वा गुणात्मक असो—चित्रण करण्याचा ( Characterisation ) हेतू नसल्यानें, मला जेवढें अवश्य व इष्ट वाटलें, तेवढ्याचाच उल्लेख मीं केला आहे. विशेषत: 'राजे' या संबंधांची हकीगत समालोचनात्मक रीतीनें देण्याचें या खंडांतील २७ व्या प्रकरणांत योजल्यानें, त्या हकीगतीचें सहज आकलन करतां यावें, म्हणून प्रकारणाच्या सुरुवातीस पार्श्वभूमीदाखल श्रीमंत राजेसाहेबांच्या स्वभावविशेषांचें थोडेंसें दिग्दर्शन केलें आहे, इतकेंच. शिवाय, चरित्र काय किंवा इतिहास काय, त्याचा उद्देश केवळ वृत्तकथन हा नसून, त्यांत उपदेशाचाहि हेतु असतो व असावा लागतो, हें

'उपदेशान्वितं पूर्ववृत्तमितिहास इत्युच्यते ।'

या वचनांत स्पष्ट सांगितलें असल्यानें, गुणांच्या बाजूकडे यांत जास्त लक्ष दिलें आहे; व तेंच उचित आहे असें कोणीही कबूल करील. शिवाय, दोषांचें तपशीलवार वर्णन करण्यापासून सर्वसामान्य जनतेचें हितापेक्षां अनहितच होण्याचा जास्त संभव असतो. त्यापासून योग्य तो बोध न घेतां, सामान्य मनुष्य दोषावरच आपलें मन केंद्रित करतो, व, कळत वा न कळत वा, त्याचेंच अनुकरण त्याच्याकडून होण्याचा जास्त संभव, नव्हे धोका, असतो. खाणीमध्यें सुवर्णाचे कण व मृत्तिकेचे कण, यांचें मिश्रण झालेलें असतें; पण, ज्यास आपलें हित व्हावें, आपला फायदा व्हावा असें वाटतें; तो त्या मिसळींतून सोन्याचे तेवढे कण दूर करतो व तेवढेच उचलून घेतो. इतकेंच नव्हे, तर मनुष्यस्वभाव गुणदोषमिश्र असल्यानें व त्याचें आचरणही बऱ्या व वाईट अशा दुहेरी स्वरूपाचें होणें संभवनीय असल्यानें, जनतेनें त्यांतून बऱ्याचेंच अनुकरण करावें व वाईटाचें करूं नये असा, विधि व निषेध या दोन्ही प्रकारचा, उपदेश समाजहितेच्छू धुरिणांनीं,

'यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपासितव्यानि नेतराणि ।'

या वचनानें श्रुतिवाङ्मयांत आवर्जून केला आहे. यास्तव, वाचकाची चांगल्याकडेच प्रवृत्ति व्हावी, म्हणून दोषांच्यापेक्षां गुणांच्याच बाजूकडे यांत प्राधान्येंकरून लक्ष देण्यांत आलें आहे.

श्रीमंतांनीं केलेली दुसरी सूचना अशी कीं, चरित्रांत कोणासंबंधींही व्यक्तिविषयक टीका ( अर्थात, प्रतिकूल ) केली जाऊं नये.

‘ आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ।’ रघुवंश १४--४६.

या वचनाप्रमाणें श्रीमंतांचें सांगणं केव्हांही प्रमाणच आहे. शिवाय, ही त्यांची सूचना सद्धेतुमूलक व त्यांच्या उदार मनाची द्योतक असल्यानें, मीं ती अक्षरशः पाळली आहे. कोणत्याही बाबींसंबंधीं मतभेद असूं शकतात; नव्हे, तसें असणें कांहीं बाबतींत तर स्वाभाविकच असतें; व म्हणून तें मान्य करणें हें विचार-स्वातंत्र्यास सवड व संमति देण्यासारखें आहे. यास्तव, या खंडाच्या प्रकरण २७ यांत लिहिलेल्या समालोचनात्मक मजकुरांत मीं कोणाही व्यक्तीचा विशेषतः नामनिर्देश करण्याचें शक्य तों वर्ज्य केलें आहे, व व्यक्तीसंबंधीं प्रतिकूल अशी टीकाही केलेली नाहीं.

या खंडाच्या २७ व्या प्रकरणांत श्रीमंतांच्या राज्यकारभाराचें त्रोटक रीत्या समालोचन केलें असल्यानें, त्यांच्या जबाबदार राज्यपद्धतीच्या ध्येयाची परिपूर्तता कां झाली नाहीं, त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे. त्याचप्रमाणें भोर म्यु०. बोर्ड व मंत्रिमंडळ यांच्या विसर्जनास कारणीभूत झालेली तत्पूर्वीची हकीगत जशी घडली तशीच दिली आहे; व लोकाग्रणींच्या अशा बेजबाबदारीच्या वागण्यानें संस्थानिकांस केवळ अनन्यगतिकत्वामुळेंच आपलें अप्रिय कर्तव्य बजावावें लागतें; व तसें लागल्याचें निःसंदेहरीत्या दिसत असलें, तरी शेवटीं संस्थानिकाच्याच विरुद्ध निराधार विधानें केलीं जातात, हा बहुतेक सर्वत्र अनुभवास येणारा प्रकारच निवेदिला आहे. सर्वच लोकपुढारी अशा वृत्तीचे असतात, असें नाहीं; पण, अशा बेजबाबदार वृत्तीच्या पुढाऱ्यांना जेव्हां कार्यनिर्वाहपदीं बसण्याचा समय येतो, व त्यांच्यावर सत्प्रवृत्त पुढाऱ्यांना आपला दाब ठेवतां येत नाहीं—मग, ती गोष्ट त्यांची तशी इच्छाच नसल्यामुळें असो किंवा त्यांना तितकी धमक व उत्साह नसल्यामुळें असो, किंवा त्यांच्या ठिकाणीं तितकी कर्तृत्वशक्तिच नसल्यामुळें असो, तेव्हांच असले अनिष्ट प्रसंग येतात; व त्यायोगें प्रगति मात्र खुंटते किंवा दुरावते. अशा बेजबाबदारीच्या वागण्याचें मूळ त्यांच्या स्वार्थांत असतें. शिवाय, कित्येक प्रसंग असेच असतात कीं, सर्वजनहिताकरतांच, आपल्या प्रजेपैकीं कांहींच्या वैयक्तिक हिताकडे दुर्लक्ष करून, संस्थानिकांस साम्राज्य सरकारच्या धोरणाशीं कांहीं बाबतींत आपलें धोरण मिळतें ठेवून वागावें लागतें. अशा

वेळीं ज्या लोकांचा व्यवहार पायाशुद्ध नसतो, त्यांच्यावर आघात होणें क्रमप्राप्त असतें; व तसें झालें कीं, तेही संस्थानिकांविरुद्ध कागाळ्या करूं लागतात. पण, त्यास इलाज नसतो. आपल्या नुकसानीस ते स्वतःच जबाबदार असतात; मात्र, अशा कित्येक प्रसंगीं संस्थानिकांना तें प्रसिद्ध करणें अडचणीचें होऊन, त्यांचा कोंडमारा झाल्यासारखें होतें; व त्यांच्याबद्दल गैरसमजास सवड मिळते, वगैरे वस्तुस्थितिच फक्त ओघानें निवेदन केली आहे.

श्रीमंतांनीं आपलें चरित्र लिहिण्याची मला परवानगी दिली, यावरूनच आपणाकडून कांहीं तरी चांगलें काम झालें आहे असें त्यांना वाटत असल्याचें उघड दिसत आहे. कारण, तसें नसतें तर, म्हणजे आपण चांगलें कांहीं केलें नाहीं असें ज्यास मनोमय वाटेल, तो आपलें चरित्र लिहिलें जावें असें कधींच इच्छिणार नाहीं. त्याचप्रमाणें श्रीमंतांच्या हातून प्रजेकरितां चांगलें असें कांहीं झालें नाहीं असें मलाही वाटत असतें, तर मीही या चरित्रलेखनाच्या कामास प्रवृत्त झालों नसतों, हेंही तितकेंच खरें आहे.

श्रीमंतांचें चरित्र ता. १८ ऑगस्ट स. १९४७ इ. अखेरपर्यंतचें लिहावें असा निश्चय केल्यानंतर, लगेच पुढें दक्षिणेंतील भोरसह ८ संस्थानांचें संघराज्य ता. १७।१०।४७ रोजीं अस्तित्वांत आलें, व पुढें ता. ८ मार्च स. १९४८ इ. रोजीं भोर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें. या शेवटच्या घटनेनें संस्थानचें स्वतंत्र अस्तित्वच संपुष्टांत आलें व 'राजे' ह्या संबंधाचें श्रीमंतांचें चरित्रहि समाप्त झाल्यानें, तेथपर्यंत चरित्र लिहिण्याचें मनानें कायम केलें.

## वाचकांची सोय

श्रीमंतांच्या चरित्राचे एकंदर चार खंड झाले आहेत. त्यांत त्यांच्या खाजगी, सामाजिक व राजकीय अशा तिन्ही प्रकारच्या हकीगती विषयवारीनें दिल्या आहेत. ज्यांना या सर्व गोष्टी कळून घेणें असेल, त्यांनीं चारही खंडांचें वाचन करणें इष्ट व जरूर आहे. तथापि, इच्छा असली, तरी सर्वांनाच चारही खंड वाचण्याची फुरसद असतेच असें नाहीं. तसेंच, कित्येकांना, श्रीमंत हे राजे असल्यानें, त्यांनीं त्या नात्यानें आपलें कर्तव्य कसें पार पाडलें, हेंच समजून घेण्याची इच्छा असते. अशांची व इतरांचीहि सोय व्हावी, म्हणून श्रीमंतांच्या

राज्यकारभारविषयक गोष्टींचा आढावा, या शेवटच्या खंडांत शेवटीं प्रकरण २७ यांत (हिज हायनेस श्रीमंत राजेसाहेब यांच्या, युवराज असतां वेळच्या हकीगतीसह, पंचवीस वर्षांच्या कारकीर्दीचें सिंहावलोकन) घेतला आहे. येवढें एकच प्रकरण वाचलें, तरी वाचकांस त्यांच्या प्रगतिपर कारकीर्दीची कल्पना येणार आहे. श्रीमंत राजेसाहेबांच्या स्वभावविशेषाचें, वर्तनक्रमाच्या धोरणाचें व 'राजा' या नात्याच्या कामगिरीचें **नवनीत** असेंच तें प्रकरण असल्याचें वाचकांना कळून येईल अशी माझी खात्री असल्यानें, **ज्यांना चारहि खंड वाचण्याची सवड नसेल, त्यांनीं निदान ४ थ्या खंडांतील २७ वें प्रकरण अवश्य वाचावें, अशी माझी सविनय शिफारस आहे.**

सन १९२९ तें १९४३ इ. पर्यंतचे बहुतेक सर्व वार्षिक रिपोर्ट माझ्याच देखरेखीखालीं प्रसिद्ध झाल्यानें, चरित्रलेखनाचें माझें काम बरेंच सोपें झालें; तथापि, चरित्रास अवश्य तो मजकूर टाइप करणें, क्वचित् इंग्रजीचें मराठींत भाषांतर करणें, वर्तमानपत्रांतील अवश्य तीं कात्रणें पुरविणें, वगैरे कामीं रा. रा. विनायक बापुराव देशपांडे, जनार्दन वासुदेव शहाणे व त्रिंबक लक्ष्मण दाणी या, पोलिटिकल व हुजूर प्रायव्हेट ऑफिसांतील, लेखकांचा झालेला उपयोग नमूद करणें इष्ट वाटतें. विशेषतः, रा. रा. विनायकराव देशपांडे यांनींच मजकुराच्या जुळणीचें बहुतेक काम केलें. श्रीमंतांची दैनंदिनी ( डायरी ) लिहिणार रा. रा. विनायक सुब्राव पारखी यांनीं डायरींतील उतारे जरूर ते तयार करून देऊन माझें काम तेवढें हलकें केलें आहे. त्याचप्रमाणें माझे मित्र डॉ. श्रीयुत भालचंद्र शंकर जोशी M. B. B. S. यांनींही मला बरीच मदत केली आहे.

सेवानिवृत्तीनंतर राज्यकारभाराशीं माझा संबंध सुटल्यामुळें हस्तलिखितांत त्या दृष्टीनें चूकवाक राहूं नये, म्हणून रावसाहेब लक्ष्मण रघुनाथ साने B. A., LL. B., माजी दिवाण, यांना तें वाचून पाहण्याची विनंति केली. ती मान्य करून त्यांनीं कांहीं ठिकाणीं दुरुस्त्या सुचवून मजकूर निर्दोष होण्यास मदत केली, याबद्दल त्यांचे आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

यानंतर, छापखान्यांकरतां मजकुराची सुवाच्य अक्षरांत जी हस्तलिखित प्रत तयार करावी लागते, ती तयार करण्याच्या कामीं वे. शा. सं. मोरेश्वर शतानंद ऊर्फ मोरशास्त्री पारखी यांनीं खरोखर फार मेहनत घेऊन मला विशेष मदत केली आहे; इतकेंच नव्हे, तर हस्तलिखितांचीं प्रकरणें जरूरीप्रमाणें छापखान्यांत नेऊन देणें, वगैरे कामीं जी निरलसता प्रकट केली व जे शारीरिक कष्ट केले, ते, त्यांचें वयोमान लक्षांत घेतां, निःसंशय वाखाणण्यासारखेच आहेत.

इतकी सर्व तयारी मीं आपल्यापरी केली, तरी पुस्तकाचा मजकूर अवघ्या दोन अडीच महिन्यांत, छापखान्यांतील आपलीं इतर कामें संभाळून, व प्रसंगीं बाजूस सारून, छापून देण्याची समर्थ भारत छापखान्याचे चालक श्रीयुत स. रा. सरदेसाई B. A., LL. B. यांनीं खात्री दिली नसती, तर माझे मनोरथ व्यर्थच होणार होते; परंतु, त्यांनीं ती जोखीम पत्करून काम वेळेवर व चांगल्या प्रकारें पुरें करून दिलें, याबद्दल, प्रस्तुतच्या काळांतील छापखान्यांच्या बहुविध अडचणी लक्षांत घेतां, उपकृतता प्रदर्शित करणें हा माझ्या कर्तव्याचाच एक भाग आहे असें मी समजतों.

महामहोपाध्याय प्रा. श्रीयुत दत्तो वामन पोतदार B. A. यांनीं माझे स्नेही कै. वा. ना. जोशी यांनीं लिहिलेल्या श्रीमंतांच्या त्रिखंडात्मक चरित्रास पुरस्कार लिहून अलंकृत केलें असल्यानें, व विशेषतः श्रीमंतांशीं पुष्कळ दिवसांचा दृढपरिचय असलेले, भोर संस्थानाची माहिती असलेले व मुख्यतः महाराष्ट्रीय संस्थानांविषयीं आपलेपणाची व अभिमानाची भावना असलेले असे ते इतिहासप्रेमी सद्गृहस्थ असल्यानें, या ४थ्या खंडास त्यांनींच पुरस्काराचे चार शब्द लिहावे, अशी त्यांना मीं विनंति केली. कै. जोशी यांचा व त्यांचा जितका दृढ परिचय होता, तितका माझा त्यांच्याशीं निकटचा संबंध नसला, तरी खरा विद्वान् व सज्जन सत्कार्यास केव्हांही मदत करण्यास तयार असतो व सज्जनाचा स्नेह 'साप्तपदीन' असून तितकें माप मीं भरल्याची मला खात्री असल्यानें, माझ्या अपेक्षेप्रमाणें, त्यांनीं माझी विनंति तत्काल मान्य केली. त्यांच्या या उपकृतीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

शेवटीं, श्रीमंत राजेसाहेब यांचे आभार कसे व कोणत्या शब्दांनीं मानावे, तेंच मला समजत नाहीं. कारण, त्यांनीं माझ्या विनंतीस रुकार दिला नसता, तर माझ्या इच्छेस कृतीचें स्वरूप येणें शक्यच नव्हतें. पण, त्यांनीं माझ्या विनंतीस उदार मनानें नुसती अनुकूलता दर्शविली इतकेंच नव्हे, तर अवश्य ती सर्व साधन-सामग्री आपल्या कचेरींतील, या कामाशीं संबंध असलेल्या, मंडळीकडून मला उपलब्ध होईल व चरित्रग्रंथाची निष्पत्ति दोषरहित व सर्वांगसुंदर होईल याविषयीं काळजी घेतली, याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत.

चरित्र-लेखनास मिळालेल्या परवानगीनंतर यथामति यथाशक्ति जें लेखन केलें, त्याचा हा खंड ( ४ था ) श्रीमंतांनाच अर्पण करावा अशी इच्छा झाली. त्याप्रमाणें मीं त्यांना विनंति केली. तीही मान्य करून श्रीमंतांनीं मला खरोखरच ऋणी केलें आहे. माझ्या विनंतीस त्यांनीं मान्यता दिल्याचा—परवानगीचा—लेख ( पत्र ) यासोबत दिलें आहे.

सचिव घराण्याची परंपरा पाहिली असतां श्रीशंकराजी नारायण यांच्या वेळेपासून, साम्राज्य सरकारशीं राजनिष्ठेनें वागण्याची आहे. श्रीमंत राजेसाहेबांच्या वडिलांनीं तें व्रत अखंड चालविलें होतें. श्रीमंत राजेसाहेब यांनींही तें कुलव्रत अव्याहतपणें पाळलें होतें. मागील व या खंडांत दिलेली विस्तृत हकीगत, ही त्याचीच द्योतक आहे. हल्लींच्या सरकारशींही या चालत असलेल्या राजनिष्ठेच्या धोरणानेंच चालण्याचा श्रीमंतांचा निश्चय आहे. तो त्यांचा निश्चय ईशकृपेनें सिद्धीस जावो अशी लेखकाचीही इच्छा व प्रभुचरणीं प्रार्थना आहे.

श्रीमंतांना व राजकुटुंबांतील मंडळींना दीर्घ आयुष्य, उत्तम आरोग्य व अविच्छिन्न सुख लाभो अशी इच्छा प्रदर्शित करून व महात्माजींसारख्या विभूति या भारतभूचें रक्षण व जनतेचें मार्गदर्शन करण्यास वरचेवर लाभोत, अशी श्रीरामप्रभूच्या चरणीं प्रार्थना करून, कविवर्य मोरोपंत यांनीं म्हटल्याप्रमाणें,

'यात्रा सफल झाली प्रभुप्रसादेंकरूनिया माझी।'

या श्रीहनुमंताच्या कृतज्ञतेच्या व धन्यतेच्या उद्गारानेंच, हें निवेदन पुरें करतों.

**विनायक गोविंद रानडे**

शुक्रवार पौष शुद्ध, १५ शके १८७०
दिनांक १४ जानेवारी १९४९ इ.

# श्रीमंतांचें अर्पणपत्रिकेबाबतचें-परवानगीचें-पत्र

लक्ष्मी विलास
नाथन रोड, पुणें नं. १
ता. १ ऑक्टोबर १९४८ इ.

रावसाहेब रानडे यांसी

आमचें चरित्र कै. वा ना. जोशी यांनीं लिहिलें होतें. त्यापुढील चरित्रात्मक हकीगत लिहून काढण्याची तुम्हीं आपली इच्छा कांहीं दिवसांपूर्वीं आमच्याजवळ बोलून दाखविली व त्यास आम्हीं संमतिही दिल्याचें आम्हांला आठवतें. त्यानंतर, चरित्राचा जुना धागा पुढें चालू करून, तुम्हीं आपलें उद्दिष्ट सिद्धीस नेल्यावर, झालेलें काम म्हणजे चरित्राचा ४था खंड, पूर्वीच्याप्रमाणेंच, आम्हांला अर्पण करण्याची परवानगी तुम्हीं नुकतीच तोंडीं मागितली. अर्थात्, तुमच्या विनंतीला नकार देणें आम्हांला शक्य नव्हतें; तथापि, तसें करण्यापूर्वीं, तुम्हीं प्रेमानें परिश्रम करून जें लेखनकार्य केलें, तें वाचून पाहणें आम्हांला इष्ट व अवश्य वाटलें. त्याप्रमाणें आम्ही सर्व लिखाण वाचून पाहिलें. त्यावरून, चरित्रलेखनास परवानगी देतांना ज्या मुख्य दोन शर्तींवजा गोष्टी–म्हणजे 'जसे आम्ही आहोंत, तसेंच आमचें ( चरित्राचें ) चित्रण करा' ( Paint me as I am ), व 'वैयक्तिक टीकेच्या मोहापासून दूर रहा' ( Avoid temptation towards individual criticism ) सांगितल्या, त्यांचें अक्षरशः परिपालन तुम्हीं केल्याचें पाहून आम्हांस समाधान वाटत आहे. तथापि, खरें सांगावयाचें म्हटल्यास, इतर बाबतींत असें स्पष्ट केल्यावांचून आम्हाला गत्यंतर नाहीं कीं, आमच्या स्वभावविशेषांचें दिग्दर्शन करण्याच्या बाबतींत तुम्हीं कांहीं कांहीं ठिकाणीं थोडा चमकदार रंग वापरला आहे. असें करणें, तुमच्या ठिकाणीं आमच्याविषयीं व आमच्या घराण्याविषयीं जी प्रेमाची, आदराची व निष्ठेची भावना आहे, तीस अनुसरून--व म्हणूनच स्वाभाविक–असलें, तरी आमच्या स्वभावांतील दोष व उणीवा यांची आम्हांस जाणीव नाहीं असें नाहीं, हें आम्हांस प्रांजलपणें कबूल करणें उचित वाटतें.

चरित्रांतील हकीगतीच्या मुख्य भागाच्या संबंधांतहि जशा गोष्टी घडल्या, तशाच नमूद करण्यांत, आमच्या मनांतील दुसऱ्या इच्छेप्रमाणें, न्याय्य तेंच तुम्हीं केलें आहे, हें पाहून आम्हांला अधिकच संतोष वाटत आहे. त्यांत कोठेंहि अतिशयोक्तीचा भाग नाहीं. या ग्रंथांतील २७ व्या प्रकरणाचें रेखाटन हें तर सर्व लेखनांत उत्तमच साधलें आहे. त्यांत आमच्या राज्यकारभाराचें व तत्पूर्वींच्या

चित्रांक ६



सुधागड तालुक्यांतील ठाणाळा लेणीं

आमच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टींचें जें सिंहावलोकन केलें आहे, त्याकडे खरोखरच कोणाही–सहजीं वरवर वाचणाऱ्याचें सुद्धां–वाचकाचें लक्ष आकर्षिलें व वेधलें जाण्यासारखें आहे. लोकव्यवहारांत म्हटलें जातें कीं, 'श्लोकानें भाषण खुलतें' ( Cite a verse and adorn a speech ), किंवा 'समयोचित वचन चटकन खात्री पटवितें' ( Apt quotation carries conviction ), त्याच्या सत्यतेची प्रचीति, तुम्हीं वरील प्रकरणांत उल्लेख केलेल्या बहुतेक सर्व विषयांना जे, संस्कृत वाङ्मयांतील, बरोबर लागू पडणारे श्लोकात्मक अनेक मथळे आधारा-दाखल दिले आहेत, त्यांनीं येत आहे. त्यायोगें, एरवीं नीरस वाटणाऱ्या हकी-गतीच्या निवेदनास एक प्रकारचा आकर्षकपणा अथवा मनोहारित्व प्राप्त झालें आहे.

या विषयासंबंधीं आम्हांला आणखी असें सांगावेंसें वाटतें कीं, आमच्या ( एक वेळच्या ) संस्थानांतील प्रजेच्या हिताकरितां करण्याचें जें कांहीं आम्हीं योजलें होतें, तें सर्व व पूर्णांशानें, अनेक कारणांमुळें, जरी आम्हांस घडवून आणतां आलें नाहीं, तरी जें करतां आलें तें करण्याइतकें व शेवटीं अखिल हिंदुस्थानरूपी आपणा सर्वांच्या मातृभूमीच्या सामर्थ्य-संघटनेप्रीत्यर्थ, तिच्या श्रेष्ठ, भव्य व व्यापक स्वरूपाच्या हितसंबंधांत आमचें, ईश्वरी न्यासाचें, वैयक्तिक हित समाविष्ट करण्याचें सुख अनुभवण्याइतकें दीर्घ आयुष्य आम्हांस दिल्याबद्दल परमेश्वरास आम्ही अनन्यभावें वंदन करतों.

तुमचें व आमच्या प्रजाजनांचें सदैव हित चिंतून, व तुमच्या विनंतीस मान्यता देऊन, श्रीरामाच्या

अपि स्वर्णमयी लङ्का न मे लक्ष्मण रोचते ।
जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ॥ रामायण

या वचनानें हें पत्र पुरें करतों. कळावें.

R. S. Pant Sachiv,

राजा, भोर

# अनुक्रमणिका

चित्रांक ७



शिवथरघळ, विचित्रगडाचे पश्चिमहद्दीला वर्धा घाटामध्यें असे. येथें श्री रामदासस्वामी यांनीं दासबोध हा ग्रंथ लिहिला.

# परिशिष्टें

# चित्रानुक्रमणिका

## ( नवी ) प्रस्तावना

या चौथ्या खंडाच्या ३०० प्रती बांधून तयार झाल्यानंतर, कांहीं गोष्टी त्यांत लिहिण्याच्या राहून गेल्या, त्या लिहाव्यात व मागील इतिहासाशीं संबंध असलेल्या इतरही नव्या गोष्टी लिहाव्यात व तसेंच ता. १७ सप्टेंबर १९४९ इ. हा दिवस श्रीमंतांच्या ७२ व्या वाढदिवसाचा असल्यानें, तोंपर्यंतची हकीगत याच खंडांत लिहावी असें मला वाटल्यावरून, मीं श्रीमंतांना त्याविषयीं विचारिलें. त्याप्रमाणें परवानगी त्यांनीं दिल्यानंतर, ही पुढील हकीगत या चौथ्या खंडांत लिहिण्यांत येत आहे.

दि. १७।९।१९४९ इ. } वि. गो. रानडे

# (नवी) अनुक्रमणिका

## — (नवी) चित्रानुक्रमणिका —

संदर्भ पान

## प्रकरण १ लें

# पुस्तक प्रकाशन

### श्रीमंतांच्या चरित्राचें प्रकाशन व अर्पण

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यास ता. १८ ऑगष्ट १९३९ रोजीं १७ वर्षें पूर्ण होऊन १८ वें वर्ष लागलें. या राज्यारोहणाच्या वाढदिवशीं दरसालच्या वार्षिक अहवालवाचनाखेरीज एक महत्त्वाचा कार्यक्रम करण्यांत आला. या दरबारास १९३८ इ. च्या डिसेंबरच्या घोषणेस अनुसरून सुधारलेल्या भोर म्युनिसिपालिटीचे लोकनियुक्त अध्यक्ष व सभासद उपस्थित होते. त्यांची श्रीमंतांस ओळख करून देण्यांत आली. तसेंच, संस्थानचे माजी शाळाधिकारी कै. श्री. वासुदेव नारायण जोशी यांनीं लिहिलेलें श्रीमंतांचें त्रिखंडात्मक चरित्र १९३९ पर्यंतचें श्रीमंतांना अर्पण करण्याचा समारंभ या दिवशीं करण्यांत आला. या समारंभा-करितां पुण्याहून प्रो. द. वा. पोतदार, रा. स. रा. सरदेसाई, व्यवसायविभूषण करपे, ग्रामभूषण तु. रा. पवार वगैरे पाहुणे मंडळी उपस्थित होती. श्रीमंतांनीं केलेल्या भाषणांत जोशी शाळाधिकारी यांच्याबद्दल आदरयुक्त उद्‌गार काढले व त्यांना पोशाख देऊन बक्षीस रुपये ५०० (पांचशें) देऊन त्यांचा गौरव केला.

श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपल्या भाषणांत खालील उद्गार काढले: "ग्रंथाच्या चांगुलपणाविषयीं आम्हीं कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. श्री. प्रो. दत्तो वामन पोतदार यांनीं आतांच केलेल्या भाषणावरून आपली त्याविषयीं खात्री होणार आहे. त्यांच्यासारख्या इतिहासप्रेमी व साहित्यपारंगत विद्वानानें ग्रंथाचा पुरस्कार लिहिणें, ह्यांतच ग्रंथाचें महत्त्व प्रतिबिंबित होत आहे, व म्हणूनच आम्हांसही त्याबद्दल आनंद वाटत आहे. श्रीयुत पोतदार येथें अगत्यपूर्वक नेहमीं येतात. आमच्याविषयीं व आमच्या संस्थानाविषयीं त्यांच्या मनांत आत्मीयतेची व स्नेहाची भावना आहे, व आम्हांस इतिहास वगैरे बाबतींत योग्य अशा सूचनाहि ते मधून मधून करतात. वास्तव, त्यांचा सत्कार करणें आमचें कर्तव्य आहे. अर्थात्, या प्रसंगाच्या निमित्तानेंच तें कर्तव्य आज आम्ही पार पाडीत आहोंत.

" फूल नाहीं, फुलाची पाकळी " या न्यायानें त्यांचा सत्कार करण्याच्या हेतूनें त्यांना गौरवार्थ आज आम्ही रु. २०० दोनशें देत आहोंत, त्यांचा ते स्वीकार करतील अशी आम्हांस आशा आहे. "

नंतर, श्री. करपे व रा. पवार यांना त्यांना दिलेल्या पदव्यांच्या सनदा व पदकें दिलीं. प्रो. पोतदार यांना रु. २०० पारितोषिक देऊन त्यांचा गौरव केला.

हीरक महोत्सवाच्या वेळीं केलेल्या घोषणेस अनुसरून नेमावयाच्या कमिट्या (जंगल-कमिटी व घटना-कमिटी) यांच्या सभासदांच्या नेमणुका जाहीर केल्या. हीरकोत्सवाच्या स्मरणार्थ कांहीं अधिकारी लोकांस व लोकपुढाऱ्यांस पदकें देण्यांत आलीं.

पदकें दिलेल्या सद्गृहस्थांमध्यें भोरम्युनिसिपालिटीचे लोकनियुक्त प्रेसिडेंट श्री. गहिनीनाथ माधव पानसे, बी.ए., एलएल.बी. यांचें, ते लोकनियुक्त प्रेसिडेंट म्हणून निवडून आल्याबद्दल, श्रीमंत राजेसाहेबांनीं या वेळीं अभिनंदन करून त्यांस हीरक-महोत्सवाचे स्मरणार्थ रौप्य पदक देऊन त्यांचा गौरव केला. नंतर त्या दिवशीं जाहीर केलेल्या घटनाकमिटीवर सभासद म्हणून त्यांची नेमणूक केली. सबब, या गौरवाबद्दल त्यांनीं या प्रसंगीं भाषण करून श्रीमंतांचे आभार मानले. त्यांचें भाषण विशेष उल्लेखनीय झालें तें परिशिष्टांत नं. १ ठिकाणीं दिलें आहे.

रा. जोशी यांनीं लिहिलेल्या चरित्राच्या प्रती श्रीमंत राजेसाहेबांनीं वर्ष-प्रतिपदेनिमित्त आपल्या स्नेह्यांना, हितचिंतकांना, कांहीं संस्थानिक बंधूंना व वरिष्ठ नोकर लोकांना भेट म्हणून दिल्या.

## भोर संस्थानच्या इतिहासाचें प्रकाशन

### ( १९१५ तें १९२२ )

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यास ता. १८ ऑगस्ट १९४१ रोजीं १९ वर्षें पुरीं होऊन २० वें वर्ष लागलें. या दिवशीं सालाबादप्रमाणें राज्यारोहण वाढदिवसदिन भोर येथें श्रीराम मंडपांत दरबार भरवून साजरा करण्यांत आला. १९४०-१९४१ या वर्षाचें भोर संस्थानच्या राज्यकारभाराचें इतिवृत्त संस्थानच्या दिवाणसाहेबांनीं वाचून दाखविल्यानंतर संस्थानचे माजी शाळाधिकारी कै. श्री. रा.

वासुदेव नारायण जोशी यांनीं भोर संस्थानच्या सन १९१५-१९२२ पर्यंतच्या ७-८ वर्षांच्या इतिहासाचें पुस्तक श्रीमंत राजेसाहेबांना अर्पण केलें. भोर संस्थानचा १९१५ इ.पर्यंतचा इतिहास कै. श्री. भागवत यांनीं तयार करून तो श्रीमंत राजेसाहेबांच्या वडिलांच्या कारकीर्दींतच प्रसिद्ध केला होता. पुढील भाग लिहिण्याचें त्या वेळीं राहून गेलें होतें, तें काम सदरहू रा. जोशी यांनीं पुरें केलें. सदरहू पुस्तकाचा स्वीकार करून श्रीमंत राजेसाहेबांनीं रा. जोशी यांना रु. १०० शंभर पारितोषिक म्हणून दिले; व मागील सालांतील महत्त्वाच्या गोष्टींचें समालोचन आपल्या भाषणांत केलें.

## विलायतच्या दुसऱ्या सफरीच्या वर्णनाच्या पुस्तकाचें प्रकाशन

भोर येथें मकरसंक्रमणानिमित्त भरविण्यांत आलेल्या दरबारांत ता. १४ जानेवारी सन १९४२ इ. रोजीं श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या सन १९३७इ.मधील बादशहांच्या राज्यारोहणासाठीं केलेल्या विलायतच्या दुसऱ्या सफरीच्या वर्णनाच्या पुस्तकाचें प्रकाशन केलें. या पुस्तकास कोल्हापूरचे दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेंट ले. क. पी. गेस्फर्ड यांनीं Foreword लिहिला आहे. हें पुस्तक श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वतः लिहिलेलें आहे. हें लिहिण्याच्या कामीं कै. रावसाहेब अनंत रामचंद्र जोशी यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना बहुमोल मदत केली. त्याबद्दल रावसाहेब जोशी यांच्या एकुलत्या एक कन्येस रु. ५०० पांचशेंची देणगी दिल्याचें श्री. राजेसाहेबांनीं दरबारांत जाहीर केलें.

## भोर संस्थानचें ऐतिहासिक स्थलवर्णन (मराठी व इंग्रजी) प्रकाशन

ता. २७ मे १९४५ रोजीं राजगड तालुक्यांतील नसरापूर गांवानजीक चेलाडी व बनेश्वर येथें हिंदवी स्वराज्य स्थापनेच्या घोषणेचा त्रिशतसांवत्सरिक महोत्सव साजरा झाला. त्या वेळीं " भोर संस्थानचें ऐतिहासिक स्थलवर्णन " या नांवाचें मराठी व Here Came Swarajya नांवाचें इंग्रजी पुस्तक दरबारतर्फे प्रसिद्ध करण्यांत आलें.

## शंकराजी नारायण यांच्या चरित्राचें प्रकाशन

सन १९४७ इ. सालीं २७ नोव्हेंबर रोजीं श्री. शंकराजी नारायण यांच्या पुण्यतिथि-महोत्सव प्रसंगीं ब्रह्मीभूत श्री. शंकराजी नारायण यांचें चरित्र प्रकाशित करण्यांत आलें. पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळांतील इतिहासप्रेमी

रा. कृ. वा. पुरंदरे यांनीं ऐतिहासिक कागदपत्रांच्या आधारें हें चरित्र परिश्रमपूर्वक लिहिलें. या कार्याबद्दल रु. ३०० तीनशेंचें श्री. शंकराजी नारायण पारितोषिक त्यांना देण्यांत आलें. श्री. शंकराजी नारायणांसंबंधीं अधिकृत माहिती या ग्रंथांत संकलित करण्यांत आलेली आहे.

रा. पुरंदरे यांचे श्रम लक्षांत घेऊन, तसेंच या ग्रंथासाठीं छापण्यास लागलेला खर्च भागावा, म्हणून आणखी रु. ३०० (तीनशें) त्यांना देण्यांत यावयाचे आहेत.

भोर येथील राजा रघुनाथराव हायस्कूलमधील शिक्षक रा. ग.वा. तगारे, एम्.ए. यांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक व सतत सहा वर्षांच्या परिश्रमानंतर सन १९४६इ. सालीं The Historical Grammar of Apabhramsa 'अपभ्रंशाचें ऐतिहासिक व्याकरण' हा ग्रंथ तयार केला व ह्यामुळें त्यांना मुंबई विश्वविद्यालयाची पीएच्. डी. ही बहुमानाची पदवी मिळाली. अशा ग्रंथाचें प्रकाशन झाल्यास त्याचा उपयोग जगांतील इतर देशांतील विद्वान् अभ्यासूंना होईल ह्या उदात्त हेतूनें व डॉ. तगारे यांनीं ह्याबाबत आर्थिक मदत छापण्याचे कामीं मिळावी म्हणून विनंति केल्यावरून श्रीमंत राजेसाहेब यांनीं, त्यांच्या अंगीं वसत असलेल्या अभिजात विद्याप्रेमामुळें, तसेंच आपल्या प्रजाजनांपैकीं एकानें केलेल्या कामाचें चीज व्हावें, म्हणून ३००० तीन हजार रुपयांची देणगी डॉ. तगारे यांच्या वरील पुस्तकासाठीं पुण्याच्या डेक्कन कॉलेज पोस्ट-ग्रॅज्युएट अँड रीसर्च इन्स्टिटयूटला डॉ. तगारे ह्यांच्या विनंतीवरून दिली. अशा उदार देणगीमुळेंच हें पुस्तक छापणें शक्य झालें हें त्यांनींच सदर ग्रंथाच्या Preface मध्यें व Introduction मध्यें लिहिलेलें आहे. तें परिशिष्टांत नं. २ ठिकाणीं दिलें आहे.

## प्रकरण २ रें

# युरोपांतील महायुद्ध व त्यास सहाय्याचे दरबारचे प्रयत्न

### सन १९३९ तें १९४६

जर्मनी व पोलंड यांच्या दरम्यान डँझिग बंदर व प्रशियांतील कॉरिडॉर म्हणून जर्मनीला पाहिजे असलेला प्रदेश, यांबाबत वाद उपस्थित झाला होता. हा वाद मिटविण्याचा इंग्लंडनें बराच प्रयत्न केला. परंतु, जर्मनीच्या दुराग्रही धोरणामुळें, शांततेच्या मार्गानें इंग्लंडच्या प्रयत्नांस यश येण्याचें चिन्ह दिसेना. जर्मनी शस्त्र हातीं धरून तें बंदर व तो प्रदेश मिळविण्याचा प्रयत्न करणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. युरोपमध्यें युद्धाचे वारे वाहूं लागले. पोलंडचें म्हणणें न्याय्य असल्यानें, इंग्लंडनें त्यास आपला पाठिंबा दिला. छोट्या राष्ट्रांचें स्वातंत्र्य, जागतिक शांतता, आंतरराष्ट्रीय कायदा आणि आपलें मित्रराष्ट्र पोलंड यांच्या संरक्षणार्थ इंग्लंडनें दिलेल्या हमीचें पालन, या सर्व गोष्टी लक्षांत घेतां, जर्मनीच्या सामोपचारानें न वागण्याच्या धोरणामुळें, लवकर युद्ध सुरू होण्याचा रंग दिसूं लागून, पोलंडच्या बाजूनें युद्धांत पडण्याची पाळी अगदीं थोड्याशा काळांतच इंग्लंडवर येणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. इतक्या थरावर परिस्थिति येऊन पोंचली, असें दिसून आल्याबरोबर श्रीमंत राजेसाहेब यांनीं बादशहांचे हिंदुस्थानांतील प्रतिनिधि लॉर्ड लिनलिथगो यांस खालील मजकुराची तार पाठविली.

To,

His Excellency The Crown Representative, Simla.

If war breaks out, which God forbid, my State will help His Majesty's Government to the farthest extent in its power.

Bhor, 30 August 1939

या तारेस नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांच्याकडून उत्तर पुढीलप्रमाणें लागलेंच आलें.

To, Raja of Bhor

In the name of His Imperial Majesty, to whom I am communicating your loyal message, I thank you most warmly for your loyal offer.

Simla 1st Sept. 1939.

Viceroy

यानंतर लवकरच, इतकेंच नव्हे तर, याच दिवशीं इंग्लंडनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें, आणि त्यासंबंधींची ता. ४ सप्टेंबर १९३९ रोजीं कोल्हापुराहून मे. रेसिडेंटसाहेब यांच्याकडून दरबारकडे खालील आशयाची तार आली.

To, Dewan, Bhor.

War has broken out with Germany. Please take any measures that may be necessary locally.

Residency, Kolhapur, 4th Sept. 1939.
Resident.

या विद्युत्संदेशास दरबारनें लागलेंच उत्तर पाठवून आवश्यक अशी सर्व तजवीज करण्यास दरबारची तयारी असल्याचें कळविलें. अशा स्वरूपाचे सहानुभूतीचे संदेश हिंदुस्थानांतील सर्व जनतेकडून व संस्थानाधिपतींकडून पाठविण्यांत आल्यामुळें बादशहांकडून मध्यवर्ती असेंब्लीकडे एक संदेश पाठविण्यांत आला. या संदेशांत त्यांनीं युद्धांत पडण्याचा पवित्र हेतू किती महत्त्वाचा आहे, याचें विवेचन केलें होतें. लोकशाही राष्ट्रांचें संरक्षण करणें व निर्बल राष्ट्रांना मदत करणें, हे उदात्त हेतू नजरेपुढें ठेवून बलाढ्य राष्ट्रांच्या अन्याय्य आक्रमणाच्या पारिपत्यासाठीं इंग्लंडनें युद्धांत पडण्याचें ठरविलें व हातीं शस्त्र धारण केलें असें म्हणून, हिंदी जनतेच्या व संस्थानिकांच्या सहानुभूतीबद्दल या संदेशांत फार आभार प्रदर्शित करण्यांत आले होते. हा संदेश प्रसिद्धीसाठीं मे. रेसिडेंटसाहेबांकडून दरबारकडे पाठविण्यांत आला. त्याची सर्व संस्थानांत दरबारनें ताबडतोब प्रसिद्धि केली.

युद्धसंधीचा फायदा घेऊन व्यापारी लोक नफेबाजी करूं लागले. सबब, त्यास आळा घालण्याकरितां दरबारनें लागलीच मुंबई सरकारनें केलेल्या कायद्यास अनुसरून कायदा संस्थानांत लागू केला. तसेंच, हिंदुस्थान सरकारचा ऑर्डिनन्स नं. १, होम डिपार्टमेंटचा वट हुकुम नं. २१-८४-३९ ता. २८-८-३९ इ. चा आणि भारत संरक्षणाचा कायदा, वटहुकूम आणि त्याअन्वयें केलेले नियम संस्थानांत, परिस्थित्यनुरूप त्यांत फेरफार करून, लागू केले. शिवाय, एअर क्रॅफ्ट ॲक्ट ( Air Craft Act ) व कॉइनेज ॲक्ट ( Coinage Act ) हे सप्टेंबर १९३९ इ. पासून लागू केले. भोर संस्थानास लागू केलेला भारत-

संरक्षण कायदा व नियम यांअन्वयें The British Controller or Controllers of Enemy Firms and British Indian Custodian or Custodians of Enemy Property म्हणून मे. रेसिडेंटचे सेक्रेटरी यांची संस्थानचे ऑफिसर म्हणून नेमणूक केली; व याबाबत त्यांच्याशीं पत्रव्यवहार करण्याचा संस्थानच्या दिवाणांना अधिकार ( हु. आ. नं. ९ ता. १४-१०-३९ इ. अन्वयें ) देण्यांत आला. संस्थानच्या दिवाणांना युद्धनियंत्रणाकरितां State Press Adviser नेमलें.

सन १९३९ चा Registration of Foreigners Act संस्थानला लागू करण्यांत आला; व त्याअन्वयें रेसिडेन्टसाहेबांची Provincial Registration Officer म्हणून आणि Superintendent of Police, Bhor State यांची State Registration Officer म्हणून नेमणूक केली. हिंदुस्थानांत शांतता व सुव्यवस्था राखण्याच्या दृष्टीनें चळवळीसंबंधीं प्रचारात्मक वाङ्मय, मग तें उघड अगर गुप्त असो, जप्त करून ठेवणें वगैरे बाबतच्या रेसिडेन्सीकडून वेळोवेळीं आलेल्या पत्रव्यवहारास अनुसरून दरबारनें जरूर त्या तजविजी ताबडतोब केल्या.

नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांनीं उभारलेल्या War Purposes Fund ला श्रीमंत राजेसाहेब यांनीं रु. १०,००० दहा हजारांची वर्गणी दिली. त्यानंतर लवकरच नेक नामदार व्हाइसरॉयसाहेबांनीं रेडक्रॉस सोसायटी, सेंट डंस्टन्स फंड व सेंट जॉन अँब्युलन्स असोसिएशन, यांकरितां हिंदुस्थानांतील सर्व गरीब, श्रीमंत लोक, संस्थानिक वगैरे लोकांनीं यथाशक्ति युद्धास मदत म्हणून वर्गणी पाठवावी, अशा आशयाचें जाहीर विनंतिपत्रक ( General Appeal ) प्रसिद्ध केलें. या विनंतिपत्रकास अनुसरून मदत देण्याच्या हेतूनें वर्गणी गोळा करण्याकरितां श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं भोर नगरवासीजनांची ता. ३१-१-१९४० रोजीं एक सभा भरविण्यांत आली. या सभेच्या सुरवातीस श्रीमंतांनीं भाषण करून वरील तिन्ही संस्था किती उपयुक्त कार्य करीत आहेत, याची माहिती लोकांस सांगून वर्गणी देण्याची विनंति केली. त्याप्रमाणें रु. ७५० वर्गणी जमा झाली. ती दिल्ली येथील सदर संस्थांच्या सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आली. या तीनही संस्थांना श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपली रु. २०० वर्गणी दिली.

भोर संस्थान कायदेमंडळाच्या सप्टेंबर १९३९ मध्यें भरलेल्या आठव्या बैठकींत बादशहांच्या सैन्यास यश मिळण्याबद्दल परमेश्वराची प्रार्थना करणारा ठराव पास करण्यांत आला. तो ठराव खालीलप्रमाणें होता.

( *a* ) "Sad news had reached here that War has broken out on lst September 1939. It is feared that this conflagration will spread over the whole world, resulting in a great war. Every one wishes an early end of this calamity.

( *b* ) "British Government is prepared to meet this danger with boldness and courage befitting the seriousness of the occasion; and this Legislative Council of the Bhor State offers its sincere prayers to God Shri-Ramchandra ( the family deity of the Raja Saheb ) to bless the Imperial Government with speedy success and to have a lasting world-wide peace and happiness."

वरील ठराव नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब व मे. रेसिडेंटसाहेब, कोल्हापूर, यांजकडे पाठविण्यांत आला. नेक नामदारसाहेबांच्या प्रायव्हेट सेक्रेटरीकडून दरबारास खालीलप्रमाणें उत्तर आलें.

Viceregal Lodge,
Simla, 15th Sept. 1939.

My dear Rajasaheb,

His Excellency asks me to thank you most warmly for your letter dated the 5th Sept. with which you enclose a resolution passed by the State Legislative Council on 3rd instant and to say how greatly he appreciates this loyal message from the members of the Legislative Council of Bhor State,

Yours sincerely,
J. G. Laithwaite.

ता. १३ जुलै १९४० रोजीं श्रीमंत राजेसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं राजवाड्यांत श्रीराम मंडपांत एक सभा भरविण्यांत येऊन, साम्राज्य सरकारास महायुद्धाच्या आणीबाणीच्या वेळीं संस्थानला काय साहाय्य करणें शक्य आहे, याचा विचार करण्यांत आला. या सभेच्या सुरुवातीला, मे. रानडे यांनीं जमलेल्या लोकांस सभेचा उद्देश समजावून सांगितल्यावर, श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण केलें.

श्रीमंतांच्या भाषणानंतर, भोर येथील प्रमुख वकील कै. रा. ग. मा. पानसे यांनीं भाषण करून श्रीमंतांच्या भाषणास दुजोरा दिला; नंतर एक ठराव पास करण्यांत आला. या ठरावानें आर्थिक साहाय्यसमिती नेमण्यांत यावी, असें ठरविण्यांत आलें. दुसरा ठराव कै. रा. रा. वासुदेव सदाशिव पाटणकर वकील यांनीं मांडला, तो पास करण्यांत आला. या ठरावानें सत्ययुद्धवार्ताप्रसार-समिति नेमण्यांत आली. या दोन्ही ठरावांवर रा. अ. रा. उपाध्ये, रा. ल. मा. देवी वकील, रा. क. अ. गुप्ते वकील, रा. स. कृ. शिंदकर इनामदार, रा. जोग-देव वकील, रा. शं. ल. लिमये वकील वगैरे मंडळींनीं उचित भाषणें केलीं.

श्रीमंत राजेसाहेब यांनीं स. १९४० इ. सालीं युद्धकार्यास मदत म्हणून पुन्हां रु. १०००० दहा हजार पाठविले. त्याबद्दल ता. १९ जुलै १९४० रोजीं कोल्हापूर येथील रेसिडेंटसाहेब यांच्याकडून पत्र आलें. त्यांत ते म्हणतात कीं,

" I write to convey to you H. E. The Crown Representative's thanks for your further generous contribution of Rs. 10,000 for War Purposes, which His Excellency gratefully accepts. "

ता. ८ सप्टेंबर १९४० रोजीं राष्ट्रीय प्रार्थनादिन संस्थानांत पाळण्यांत आला. बकिंगहॅम राजवाड्यावर झालेल्या बॉंबहल्ल्यांतून बादशहा व महाराणी यांची आश्चर्यजनक रीतीनें सुटका झाल्याची बातमी समजली, तेव्हां श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. १५ सप्टेंबर रोजीं हि. ए. बादशहांचे प्रतिनिधि यांना विद्युत्-संदेश पाठवून त्याबद्दलचा आनंद व्यक्त केला. तो—

" Kindly convey their Imperial Majesties my deep feelings of joy to read Their miraculous escape from the explosion of bombs in the Buckingham Palace. "

या संदेशाचें कोल्हापुराहून रेसिडेंटसाहेब यांचें ता. १९ मार्च १९४१ रोजीं खालीलप्रमाणें उत्तर आलें.

" His Excellency The Crown Representative has received the Commands of His Majesty the King Emperor to convey to you His Imperial Majesty's appreciation of the loyal sentiments to which your telegram under reference gives expression. "

या वेळीं भोर येथें ललितकला नाटक मंडळीचे खेळ चालू होते. या कंपनीनें श्रीमंत राजेसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं 'शिक्काकट्यार' या ऐतिहासिक नाटकाचा प्रयोग युद्धकार्यास मदत देण्याच्या हेतूनें केला. या खेळाच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं सुमारें रु. १०० शंभर किंमतीचा एक पोषाख कंपनीस दिला. या खेळाच्या उत्पन्नाच्या रकमेपैकीं रु. १८४ एकशेंचौऱ्याऐंशीं कंपनीनें युद्धास मदत म्हणून दिले.

नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांनीं, ता. २३ मार्च १९४१ रोजीं सर्व हिंदुस्थानभर युद्धांत इंग्लंडला यशःप्राप्ति व्हावी, म्हणून प्रार्थना करण्यांत यावी असें जाहीर विनंतिपत्रक प्रसिद्ध केलें होतें. त्यास अनुसरून संस्थानांत श्रीमंत राजेसाहेबांच्या आज्ञेप्रमाणें या दिवशीं सार्वत्रिक प्रार्थना करण्यांत आली.

सन १९४१ च्या मे महिन्यांत श्रीमंत राजेसाहेबांचा मुक्काम महाबळेश्वर येथें होता. तेथून त्यांनीं युद्धसहाय्यार्थ आणखी रु. १०००० दहा हजारांची देणगी नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांच्याकडे पाठविली; आणि या देणगीचा विनियोग भोर संस्थानच्या नांवाचा एक रणगाडा (Armoured Carrier) खरेदी करण्याकडे करावा, अशी इच्छा प्रदर्शित केली. या उदार देणगीबद्दल ता. ५ मे सन १९४१ रोजीं डी. ओ. नं. पी. १७/४१ चें कोल्हापुराहून रेसिडेंटसाहेबांनीं पत्र पाठवून श्रीमंतांचे आभार मानले. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें कीं,

" It was with great pleasure that I have received your letter dated the 25th April 1941 on the above subject, communicating your generous offer of Rs. 10,000 to meet the cost of an Armoured Carrier. I have forwarded your letter to the Secretary to His Excellency the Crown Representative and I should like to take this opportunity of offering my sincere thanks to you and the State for your great generosity. This gift is one more splendid instance of your well-proved loyalty and cooperation.

" I will not fail to inform H. E. that it is your desire that the Armoured Carrier purchased out of your generous donation should bear the name of your State. "

भोर संस्थानच्या नांवानें Armoured Carrier घेण्यांत येण्याकरितां श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. १०,००० देण्याचें ठरविल्याबद्दल मे. रेसिडेंटसाहेबांनीं नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांना कळविलें. त्याबाबत नेक नामदार व्हाइसरॉय-साहेबांच्याकरितां रेसिडेंटसाहेबांनीं खालील आशयाचें आभारप्रदर्शक पत्र ता. १०-६-४१ रोजीं पाठविलें.

"I write to convey to you His Excellency the Crown Representative's thanks for your generous contribution of a sum of Rs. 10,000 to His Excellency the Viceroy's War Purposes Fund, which His Excellency gratefully accepts. The Armoured Carrier will be inscribed as desired by you."

या देणगींतून खरेदी करण्यांत आलेल्या Armoured Carrier चा फोटो रेसिडेंटसाहेब, कोल्हापूर, यांनीं श्रीमंत राजेसाहेब यांजकडे जून १९४२ मध्यें पाठविला.

दिल्ली येथें ता. १५ मार्च १९४१ रोजीं इंपीरियल हॉटेलमध्यें लेडी डोरीन होप दिल्ली एअर-क्राफ्ट फंडाच्या मदतीकरितां चित्रकला-प्रदर्शन भर-विण्यांत आलें. त्याच्या उद्घाटनसमारंभास श्रीमंत राजेसाहेब, नरेंद्र मंडळाच्या बैठकीकरितां या वेळीं दिल्ली येथें ते गेले असल्यामुळें, हजर राहिले. या प्रदर्शनांतील वस्तूंपैकीं काश्मीरमधील लिडार व्हॅलीचें चित्र श्रीमंतांनीं रु. २५० अडीचशेंला विकत घेतलें व युद्धकार्यास या रीतीनें मदत केली.

ता. २० जुलई १९४० रोजीं कोल्हापूरच्या रेसिडेंटसाहेबांकडून पत्र आल्यावरून रेड क्रॉस सोसायटीच्या मदतीकरितां कोल्हापूर कॅम्प जिमखान्याच्या अध्यक्षांनीं कोल्हापूर रेसिडेन्सींत भरविलेल्या जत्रेस श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. ५० देणगी दिली.

बेळगांव जिल्ह्याचे कलेक्टर यांनीं बेळगांव रुपी प्राइज फंड उभारला. या फंडाचीं रु. २५० अडीचशेंचीं तिकिटें खरेदी करून श्रीमंत राजेसाहेब व भोर संस्थानचे प्रजाजन यांनीं या फंडास मदत केली. या मदतीबद्दल रेसिडेंट कोल्हापूर यांनीं ता. २७ मे सन १९४१ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांना पत्र पाठवून आभार मानले.

संस्थानच्या प्रजाजनांनीं रु.९०५ नऊशें पांचचीं डिफेन्स सर्टिफिकेट्स खरेदी केलीं. शिवाय, नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांनीं युद्धकार्यफंड War Purposes Fund उभारला होता, त्यास मदत म्हणून भोर संस्थानच्या प्रजाजनांनीं रु. ३००० तीन हजारपर्यंत मदत केली. ही रक्कम दिल्ली येथील या फंडाचे जनरल सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आली; व त्याबद्दल कोल्हापूर येथें मे. रेसिडेंट-साहेब यांच्या सेक्रेटरीस ता. ४ जुलई १९४१ रोजीं संस्थानच्या दिवाणांनीं पत्र पाठवून कळविलें.

नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांनीं या रकमेचा स्वीकार केल्याबद्दल त्यांच्या सेक्रेटरींनीं ता. ३१ जुलै १९४१ रोजीं खालीलप्रमाणें पत्र पाठवून श्रीमंतांना कळविलें.

"I am directed to convey to the Bhor Darbar His Excellency the Crown Representative's thanks for the contribution from the Bhor State subjects to His Excellency the Viceroy's War Purposes Fund, which His Excellency gratefully accepts."

श्रीमंत राजेसाहेबांनीं युद्धविषयाबाबत अनेक वेळां केलेल्या भाषणांतून, संस्थानच्या प्रजाजनांनीं युद्धकार्यास मदत करण्यासाठीं पुढें यावें, मग ती मदत कोणत्याहि मार्गानें आर्थिक साहाय्य करून अगर स्वतः रिक्रूट म्हणून सैन्यांत दाखल होऊन अगर अन्य तऱ्हेनें असो, पण अशी मदत करून प्रत्येक प्रजाजनानें युद्धास साहाय्य करावें अशी श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपली उत्कट इच्छा व्यक्त केली होती. या इच्छेस मान देऊन प्रजेपैकीं कांहीं लोक युद्धास मदत करण्यास पुढें आले. तथापि, बऱ्याच प्रमाणांत सैन्यभरतीसाठीं लोक तयार व्हावे, म्हणून श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. २९-५-१९४० रोजीं एक जाहीरनामा प्रसिद्ध करून सर्व लोकांस असें कळविलें कीं, भोर संस्थानच्या रयतेपैकीं जो इसम सैन्यांत दाखल होऊन प्रत्यक्ष रणांगणावर जाईल, तो इसम तेथें काम करीत असेपर्यंत, त्याच्या घरच्या मंडळीस दरमहा रु. २ प्रमाणें तैनात देण्याचें, आणि असा इसम युद्धानंतर परत आल्यावर त्यास व, तो युद्धांत कामीं आल्यास, त्याचे कुटुंबास, इनाम जमीन अगर जमिनीची किंमत बक्षीस म्हणून देण्याचें ठरविलें आहे. या जाहीरनाम्याचें वैशिष्ट्य कीं, त्याची अंमलबजावणी ता. ३ सप्टेंबर १९३९ पासून करण्यांत यावी असेंही त्यांनीं ठरविलें होतें. तसेंच, स. १९२५ इ. चा

इंडियन सोल्जर्स ॲक्ट ४ था—थोडे फेरफार करून—लागू करण्यांत येऊन त्या अन्वयें रिक्रूट्सना सवलती देण्यांत आल्या. या सवलती ता. १ सप्टेंबर १९३९ पासून दिल्या जातील, असेंही आणखी ठरविण्यांत आलें.

अशा प्रकारें सैन्यभरतीसंबंधीं भोर दरबारनें केलेले विशेष प्रयत्न निदर्शनास आल्यावर, त्याबाबत दरबारचा गौरव व अभिनंदन करणारें पत्र मे. रेसिडेंटसाहेब, कोल्हापूर, यांच्याकडून आलें.

या सर्व प्रयत्नांचा परिणाम म्हणून सन १९४२ इ. अखेर सुमारें ७५ इसमांनीं आपलीं नांवें सैन्यांत दाखल करून घेतलीं.

युद्धकालांत आवश्यक म्हणून ब्रिटिश हिंदुस्थानांत लागू करण्यांत आलेले सर्व कायदे व वटहुकूम Ordinances व भारत संरक्षण कायदा संस्थानांत लागू करण्यांत आला.

हर एक्सलन्सी मार्चिओनेस ऑफ लिनलिथगो यांनीं An Association for Moral and Social Hygiene in India and the New Sanatorium at Simla, या दोन संस्थांना देणगी मिळविण्याकरितां जाहीर विनंतिपत्रक प्रसिद्ध केलें. त्याबाबत श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. १ मे व ता. ६ जून १९४१ रोजीं दोन पत्रें पाठविलीं. या दोन संस्थांना श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. २६ जून १९४१ रोजीं पत्र पाठवून रु. ५०० ची देणगी दिली; व ती रकम या दोन्ही संस्थांमध्यें विभागून अगर कोणत्याहि एका संस्थेच्या उपयोगासाठीं ह. ए. मार्चिओनेस यांच्या इच्छेनुसार विनियोगिली जावी, अशी आपली इच्छा प्रदर्शित केली. त्या पत्राचें खालीलप्रमाणें उत्तर हर एक्सलन्सी मार्चिऑनेस यांचेकडून ता. ३० जून सन १९४१ रोजीं सिमल्याहून आलें.

" Many thanks for your letter and your kind donation of Rs. 500/– which I will use for the Lady Linlithgow Sanatorium of Kasauli. "

" I do indeed know of your Darbar's contributions to the Viceroy's War Purposes Fund and I am delighted to hear that the Darbar has also undertaken to pay monthly allowance to families or near relatives of the State subjects, who are already on field service. "

" The Viceroy and I both appreciate the support which you are giving to the War effort, and I only sent you the appeal, as it was going out to all the other Princes, with whom I am acquainted, for them to have the chance of subscribing, should they be in a position to do so."

ता. ७ सप्टेंबर सन १९४१ रोजीं नेक नामदार व्हाइसरॉय यांच्या इच्छेस अनुसरून भोर येथील श्री दत्त मंदिरांत मे. दिवाणसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरवून सार्वजनिक प्रार्थना करण्यांत आली. या सभेंत श्री. ग. मा. पानसे वकील, श्री. वि. गो. रानडे, कौन्सिलर, वगैरे मंडळींनीं युद्धविषयावर भाषणें केलीं. भोर संस्थानांतील पांचही तालुक्यांच्या ठाण्यांच्या ठिकाणीं सभा भरवून प्रार्थना करण्यांत आल्या.

विमान-हल्ल्यापासून बचाव करण्याबाबत ब्रिटिश हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं शिक्षणाची तजवीज करण्यांत आली होती. भोर संस्थानच्या प्रजाजनांना याबद्दलची माहिती असणें जरूर आहे, असें वाटल्यावरून श्रीमंत राजेसाहेबांनीं पुणें येथील श्री. डी. पी. जोशी, ॲसिस्टंट आर्गनाइझिंग कमिशनर, बॉयस्काउट्स असोसिएशन व फर्स्टक्लास ए. आर. पी. इन्स्पेक्टर, यांना मुद्दाम भेटीस बोलविलें व ए. आर. पी. वर भोर येथें व्याख्यान देण्याबद्दल त्यांना विनंति केली. त्याप्रमाणें त्यांनीं ता. २४ डिसेंबर १९४१ रोजीं भोर येथें येऊन श्रीराम मंडपांत माहितीपूर्ण व्याख्यान दिलें. या व्याख्यानाच्या वेळीं संस्थानचे दिवाण अध्यक्ष होते. व्याख्यानास भोर येथील सर्व लहान-थोर नागरिक उपस्थित होते. ए. आर. पी. ची माहिती थोडक्यात पण उत्तम प्रकारें दिल्याबद्दल श्री. पाटणकर वकील यांनीं श्री. जोशी यांचे आभार मानले.

कोल्हापूरच्या रेसिडेंटच्या पत्नी मिसेस गेसफोर्ड यांनीं रेड क्रॉस सोसायटीच्या मदतीसाठीं फंड उभारला होता. या फंडास श्रीमंत राजेसाहेब यांनीं रु. १०० शंभरची देणगी दिली. त्याबद्दल ले. क. गेसफर्ड व मिसेस गेसफर्ड यांनीं अनुक्रमें ता. १३ व ता. १९ नोव्हेंबर १९४१ रोजीं पत्रें पाठवून श्रीमंतांचे आभार मानले.

तसेंच, कोल्हापूर रेसिडेन्सी क्लबच्या रेड क्रॉस व वॉर परपजेस फंडास रु. १५० दीडशेंचीं तिकिटें खरेदी करून मदत करण्यांत आली.

श्रीमंत राजेसाहेबांनीं चायना फंडाच्या मदतीसाठीं रु. १०१ एकशें एक नेक नामदार व्हाइसरॉयसाहेबांच्या युद्धफंडाच्या ऑनररी खजिनदाराकडे पाठविले, त्याबद्दल आभाराचें पत्र त्या फंडाच्या खजिनदारांकडून आलें.

ता. २४-२-१९४२ रोजीं पुणें येथें रेल्वे स्टेशनवर लेडी हेग क्यांटीन फॉर इंडियन ट्रुप्स ( Lady Haig Canteen for Indian Troops ) याचा उद्‌घाटनसमारंभ झाला. हर एक्सलन्सी लेडी लमले यांना त्याचें उद्‌घाटन करण्याचा मान देण्यांत आला होता. या समारंभास श्रीमंतांस निमंत्रण आलें होतें. श्रीमंत राजेसाहेब हे हजर राहिले. रु. ३०० तीनशेंची देणगी त्यांनीं त्या संस्थेच्या कार्यास दिली.

युद्धकालांत युद्धोपयोगी कामें व युद्धवस्तूंचा पुरवठा व उत्पादन जास्त प्रमाणांत व्हावें, यासाठीं दिवसाचा जास्तींत जास्त उपयोग करण्याच्या हेतूनें कामाचे तास सर्व ठिकाणीं एक तास अगोदर सुरू करण्याचें हिंदुस्थान सरकारनें ठरविलें. नेहमींच्या घड्याळाप्रमाणें कामाच्या सुरुवातीचा एक तास अलिकडे—उदाहरणार्थ, ११ च्या ऐवजीं १० वाजतां— मुक्रर करून हें काम शक्य झालें असतें. परंतु, तसें करण्यानें कामगारांना आपल्याकडून जास्त तास काम घेतलें जातें कीं काय, असा नुसता संशय वाटण्यास तें कारण झालें असतें. तसें वाटूं नये, म्हणून ता. १ सप्टेंबर १९४२ पासून घड्याळें एक तास पुढें करण्यांत आलीं; म्हणजे सकाळीं १० वाजण्याच्या वेळीं ११ वाजतील असें ठरविण्यांत आलें. असें करण्यानें कामगारांना, कामाच्या सुरुवातीचा तास पूर्वींचाच राहिल्यामुळें, चुकल्यासारखें न वाटतां पूर्वींप्रमाणेंच आपण काम करीत आहोंत असें वाटून, कामहि भरपूर प्रमाणांत होऊं लागलें, व लवकर त्यांना आपल्या घरीं जातां येऊं लागलें. युद्धकालापुरता हा बदल कायम ठेवण्याचें ठरविण्यांत आलें. जादा ग्याझेट काढून भोर संस्थानांतहि घड्याळाचा हा बदल जारी करण्यांत आला होता. पुढें स. १९४५ इ. मध्यें युद्ध समाप्त झाल्यावर, ता. १५ आक्टोबरपासून वेळ पूर्ववत् करण्यांत आली. युद्धकाळांत संस्थानांतलें वातावरण शांततेचें असल्याची हकीकत कोल्हापूरच्या रेसिडेंटसाहेबांना समजल्यावर, त्यांनीं ता. ३१ ऑगस्ट १९४१ रोजीं मुद्दाम पत्र पाठवून श्रीमंतांना शांतता व सुव्यवस्था राखल्याबद्दल गौरविलें.

त्यानंतर लवकर त्यांची दुसरीकडे बदली झाली. दुसऱ्या जागेवर हजर होण्यास जाण्यापूर्वी, त्यांच्या मागून येणाऱ्या रेसिडेंटला चार्ज देतांना, ता. २२-१०-१९४६ रोजीं त्यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना खालीलप्रमाणें पत्र पाठविलें.

" On the eve of handing over charge of my office to Colonel Edwards, I take this opportunity to send a message of farewell to you and to thank you most sincerely for the consistent cooperation and friendship which you have extended to me during these last 2½ years. I am afraid that I am leaving you at a time when the political horizon is clouded over but from what I have seen of the manner in which the Bhor State has been kept clear of the trouble in these last three months, I feel that it would be proper for me to convey my congratulations and at the same time my confidence that you will continue to handle the situation just as tactfully and firmly in the future as in the past. Although my official relations are now being severed, I hope that in the years to come I may still be privileged to continue the friendly personal relations which have been so happily established between us, "

महायुद्धाचीं तीन वर्षें पुरीं होऊन चौथ्या वर्षांत पदार्पण झाल्यावर, साम्राज्य सरकारच्या फौजेस युद्धांत जय मिळावा, म्हणून हिंदुस्थान सरकारनें प्रार्थनादिन ता. ६-९-४२ रोजीं पाळावा असा जाहीर आदेश दिला. त्यास अनुसरून या दिवशीं भोर येथें सभा भरवून जाहीरपणें सामुदायिक प्रार्थना करण्यांत आली.

इजिप्तमध्यें दोस्त व गट्टी (शत्रू) राष्ट्रें यांचें निकराचें युद्ध ऑक्टोबर-नोव्हेंबर १९४२ मध्यें झालें. या युद्धांत दोस्तांना जयप्राप्ति व्हावी, म्हणून हिंदुस्थान सरकारच्या आदेशानुसार ता. २२-११-४२ रोजीं भोर येथें श्रीदत्त मंदिरांत सामुदायिक प्रार्थना करण्यांत आली.

ट्युनिशियांत निकराचें युद्ध होऊन दोस्तांनीं गट्टी राष्ट्रांच्या सैनिकांस नेस्तनाबूद केलें व अत्यंत महत्त्वाचा असा जय संपादन केला. या जयामुळें एकंदर युद्धपरिस्थितींत दोस्तांच्या दृष्टीनें महत्त्वाचा अनुकूल पालट झाला असल्यानें, 'ट्यूनिशिया डे' म्हणून ता. २१-५-४३ हा दिन पाळण्यांत आला.




रणगाडा ( Armoured Carrier ). श्रीमंत राजेसाहेब यांनीं रुपये दहा हजार (१०,०००) ने. ना. व्हाइसरॉय यांच्या वॉर-फंडास स. १९४१ सालीं दिले. त्यांतून हा रणगाडा विकत घेतला. [ सं. पा. १३

या दिवशीं भोर येथें सकाळीं परेड झाली. ग्रामदेवतांना अभिषेक करण्यांत आले. गरिबांना अन्नदान दिलें. शाळेंत मुलांमुलींना या आनंदाप्रीत्यर्थ मिठाई वांटण्यांत आली व सायंकाळीं श्रीदत्तमंदिरांत जाहीर सभा भरवून प्रार्थना करण्यांत आली. संस्थानांत सर्व प्रमुख ठिकाणीं याचप्रमाणें कार्यक्रम करण्यांत आले. श्रीमंत राजेसाहेब यांचा मुक्काम या वेळीं महाबळेश्वर येथें होता. तेथें ते 'ट्यूनिशिया डे' साजरा करण्याकरितां झालेल्या सभेस उपस्थित राहिले होते.

युद्धकार्य निर्वेध व जोरानें चालू राहावें म्हणून, राष्ट्रीय आघाडी निर्माण करणें हिंदुस्थान सरकारास जरूर वाटल्यानें त्या दिशेनें प्रचारकार्य सुरू करण्यांत आलें. या आघाडीच्या प्रचारकाकडे युद्धसाहाय्याचें महत्त्व लोकांना पटवून देण्याचें कार्य सोंपविण्यांत आलें. या आघाडीचे प्रचारक श्री. केळकर, श्री. (आतां रा. ब.) गडकरी व श्री. खरे यांनीं भोर येथें येऊन ता. २३-१०-४२ रोजीं व्याख्यान दिलें व युद्धांत ब्रिटिशांना साहाय्य करणें किती जरूरीचें आहे ही गोष्ट श्रोत्यांना पटवून दिली व त्याचा फार उपयोग झाला.

वर उल्लेख केलेल्या मदतीशिवाय, श्रीमंत राजेसाहेबांनीं युद्धसाहाय्यासाठीं खालील देणग्या सन १९४२-४३ या वर्षी दिल्या.

कोल्हापूर येथील दक्षिणी संस्थानचे रेसिडेंट ले. क. एडवर्ड्स यांनीं भोरास ता. १३ फेब्रुवारी १९४३ रोजीं भेट दिली. या भेटीप्रीत्यर्थ वॉर फंडास मदत म्हणून रु. २००० दोन हजारांची देणगी दिली.

पुणें जिल्ह्याच्या युद्धसाहाय्य कमिटीच्या स्त्री-समितीनें Red Cross Fete भरविलें, त्यांस रु. २५ पंचवीस पाठविले.

कोल्हापूर आणि दक्षिणी संस्थानें यांच्या कोल्हापूर येथील रेड क्रॉस सोसायटीच्या फंडास सन १९४३ इ. च्या एप्रिलपासून दरमहा रु.४० चाळीस-प्रमाणें देणगी एक वर्षपर्यंत दिली.

सेंट डंस्टन्स फंडास भोरच्या राजेसाहेबांची व प्रजाजनांची देणगी पाठविल्याचा वर उल्लेख आलाच आहे. त्या संस्थेचे हिंदुस्थानचे प्रतिनिधि मेजर सर क्लुथा मॅकेंझी ( Major Sir Clutha Mackenzie ) यांजकडून ता. १६-४-४३ चें श्रीमंत राजेसाहेब यांना पत्र आलें. त्यांत वरील देणगीबद्दल आभार मानतांना, त्यांनीं लिहिलें कीं,

" I returned to India not long ago and on looking back through the subscription-lists, I came across a most generous donation from the people of Bhor State and hasten to ask you to please convey to them a special message from St. Dunstan's. Our activities in Britain are going on splendidly and already many of the men, blinded earlier in the War, are back at work on useful service as masseurs, telephone operators, in aircraft and other factories, lecturers, basket-makers and so on."

" Here in India we are actively helping each of the War-blinded Indians as best suits his circumstances."

महाबळेश्वर येथें स्वस्त धान्याचें दुकान काढण्यास मदत, म्हणून रु. १०० शंभर श्रीमंत राजेसाहेबांनीं दिले.

पुणें जिल्हा रेड क्रॉस फंडास श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. ४४ चवेचाळीस दिले; शिवाय, या फंडास प्रचंडगड तालुक्यांतील प्रजाजनांची देणगी म्हणून, रु. २५ पंचवीस मामलेदार यांनीं पाठविले.

नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांनीं महायुद्ध सुरू झाल्यास पांच वर्षें पुरीं झालीं, त्यानिमित्त सार्वजनिक प्रार्थनेचा दिन ता. ५-९-१९४३ इ. हा पाळावा असें फर्मान काढलें. त्यास अनुसरून भोर येथें रा. सा. दिवाण याच्या अध्यक्षतेखालीं 'पंचम युद्धदिन' पाळण्यांत आला व सार्वजनिक प्रार्थना करण्यांत आली.

हिज हायनेस महाराजसाहेब देवास (सीनियर) यांनीं युद्धावर काम करण्याकरितां किंग्ज कमिशनसाठीं लोक ( रिक्रूट) मिळावेत, म्हणून संस्थानांतून दौरा काढला. या दौऱ्याच्या कार्यक्रमांत त्यांनीं ता. १३-२-१९४४ रोजीं भोरास भेट दिली. या कामावर नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांनीं त्यांची योजना केली होती. भोर येथील मुक्कामांत श्रीमंत राजेसाहेबांनीं राजवाड्यांत दरबार भरवून त्यांचें स्वागत केलें. स्वागतपर भाषणांत त्यांनीं अंगिकारलेल्या कार्याबद्दल त्यांचें अभिनंदन करून यश चिंतिलें. हि. हा. महाराजसाहेबांनीं संस्थानांतील लोकांना युद्धपरिस्थिति समजावून सांगितली व युद्धास सक्रिय साहाय्य करणें योग्य असल्यानें, रिक्रूटभरती होण्यास लोकांनीं उत्सुकतेनें पुढें यावें, अशी विनंति केली. या त्यांच्या भेटीनिमित्त श्रीमंत राजेसाहेबांनीं व्हाइसरॉयसाहेबांच्या War Purposes फंडास रु. ३००० तीन हजारांची देणगी

दिली व हि. हा. महाराजांनीं आपल्या इच्छेप्रमाणें त्या पैशाचा विनियोग करावा असें सुचविलें. या देणगीचा विनियोग कोल्हापूर येथें महाराष्ट्रीय ब्राह्मणांकरितां काढण्यांत आलेल्या कॅडेटच्या वर्गाकडे करण्यास श्रीमंत राजेसाहेबांनीं आपली संमति दिली.

दुसऱ्या दिवशीं ता. १४-२-४४ रोजीं हि. हा. महाराजांनीं भोर येथील लायब्ररी, म्यूझिअम, श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय, इत्यादि संस्थांस भेटी दिल्या. दुपारीं राजवाड्यांत श्रीमंतांनीं त्यांना मेजवानी दिली, व ३॥ साडेतीन वस्त्रांचा आहेर करून त्यांचा यथोचित गौरव केला. भोजनोत्तर महाराजसाहेबांनीं येथील तीन कॅडेट्सना मुलाखत (Interview) दिली; व त्यांपैकीं एकजण पसंत करून सेंट्रलबोर्डाकडे शिफारस करण्यांत येईल असें त्यांस सांगितलें. सायंकाळीं त्यांनीं भोर हायस्कूलला भेट दिली; व नंतर भाटघर येथील धरण पाहून त्यांत स्टीम लॉंचमध्यें बसून कांहीं वेळ सहल केली.

श्रीमंत राजेसाहेबांनीं हि. हा. महाराजासाहेब यांच्यामार्फत दिलेल्या रु. ३००० देणगीचा साभार स्वीकार केल्याचें नेक नामदार व्हाइसरॉय यांच्याकडून लिहून आलें असून, श्रीमंत राजेसाहेबांच्या हेतूप्रमाणें सदरहू रकमेचा विनियोग करण्याबाबत म... ...द्दल लिहून आल्यावर कळविण्यांत येईल, अशा अर्थाचें पत्र मे. रेसिडेंटसा... कोल्हापूर यांजकडून ता. २-५-१९४४ चें आलें.

यानंतर, ता. १३-४-१९४४ इ. रोजीं मे. ले. क. सी. जी. एन. एडवर्ड्स यांनीं भोरास वार्षिक भेट दिल्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. २००० दोन हजारांची देणगी व्हाइसरॉयसाहेबांच्या वॉर पर्पजेस फंडास दिली.

महायुद्धाच्या सहाव्या वर्षास सुरुवात झाली व युद्ध लवकर समाप्त होईल असें न वाटल्यावरून, मुंबईचे गव्हर्नर यांनीं रिक्रूट भरतीचे प्रयत्न जारीनें करण्यांत यावे, असें संदेशद्वारा प्रकट केलें. श्रीमंत राजेसाहेबांनाहि हा संदेश मिळाला. संस्थानच्या आजपर्यंतच्या युद्धविषयक धोरणास अनुसरून, त्या दिशेनें विशेष प्रयत्न करण्यांत आला. या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं जातीनें प्रयत्न केला. संस्थानच्या तालुक्यांच्या मुख्य ठिकाणीं स्वतः जाऊन जाहीर सभांतून त्यांनीं व्याख्यानें दिलीं; आणि लष्करांत भरती करून घ्यावी, म्हणून लोकांचीं

मनें वळविलीं. ता. २९ जानेवारी १९४५ रोजीं कोळवण व पिरंगूट, ता. ५-४-४५ रोजीं नसरापूर, ता. ६-४-४५ रोजीं वेल्हें आणि ता. २९-४-४५ रोजीं हिर्डोशी या ठिकाणीं जाऊन जाहीर सभांतून श्री. राजेसाहेबांनीं भाषणें केलीं. युद्धप्रयत्नाकरितां राजेसाहेब स्वतः भाग घेत असलेले पाहून प्रजेला त्यांचें कौतुक वाटलें; व वरील ठिकाणीं ते गेले, त्या वेळीं लोकांनीं त्यांचें हार्दिक स्वागत करून युद्धसाहाय्यांत लोकांचें पूर्ण सहकार्य असल्याचें सांगितलें.

रेसिडेन्सीच्या सूचनेनुसार धान्य पुरवठा-व्यवस्था संस्थान दरबारनें आपल्या ताब्यांत नुकतीच घेतली होती. तेव्हां, वरील दौऱ्यांत त्या त्या ठिकाणीं धान्याची व्यवस्था कशी काय आहे, लोकांच्या तक्रारी काय काय आहेत, काय दुरुस्ति करणें जरूर आहे, इत्यादींबाबत श्री. राजेसाहेबांनीं आस्थापूर्वक पाहणी केली.

## विजयदिन समारंभ

सन १९३९ मध्यें सुरू झालेलें युरोपांतील महायुद्ध ता. ८ मे १९४५ रोजीं समाप्त झालें. दोस्तांचा विजय झाला, असें आनंदकारक वृत्त कोल्हापूरच्या रेसिडेंटसाहेबांनीं विद्युत्संदेश पाठवून कळविलें. अर्थात्, सर्वांना त्यामुळें आनंद वाटणें साहजीकच होतें. तन्निमित्त भोर येथें स्वार-शिबंदीची मिरवणूक काढून, हत्तीवर फलक लावून ही सुवार्ता सर्व नागरिकांना विदित करण्यांत आली. सरकारी ऑफिसें, शाळा, कोर्टें इत्यादींना ता. ८ व ९ या दोन दिवशीं सुट्टी देण्यांत आली. रविवार ता. १३ रोजीं सायंकाळीं देवालयांतून सार्वजनिक प्रार्थना करून हा सुदिन दाखविल्याबद्दल परमेश्वराचे अंतःकरणपूर्वक सर्व जनतेनें आभार मानले. या संकटांतून निभावल्याबद्दल सर्वांनाच हायसें वाटलें. ता. १४-५-४५ रोजीं सेरिमोनियल परेड करून विजयानंद प्रकट करण्यांत आला. परेड पाहण्यास श्री. राजेसाहेब उपस्थित राहिले होते; नंतर, पोलिसांचे खेळ झाले. गोरगरिबांना अन्नदान दिलें. तिसऱ्या प्रहरीं ४-३० वाजतां राजवाड्यांत दरबार भरवून विजयाबद्दल आनंद व्यक्त करण्यांत आला. सर्व नागरिकांनीं या कार्य-क्रमांत उत्साहानें भाग घेतला होता. दरबारांत श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून दोस्तांना विजयप्राप्ति करून दिल्याबद्दल प्रभू श्रीरामचंद्राचे मनःपूर्वक आभार मानले. जमलेल्या सर्व लोकांना व शाळेंतील मुलांना या आनंदोत्सवा-प्रीत्यर्थ पेढे वाटण्यांत आले. सायंकाळीं ५ वाजतां कुस्त्यांचा फड भरवून यशस्वी

मल्लांना रु. २०० दोनशेंचीं बक्षिसें देण्यांत आलीं. रात्रौ घरोघर दीपोत्सव साजरे करून लोकांनीं आनंद व्यक्त केला. भोरप्रमाणें तालुक्यांचे सर्व ठिकाणीं विजयोत्सव साजरे करण्यांत आले.

युरोपांतील युद्ध ता. ८ मे १९४५ रोजीं समाप्त झालें; परंतु, पूर्वेकडे जपान अद्याप बराच प्रबळ होता. नागासाकी व हिरोशिमो या दोन जपानमधील शहरांवर अणूबॉंब टाकल्यावर जो हाहा:कार उडाला व जी प्राणहानी झाली, त्यांमुळें जपानला एवढा हादरा बसला कीं, त्यानें अणूबॉंब वर्षावानंतर अवघ्या १५ दिवसांत शस्त्र खालीं ठेवून संपूर्ण शरणागति पत्करली. जपानी बादशहा हिरोहिटो यांनीं आपल्या लोकांचा, त्यांच्या वित्ताचा व सर्व प्राणिमात्रांचा आपल्या डोळ्यांदेखत सत्यानाश होणार हें जाणून, दूरदृष्टीनें शरण जाण्याचें ठरविलें; व अशा रीतीनें अतिपूर्वेकडील युद्ध आकस्मिकपणें व अकल्पितरीतीनें समाप्त होऊन दोस्तांना प्रचंड विजयश्रीनें माळ घातली. हें युद्ध किती काळ लांबेल, याची धास्ती वाटत होती. परंतु, अमेरिकन वैमानिकदलानें एक दिवस जपानच्या दोन प्रमुख शहरांवर नवीन शोध लागलेल्या अणुबॉंब अस्त्रांचा वर्षाव केला, त्यामुळें जपानबरोबरच्या युद्धाचा निकाल लागला.

श्रीमंत राजेसाहेबांनीं या विजयानिमित्त पत्र पाठवून बादशहांचें अभिनंदन केलें. त्याचें उत्तर कोल्हापूरचे रेसिडेंट ले. क. हार्वे यांजकडून ता. ४ डिसेंबर १९४५ रोजीं आलें. त्यांत त्यांनीं लिहिलें कीं,

"H. E. the Crown Representative has received the commands of the King Emperor to convey to you His Imperial Majesty's appreciation of loyal sentiments contained in your Message of congratulations on the Victory over Japan."

मे महिन्यांतल्याप्रमाणेंच या वेळींहि विजयोत्सव सर्व संस्थानभर साजरा करण्यांत आला.

## जागतिक युद्धासंबंधीं एकत्र विचारविनिमयासाठीं भरविलेल्या बैठकी

युद्ध सुरू झाल्यापासून अनेक, निरनिराळे, सार्वजनिक, महत्त्वाचे व सामुदायिक प्रश्न उपस्थित झाले. त्यांचा विचार करून निर्णय घेणें एकेकट्यास सोयीचें व शक्य नव्हतें. अशा विषयांचा निर्णय सामुदायिकरीत्या ठरविण्यांत

फार सोयीचें असल्यामुळें एकत्र विचार करण्यासाठीं वारंवार पुणें, कोल्हापूर येथें अगर इतर सोयीस्कर ठिकाणीं सभा भरविण्याची प्रथा दक्षिणेंतील कांहीं संस्थानिकांकडून सुरू करण्यांत आली. या प्रथेस अनुसरून ज्या ज्या वेळीं सभा भरविण्यांत आल्या, त्या त्या वेळीं भोरचे राजेसाहेब अगर दरबारचे प्रतिनिधि हजर राहून इतर संस्थानिक अगर त्यांचे प्रतिनिधी अगर कोल्हापूर रेसिडेन्सीमधील अधिकारी यांच्याबरोबर विचारविनिमय केला जाई; व संस्थानमध्यें युद्धजन्य परिस्थितीमुळें ज्या ज्या अडचणी आल्या, त्यांचें निवारण करण्याचा प्रयत्न होई. युद्ध सुरू झाल्यापासून सामान्यतः खालील महत्त्वाचे प्रश्न उपस्थित झाले व त्यांबाबत सामुदायिक चर्चा करून निर्णय घेणें आवश्यक झालें: १ पेट्रोल रेशनिंग, २ युद्धावर गेलेल्या इसमांच्या मुलांच्या शिक्षणाबाबत द्यावयाच्या सवलती, ३ हवाई हल्ल्यापासून संरक्षण, ४ वॉर इंज्यूरीज ऑर्डिनन्स, ५ वॉर रिस्क इन्शुअरन्स आर्डिनन्स, ६ नगरसंरक्षक दलाची स्थापना, ७ राष्ट्रीय युद्ध आघाडी, ८ युद्धांत जखमी झालेल्यांबाबत योजना, ९ युद्धपरिस्थितीचा विचार, १० जादा धान्य उत्पादन योजना, इत्यादि. या प्रश्नांबाबत वरचेवर पुणें, मुंबई, कोल्हापूर वगैरे ठिकाणीं सभा भरवून निर्णय घेण्यांत आले.

याशिवाय श्रीमंत राजेसाहेब यांनीं ता. १८ ऑगस्ट १९४१ रोजीं राज्यारोहण-वाढदिवसानिमित्त केलेल्या भाषणांत प्रजाजनांनीं व शाळेंतील विद्यार्थ्यांनीं युद्धकार्याच्या मदतीसाठीं काय गोष्टी करणें अगत्याचें आहे, याचें यथोचित शब्दांत विवेचन केलें.

## नोकरवर्गास महागाई

वर वर्णन केलेली परिस्थिति सर्वसामान्य स्वरूपाची झाली. या परिस्थितीचा परिणाम असा झाला कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतल्याप्रमाणें सर्व जिनसांची संस्थानांतहि अत्यंत महर्गता झाली. संस्थानच्या नोकरवर्गाला त्याची झळ लागूं लागली. दरमहाच्या प्राप्तींत कुटुंबाचा चरितार्थ चालविणें कांहींसें कठीण झालें. ही परिस्थिति लक्षांत घेऊन, श्रीमंत राजेसाहेब यांनीं नोकर वर्गाला रु. २० व त्याच्या आंतील पगारदारास रु. २, व रु. १२ पगार मिळणारे कारकुनास रु. ३ व रु. ९ पगारवाले शिपाई वगैरे खालच्या दर्जाच्या नोकरास रु. १ याप्रमाणें दरमहा महागाई म्हणून माहे जुलै १९४२ इ. पासून

वाढ केली. ही वाढ केल्यानें संस्थानांतील दौलतीच्या नोकरांस रु. ६६८०, लोकलबोर्डाकडे रु. २०७९ आणि वतनी दप्तर, कारखाने, रामसंस्थान वगैरे-कडे रु. २८२७, याप्रमाणें एकूण रु. ११,५९४ सालीना रक्कम जास्त खर्चासाठीं मंजूर करण्यांत आली.

युद्धपरिस्थितींत बदल लवकर होण्याचें चिन्ह न दिसल्यामुळें, १९४२-४३ मध्यें दिलेली महागाईवाढ सन १९४३-४४ व १९४४-४५ या सालीं तशीच पुढें चालू ठेवण्यांत आली. १९४३-४४ सालीं पोलीस खात्यांत प्रत्येक नोकरास दरमहा रु. ६ सहाप्रमाणें आणि पागा व शिबंदीकडील नोकरास प्रत्येकीं दरमहा रु. ३, याप्रमाणें नवीन महागाई-वाढ देण्यांत आली. या वेळीं महागाईप्रीत्यर्थ दरसाल रु. ३४,४५२ खर्च पडूं लागले. सन १९३८ इ. नंतर सन १९४४ च्या जुलैपर्यंत संस्थानच्या नोकरास पगारवाढ देण्यांत आली, त्याचा वार्षिक खर्च रु. १२,१४४ पर्यंत वाढला. ऑगस्ट १९४५ मध्यें दुसरें महायुद्ध समाप्त झालें; व लोकांना थोडें बरें वाटलें. परंतु, युद्धकालांत सर्व कार-खान्यांतून युद्धोपयोगी वस्तूंचें उत्पादन वाढविण्यांत आलें होतें व जीवनोपयोगी वस्तू फार कमी प्रमाणांत निर्माण केल्या गेल्या. त्याचा साहजिकच परिणाम असा झाला कीं, जीवनोपयोगी वस्तू, खाद्य पदार्थ, इत्यादींचे भाव युद्धसमाप्ती-नंतर एकदम कडाडले. त्यांतच १९४५ इ. सालीं पावसानें दगा दिल्यामुळें खरीपाचीं पिकें जवळ जवळ बुडालीं. रबीचें पीक कांहीं थोड्या प्रमाणांत हातीं आलें. परंतु, त्यामुळें सर्व हिंदुस्थानांतील जनतेस पुरेसें धान्य न पिकल्या-मुळें, दुष्काळानें फार उग्र रूप धारण केलें. लोक फार हवालदिल झाले. हिंदुस्थान सरकारनें अमेरिका, ऑस्ट्रेलिया, कॅनडा, इत्यादि देशांतून धान्य मिळविण्याच्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. अमेरिकेंतून मका आला, ऑस्ट्रेलियानें गहूं पाठविला व सयामनें तांदूळ दिला. कोणीकडून तरी दुष्काळाची आपत्ति महत्प्रयासानें टळली गेली. या दुष्काळाच्या संकटानें किती जनता अन्नान्न दशा होऊन मृत्युमुखीं पडणार, अशी हिंदुस्थानांतील सर्वच प्रांतांना मोठी धास्ती वाटत होती. परंतु, परस्पर-सहकार्यानें या बिकट परिस्थितींतून देश बचावला गेला. या संकटाची झळ भोर संस्थानला जाणवल्याखेरीज राहिली नाहीं. Standard of Living म्हणजेच राहणीच्या खर्चाचें मान फार वाढलें.

पूर्वीं मिळणारा पगार व महागाई यांत भागणें मोठ्या मुष्किलीचें झाल्यामुळें, संस्थानच्या सर्व नोकरवर्गांना एप्रिल १९४६ पासून पगाराचें टाइम स्केल लागू केलें, आणि महागाई रु. १, २, ३, या प्रमाणांत होती, ती रु. २० पगारापर्यंत रु. ८; रु. ४० पगारापर्यंत रु. ९ आणि रु. १०० पगारापर्यंत रु. १० या प्रमाणांत ता. १ जून १९४६ पासून वाढवून देण्यांत आली. टाइमस्केलमुळें पगाराच्या वार्षिक खर्चांत पूर्वीपेक्षां रु. २७००० नीं आणि महागाई-वाढीमुळें पूर्वीपेक्षां रु. ३८००० नीं एकंदर वाढ झाली.

युद्ध थांबल्यास सुमारें दोन वर्षें झालीं, तरी महर्गता कमी न होतां ती उलट तीव्रतर झाली असें पाहून, संस्थानच्या लोकनियुक्त मंत्रिमंडळाच्या सल्ल्यास अनुसरून श्रीमंत राजेसाहेब यांनीं संस्थानच्या नोकरवर्गास नवीन टाइमस्केल ता. २५-१०-१९४७ च्या हुकुमानें लागू करून सर्वांस पगारवाढ केली. या स्केलची अंमलबजावणी ता. १ जून १९४७ पासून करून सर्व नोकरांना सहा महिन्यांचा वाढाव्याचा पगार एकदम दिला.

त्याचप्रमाणें सन १९४६ मध्यें दिलेल्या महागाईभत्यांत वाढ करून रु. ५० पगारापर्यंत रु. २५, रु. ५१ ते १००पर्यंत रु. ३० आणि रु.१०० चे वर रु. ३५ असा महागाई भत्ता सर्व नोकरांस ता. १ जून १९४७ पासून दरमहा देण्याचें ता. १४ डिसेंबर १९४७ रोजीं मंजूर केलें.

## धान्य पुरवठा व भावनियंत्रण यांबाबत भोर दरबारचे प्रयत्न

युद्धकाल जों जों लांबूं लागला, तों तों खाद्यवस्तूंचा तुटवडा मोठ्या प्रमाणांत भासूं लागला. युद्धाच्या पहिल्या दोन वर्षांच्या कालांत या गोष्टीची जाणीव तितकीशी झाली नाहीं. परंतु, युद्धाचें सबंध तिसरें वर्ष व त्यापुढील काल वाढत्या प्रमाणांत हलाखीचा झाला. युद्धाची तीव्रता वाढत असल्यामुळें जास्त प्रमाणांत सैन्यभरती होऊं लागली; व शेतीचें उत्पादन कमी होऊं लागलें. युद्धावर गेलेल्या लोकांस अन्नवस्त्राचा भरपूर पुरवठा करणें सरकारचें एकमेव कर्तव्य असल्यामुळें, जें जें धान्य मिळेल तें पडेल त्या भावानें सरकारनें खरेदी केलें. त्यामुळें, जनतेंत अन्नवस्त्र यांची वाढत्या प्रमाणांत उणीव भासूं लागली. धान्य व कापड वगैरे नित्योपयोगी जिनसांची आयात कमी पडूं लागली, व जें येई, तें युद्धाकडे नेलें जाई. याचा परिणाम असा झाला कीं, ज्या लोकांनीं या

जिनसांचे सांठे केले होते, ते त्यांच्या किंमती मन मानेल त्याप्रमाणें घेऊं लागले. त्यामुळें सरकारला खाद्यवस्तूंचें नियंत्रण करणें भाग पडलें. एका जिल्ह्यांतील पदार्थ दुसऱ्या जिल्ह्यांत नेणें व आणणें परवान्याविना बंद करण्यांत आलें. किंमतीचेंहि नियंत्रण करण्यांत आलें. ठराविक भावापेक्षां जास्त किंमत घेऊन पदार्थ विकूं नयेत असे कायदे करण्यांत येऊन, त्याविरुद्ध वर्तन करणाऱ्यांस शिक्षाही देण्यांत येतील, अशी तजवीज झाली.

ब्रिटिश हद्दींत याप्रमाणें सर्व ठिकाणीं नियंत्रणें बसविल्यावर, त्याच धर्तीवर संस्थानमध्यें खाद्यवस्तूंच्यावर नियंत्रण बसविणें व त्यांचें भाव-नियंत्रण करणें अगत्याचें झालें. तसेंच, जो जिन्नस अपुरा असेल, त्याचा पुरवठा करण्याच्या योजना करणेंहि भाग झालें व त्या दिशेनें दरबारनें आवश्यक असे सर्व प्रयत्न तांतडीनें केले. भोर येथें एक सरकारी व बिनसरकारी अशा सभासदांची मिश्र कमिटी ता. ६-१०-१९४२ रोजीं नेमण्यांत आली. या कमिटीची पहिली बैठक ता. २१-१०-४२ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं झाली. श्रीमंत राजेसाहेबांनीं एक विस्तृत भाषण करून एकंदर प्राप्त परिस्थितीची जाणीव सर्वांना करून दिली, आणि सर्वांनीं एकोप्यानें या अडचणीच्या प्रसंगांतून पार पडण्यास दरबारशीं सहकार्य करावें अशी विनंति केली. या कमिटीनें सर्व परिस्थितीचा विचार करून काय काय योजना केल्या पाहिजेत, याबाबत दरबारला सल्ला देण्याची उत्तम कामगिरी केली. लोकपुढाऱ्यांचे सांहाय्यानें श्रीमंत राजेसाहेबांनीं एक धान्यपदार्थ-नियंत्रणाची योजना करून तावडतोब ती अंमलांत आणली. ही योजना सर्वांस पसंत पडल्यानें लोकपुढाऱ्यांनीं श्रीमंत राजेसाहेबांचें, मुद्दाम पत्र पाठवून, अभिनंदन केलें. या पुढाऱ्यांत भोर कायदेमंडळाचे लोकनियुक्त सभासद श्री. पानसे, श्री. लिमये, व श्री. स. कृ. शिंदकर, हे व बाहेरचे श्री. गुप्ते वकील, श्री. देवी वकील, श्री. राघु तुकाराम शेटे, वगैरे मंडळी होती. या पत्रांत त्यांनीं लिहिलें होतें कीं,

"आम्ही परवां ता. २१-११-४२ रोजीं श्रीमंतांची मुलाखत घेऊन धान्य व भावनियंत्रण यांसंबंधीं आमच्या दृष्टीनें कोणती योजना आपल्या संस्थानांत अंमलांत आणली असतांना श्रीमंतांस व रयतेस सुखावह होईल, यासंबंधीं वाटाघाट केली. त्यानंतर श्रीमंतांनीं एक जादा ग्याझेट काढून रयतेच्या फायद्याकरितां

रु. ५०,००० पन्नास हजार बाजूस काढल्याचें व त्याचा विनियोग कसा व कोणामार्फत करावा वगैरे बाबतींत त्या ग्याझेटद्वारें प्रसिद्धीकरण ता. २४-११-४२ रोजीं केलें आहे. श्रीमंतांनीं जाहीर केलेली घोषणा व आम्ही आपल्यासमोर मांडलेली योजना बहुतांशीं सारख्याच आहेत, हें नमूद करण्यास आम्हांस आनंद वाटतो. आम्ही श्रीमंतांकडे आलों असतांना आमचें संपूर्ण व खुलासेवार म्हणणें श्रीमंतांनीं शांतपणें ऐकून घेतलें, याबद्दल प्रथमतः आम्ही श्रीमंतांचे हार्दिक आभार मानतों. श्रीमंतांनीं आम्हीं सुचविलेली योजना ऐकून घेऊन ती अत्यंत तातडीनें अंमलांत आणण्याची योजना जाहीर केली, याबद्दल श्रीमंतांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. सर्व जनतेसही श्रीमंतांनीं केलेली योजना पसंत पडेल अशी आमची खात्री असून, जनतेंतील पुढारी व व्यापारी यांचें अंतःकरण-पूर्वक साहाय्य या कामांत मिळून ही योजना पूर्ण यशस्वी होईल, अशी आमची उमेद आहे. ''

सुधागड तालुक्यांत भाताची पैदास फार मोठ्याच प्रमाणांत होते. पण, धान्यनियंत्रण ठेवल्यामुळें, त्या लोकांना आपलें धान्य बाहेर नेऊन विकण्यास परवानगी नसल्यामुळें, त्यांची फार कुचंबणा होऊं लागली; म्हणून, त्यांच्या पुढाऱ्यांकडून परवानगीसाठीं वेळोवेळीं दरबारकडे डेप्युटेशन्स आलीं. त्यांच्या भेटी कधीं दरबारचे अधिकाऱ्यांनीं व कधीं श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वतः घेऊन त्यांच्या अडचणींचा सहानुभूतीनें विचार करून त्यांचें निवारण केलें. अशीं डेप्युटेशन्स ता. १३-१२-४२, ता. ११-४-४३, ता. १३-५-४३, व ता. १६-५-४३ अशा निरनिराळ्या चार तारखांस आलीं. त्यांपैकीं तीन वेळां स्वतः श्रीमंतांनीं भेट घेऊन त्यांच्या अडचणी निवारण केल्या. ज्यांच्या अडचणी दूर करण्याकरितां संस्थानाबाहेर धान्य नेण्याची परवानगी देणें आवश्यक होतें, त्यांना परवानगी, संस्थानला पुरेसें धान्य येथें राहील व जादा माल असेल तेवढें बाहेर जाईल अशी खबरदारी घेऊन, देण्यांत आली.

संस्थानांत धान्य व भावनियंत्रण झाल्यामुळें पुरेसा माल बाजारांत येईना व नित्याचे आवश्यक ज्वारी, बाजरी, तांदूळ, साखर, इत्यादि पदार्थ भरपूर प्रमाणांत मिळेनासे झाल्यामुळें, दरबारनें स्वतः माल खरेदी करून व त्याचा सांठा करून तो लोकांना पुरविण्याची आवश्यकता दिसून येऊं लागली. या

अडचणीच्या प्रसंगांतून निभावून जाण्यास एकदम मोठी रक्कम खर्च करणें जरूर होतें. श्रीमंत राजेसाहेबांनीं ही आणीबाणीची परिस्थिति लक्षांत घेऊन, रयतेची उपासमार होऊं नये म्हणून साखरखरेदीस रु. १०,००० दहा हजार आणि धान्यखरेदीसाठीं रु. १,७५,००० पावणे दोन लक्ष दिले.

महायुद्धजन्य प्राप्त परिस्थितींतून निभावून जाण्यास वेळींच योग्य तो उपाय श्रीमंत राजेसाहेब यांनीं, स्वत: लक्ष आपुलकीच्या भावानें घालून, केल्यामुळें रयतेस पोटभर अन्न मिळण्याची तजवीज झाली व बाकीच्या ठिकाणांपेक्षां संस्थानमधील परिस्थिति पुष्कळच बरी होती असें लोकमत झालें.

याप्रमाणें व्यवस्था चालल्यानंतर कांहीं दिवसांनीं संस्थानचें खाद्य धान्याचें नियंत्रण, रेसिडेन्सीकडून लिहून आल्यावरून, तिकडे सोपविण्यांत आलें. दक्षिणेंतील संस्थानांकरितां रेसिडेंटसाहेबांचे सेक्रेटरी यांना डायरेक्टर ऑफ फुड सप्लाइज म्हणून नेमण्यांत आलें व त्यांच्याकडून लिहून येईल, त्याप्रमाणें धान्याचा पुरवठा करणें, किंमती कायम करणें, दुसऱ्या संस्थानांना धान्य पुरविणें वगैरे तजविजी होऊं लागल्या. भोर संस्थानांतून सन १९४३ व सन १९४४ सालांत दुसऱ्या संस्थानांना एकंदर सुमारें ३६००० पोतीं तांदूळ नियंत्रित दरानें पुरविण्यांत आला, व संस्थानांत जें धान्य अगर खाद्य पदार्थ उत्पन्न होत नाहींत व झाले तरी अपुरे पडतात, असे ज्वारी, बाजरी, तूर, हरभरे, गहूं, मैदा, रवा वगैरे जिन्नस रेसिडेन्सीकडून ब्रिटिश हिंदुस्थानांतून भोर संस्थानला पुरविण्यांत आले. त्यामुळें संस्थानची धान्य-परिस्थिति या वर्षांत एकंदरीनें समाधानकारक राहिली. संस्थानांतल्या संस्थानांत धान्यविक्री-खरेदी करण्याकरितां व बाहेर माल पाठविण्याची व्यवस्था करण्याकरितां संस्थानच्या सुधागड व पवनमावळ या तालुक्यांतील लोकांनीं व्यापारी कंपन्या (कार्पोरेशन्स), श्रीमंत राजेसाहेबांच्या भाषणाला अनुसरून, स्थापन केल्या व घाटावरील तीन म्हणजे विचित्रगड, राजगड व प्रचंडगड, या तालुक्यांतील खरेदी, विक्री व निर्गत यांची व्यवस्था एक एजंट नेमून त्याजकडे सोंपविण्यांत आली. कंपन्या व एजंट यांनीं धान्याच्या खरेदी-विक्रीचें काम दरबारच्या सहकार्यानें फार समाधानकारक रीतीनें केलें व लोकांना नित्योपयोगी पदार्थांची वाण भासूं दिली नाहीं. धान्य-पुरवठ्याचा प्रश्न फार गुंतागुंतीचा व अवघड असल्यामुळें, त्याकरितां कोल्हापूर येथें वरचेवर

विचारविनिमयासाठीं फुड कॉन्फरन्सेस ( सभा ) भरविण्यांत आल्या. अशा प्रत्येक कॉन्फरन्सला भोर संस्थानचा प्रतिनिधि पाठविण्यांत येऊन, एकंदर प्रश्नाची माहिती संस्थानला पूर्णपणें राहील अशी तजवीज करण्यांत येई. अशा बैठकी सुमारें ६-७ भरविण्यांत आल्या होत्या. यांखेरीज संस्थानांत धान्याच्या सांठ्याची व तो परठिकाणीं पाठविण्याची काय तजवीज केली आहे, हें पाहण्यासाठीं भोर येथें सुधागडमधील पाली येथें डायरेक्टर ऑफ फुड सप्लाइज या नात्यानें रेसिडेंटचे सेक्रेटरी यांनीं दोन वेळ स्वतः भेट देऊन, संस्थानच्या दिवाणांची भेट घेऊन, त्या प्रश्नाबाबत अडीअडचणी काय आहेत, त्या समजून घेण्याच्या दृष्टीनें त्यांच्याशीं वाटाघाट केली. सन १९४३-४४ सालीं धान्याची एकंदर व्यवस्था समाधानकारक राहिल्यामुळें, संस्थानचे रहिवासी म्हणून नसरापूर येथें राहिलेले व संस्थानांत मिशनरी या नात्यानें धंदा करीत असलेले युरोपियन गृहस्थ मि. लिपट्रॉप यांनीं मुद्दाम ता. ४-१०-४३ इ. रोजीं पत्र पाठवून श्रीमंत राजेसाहेब व दरबारचे अधिकारी यांचें अभिनंदन केलें, त्या पत्राचा उतारा खालीं दिला आहे:—

" It is a great comfort to see that more food grains are now becoming available for the folk of this Taluka. The supply of late has greatly increased–Zwari, Bajeri, Patni, Kolumba, Wheat and flour. The folk also fare pretty well re : Kerosene oil and sugar.

" In the last bazar there was zwari available at Government rate and through the Nasrapur Grain Union there were two kinds of rice available–local best and other imported from another part of the State–at Government price.

" The Nasrapur Grain Union has hitherto done and is doing a good work, even though not infallible. I seek in every way to urge them to go straight in every transaction.

" When we think of what is going on in other parts of India, we have much cause for thankfulness and I think Your Highness' subjects should be grateful for what has been done by your Govt. in these unprecedented days.

" I have felt for sometime I ought to write Your Highness and let you know how I see things. "

भोर संस्थानच्या घाटावरील तीन तालुक्यांत रा. शिंगरे एजंट व सुधागड तालुक्यांत व पवनमावळ यांमध्यें कार्पोरेशन्स यांच्याकडून धान्य-वांटपाचें काम चांगल्या प्रकारें चालविल्याचा उल्लेख वर आलाच आहे. परंतु, गव्हमेंट ऑफ इंडियानें आंखून दिलेल्या धोरणानुसार कंट्रोलची सर्व व्यवस्था संस्थानच्या दरबारनें आपल्या ताब्यांत घ्यावी व एजंट आणि कार्पोरेशन्स रद्द कराव्या, असें रेसिडेन्सीकडून दरबारला कळविण्यांत आलें. कोल्हापूर येथील रेसिडेंटचे त्या वेळीं मि. पार्कस् नांवाचे सेक्रेटरी होते. त्यांनीं धान्याचें नियंत्रण व वांटप यांविषयीं तयार केलेली योजना गव्हमेंट ऑफ इंडियानें मान्य करून, त्या योजनेप्रमाणें दक्षिणेंतील सर्व संस्थानांत धान्यनियंत्रण-पद्धति सुरू करावी असें रेसिडेंटमार्फत कळविण्यांत आलें. ही पार्कस्-योजना आदर्श समजली जाऊन, सर्व संस्थानांतून, स्थानिक परिस्थितीप्रमाणें तींत थोडा फेरफार करून, तावडतोब अंमलांत आणली गेली. या योजनेप्रमाणें सर्वांना सारख्या प्रमाणांत खाद्यपदार्थ पुरविले गेल्यामुळें, ती सुरू केल्यापासून लोकांना फार सुख झालें.

ता. २६-२७ आक्टोबर १९४४ रोजीं कोल्हापूर येथें रेसिडेंसीमध्यें सर्व संस्थानांच्या दिवाणांची सभा भरवून मे. रेसिडेंटसाहेबांनीं सर्वांना हिंदुस्थान सरकारचें धोरण समजावून सांगितलें; व प्रत्येक संस्थानकरितां संस्थानच्या धान्यनियंत्रण व पुरवठा यांबाबतची योजना, हिंदुस्थान सरकारच्या धोरणास अनुसरून, तयार करून पसंतीकरितां पाठवावी असें सर्व दिवाणांना सांगितलें. त्या वेळीं भोर येथें रा. मुंडकूर दिवाण होते, व सदर परिषदेस ते कोल्हापूर येथें हजर राहिले होते. तेथून परत आल्यावर त्यांनीं भोर संस्थानची परिस्थिति लक्षांत घेऊन एक योजना तयार केली; व श्रीमंत राजेसाहेबांची त्या योजनेस मान्यता घेऊन, रेसिडेंटसाहेबांकडे पाठविली. त्यांनींहि सदर योजना मान्य केली. या योजनेप्रमाणें शिंगरे एजन्सी व सुधागड व पवनमावळ कार्पोरेशन्स ता. २२-११-४४ पासून रद्द करण्यांत आल्या.

मुंडकूर यांचे जागीं दिवाण व चीफ कंट्रोलर म्हणून रा. ब. कृ. रा. शितूत यांची ता. १५-१-४५ पासून नेमणूक झाली. ते आल्यावर एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन धान्यव्यवस्था ता. ५-२-१९४५ पासून त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतली. नवीन योजनेचें स्वरूप लक्षांत येण्याकरितां ती सारांशरूपानें खालीं दिली आहे.

रा. ब. शितूत यांनीं रेसिडेन्सीच्या सूचनेप्रमाणें धान्यपुरवठ्याची व्यवस्था आपल्याकडे घेतल्यावर, त्यांनीं प्रथमतः सर्व संस्थानची फुडग्रेन्स सेन्सस ऊर्फ धान्यगणती करविली. त्यावरून संस्थानमध्यें कोणत्या धान्याचें किती उत्पादन होतें, याची स्पष्ट कल्पना आली. मि. पार्कस् ह्यांच्या योजनेनें प्रत्येक माणशीं वार्षिक निर्वाहाकरितां सर्व प्रकारचें मुख्य धान्य साडेचार बंगाली मण पुरेसें होतें असें गृहीत धरलें होतें. त्या प्रमाणांत प्रत्येक जमीन धारण करणारास, त्याच्या शेतांत उत्पन्न झालेल्या धान्यापैकीं कुटुंबांतील माणसांस पुरेसें धान्य ठेवून, बाकीचें जें जास्त धान्य उरेल, तें नियंत्रित केलेल्या दरानें सरकारनें खरेदी करावयाचें, आणि ज्यांना शेतीचें घरचें धान्य नाहीं अगर असलेलें उत्पन्न अपुरें आहे, त्यांना माणशीं ४॥ साडेचार मण या प्रमाणांत पुरवावयाचें. कोणालाहि या प्रमाणापेक्षां जास्त धान्य घेतां येऊं नये, म्हणून प्रत्येक कुटुंबाकरितां रेशनकार्डें द्यावयाचीं व त्या कार्डांवर कुटुंबांतील माणसांच्या संख्येच्या प्रमाणांत प्रत्येक महिन्यास किती धान्य द्यावयाचें याची नोंद करावयाची. या कार्डावर साखऱ्या, तांदूळ, ज्वारी, बाजरी, राकेल व गहूं या जिनसा युनिटच्या प्रमाणांत देण्यांत येत. तसेंच, संस्थानांतील प्रत्येक मोठ्या गांवीं व खेड्यांचे गट करून त्या गांवांतील व गटांतील लोकांना हे जिन्नस सेंटरच्या ( केंद्र ) ठिकाणीं ठराविक दुकानदारांकडून दिले जावे, म्हणून किरकोळ विक्रीचे परवाने देऊन त्यांच्याकडे गरजेप्रमाणें धान्य, राकेल, साखऱ्या, कापड वगैरे जिन्नस पुरविले जावे. या योजनेप्रमाणें विभागणी करून जीवनोपयोगी आवश्यक अशा सर्व वस्तू सर्वांना सारख्या प्रमाणांत मिळण्याची तजवीज झाली.

संस्थानमध्यें तांदुळाचें पीक मोठ्या प्रमाणांत होतें. युद्धपूर्वकालीं संस्थानमधील पुष्कळसा तांदूळ ब्रिटिश हद्दींत विकला जाई. आतां, धान्यपुरवठ्याची सर्व व्यवस्था सरकारनें आपल्याकडे घेतल्यावर, रेसिडेन्सीच्या सूचनेप्रमाणें पवनमावळ व सुधागड तालुक्यांतील जादा तांदूळ दक्षिण महाराष्ट्रांतील सांगली, मिरज, जमखिंडी, कोल्हापूर, सांवतवाडी इत्यादि संस्थानांना पुरविला जाऊं लागला; व त्याच्या मोबदल्यांत ज्वारी, बाजरी, गहूं, साखऱ्या वगैरे जिन्नसा, ज्या संस्थानमध्यें होत नाहींत व होतात पण पुरेशा नाहींत, त्या रेसिडेन्सीनें कळविलेल्या ठिकाणांहून आणवून संस्थानच्या प्रजेस पुरविण्याची व्यवस्था झाली.

सरकारनें धान्याची खरेदी व विक्री आपल्या ताब्यांत घेतल्यावर, घाटावरील चार तालुक्यांतील धान्यखरेदीचें काम संस्थानच्या त्या त्या तालुक्याचे मामलेदार यांच्या हाताखालीं पुरेसा नोकरवर्ग नेमून त्यांच्या मार्फतीनें होऊं लागलें. सुधागड तालुक्यांत तांदूळ फार मोठ्या प्रमाणावर होतो व तेथील काम सरकारी नोकरवर्गामार्फत व्यवस्थितपणें करतां येईल असें न वाटल्यामुळें, त्या तालुक्यांतील खरेदीकरतां रेसिडेन्सीच्या संमतीनें कमिशन एजंट नेमण्यांत आला व त्याच्यामार्फत नियंत्रित दरानें खरेदी-विक्रीची तजवीज झाली.

वर लिहिल्याप्रमाणें धान्यव्यवस्था सरकारला आपल्याकडे घ्यावी लागल्यामुळें सर्व जिन्नसा खरेदी करण्यासाठीं भांडवलही फार मोठें म्हणजे रु. १० लाखांचे वर गुंतवावें लागलें. हें भांडवल भोर स्टेट बँकेकडे दरबारच्या प्रॉमिसरी नोटा डिपॉझिट ठेवून बँकेकडून मिळेल अशी तजवीज करण्यांत आली. कंट्रोलची व्यवस्था कंट्रोल-खातें स्वतंत्र निर्माण करून त्यांच्या मार्फत करण्यांत आली.

सरकारच्या धान्य-खरेदीबाबत, भोर संस्थान व ब्रिटिश हिंदुस्थानामधील संस्थानलगतचे जिल्हे, यांत एक महत्त्वाचा व वैशिष्ट्यपूर्ण फरक होता. तो असा कीं, ब्रिटिश जिल्ह्यांत जें धान्य खरेदी (लेव्ही वसुली) केलें, तें जमीनमालकाकडून सर्वच्या सर्व घेतलें गेलें. त्याच्या घरच्या कुटुंबापुरतें ठेवण्यांत येत नसे. तें त्याला रेशन कार्डावर नमूद केलेल्या युनिटप्रमाणें दुकानदाराकडून पुन्हां खरेदी करावें लागे, आणि संस्थानमध्यें धान्य सरकारांत खरेदी करतांनाच जमीनमालकांकडून, वार्षिक दरमाणशीं साडेचार मण या प्रमाणांत कुटुंबापुरतें धान्य वजा करून, जें जादा धान्य त्याजकडे उरेल, तेवढेंच खरेदी करण्यांत येत असे. त्यामुळें लेव्ही वसुलीबाबत लोकांचा विरोध ब्रिटिश हद्दींत झाला, त्याप्रमाणें संस्थानमध्यें झाला नाहीं. जादा धान्य लोकांनीं खुषीनें सरकारला विकत दिलें.

कापडाचा कोटा एका मक्तेदारामार्फत आणवून तो सर्व लोकांना मिळेल अशी तजवीज झाली. वांटप-पद्धतीनें कोणालाहि माल मिळाला नाहीं, असें कधींच झालें नाहीं. दूध, लाकूड, कोळसा, चारा, वैरण यांचेंहि नियंत्रण केल्यामुळें, हे जिन्नस सर्वांना मिळण्याची तजवीज झाली.

रा. ब. शितूत जानेवारी १९४६ मध्यें राजीनामा देऊन संस्थानची नोकरी सोडून गेले. ते गेल्यानंतर धान्यपुरवठयाच्या व्यवस्थेचें काम श्री. न. चिं. केळकर उर्फ तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या संस्थानच्या कारभारी-मंडळानें मे १९४६ ते फेब्रुवारी १९४७ अखेरपर्यंत केलें. या मुदतींत धान्यव्यवस्था एकंदरीनें बरी होती. ता. १ मार्चपासून लोकनियुक्त मंत्र्याकडे हें खातें सोंपविण्यांत आलें. लोकनियुक्त मंत्री ना. शं. ल. लिमये यांनीं ता. ८ ऑक्टोबर १९४७ पर्यंत हें काम केलें. त्यांच्यानंतरचे लोकनियुक्त मंत्री ना. द. शं. वाळिंबे यांनीं शेवटपर्यंत या खात्याचें काम केलें. डिसेंबर १९४७ मध्यें हिंदुस्थान सरकारनें महात्मा गांधींच्या सल्ल्यानुसार धान्यनियंत्रणें हळूहळू उठविण्याचें धोरण जाहीर केलें. त्यास अनुसरून ता. १० माहे डिसेंबर पासून मुंबई इलाख्यांतील धान्य-नियंत्रणें व रेशनिंग—मुंबई, पुणें, अहमदाबाद व सोलापूर हीं चार मोठीं शहरें वगळून—बाकी सर्व भागांतील रद्द करण्यांत आलीं; व फक्त जिल्हा-नियंत्रणें ठेवण्यांत आलीं—म्हणजे, एका जिल्ह्यांतून दुसऱ्या जिल्ह्यांत कोणताहि माल परवानगीशिवाय जाऊं नये असें ठरविण्यांत आलें. भोर संस्थानची परिस्थिति थोडी वेगळी असल्यामुळें, भोरमधील नियंत्रणें दक्षिणी संस्थानांचे कोल्हापूर येथील रीजनल कमिशनर यांच्या सल्ल्यानुसार मार्च १९४८ पर्यंत ठेवावीं असें ता. १४-१२-४७ रोजीं ठरविण्यांत आलें; व त्याप्रमाणें जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. साखरेचें नियंत्रण ता. १-२-४७ पासून रद्द करण्यांत आलें. परंतु, मुंबई प्रांतांतील नियंत्रणें रद्द केल्याचा परिणाम भोर संस्थानवर झाल्यावांचून राहिला नाहीं. तिकडे सरकारनें धान्यवसुली अजीबात बंद केली होती. त्यामुळें संस्थानमधील जमीनदार व शेतकरी दरबारला धान्य विकत देण्यास कबूल होत ना. तेव्हां, रेशनिंगची पद्धति चालू ठेवणें दुरापास्त असल्याचें दिसून आल्यावरून, मंत्री ना. वाळिंबे यांनीं जाहीरनामा प्रसिद्ध करून भोर संस्थानमधील शिधावाटपपद्धति ता. १० जानेवारी १९४८ पासून रद्द केली, व फक्त भोरमधील माल मुंबई प्रांतांत निर्गत करण्यास तेवढी बंदी ठेवली. तथापि, दक्षिणी संस्थानांकरितां मागील सालप्रमाणें तांदूळ पुरवावे अशी कोल्हापूरचे डायरेक्टर ऑफ फुड सप्लाइज यांची मागणी सतत चालू असल्यामुळें, खाजगी खरेदी-विक्रीस बंदी ठेवण्यांत आली. परंतु, मुंबई प्रांतांत धान्याचे,

चित्रांक ९



हि. हा. महाराज देवास सीनियर ( हल्लींचे कोल्हापूरचे छ. महाराज ) यांनीं युद्धकामगिरीकरतां ता. १३।२।४४ रोजीं भोरास भेट दिली त्या वेळेस ते दरबारांत भाषण करीत आहेत. [ सं. पा. १८

विशेषत: भाताचे, भाव फारच चढल्यामुळें दरबारनें ठरविलेल्या दरानें भात अगर तांदूळ पुरविण्यास कोणीच कबूल होईना. अशी परिस्थिति झाल्यामुळें दरबारला या सालीं दक्षिणी संस्थानला तांदूळ पुरविणें अशक्य असल्याचें रेसिडेंसीकडे स्पष्ट कळविण्यांत आलें. हिंदुस्थानांतील कापड, रॉकेल, कोळसा, इत्यादींवरील नियंत्रणें जानेवारी १९४८ मध्यें रद्द करण्यांत आलीं. नियंत्रण उठविण्याचा परिणाम फार चांगल्या प्रकारें अनुभवास आला. सर्वत्र मुबलक, चांगला माल बाजारांत येऊन तो लोकांना भरपूर प्रमाणांत मिळूं लागला. कांहीं जिन्नसांचे भाव बरेच वाढले, तर कांहीं जिन्नस स्वस्त झाले. साखरेचा भाव कंट्रोल दरापेक्षां वाढला, तर गुळाचा भाव फारच कमी झाला. तांदूळ, ज्वारी, बाजरी इत्यादींचे भाव थोडे कडकले, तर डाळी, कडधान्यें इत्यादींचे भाव बरेच सैलावले आहेत. लाकूड व कोळसा यांवरील नियंत्रणें उठविल्यावर त्यांचे भाव बरेच चढले आहेत. एकंदरीनें, नियंत्रणें रद्द केल्यामुळें सर्वत्र समाधानाचें वातावरण झालें. अद्यापि वाहतुकीच्या साधनांची अडचण बरीच वाटत असल्यामुळें, मालाची आयात व निर्यात भरपूर प्रमाणांत होऊं शकत नाहीं. वाहतूक व्यवस्थितपणें होऊं लागल्यावर सर्व जीवनोपयोगी वस्तूंची झालेली महर्घता हळूहळू कमी होत जाईल अशीं चिन्हें दिसत आहेत.

ता. १ मार्च १९४७ पासून संस्थानांत लोकनियुक्त मंत्र्यांची नेमणूक होऊन कंट्रोल-खातें सोंपीव करण्यांत आल्यावर, ना. पुरवठामंत्री यांनीं चीफ कंट्रोलर रा. सप्रे यांच्या जागीं रा. भा. ल. लिखिते, एम्.ए., एलएल.बी., यांची ता. १ एप्रिलपासून चीफ कंट्रोलर म्हणून नेमणूक केली. ता. ८ आक्टोबर रोजीं पहिलें मंत्रिमंडळ बरखास्त होऊन पुरवठामंत्री म्हणून ना. द. शं. वाळिंबे हे कंट्रोल खात्याचा कारभार पाहूं लागले. चीफ कंट्रोलर रा. लिखिते यांचें काम त्यांना पसंत न पडल्यामुळें त्यांना ना. वाळिंबे यांनीं कमी करून त्यांच्याकडील काम दुसऱ्याकडे दिलें.

## प्रकरण ३ रें

# हिंदुस्थानची संयुक्त राज्यघटना व भोर संस्थानची संमति

संदर्भ:—खंड २ प्रकरण १४ पान ६६४ व खंड ३ प्रकरण २८ पान ९४३ यांत १७ ऑगस्ट १९३९ च्या पत्रानें संयुक्त घटनेंत सामील होण्यास दरबारनें सशर्त संमति दिली, येथपावेतों हकिकत आली आहे. ) दरबारकडून ता. १७ ऑगस्ट १९३९ रोजीं पाठविलेल्या पत्रास ता. २९ ऑगस्ट १९३९ रोजीं नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांच्याकडून खालीलप्रमाणें उत्तर आलें.

Viceregal Lodge, Simla
29th August 1939

My Friend,

I write to acknowledge with thanks your letter of 17th August No. D. O. 228/9, regarding the accession of your State to the Federation of India, which shall have my attention, and add that I have noted with much satisfaction the decision you have taken in this important matter.

Yours sincerely
Sd/Linlithgow

यानंतर लवकरच बादशहांचें सरकार आणि जर्मन राष्ट्र यांच्या दरम्यान युद्ध सुरू झाल्यामुळें, संयुक्त घटना-विषयक प्रश्नांकडे, युद्धासंबंधींच्या कामकाजांत सरकार गुंतलें जाणार असल्यानें, पुरेसें लक्ष देतां येणार नाहीं; सबब, याबाबत वाटाघाट बंद ठेवण्यांत आली आहे, असें रेसिडेंटसाहेबांकडून कळविण्यांत आलें.

## हिंदुस्थानची राज्यघटना

युरोपांतील महायुद्ध ता. ८ मे १९४५ रोजीं संपलें आणि १४ ऑगस्ट रोजीं जपाननें संपूर्ण शरणागति पतकरल्यामुळें अतिपूर्वेकडील युद्धाची परिसमाप्ति झाली. युद्ध संपल्यानंतर, दोस्तांनीं जिंकलेल्या मुलखांतील राज्यव्यवस्थेकडे लक्ष देण्याच्या हेतूनें इंग्लंड, अमेरिका व रशिया या महात्रयीनें सानफ्रान्सिस्को येथें शांततापरिषद भरविली. या परिषदेचें काम कित्येक दिवसपर्यंत चाललें.

हिंदुस्थाननें महायुद्ध जिंकण्याच्या कामीं फार महत्त्वाची कामगिरी. दोस्तांच्या बाजूनें बजावली होती. सन १९४२ मध्येंच सर स्टॅफर्ड क्रिप्स हे ब्रिटिश पार्लमेंटचे प्रतिनिधि हिंदुस्थानांत आले होते. त्या वेळीं त्यांनीं हिंदुस्थानचें सहकार्य मोठ्या प्रमाणांत मिळविण्याच्या हेतूनें हिंदुस्थानाची स्वातंत्र्याचे मार्गावर प्रगति करण्याकरितां एक योजना तयार करून आणली होती, व ती त्यांनीं हिंदुस्थानच्या प्रमुख पुढाऱ्यांपुढें विचारासाठीं मांडली होती; पण, महात्मा गांधी, पं. जवाहरलाल नेहरु इत्यादि कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं हिंदुस्थानला स्वातंत्र्यप्राप्ति होण्याच्या दृष्टीनें ती योजना अपुरी आहे असें ठरवून, नाकारली होती. त्या योजनेनें हिंदुस्थानाला युद्धसमाप्तीनंतर एक वर्षानें वसाहतीचा दर्जा देऊं केला होता. आतां, युद्ध समाप्त झाल्यानंतर हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नानें पुनः उचल केली. दरम्यान इंग्लंडमध्यें नवीन निवडणुका होऊन चर्चिल यांच्या कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचा पाडाव झाला, व मजूरपक्षाची सरशी होऊन तो अधिकारारूढ झाला. मजूरपक्षाचे मि. ॲटली यांनीं मुख्यप्रधानपद धारण केलें. पूर्वींचे भारतमंत्री, मि. अमेरी, जाऊन त्यांच्या जागीं सर पेथिक लॉरेन्स हे मजूरपक्षाचे सभासद भारतमंत्री झाले. महायुद्धानंतर एकंदर जागतिक परिस्थितींत अतिशय महत्त्वाचा बदल झाला. सर्व राष्ट्रांनीं संपूर्ण स्वतंत्रता भोगली पाहिजे, कोणत्याहि राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करून साम्राज्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करतां कामा नये, सर्वत्र लोकशाही राज्यें स्थापन व्हावीं अशी तत्त्वप्रणाली सर्व जगभर वाढत्या प्रमाणांत रूढ होऊं लागली. इंग्लंडलाहि यापुढें आपलें साम्राज्यवादी धोरण टिकणें अशक्य दिसूं लागलें. या जागतिक परिस्थितीचा परिणाम, म्हणून हिंदुस्थानांत राष्ट्रीय हंगामी सरकार स्थापन करण्याचा आदेश मि. ॲटली यांच्या मंत्रिमंडळानें हिंदुस्थानचे त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यांना दिला. त्या आदेशानुसार लॉर्ड वेव्हेल यांनीं हिंदुस्थानांतील प्रमुख राजकीय पक्ष, कॉंग्रेस, मुस्लीम लीग आणि अल्पसंख्याकांचे प्रतिनिधि, यांची सिमला येथें परिषद भरविली. या परिषदेचें काम सुमारें १५ दिवस चालून, समानप्रतिनिधित्वाच्या तत्त्वाबाबत मुस्लीम लीगचे पुढारी मि. जीना यांच्या हेकेखोरपणामुळें, अखेर या वाटाघाटी अयशस्वी झाल्या, व पेचप्रसंग निर्माण झाला. यांतून मार्ग काढण्याच्या हेतूनें ब्रिटिश सरकारनें मंत्रिमंडळांतील तीन मंत्र्यांचें एक शिष्टमंडळ हिंदी प्रश्नांची

वाटाघाट करण्याकरितां हिंदुस्थानांत पाठविण्याचें घोषित केलें. ब्रिटिश घोषणे-प्रमाणें मार्च १९४५ मध्यें ब्रिटिश त्रिमंत्र्यांचें शिष्टमंडळ हिंदुस्थानांत आलें. त्यांत भारतमंत्री सर पेथिक लॉरेन्स, मि. ए. व्ही. अलेक्झँडर व १९४२ च्या योजनेचे प्रणेते सर स्टॅफोर्ड क्रिप्स् हे तिघे होते. त्यांनीं दिल्ली व सिमला येथें काँग्रेस व मुस्लीम लीग यांच्या प्रतिनिधींबरोबर सुमारें तीन महिनेपर्यंत वाटाघाटी करून, एक हंगामी सरकारची योजना व एक दीर्घकालीन राजकारभाराची स्वातंत्र्याची योजना, अशा दोन योजना हिंदुस्थानला दिल्याचें जाहीर केलें. मुस्लीम लीगनें दीर्घकालीन योजना प्रथम स्वीकारली आणि काँग्रेसनेंहि कलमांतील अर्थाबाबत मंत्रिशिष्टांशीं बरीच चर्चा करून दीर्घकालीन योजनेस मान्यता दिली. हंगामी सरकारची योजना समप्रतिनिधित्वाच्या तत्त्वावर लीगनें नाकारली. काँग्रेस व लीग यांच्या दरम्यान योजना स्वीकारणें व नाकारणें असें आंदोलन कित्येक दिवसपर्यंत चालू होतें. व्हाइसरॉय वेव्हेल यांनीं हंगामी सरकारांतील मंत्र्यांचीं नांवें दोन वेळ जाहीर केलीं व दोन्ही वेळ या ना त्या कारणास्तव काँग्रेस व मुस्लीम लीग यांनीं जाहीर केलेल्या मंत्रिमंडळास नकार दिला. मुस्लीम लीगला समान प्रतिनिधित्व मंत्रिमंडळांत पाहिजे होतें, तर काँग्रेसला समान प्रतिनिधित्व अमान्य होतें. शिवाय, काँग्रेसच्या बाजूनें मंत्रिमंडळांत राष्ट्रीय मुसलमान नेमला जाणें आवश्यक वाटत होतें, तर मुस्लीम लीगला राष्ट्रीय मुसलमानाचें वावडें होतें. मुस्लीम लीग आपण सर्व मुसलमान जनतेचे प्रतिनिधि आहों, असें म्हणवीत होती; आणि हिंदुस्थानच्या सर्व जमातींचें प्रतिनिधित्व आपणाकडे आहे, असा काँग्रेसचा दावा होता. व्हाइसरॉयांनीं प्रसिद्ध केलेल्या मंत्रिमंडळास काँग्रेसनें नकार दिल्यावर, लीगला मंत्रिमंडळ बनविण्यास पाचारण केलें जाईल, अशी लीग-पुढाऱ्यांना आशा वाटत होती. परंतु, हिंदुस्थानांतील बहुसंख्य हिंदूंवर अल्पसंख्य मुस्लीम जमातीनें अधिराज्य चालविणें लोकशाहीच्या तंत्रानुसार अयोग्य असल्यानें, व्हाइसरॉयला तसें करतां येणें अशक्य होतें; म्हणून, मध्यंतरीं कांहीं काल जाऊं देऊन, काँग्रेसचे पुढारी पंडित जवाहरलाल नेहरु यांना व्हाइसरॉयसाहेबांनीं मंत्रि-मंडळ बनविण्यास पुन: पाचारण केलें; व काँग्रेस ज्यांचीं नांवें सुचवील, त्यांना मंत्रिमंडळावर घेण्याचें कबूल केलें. या वेळींहि पंडित नेहरूंनीं मुस्लीम लीगचे पुढारी मि. जीना यांच्याबरोबर मंत्रिमंडळांत लीगनें यावें, म्हणून वाटाघाट केली.

परंतु, मि. जीनांनीं आपला हेका सोडला नाहीं व पंडित नेहरूंच्या विनंतीस नकार दिला. तेव्हां, पंडित नेहरू यांनीं दिल्लीस जाऊन व्हाइसरॉयबरोबर चर्चा करून कॉंग्रेसच्या १२ सभासदांचें मंत्रिमंडळ बनविलें व या मंत्रिमंडळानें ता. २ माहे सप्टेंबर १९४६ रोजीं मध्यवर्ती कारभाराचीं अधिकारसूत्रें आपल्या हातीं घेतलीं. या मंत्रिमंडळानें, व्हाइसरॉयांचें कार्यकारीमंडळ म्हणून काम न करतां, हंगामी राष्ट्रीय सरकार म्हणून काम करण्याचें ठरविलें; आणि व्हाइसरॉय व ब्रिटिश सरकार यांनीं त्यास संमति दिली. या मंत्रिमंडळानें राज्यकारभार धूमधडाक्यानें सुरू केल्यावर, मंत्रिमंडळांत आपण शिरलों नाहीं ही चूक झाली, असें मुस्लीम लीगला वाटूं लागलें; व व्हाइसरॉय यांनाहि लीग मंत्रिमंडळांत आल्यास बरें होईल असें वाटून, त्यांनीं लीगचे पुढारी मि. जीना यांना बोलावून मंत्रिमंडळांत लीगनें यावें म्हणून वाटाघाट केली; व सुमारें एक महिन्यानंतर लीगनें मंत्रिमंडळांत शिरण्यास संमति दिली. त्यामुळें, कॉंग्रेस मंत्रिमंडळांतील दोन मंत्र्यांचे राजीनामे घेऊन, लीगचे पांच मंत्री मुस्लीम लीगच्या संमतीनें मंत्रिमंडळांत व्हाइसरॉयसाहेबांनीं नेमले व पंतप्रधान पंडित नेहरू यांच्या विचारें एकंदर चौदा मंत्र्यांमध्यें मध्यवर्ती सरकारचीं खातीं विभागण्यांत आलीं. या मंत्रिमंडळांत कॉंग्रेसचे, राष्ट्रीय मुसलमान धरून ६, मुस्लीम लीगचे अस्पृश्य प्रतिनिधींसह ५ आणि इतर ३ असे एकंदर १४ मंत्री होते. मंत्रिमंडळाचे उपाध्यक्ष पंडित नेहरु असून त्यांच्याकडे परराष्ट्रीय खातें होतें.

ब्रिटिश त्रिमंत्रिशिष्टमंडळानें जी दुसरी दीर्घकालीन हिंदी स्वातंत्र्याची योजना केली व जी कॉंग्रेसनें मान्य केली, ती योजना अशी कीं, सर्व हिंदुस्थानचे तीन विभाग (अ), (ब) व (क) असे करण्यांत आले. (अ) विभाग मुंबई, मद्रास, वगैरे बहुसंख्य हिंदूंचा होता. (ब) विभागांत बंगाल, बिहार व आसाम यांचा समावेश होता. यांतील बंगाल प्रांतांत बहुसंख्य मुसलमान आहेत. (क) विभाग सिंध, पंजाब व वायव्य सरहद्दप्रांत यांचा बनविला होता. यांतील सिंध व वायव्य सरहद्दप्रांत यांत बहुसंख्य मुसलमानांची वसती होती. हे जे अ, ब व क असे तीन गट पाडले, त्यांतील लोकांनीं दर १० लक्षांस १ याप्रमाणें आपले प्रतिनिधि निवडावयाचे, व अशा निवडून आलेल्या प्रतिनिधींची एक घटना-समिती बनवून, तिनें हिंदुस्थानची राज्यघटना बनवावयाची; आणि जी

घटना या घटना-समितीकडून तयार केली जाईल, तिला ब्रिटिश सरकार मान्यता देणार असून, त्याप्रमाणें राज्यकारभार सुरू करून देऊन हिंदुस्थानांतील आपली सत्ता सोडावयाची असें ब्रिटिश मजूर मंत्रिमंडळानें आश्वासन दिलें.

ही दीर्घकालीन योजना कॉंग्रेसनें मान्य करून, मगच हंगामी सरकारांत प्रवेश केला. मुस्लीम लीगला ही योजना मान्य नव्हती. या योजनेनें ठरविल्या-प्रमाणें हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांनीं आपआपले प्रतिनिधि घटना-समितीवर निवडून दिले. घटना-समितीवर सर्व प्रांतांच्या मिळून एकूण प्रतिनिधींची संख्या तीनशें एकुणनव्वद ३८९ राहणार होती; त्यांपैकीं ब्रिटिश हिंदुस्थानतर्फे २९६ आणि हिंदी संस्थानांतर्फे ९३ प्रतिनिधि यावयाचे होते. संस्थानी प्रतिनिधींची निवड होऊन, सर्व प्रतिनिधींनीं युक्त अशा समितीचें काम जून १९४७ पासून सुरू झालें. ब्रिटिश हिंदुस्थानांतल्या निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या समितीची बैठक सुरू करण्याची तारीख जाहीर झाल्याबरोबर, मुस्लीम लीगच्या प्रतिनिधींनीं घटना-समितींत भाग घेण्याचें नाकारलें. परंतु, पंडित नेहरु यांनीं काय वाटेल तें झालें, तरी घटना-कमिटी ठरल्या तारखेस भरलीच पाहिजे असें जाहीर केलें. घटना-कमिटीच्या बैठकीची ता. ९ डिसेंबर १९४६ ही ठरविण्यांत आली होती.

दरम्यानच्या काळांत, ब्रिटिश सरकारनें जाहीर केलेल्या दीर्घकालीन योजनेंतील कलमांचे कॉंग्रेस व मुस्लीम लीग यांनीं लावलेल्या अर्थाबाबत मतभेद झाल्यामुळें कॉंग्रेसचे व मुस्लीम लीगचे पुढारी ब्रिटनचे मुख्य प्रधान मि. ॲटली यांच्याबरोबर वाटाघाट करण्यासाठीं लंडनला जाऊन आले. तेथील वाटाघाटींत अर्थाबाबतचे मतभेद मिटले नाहींत, व पंडित नेहरू पूर्वी ठरल्याप्रमाणें घटना-समितीच्या बैठकीसाठीं हिंदुस्थानांत परत आले. ता. ६ डिसेंबर रोजीं एक पत्रक प्रसिद्ध करून मुस्लीम लीग लावीत असलेल्या अर्थास ब्रिटिश सरकारनें पुष्टी दिली व मतभेदाच्या कलमांचा अर्थ फेडरल कोर्टाकडून लावून घ्यावा, या कॉंग्रेसच्या मागणीस त्यांनीं मान्यता दिली. फेडरल कोर्टाचा निर्णय मान्य कर-ण्यास लीग कबूल नसल्यानें, कॉंग्रेसनेंहि फेडरल कोर्टाकडे न जाण्याचें ठरविलें.

पंडित नेहरू ता. ८ डिसेंबर १९४६ रोजीं लंडनहून परत आल्यावर ता. ९ रोजीं सकाळीं ११ वाजतां पूर्वी ठरल्याप्रमाणें घटनासमितीचें काम डॉ. सच्चिदानंद सिंह यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू झालें. एकंदर २०५ सभासद

चित्रांक १०



राष्ट्रीय ध्वज



संस्थानचा भगवा झेंडा

समितीच्या बैठकीस हजर होते. मुस्लीम लीगनें समितींत भाग घ्यावयाचा नाहीं असें ठरविलें असल्यामुळें, लीगचा एकहि सभासद हजर नव्हता. डॉ. आंबेडकर यांनींहि घटना-समितींत भाग घ्यावयाचा नाहीं असें प्रथम ठरविलें होतें; परंतु, तेही पहिले दिवसापासून विरोधकाची भूमिका स्वीकारून घटना-समितीस हजर राहिले. डॉ. सिंह हे फार वयोवृद्ध असल्यामुळें, समितीच्या कामावर कायमचे अध्यक्ष म्हणून, त्यांच्या जागीं, डॉ. राजेंद्र प्रसाद यांची निवड करण्यांत आली; व त्यांच्या अध्यक्षतेखालीं समितीच्या बैठकी चालू झाल्या.

सन १९४७ सालांत वरचेवर बैठकी भरवून घटना-समितीनें घटना पुरी करण्याचें काम जवळ जवळ पुरें केलें. ती स. १९४८ इ. च्या एप्रिलमध्यें जाहीर करण्यांत येणार होती. दरम्यानच्या काळांत हंगामी मंत्रिमंडळांतील कॉंग्रेसपक्ष व मुस्लीम लीग पक्ष यांच्यांतील मतभेद विकोपास जाऊन दैनंदिन कारभार सरळपणें चालणें अशक्य होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येऊं लागल्यामुळें, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड माउंटबॅटन हे हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितीसंबंधीं आपल्या परीक्षणाचा रिपोर्ट घेऊन लंडनला गेले. तेथें त्यांनीं सुमारें एक महिनाभर मुक्काम केला व ब्रिटिश मंत्रिमंडळाबरोबर, हिंदुस्थानच्या प्राप्त परिस्थितींत काय उपाययोजना करावी यासंबंधीं वाटाघाट करून, हिंदुस्थानची फाळणी हिंदुस्थान व पाकिस्तान अशी दोन स्वतंत्र राष्ट्रांत करून, हिंदुस्थानचा राज्यकारभार जून १९४८ अखेर कॉंग्रेसच्या हातीं देण्याचें पूर्वी जाहीर केलें होतें, त्यांत फेरबदल करून ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजींच स्वतंत्र हिंदुस्थानचा कारभार हिंदुस्थानच्या लोकांच्या हातीं देण्याबद्दल त्यांनीं योजना तयार केली व ब्रिटिश मंत्रिमंडळाची या योजनेस संमति मिळविली. कॉंग्रेस व मुस्लीम लीग यांची संमति घेऊन त्यांनीं ती ता. २ जून १९४७ रोजीं जाहीर केली. कॉंग्रेसचें ध्येय अखंड हिंदुस्थानचें होतें. वरचेवर तें तिनें जाहीरही केलें होतें; परंतु, मुस्लीम लीगच्या हेकेखोरपणामुळें, हें तत्त्व धरून बसल्यास, हिंदुस्थानचें स्वातंत्र्य जें दृष्टिपथांत येऊं लागलें होतें, त्यासहि अंतरण्याचा प्रसंग येण्याची आपत्ति टाळण्यासाठीं 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः'। अशा दूरदृष्टीनें माउंटबॅटन योजनेस तिनें संमति दिली. हिंदुस्थानांतील प्रमुख राजकीय पक्ष, जे मुस्लीम लीग व कॉंग्रेस, यांची संमति मिळतांच, त्या योजनेप्रमाणें देशाच्या फाळणीस

सुरुवात झाली. मि. रॅडक्लिफ नांवाच्या युरोपियन ऑफिसरकडे हें काम उभय-पक्षांच्या संमतीनें सोपविण्यांत आलें. त्यानें सिंधप्रांत सर्व, पश्चिम पंजाब व पूर्व-बंगाल हे भाग पाकिस्तानांत समाविष्ट केले. वायव्य सरहद्दप्रांत व आसामाचा पूर्वभाग यांत बहुसंख्य प्रजा मुस्लीम होती; तथापि, ते भाग पाकिस्तानांत अगर हिंदीसंघराज्यांत समाविष्ट करावयाचे, तें तेथील सार्वमतानें ठरवावें असें ठरविलें. त्याप्रमाणें मतदान झाल्यावर, बहुमतानें ते दोन्ही प्रांत पाकिस्तानांत समाविष्ट झाले. बाकीचा राहिलेला सर्व भाग हिंदुस्थानच्या संघराज्याचा भाग ठरविला गेला. व त्यास अनुसरून सरहद्दी ठरविल्या गेल्या. देशाच्या फाळणीबरोबरच सैन्याची, राष्ट्रीयनिधीची, नोकरांची, लष्करी सामग्रीची, इत्यादींची वांटणी उभय राष्ट्रांमध्यें झाली. याप्रमाणें फाळणीचें काम झाल्यावर, ता. १४ ऑगस्ट १९४७ रोजीं रात्रीं १२ बारा वाजतां हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचीं सूत्रें काँग्रेस मंत्रिमंडळाच्या व ता. १५ रोजीं पाकिस्तानचीं सूत्रें मुस्लीम लीगच्या मंत्रिमंडळाच्या हातीं देण्यांत आलीं. हिंदुस्थानचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं आपल्या हातांत सूत्रें घेतलीं व पाकिस्तानचीं सूत्रें मि. लियाकत अल्लीखान यांनीं घेतलीं. पाकिस्तानचे गव्हर्नर जनरल मुस्लीम लीगचे अध्वर्यू मि. जीना हे स्वतः झाले. नेहरू मंत्रिमंडळानें लॉर्ड माउंटबॅटन यांची जून १९४८ पावेतों हिंदीसंघराज्याचे गव्हर्नर जनरल म्हणून नेमणूक केली. याप्रमाणें ता. १५ ऑगस्ट १९४७ पासून हिंदुस्थान स्वतंत्र झाला. हा राष्ट्राच्या इतिहासांतील अत्यंत संस्मरणीय असा दिवस सर्व हिंदुस्थानभर मोठ्या समारंभानें साजरा झाला. भोर येथें श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं समारंभ साजरा करण्यांत आला. राष्ट्रीय ध्वज व संस्थानचा भगवा ध्वज, हे दोन्ही ध्वज श्री. राजेसाहेब यांच्या हस्तें उभारून त्यांस वंदन करण्यांत आलें. या मंगल प्रसंगीं श्री. राजेसाहेबांनीं संस्मरणीय भाषण केलें. तें :—

" ब्रिटिश साम्राज्याचा कालखंड संपून आजपासून या देशांत स्वातंत्र्याचें सुवर्ण युग सुरू होत आहे. ब्रिटिश साम्राज्यसत्ता जाऊन त्या ठिकाणीं आजपासून हिंदी लोकांची सत्ता सुरू होत आहे, याबद्दल कोणाचें अंतःकरण अभिमानानें उचंबळून येणार नाहीं ? अशा अत्यंत मंगल प्रसंगीं संस्थानच्या भगव्या ध्वजाबरोबर देशानें संमत केलेला तिरंगी राष्ट्रध्वज उभारण्यास आम्हांला फार आनंद वाटत आहे. "

भाषणानंतर श्रीमंत राजेसाहेब यांनीं राजवाड्याचे पुढील चौकांत एका बाजूला राष्ट्रीय ध्वज व दुसऱ्या बाजूला संस्थानचा भगवा ध्वज उभारला.

नंतर संस्थानचे मुख्य मंत्री श्री. गो. बा. पोतनीस, श्री. शं. ल. लिमये, मंत्री, श्री. ल. मा. देवी वकील, व श्री. गुप्ते वकील यांचीं स्वातंत्र-दिनाचें महत्त्व वर्णन करणारीं भाषणें झालीं. श्री. देवी वकील म्हणाले कीं, "काल आपण परतंत्र होतों. आजपासून आपण स्वतंत्र झालों ही घटना सूर्यप्रकाशाइतकी सत्य आहे. सन १८८५ सालीं कॉंग्रेसची स्थापना झाली व तेव्हांपासून आजपर्यंत विविध प्रकारचे प्रयत्न या देशास स्वातंत्र्य प्राप्त व्हावें, म्हणून झाले. त्यांचें फळ आज आपणांस मिळालें आहे. आजपर्यंत भारतमातेच्या सुपुत्रांनीं स्वातंत्र्याकरितां बलिदान केलें, त्यांस आपण श्रद्धांजलि अर्पूं या."

नंतर, श्री. गुप्ते वकील यांनीं भाषण केलें. समारंभाचे अध्यक्ष श्री. वझे यांनीं आपल्या समारोपाच्या भाषणांत स्वातंत्र्य-दिनाचें महत्त्व विविध रीतीनें पटवून दिलें.

श्री. ल. मा. देवी, भोर प्रजापरिषदेंतील एक प्रमुख पुढारी, यांनीं केलेल्या भाषणांतील कांहीं उतारे परिशिष्टांत परिशिष्ट नं. ३ ठिकाणीं दिले आहेत.

ता. २ जून १९४७ रोजीं ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या संमतीनें हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड माउंटबॅटन यांनीं फाळणीची योजना जाहीर केल्यावर, त्या दिशेनें अंमलबजावणीच्या कामास सुरुवात लागलीच केल्याचा उल्लेख वर आलाच आहे. ब्रिटिश सरकारनें संस्थानांच्या भवितव्याविषयीं वेळोवेळीं काय धोरण राहील, हें जाहीर केलें होतें. ब्रिटिशांनीं हिंदुस्थान सोडल्यावर हिंदी संस्थानें सार्वभौम होतील असें त्यांनीं घोषित केलें होतें. परंतु, संस्थानांच्या सार्वभौमत्वाची ही घोषणा केवळ शाब्दिक होती, असें पुढील घटनेवरून म्हणावें लागतें. कारण, हिंदुस्थानांतील प्रदेशाच्या फाळणीच्या कामाबरोबरच, व्हाइसरॉय लॉर्ड माउंटबॅटन यांनीं ब्रिटिश राज्य हिंदुस्थानांत स्थापन झाल्यानंतर त्याच्याशीं संस्थानिकांनीं मांडलिकत्वाचे जसे करार केले होते, त्या प्रकारचे 'जैसे थे' करार नवीन हिंदी सरकारबरोबर करावे याविषयीं संस्थानिकांबरोबर वाटाघाटी सुरू केल्या. त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व लहान लहान संस्थानिकांनीं नवीन

करार व Instrument of Accession ( सामिलनामे ) हिंद सरकारबरोबर केले. दक्षिणेंतील इतर संस्थानिकांबरोबर भोरच्या अधिपतींनीं अशा प्रकारच्या 'जैसे थे' करारावर व Instrument of Accession वर सही करून हिंदी राज्याच्या आधिपत्यास मान्यता दिली. त्याबाबत हिंदुस्थान सरकारच्या संस्थानी खात्याच्या सेक्रेटरीचें ता. २२-८-१९४७ चें खालीलप्रमाणें पत्र श्री. राजेसाहेबांना आलें.

" I am desired by His Excellency the Viceroy and Sardar Patel to acknowledge the receipt of the Instrument of Accession signed by you on behalf of your State, and to say that they both appreciate the part played and the sacrifice made by you in arriving at this agreement, at such short notice in the common interest of the Dominion of India and the States. They hope that the era of co-operation between the Dominion and the States, as exemplified by this Instrument of Accession, will in due course strengthen the country as a whole socially, economically and politically.

2. The Stand-still Agreement ( in duplicate ) signed on behalf of your State has also been received.

3. One copy of the Instrument of Accession signed by the Governor-General of the Dominion of India and a copy of the Stand-still Agreement signed on behalf of the State Department of the Dominion will be returned to you shortly after August 15".

यानंतर लवकरच हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल लॉर्ड माउंटबॅटन यांनीं सह्या केलेले करार संस्थान दरबारकडे पाठविण्यांत आले. हा करार व त्याचें परिशिष्ट हीं परिशिष्टांत नं. ४ ठिकाणीं दिलीं आहेत.

ता. १५ ऑगस्ट १९४७ पासून हिंदुस्थान व पाकिस्तान यांची वसाहतींचीं स्वराज्यें स्वतंत्रपणें आपआपल्या राष्ट्राचा कारभार पाहूं लागल्यावर, फारच थोड्या अवधींत हिंदी राष्ट्रावर अनेक आपत्ति कोसळल्या. हिंदुस्थानांतील बहुजन-समाजास फाळणीची योजना पसंत नव्हती. फाळणीचा पहिला व अत्यंत तीव्र स्वरूपांत असा परिणाम दिसून आला कीं, बंगाल व पंजाब यांमध्यें फार मोठ्या प्रमाणांत दंगली सुरू झाल्या. या प्रांतांतील पाकिस्तानच्या वाटणीस आलेल्या

चित्रांक ११



राष्ट्रीय ध्वज व संस्थानचा भगवा झेंडा ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं भोर येथें श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें उभारण्यांत आला.
डावे बाजूला राष्ट्रीय झेंडा व उजवे बाजूला संस्थानचा झेंडा
डावे बाजूकडून उजवीकडे—श्रीमंत राजेसाहेब व श्री. श्री. ग. बझे

[ सं. पा. ४१

भागांतील मुसलमानांनीं तेथील हिंदूंचीं घरेंदारें लुटलीं, त्यांना हाकलून देऊन त्यांच्या घरांचे ताबे घेतले, बायका पोरांच्या कत्तली केल्या, अनेक स्त्रियांना पळविलें, त्यांच्यावर अत्याचार केले, व बाटवून कित्येकांना मुसलमानी धर्म स्वीकारावयास लावलें. आधींच युद्धामुळें व धान्यनियंत्रणामुळें कसेंबसें जीवन कंठीत असलेली तेथील प्रजा, या अरिष्टानें अत्यंत भयभीत झाली व जिकडे वाट फुटेल तिकडे स्वतःचा जीव बचावण्याकरितां देश सोडून पळत सुटली. आप्तेष्टांची व बायकापोरांची सुद्धां कोणीं काळजी केली नाहीं. सर्वत्र हवालदील वातावरण झालें. या संकटांत कित्येकांना आपल्या घरादारांना, बायकापोरांना व संपत्तीला मोताद व्हावें लागलें; व कित्येक जिवानिशीं मेले, त्यांची गणतीच नाहीं. हिंदुस्थान सरकारला ही आपत्ति अगदींच अनपेक्षित असल्यामुळें, त्यांनाहि या संकटाला कशा प्रकारें तोंड द्यावें, असा बिकट प्रश्न पडला. पहिल्या ८।१५ दिवसांत तर या कत्तलीचें स्वरूप फारच तीव्र होतें. बंगाल व पंजाब या प्रांतांतील दंगलीच्या प्रदेशांतून लाखों लोक जीव घेऊन पळाले, ते राष्ट्राच्या सर्व भागांत पसरले. त्यांना अन्न व वस्त्र पुरविण्याची जबाबदारी अर्थातच हिंदी सरकारवर होती. कलकत्यास व दिल्लीला ही दंगल मोठ्या प्रमाणांत झाली. पंजाब व बंगाल यांमधील निर्वासितांनीं ही दंगल केली. दिल्लींत तीन दिवसपर्यंत वातावरण अगदीं तंग झालें होतें. याप्रमाणें परिस्थिति ता. २० ऑगस्टपासून पुढें, एक महिन्याचे वर, चालू होती. पहिला सुरुवातीच्या दंगलीचा भर ओसरल्यावर, हिंदुस्थान सरकारनें पाकिस्तान सरकारबरोबर वाटाघाटी करून पंजाबमधील हिंदु निर्वासितांना हिंदुस्थानांत आणण्याची, त्यांना अनवस्त्र पुरविण्याची, त्यांच्या राहण्याची, व त्यांना उद्योगधंदे मिळवून देण्याची सोय, निर्वासितांकरितां स्वतंत्र खातें उघडून, त्या खात्यामार्फत केली. कित्येक दिवसपर्यंत हें काम चालू होतें. पंजाब व बंगाल यांमधील निर्वासित हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रांतांतून पसरले. त्या त्या प्रांताच्या सरकारांनीं निर्वासितांकरितां ठिकठिकाणीं छावण्या उघडून सोयी केल्या. इकडे हें निर्वासित-प्रकरण चालू असतांच, वायव्य सरहद्दीवरील पठाण टोळ्यांनीं पाकिस्तानच्या मदतीनें काश्मीरवर हल्ले करण्यास सुरुवात केली. काश्मीर संस्थानांत बहुसंख्य मुसलमान वसती आहे. तो भाग पाकिस्तानांत आला

पाहिजे, असा पाकिस्तान सरकारचा दावा आहे. टोळीवाल्यांचे हल्ले सुरू झाल्यावर, तेथील संस्थानाधिपतीनें हिंदुस्थान सरकारशीं करार करून काश्मीर संस्थान कांहीं अटींवर हिंदुस्थानांत सामील करण्यास मान्यता दिली. नंतर, त्याच्या संरक्षणाची जबाबदारी हिंदुस्थान सरकारनें पतकरून आपलें सैन्य काश्मीरच्या मदतीस पाठविलें. पंजाब व बंगाल यांमधील दंगली थांबल्या असून, काश्मीर-मध्यें अद्यापपावेतों टोळीवाल्यांचे हल्ले चालू आहेत. काश्मीरबाबत पाकिस्तान व हिंदुस्थान यांच्या दरम्यान आपसांत तडजोड होऊं न शकल्यामुळें, हिंदुस्थान सरकारनें काश्मीरचा प्रश्न जागतिक सुरक्षा मंडळाकडे निर्णयासाठीं पाठविला आहे. सुरक्षामंडळापुढें आपआपलें म्हणणें मांडण्यासाठीं उभयराष्ट्रांचे प्रतिनिधि गेले आहेत. त्यांच्या वाटाघाटी चालू आहेत. अद्यापि कोणताच निर्णय लागलेला नाहीं.

## प्रकरण ४ थें

# श्रीमंत राजेसाहेबांनीं नेमलेली घटना कमिटी

इ. स. १९३८ अखेरच्या डिसेंबर महिन्यांत केलेल्या घोषणेस अनुसरून ता. १८ ऑगस्ट १९३९ रोजीं पुणें येथील भारत सेवक समाजाचे सभासद श्री. श्रीधर गणेश वझे, बी.ए., यांच्या अध्यक्षतेखालीं ५ सरकारी व ५ बिन-सरकारी अशा सभासदांची मिश्र कमिटी ' घटना कमिटी ' म्हणून नेमण्यांत आली. या कमिटीकडे ( १ ) कायदेमंडळाच्या सभासदांना निवडण्यासाठीं मताधिकार कोणास असावा ? ( २ ) कौन्सिलच्या सभासदाची लायकी काय असावी ? ( ३ ) कायदेमंडळावर सभासद निवडण्यासाठीं कोणकोणते मतदार-संघ तयार करण्यांत यावेत ? ( ४ ) निवडणुकीचा कायदा व नियम काय असावेत ? आणि ( ५ ) कायदेमंडळाच्या कामकाजाचे नियम काय असावेत ? या पांच बाबी ठरविण्याचें काम सोंपविण्यांत आलें.

### घटना कमिटींतील सभासद

१. रा. श्रीधर गणेश वझे, बी.ए., अध्यक्ष.

### सरकारी सभासद

१. रा. कोंडो महादेव कुमठेकर, बी.ए., एल्.एल्.बी., दिवाण, सं. भोर.

२. रा. विनायक गोविंद रानडे, एम्.ए., एल्.एल्.बी., कौन्सिलर, सं. भोर.

३. रा. नरहर गोपाळ आंबेकर, बी.ए., कौन्सिलर, सं. भोर.

४. रा. शंकर सखाराम काळे, बी.ए.

५. रा. विनायक विश्वनाथ बावडेकर, बी.ए., एल्.एल्.बी., डि. व से. जज्ज, भोर.

### बिनसरकारी सभासद

६. रा. गहिनीनाथ माधव पानसे, बी.ए., एल्.एल्.बी.

७. रा. गणेश भास्कर साने, बी.ए., एल्.एल्.बी.

८. रा. गोपिनाथ बाळकृष्ण पोतनीस.

९. रा. कृष्णाजी गणेश देव.

१०. रा. अण्णाजी पांडुरंग कोंडे, देशमुख.

या कमिटीचें काम ता. ४ नोव्हेंबर सन १९३९ पासून सुरू झालें. कमिटीनें प्रथम वरील पांच बाबींपैकीं पहिल्या तीन बाबींवर अगोदर विचार करून आपला रिपोर्ट तयार करण्याचें ठरवून व एक प्रश्नपत्रिका तयार करून, ती सुमारें ७०० व्यक्तींकडे अभिप्रायासाठीं पाठविली. सुमारें १५० लोकांकडून लेखी उत्तरें कमिटीकडे आलीं. यांपैकीं ८३ व्यक्तींना कमिटीनें तोंडी पुराव्यासाठीं बोलाविलें होतें. तोंडी पुरावा घेण्यासाठीं कमिटीनें संस्थानांत दौरा काढला व पुरावा घेऊन आपला रिपोर्ट तयार करून तो श्रीमंत राजेसाहेबांना सप्टेंबर १९४० मध्यें सादर केला. नंतर, ऑक्टोबरमध्यें भरलेल्या भोर कायदेमंडळाच्या बैठकीच्या वेळीं तो अभिप्रायासाठीं कायदेमंडळापुढें मांडण्यांत आला. या वेळीं कायदेमंडळानें त्यावर आपला अभिप्राय दिला नाहीं. त्याचें मराठी भाषांतर तयार करून सभासदांना पुरविण्यांत आल्यावर, अभिप्रायाकरितां जादा अधिवेशन भरविण्यांत यावें, अशी कायदेमंडळाकडून विनंति करण्यांत आली. त्याप्रमाणें दरबारनें रिपोर्टाचें भाषांतर तयार करून, तें जानेवारी सन १९४१ मध्यें सभासदांकडे पाठविलें, आणि मार्च १९४१ मध्यें जादा बैठक भरविण्यांत येऊन त्यावर चर्चा करण्यांत आली. परंतु, याहि बैठकींत कायदेमंडळाकडून अभिप्राय न येतां, एक बिनसरकारी सभासदांची कमिटी नेमली गेली व या कमिटीचा रिपोर्ट ता. १२ एप्रिल १९४१ रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांना सादर करण्यांत आला.

वर लिहिल्याप्रमाणें घटना-कमिटीच्या रिपोर्टाचा विचार करून दरबारनें दप्तरी ठराव नं. ४ ता. १ जुलई १९४१ इ. चा मंजूर करून घटना-कमिटीच्या शिफारशींना, कांहीं फेरफार करून, मान्यता दिली.

सुरुवातीस कमिटीकडे एकूण ५ प्रश्न विचारासाठीं सोंपविले होते, असें म्हटलें आहे. त्यांतील तीन प्रश्नांबाबतच्या शिफारशींना दरबारकडून मान्यता मिळाल्यावर, कमिटीनें ४ था प्रश्न कायदेमंडळाच्या निवडणुकीचे नियम व

कायदा काय असावा हा विचारासाठीं हातीं घेतला; आणि याबाबतचा आपल्या शिफारशींचा रिपोर्ट ता. २६ ऑक्टोबर १९४१ रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांना सादर केला. या रिपोर्टांतील शिफारशींना दरबारकडून ता. ३ डिसेंबर १९४१ रोजीं दप्तरी ठराव नं. ९ नें मंजूरी व मान्यता देण्यांत आली.

आतां फक्त ५ वा प्रश्न 'कायदेमंडळाच्या कामकाजाचे नियम काय असावेत' हा शिल्लक राहिला होता. या प्रश्नाचा विचार करण्याकरितां भोर संस्थानच्या कायद्यांत दुरुस्ती करणें जरूरीचें होतें. कायद्यांतील कलमें कायम झाल्याखेरीज कामकाजाचे नियम करणें चुकीचें होणार होतें. सबब, घटना कमिटीचे अध्यक्ष मे. वझे यांनीं भोर संस्थानच्या कायद्याचा दुरुस्त मसुदा कमिटीकडे विचारासाठीं सोंपविण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांना विनंति केली. त्या विनंतीचा हेतु श्रीमंत राजेसाहेबांनीं लक्षांत घेऊन कायद्याचा मसुदा प्रथम ठरविलेल्या ५ प्रश्नांचे कक्षेंत येत नव्हता, तरी कमिटीपुढें तो मांडण्यास आपली संमति दिली. या कायद्याचा इंग्रजी मसुदा आणि त्याचें मराठी भाषांतर यांच्या प्रती सभासदांस पुरविण्यांत आल्यावर, त्यावर वाटाघाट करून बऱ्याचशा दुरुस्त्यांच्या शिफारशींचा रिपोर्ट घटना कमिटीनें श्री. राजेसाहेबांस ता. १४ माहे मार्च १९४२ रोजीं सादर केला. हें काम संपल्यानंतर कायदेमंडळाच्या कामकाजाचे नियम तयार करण्याचें काम कमिटीनें हातीं घेतलें; आणि त्याही-बद्दलच्या शिफारशी ता. १३ एप्रिल १९४२ रोजीं रिपोर्टाच्या रूपानें राजे-साहेबांकडे कमिटीनें पाठविल्या.

अशा रीतीनें श्रीमंत राजेसाहेबांनीं स. १९३८ इ. मधील घोषणेस अनुसरून नेमलेल्या घटना-कमिटीचें काम १३ एप्रिल १९४२ रोजीं संपलें. त्या वेळीं अध्यक्ष मे. वझे यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना पुण्याहून ता. १३ रोजीं एक पत्र पाठविलें. त्यांत ते म्हणतात कीं,

"The Constitution Committee's meetings went off very smoothly, except for the fact that Mr. Deo absented himself. There was a touching leave-taking ceremony at the end, in which non-official members were full of praise for your sympathetic treatment of the changes proposed by them in the Draft Act."

यानंतर, पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणें भोर कायदेमंडळाची जादा बैठक जून १९४२ मध्यें भरविण्यांत येऊन भोर संस्थानचा कायदा व कायदेमंडळाच्या कामकाजाचे नियम, व त्यांसंबंधींच्या कमिटीच्या शिफारशी, यांवर कायदेमंडळाचा अभिप्राय घेण्यांत आला; आणि हा अभिप्राय लक्षांत घेऊन वरील दोन्ही मसुद्यांना दरबारकडून ता. १८ ऑगस्ट १९४२ रोजीं मान्यता देण्यांत आली. या कायद्याच्या परीक्षणात्मक ज्ञानप्रकाशाच्या ता. २१-८-४२ च्या अंकांत प्रसिद्ध झालेला लेख खालीं दिला आहे :—

## भोरचा घटना कायदा, दुरुस्ति १९४२

"भोर संस्थानचे राजेसाहेब, श्रीमंत सर बाबासाहेब पंतसचिव, के. सी. आय्. इ., यांनीं चार वर्षांपूर्वी केलेल्या घोषणेनुसार आतां नवीन घटना-कायदा जारी केला आहे. साधारणतः तीस बत्तीस वर्षांपूर्वींच्या मोर्लेमिंटो सुधारणांस धरून ही संस्थानची नवीन घटना आहे. कायदेमंडळांत एकंदर सभासद २३ असतील, त्यांपैकीं प्रत्यक्ष निवडणुकीनें निवडलेले १३, श्रीमंतांनीं नेमलेले बिनसरकारी ५ व सरकारी ५, अशी या सभासदांमध्यें वांटणी करण्यांत आली आहे. त्यांना प्रश्न व उपप्रश्न विचारण्याचा, ठराव मांडण्याचा व अंदाजपत्रकावर चर्चा करण्याचा अधिकार देण्यांत आला आहे. अंदाजपत्रकावर कायदेमंडळाचें मत घेण्यांत येणार नाहीं, पण कपातीच्या सूचना आणून त्यावर सभासदांना मतें देतां येतील; व अशा रीतीनें सरकारच्या धोरणावर निंदाव्यंजक ठराव पसार करतां येतील.

एकदां वर्षाचें अंदाजपत्रक कायदेमंडळापुढें ठेवल्यावर त्या पत्रकाबाहेर खर्च करण्याचे प्रकार अनेक संस्थानांतून घडतात; व मग या खर्चासंबंधीं आपलें मत व्यक्त करण्यास सभासदांना संधि मिळत नाहीं. भोर संस्थानांत मात्र असें न व्हावें यासंबंधीं दक्षता घेण्यांत आली आहे. कारण, अधिक खर्च करावा लागल्यास, त्याचें पुरवणी अंदाजपत्रकहि कायदेमंडळापुढें आतां मांडावें लागेल व त्यावर सभासदांना टीका करतां येईल, अशी सवलत ठेविल्याबद्दल श्रीमंतांचें अभिनंदन करणें वाजवी होईल. पण, याहीपेक्षां विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, अंदाजपत्रकांत ठरल्याप्रमाणेंच खर्च होत आहे किंवा नाहीं, हें सभासदांना

कळण्याची व कांहीं गैरशिस्त खर्च झाल्यास, तो उजेडांत आणण्याची तरतूद कायद्यांत केली आहे. वार्षिक जमाखर्चाचें ऑडिट होण्याची पद्धत सर्वच संस्थानांत आहे; पण, भोर संस्थानांत जमाखर्चाचा तपशीलवार तक्ता कायदेमंडळाच्या एका स्थायी समितीपुढें ठेवण्यांत येईल. अर्थात्, त्यावरील ऑडिटरचा शेराही या समितीस उपलब्ध होईल; आणि समितीचा यासंबंधांतील अहवाल कायदेमंडळांत चर्चिला जाईल, असें आम्ही समजतों. ही सुधारणा महत्त्वाची असून, स्वतंत्र ऑडिटर नेमण्याची व्यवस्था झाल्यास, तिचा फारच उपयोग होईल.

कायदेमंडळानें कांहीं प्रश्नांची चर्चा करूं नये अथवा अंदाजपत्रकांतील कांहीं बाबी विचारांत घेऊं नये, असें सर्वच ठिकाणीं ठरविणें जरूर असतें. पण, अशा प्रश्नांची व बाबींची लांबलचक यादी देण्याचा परिपाठ बऱ्याच संस्थानांतून दृष्टीस पडतो. ही यादी भोर संस्थानांत साधारण मानानें आटोपशीर ठेवण्यांत आली आहे, असें म्हणतां येईल. नियमांमध्येंही जर कायदेमंडळांतील चर्चेवर कडक नियंत्रणें घालण्यांत आली नाहींत, तर भोरचा कायदा, ज्या टप्प्यावर या संस्थानची राजकीय सुधारणा आजमितीस आली आहे तो लक्षांत घेतां, एकंदरीनें बऱ्या प्रकारचा आहे व एकदोन बाबतींत तर या पातळीवरच्या संस्थानांपेक्षां अधिक प्रगतिपर आहे, असेंच कोणाचेंहि मत होईल.

परंतु, भोर संस्थाननें यापेक्षां पुढील पल्ला आजच गांठावा असें आम्हांस वाटतें. पांच वर्षांनीं कायदेमंडळाच्या मतास अंदाजपत्रक टाकण्याचा आणि शिक्षण, आरोग्य, आदि खातीं कायदेमंडळाला जबाबदार अशा मंत्र्याकडे सोंपविण्याचा उपक्रम करण्याचें राजेसाहेबांनीं आपल्या घोषणेंत आश्वासन दिलें आहे. ही घोषणा होऊन चार वर्षें पुरीं झालीं असतां, आजच हा उपक्रम त्यांनीं केल्यास आपलें आश्वासन पुरें करण्यांत फाजील घाई केल्याचा आरोप श्रीमंतांवर कोणी करील, असें आम्हांस वाटत नाहीं. संस्थानी प्रजेच्या आकांक्षा किती त्वरेनें वृद्धिंगत होत आहेत, याची जाणीव राजेसाहेबांनीं ठेवणें अगत्याचें आहे. जमखिंडी संस्थाननें भोरच्या मागून कायदेमंडळास सुरुवात करून दोन वर्षांपूर्वी द्विदल राज्यपद्धतीची सुधारणा अंमलांत आणिली. मिरजेंत तर, श्रीमंत बाबासाहेबांची घोषणा झाल्यावर, तीन वर्षांनीं राजकीय सुधारणेचा प्रश्न उपस्थित झाला व इतक्यांतच मंत्र्यांची नेमणूक होऊनहि जाईल. अशा स्थितींत गेलेलीं

चार वर्षें जमेस धरून लोकनियुक्त मंत्री आतांच नेमण्याचें श्रेय श्रीमंतांनीं घ्यावें आणि प्रजेचा दुवा मिळवून स्वतःहि आपल्या उतार वयांत मनःस्वास्थ्याची जोड करून घ्यावी, अशी आमची त्यांस आग्रहाची विनंति आहे."

ता. ३ डिसेंबर १९४१ रोजीं दप्तरी ठराव नं. ९ नें निवडणुकीच्या नियमांस मान्यता दिल्यानंतर, घटना-कमिटीच्या अध्यक्षांनीं एप्रिल १९४२ अखेरच्या आंत निवडणुकी कराव्या अशी दरबारला विनंति केली. या वेळीं मतदारांच्या याद्या तयार करण्याचें काम पूर्ण झालें असल्यामुळें, दरबारनेंहि ती विनंति लागलीच मान्य केली; व तदनुसार ता. २० डिसेंबर १९४१ रोजीं राजेसाहेबांनीं एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. निवडणुकीच्या नियमानुसार जरूर ते जाहीरनामे वगैरे प्रसिद्ध करण्यांत येऊन ता. ११ मे १९४२ रोजीं निवडणुकी होऊन निरनिराळ्या मतदारसंघांतून १३ उमेदवार कायदेमंडळावर निवडून देण्यांत आले.

संस्थानच्या ५ तालुक्यांचे ५ ग्रामीण मतदारसंघ करण्यांत आले. त्यांतर्फे १० सभासद, सर्व तालुक्यांच्या हरिजन संयुक्त-मतदारसंघातर्फे १ हरिजन सभासद, सर्व तालुक्यांतील इनामदारांच्या विशिष्ट मतदारसंघातर्फे १ इनामदार सभासद, आणि भोर शहर नागर मतदारसंघातर्फे १ सभासद, याप्रमाणें एकूण १३ सभासद निवडून देण्यांत आले. ता. १४ व १६ मे रोजीं मतमोजणी होऊन ता. १८ रोजींच्या जादा गॅझेटमध्यें निवडून आलेल्या सभासदांचीं नांवें प्रसिद्ध करण्यांत आलीं.

हीरक-महोत्सवाच्या वेळीं केलेल्या घोषणेंत कायदेमंडळाच्या एकूण २१ सभासदांपैकीं १२ सभासद लोकनियुक्त राहतील असें ठरविण्यांत आलें होतें. घटना-कमिटीनें संस्थानांतील सर्व वर्गांचे हितसंबंध लक्षांत घेऊन, जागांची वांटणी ठरवितांना लोकनियुक्त सभासदांची संख्या १३ असावी अशी शिफारस केली. मूळच्या घोषणेप्रमाणें १२ नियुक्त व ९ सरकारी अशी २१ संख्या ठरली होती. कमिटीनें नियुक्तांची संख्या १३ केली, तेव्हां सरकारी सभासद ९ ऐवजीं १० व एकंदर कायदेमंडळ २३ सभासदांचें व्हावें असें ठरवून शिफारशींना श्रीमंत राजेसाहेबांनीं मान्यता दिली.

## प्रकरण ५ वें

# भोर संस्थानांतील राजकीय चळवळ

श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या षष्ट्यब्दपूर्ति-समारंभाच्या वेळीं जाहीर घोषणा करून प्रजेला राजकीय हक्कदान केलें, याची सविस्तर हकीकत मागील भागांत आलीच आहे. त्या वेळीं जाहीर केल्याप्रमाणें घटना-समिती नेमली. घटनासमितीनें दोन वर्षांत आपलें काम संपवून निवडणुकीचे नियम व घटना-कायदा तयार केला. या नियमांस अनुसरून भोर संस्थान कायदेमंडळाच्या निवडणुकी मे १९४२ मध्यें झाल्या. त्यांत संस्थानमधील दोन राजकीय पक्ष, प्रजासभा व लोकपक्ष, यांनीं मोठया हिरीरीनें भाग घेतला. प्रजासभेचे उमेद-वार बहुसंख्येनें यशस्वी झाले. लोकपक्षास अपयश आलें. फक्त दोन उमेद-वार लोकपक्षातर्फे निवडून आले. निवडणुकी शांततेनें पार पडल्या खऱ्या; परंतु, त्यांमध्यें लांचलुचपत, तोतयेपणा, वगैरे कृत्यें बरींच घडून आलीं. लोकपक्षाच्या पराभूत उमेदवारांनीं बहुतेक सर्व यशस्वी उमेदवारांविरुद्ध निवडणुकीसंबंधीं तक्रारअर्ज दाखल केले. निवडणुकीच्या नियमांत डि. जज्जा-कडे तक्रार-अर्जांचे निकाल करण्याचें काम सोंपविलें होतें. तथापि, संस्थानच्या नेहमींचे डि. जज्जांकडे हें काम न सोपविता, काम निःपक्षपातीपणानें व्हावें, म्हणून श्रीमंत राजेसाहेबांनीं ब्रिटिश हद्दींतील सेवानिवृत्त झालेल्या इसमां-पैकीं रा. मस्तकार या कायदेपंडितांची या कामाकरितां स्पेशल डि. जज्ज म्हणून नेमणूक केली. या जज्जानें आपल्यापुढील अर्जांपैकीं कांहीं अर्जांचा निकालही नियमांस अनुसरून केला. निवडणूकअर्जांच्या डि. जज्जाच्या निकालावर नियमांत अपील करण्याचा हक्क दिलेला नव्हता. परंतु, एका निवडणूक-अर्जांत असें अपील विरुद्ध पक्षाकडून दाखल करण्यांत आलें. दरम्यान स्पेशल जज्ज मि. मस्तकार हे प्रकृतीच्या कारणाकरितां राजीनामा देऊन निघून गेले. तेव्हां, दुसऱ्या डि. जज्जाची, रा. ब. बाळ यांच्या शिफारशीवरून, रा. पोतदार यांची नेमणूक करून निकाल करण्यांत आले. फिर्यादीपक्षातर्फे सादर करण्यांत आलेला पुरावा ग्राह्य मानून डि. जज्जानें प्रजासभेच्या बऱ्याच उमेद-

वारांच्या निवडणुका रद्द ठरविल्या व त्यांच्या जागीं प्रतिपक्षाचे-लोकपक्षाचे-उमेदवार निवडून आल्याचें जाहीर केलें; यामुळें, प्रजाप्रक्षाचें कायदेमंडळांत बहुमत होतें तें जाऊन, लोकपक्षाचें बहुमत झालें. मध्यंतरींच्या काळांत कांहीं सभासद मृत्यु पावल्यामुळें, कांहींच्या निवडणुकांचे अर्जांत निवडणुका रद्द ठरविल्या गेल्यामुळें व कांहींनीं राजीनामा दिल्यामुळें, बऱ्याच जागा कायदेमंडळांत रिकाम्या झाल्या. या जागांकरितां फेरनिवडणुका कराव्या लागल्या. त्यांतहि वरील गोष्टींचीच पुनरावृत्ति झाली. या निवडणुकांत प्रजापक्षाचेच उमेदवार निवडून आले. त्यांच्याविरुद्ध प्रतिपक्षाचे निवडणूक-तक्रार अर्ज होऊन, त्यांच्या निवडणुकाही कोर्टानें रद्द ठरविल्या व त्यांच्या जागीं लोकपक्षाचे उमेदवार निवडून आल्याचे निकाल दिले. वर म्हटल्याप्रमाणें निःपक्षपातीपणानें न्याय दिला जावा, म्हणून राजेसाहेबांनीं प्रथमपासूनच हें धोरण स्वीकारलें होतें. या निवडणुकीसंबंधीं एक गोष्ट मोठी चमत्कारिक घडली. ती, म्हणजे सर्वसामान्य निवडणुकांत व पोट-निवडणुकांत प्रजापक्षाचे उमेदवार बहुमतानें व बहुसंख्येनें निवडून यावे व त्यांच्या निवडणुकी कोर्टानें सर्वच्या सर्व रद्द ठरवाव्या, ही होय. याचा परिणाम असा झाला कीं, या निवडणुकांसंबंधांत कांहींतरी अंतस्थ राजकारण असावें व त्यांत राजेसाहेबांचा हात असावा अशी वर्तमानपत्रांतून याविषयीं उघड उघड टीका होऊं लागली. वास्तविक निवडणुकीच्या राजकारणाशीं राजेसाहेबांना हात घालण्याचें कांहींच कारण नव्हतें; व त्यांनीं तसा हात घातलाहि नाहीं. निवडणुकीचे नियम घटनासमितीनें तयार केले. ते राजेसाहेबांनीं जसेच्या तसे मंजूर केले. निवडणुकीच्या नियमांत राहिलेल्या दोषांचा पराभूतपक्षानें फायदा घेतला. ‘ डि. जज्जाचा तक्रार-अर्जाचा निकाल अखेरचा समजला जाईल. ’ असा नियम होता. परंतु, अर्जाची चौकशी चालू असतांना उपस्थित झालेल्या एकाद्या वादग्रस्त मुद्याचा जज्जानें निकाल केल्यावर, त्यावर प्रतिपक्षांस अपील करण्यास जागा होती. कारण, निवडणूक अर्जाचे निकाल करण्याचें काम डि. जज्जाकडे नियमानेंच सोपविलें होतें व ज्या सिव्हिल प्रोसीजर कोडच्या कलमानें डि. जज्जास निकाल करतां येतो, त्या कोडानेंच डि. जज्जाच्या निकालावर अपील करण्याचा अधिकार प्रतिपक्षास दिला आहे. हायकोर्ट अशा अपीलअर्जांचा निकाल करूं

शकतें. ब्रिटिश हद्दींत निवडणुकीच्या तक्रार-अर्जांची चौकशी स्वतंत्रपणें नेमलेल्या कमिशनरकडून करण्यांत येते व, त्यासही अखेरचा निकाल करण्याचा अधिकार नसून, त्या कमिशननें गव्हर्नरला शिफारस करावयाची असते. गव्हर्नरचा निकाल अखेरचा असतो.

नियमांतील दुसरा महत्त्वाचा दोष असा होता कीं, लांचलुचपतीचीं म्हणून जीं कृत्यें ठरविलीं होतीं, तीं ब्रिटिश हद्दींतील सन १९१९ च्या कायद्यानुसार ठरविलीं होतीं. त्यांतील कांहीं कृत्यें पुढें तिकडे रद्द ठरविण्यांत आलीं आहेत. पण, संस्थानच्या नियमांत तीं तशींच ठेवलेलीं असल्यामुळें, डि. कोर्टास त्यास अनुसरून निकाल करावे लागले. हे नियम घटनाकमिटीनें केलेले होते. मग, डि. कोर्टानें निवडणूकअर्जांचे निकाल केले, त्यांत राजेसाहेबांचा हात असावा या टीकेस काय आधार होता, तेंच समजत नाहीं. ‘ चुकला घाव ऐरणीच्या माथीं ’ या न्यायानें, नियमांच्या दोषानें उत्पन्न झालेल्या परिस्थितीचें खापर राजेसाहेबांच्या माथीं फोडण्यांत आलें. याखेरीज यांची संगतीच लागत नाहीं.

या निवडणुकीच्या निकालानंतर प्रजासभेनें आपली तक्रार दक्षिणी संस्थान लोकसभेपुढें मांडली. त्या सभेनें ना. मावळणकर यांच्या अध्यक्षतेखालीं एक चौकशी-समिति नेमली. तिनें यासंबंधीं आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला. त्याशीं दरबारचें सहमत नाहीं.

प्रजापक्षाचा निवडणुकीच्या कामांत पराभव झाल्यामुळें, त्यांनीं संस्थानमध्यें दुसरे उद्योग सुरू केले. रा. गोपीनाथराव पोतनीस यांनीं ‘ भोर संस्थान शेतकरी संघ ’ स्थापन करून त्या संघातर्फें संस्थानमध्यें गांवोगांव सभा भरविल्या व त्या सभांतून त्यांचीं भाषणें होऊं लागलीं. रा. पोतनीस व भाई भुस्कुटे वगैरे मंडळींच्या भाषणांनीं लोकमत प्रक्षुब्ध होऊं लागल्याची भीति वाटूं लागली, व त्याचा स्फोट भलत्या मार्गानें होईल कीं काय, अशी मोठी शंका उत्पन्न झाली. महायुद्ध या वेळीं जोरांत सुरू होतें. लोकांना जीवनोपयोगी जिन्नस दुर्मिळ होऊं लागले होते. संस्थानला लागणारीं धान्यें दूरदूरच्या मुलखांतून आणवून रयतेस पुरविण्याचा दरबार कसोशीनें प्रयत्न करीत होतें. परंतु, सर्व

संस्थानच्या प्रजेला पुरेल इतकें धान्य वेळच्यावेळीं आणविणें दरबारलाही पराकाष्ठेचें कठीण काम होऊन बसलें होतें. धान्याकरितां लोकांच्या रांगाच्या रांगा लागत व सर्वांना थोड्याथोड्या प्रमाणांत धान्य विकलें जात असे. प्रत्येकास मागणीइतकें देतां येत नसे. यांत दरबारचा दोष कांहींच नव्हता. पण, धान्याच्या कमतरतेमुळें ज्यास धान्य अपुरें मिळे, तो साहजिकच नाराज होई. अशा रीतीनें पसरत चाललेल्या असंतोषाचा फायदा या शेतकरी संघाच्या मंडळींनीं घेतला व आपल्या प्रक्षोभक भाषणांनीं जनतेचें मन दरबारविरुद्ध कलुषित करून राजसत्तेविरुद्ध चळवळ करण्यास तयार केलें. अशा प्रकारच्या शेतकरी संघाच्या सभांचे आलेले रिपोर्ट Intelligence ( इंटेलिजन्स ) खात्याकडून रेसिडेन्टमार्फत राजेसाहेबांकडे वेळोवेळीं पाठविले जात ( या पुढाऱ्यांविरुद्ध जरूर ती उपाययोजना न केल्यास, परिस्थिति आटोक्याबाहेर जाईल असा त्यांत इषारा दिलेला असे ). संस्थानांत अशांतता उत्पन्न होऊं नये, म्हणून योग्य ती खबरदारी घेणें दरबारला अवश्य होतें. तरी पण, युद्धामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितींत लोकपुढाऱ्यांविरुद्ध कांहीं उपाय करण्याचें ठरविल्यास, लोकांत प्रक्षोभ जास्त होऊन त्याचा अनिष्ट परिणाम दरबारला भोगावा लागेल; तशी परिस्थिति उत्पन्न होऊं नये, म्हणून या पुढाऱ्यांविरुद्ध कांहींहि उपाय करूं नये, असें श्रीमंत राजेसाहेबांना मनापासून वाटत होतें. परंतु, वर लिहिल्याप्रमाणें रेसिडेंटकडून रिपोर्ट आल्यामुळें, दरबारला त्या गोष्टीकडे कानाडोळा करणें शेवटीं अशक्य झालें.

शेतकरी संघाची एक सभा संस्थानच्या राजगड तालुक्यांतील नसरापूर गांवीं भरविण्यांत येण्याची तारीख जाहीर झाल्यावर, नेमल्या तारखेस सभेकरितां लोकहि तेथें बरेच जमले. त्या तारखेस सकाळीं उजाडण्यापूर्वीं रा. पोतनीस यांस अटक करण्यांत आली व, त्यांचे सहकारी भाई भुस्कुटे यांजवर संस्थान हद्दींत प्रवेश करण्यास बंदी करणारा हुकूम बजावून, त्यांना पुणें येथें नेऊन सोडण्यांत आलें. पोतनिसांना केलेल्या अटकेबाबत प्रजासभेनें दरबारच्या धोरणाचा निषेध करणारीं पत्रकें प्रसिद्ध केलीं. त्या पत्रकांबाबत दरबारतर्फे आपला खुलासा वर्तमानपत्रांत जाहीर करण्यांत आला; व रा. पोतनीसांस डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टखालीं अटकेंत ठेवलें. तेव्हां, प्रजासभेच्या सल्लागार

मंडळींनीं एक नवीनच मार्ग अनुसरला. गोपीनाथराव पोतनीस संस्थानमधील चळवळीचे पुरस्कर्ते होते, ही गोष्ट ब्रिटिश इंडियांतील बऱ्याच पुढाऱ्यांना माहीत होती. सबब, प्रजासभेनें पोतनिसांच्या अटकेविरुद्ध दरबारचा निषेध करणारें एक पत्रक ब्रिटिश हिंदुस्थानांतील सुमारें २५ पुढाऱ्यांच्या सह्यांनिशीं वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केलें. त्यानंतर, ज्या ज्या पुढाऱ्यांच्या सदर पत्रकावर सह्या होत्या, त्या प्रत्येकास कोणत्या परिस्थितींत पोतनीसांस अटक केली गेली, याचा खुलासा दरबारनें पत्रें पाठवून केला.

याच सुमारास प्रचंडगड तालुक्याचे मामलेदार व निवडणूक-कामगार यांच्याकडून रा. गोपीनाथराव पोतनीस यांनीं केलेल्या गुन्ह्याबद्दल दरबारकडे एक रिपोर्ट आला. सन १९४२ इ. मधील कायदेमंडळाच्या सभासदत्वासंबंधींच्या निवडणुकींत सदरहू पोतनीस यांनीं प्रचंडगड तालुक्यातर्फे उमेदवार म्हणून उभे राहून, त्याकरतां त्या तालुक्यांतील जमीन कसणारें कूळ आपण आहोंत हें निदर्शनास आणण्याकरितां खंडचिठ्यांसह निवडणूक-कामगाराकडे अर्ज सादर केला. परंतु, अर्जासोबतच्या खंडचिठ्या खऱ्या नसल्याचा निवडणूक-कामगार यांना संशय आल्यामुळें, त्यांनीं सदरचा अर्ज नामंजूर केला. त्यावर केलेल्या अपीलांत निवडणूक-कामगारांचा ठराव कायम राहिला. त्यानंतर वरील गुन्ह्या-बद्दल रा. पोतनीस यांच्यावर खटला करण्यांत आला.

खटल्याचें काम चालू होतेंच. दरम्यान रा. गोपीनाथराव यांची अटकेंतून मुक्तता करण्यांत येऊन, त्यांनीं कोणत्याहि सभेंत भाग घेऊं नये व चळवळीस उत्तेजन देऊं नये या अटींवर, त्यांना त्यांच्या राहत्या गांवीं स्थानबद्ध करण्यांत आलें. मात्र, वरील खटल्याचे कामाकरितां भोरास येण्यास व वकीलांचा सल्ला घेण्यास त्यांना परवानगी देण्यांत आली होती.

यानंतर लौकरच कौन्सिलच्या निवडणुकी पुन्हां करण्याचें ठरविण्यांत आलें व त्याकरितां उमेदवार म्हणून उभे राहण्यास रा. गोपीनाथराव यांना अडचण येऊं नये, म्हणून त्यांच्यावरील सदरहू खटला श्रीमंत राजेसाहेब यांनीं काढून घेतला.

दरम्यानच्या काळांत रा. म. व्यं. शिंगरे, लोकपक्षाचे अध्वर्यु, यांना राजेसाहेबांनीं मंत्री म्हणून नेमलें. त्यांचा मंत्री या नात्यानें कारभार मे १९४४ पर्यंत बरा चालला. मे महिन्यांत कायदेमंडळाची बैठक झाली. त्या वेळीं कायदेमंडळांत प्रजापक्षाचें बहुमत होतें. त्या पक्षानें मंत्री यांजविरुद्ध अविश्वासाचा ठराव आणण्याचें ठरविलें होतें. ठराव आल्यास, तो बहुमतानें पास होण्याची शक्यता होती. तेव्हां, ठराव येण्यापूर्वींच, शिंगरे यांनीं आपल्या मंत्रिपदाचा राजीनामा दिला. मे ते डिसेंबरच्या काळांत निवडणुकीच्या तक्रार-अर्जांचे निकाल होऊन प्रजापक्षाचे बरेच सभासद, त्यांचें सभासदत्व रद्द ठरविल्यामुळें, कायदेमंडळातून कमी झाले ; आणि यांच्या जागीं लोकपक्षाचे सभासद येऊन त्यांचें निर्विवाद बहुमत झालें. बहुमताचा पाठिंबा असल्यामुळें त्या पक्षाचा मंत्री नेमण्यास आतां कांहींच हरकत नव्हती. सबब, रा. शिंगरे यांची ता. १५ नोव्हेंबर १९४४ पासून मंत्रिपदावर पुन्हा नेमणूक करण्यांत आली. ता. १५ नोव्हेंबर १९४४ तें ६ फेब्रुवारी १९४६ पर्यंत शिंगरे यांनीं मंत्री म्हणून काम केलें. शिंगरे पुन्हां मंत्रिपदावर येईपावेतों कंट्रोल-धान्याची व्यवस्था दरबारतर्फे करण्यांत येत होती. या वेळीं दरबारनें धान्य-पुरवठ्याकरितां एजंट नेमण्याची व्यवस्था केली. धान्यपुरवठा-एजन्सीचें काम शिंगरे यांचे पुतणे रा. व्यंकटेश राघवेंद्र शिंगरे यांजकडे संस्थानच्या घाटावरील तीन तालुक्यांपुरतें देण्यांत आलें होतें. सुधागड व पवनमावळ तालुक्यांतील लोकांनीं आपआपल्या व्यापारी कंपन्या स्थापून धान्य पुरवठ्याचें काम केलें. एजन्सी पुतण्याच्या नांवें घेतली; पण, व्यापाराची यथार्थ माहिती व अनुभव रा. म. व्यं. शिंगरे यांना असल्यानें, त्यांच्या सल्ल्यानुसार ही कंट्रोल-धान्य-पुरवठ्याची व्यवस्था चालू होती. या काळांत हिंदुस्थानची धान्यपरिस्थिति उत्तम होती. एजंटानें ब्रिटिश हद्दींतून धान्य भरपूर आणून कोणत्याहि प्रकारची वाण पडूं दिली नाहीं. तुलनात्मक दृष्टीनें विचार करतां, एजन्सी-पूर्वीच्या काळापेक्षां एजन्सीच्या काळांत सर्व रयतेला धान्य-पुरवठा मुबलक प्रमाणांत झाला. शिंगरे व्यापारांत कसलेले असल्यामुळें व ब्रिटिश हद्दींत त्यांचा बोलबाला बरा असल्यामुळें, त्यांनीं धान्य भरपूर मिळविलें.

वर उल्लेख केलेल्या दक्षिणी-संस्थान लोकसभेनें नेमलेल्या मावळणकर समितीनें रा. शिंगरे यांना संस्थानचे लोकनियुक्त मंत्री या नात्यानें चौकशीच्या वेळीं साक्षीस बोलाविलें होतें. शिंगरे यांनीं समितीपुढें साक्ष दिली. त्या साक्षीच्या आधारानें मावळणकर समितीनें लिहिलेल्या रिपोर्टांत शिंगरे यांच्या कंट्रोल व्यवस्थेवर कांहीं आक्षेप घेतले होते.

दरम्यानच्या काळांत महायुद्ध संपल्यानंतर हिंदुस्थानची राजकीय परिस्थिति झपाटयानें बदलत चालली. लोकशाहीचे वारे वाहूं लागले व भोर संस्थानांत नवीन प्रगत सुधारणा करण्याची आवश्यकता भासूं लागली. बदलत्या काळास अनुसरून प्रवाहाबरोबर आपलीहि गति ठेवण्याच्या दृष्टीनें, राजकीय क्षेत्रांतील आंदोलन व घडामोडी यांचा हिंदुस्थानवर होत चाललेला परिणाम लक्षांत घेऊन, संस्थानी प्रजाजनांची राजकीयदृष्टया प्रगति व्हावी या हेतूनें, श्रीमंत राजेसाहेबांनीं, नरेंद्रमंडळाचे चॅन्सेलर हिज हायनेस नबाबसाहेब, भोपाळ, यांनीं जाहीर केलेल्या धोरणानुसार, भोर संस्थानच्या प्रजेस नागरिकत्वाचे मूलभूत हक्क पूर्णतया बहाल केल्याचें ता. ६ फेब्रुवारी १९४६ रोजीं प्रसिद्ध केलें; व याच जाहीरनाम्यानें स. १९३२ इ. सालीं जाहीर केलेलें ‘ जबाबदार राज्यपद्धति ’ हें संस्थानच्या राज्यकारभाराचें अंतिम ध्येय गांठण्याची पुढील पायरी म्हणून सन १९४२ सालीं जाहीर केलेल्या, पण पांच वर्षांनीं म्हणजे १९४७ नंतर अंमलांत येणाऱ्या, सुधारणा ताबडतोब अंमलांत आणण्याचें प्रसिद्ध केलें व त्याकरितांच त्या वेळचें कायदेमंडळ विसर्जित केलें. नंतर कारभारीमंडळाची पुनर्घटना केली व त्याचे अध्यक्ष म्हणून पुणें येथील प्रसिद्ध पुढारी साहित्यसम्राट् श्री. तात्यासाहेब केळकर यांची योजना केली. कायदेमंडळ बरखास्त झाल्याबरोबर, नियमांप्रमाणें शिंगरे मंत्रिपदावर असतांच्या सुमारास, धान्यपुरवठा खातें दरबारनें स्वतः चालवावें असें रेसिडेन्सीकडून लिहून आल्यामुळें, एजन्सी व कार्पोरेशन्स रद्द करण्यांत आल्या.

कारभारीमंडळाचें काम श्री. केळकर यांच्या नेतृत्वाखालीं सुरू झाल्यावर त्यांनीं कायदेमंडळाच्या निवडणुकी राजेसाहेबांच्या अनुज्ञेनें लवकरच करण्याचें जाहीर केलें. कायदेमंडळाच्या घटनेंतहि दुरुस्त्या करून बहुसंख्य लोकनियुक्त

सभासदांचें कायदेमंडळ करण्यांत आलें. लोकनियुक्तांपैकीं दोन मंत्री नेमून त्यांच्याकडे बरींच महत्त्वाचीं खातीं देण्याचें ठरविलें. राजेसाहेबांनींही श्री. केळकर यांच्या सूचना स्वीकारून त्याला आपली मान्यता दिली.

नवीन घटनेप्रमाणें कायदेमंडळाच्या निवडणुकी माहे नोव्हेंबर १९४६ मध्यें झाल्या. दोन लोकनियुक्त मंत्र्यांची नेमणूक ता. २३ फेब्रुवारी १९४७ पासून होऊन सोंपीव खात्याचा कारभार करण्यास त्यांनीं जोमानें सुरुवात केली. नव्या कायदेमंडळाचें १ लें अधिवेशन मे १९४७ मध्यें झालें.

अशा प्रकारें स. १९४२ इ. पासून सुरू झालेल्या प्रजेच्या चळवळीचें थोडक्यांत स्वरूप होतें व त्याचें पर्यवसान, उग्र स्वरूपाची चळवळ न होतां, शांततेच्या मार्गानें वरील परिच्छेदांत वर्णन केल्याप्रमाणें स्थिरस्थावरच होण्यांत झालें. राजेसाहेबांचें धोरणहि प्रजेशीं अगदीं मिळून मिसळून वागण्याचें होतें. प्रजापक्ष संस्थानमध्यें सन १९२० सालीं स्थापन होऊन त्याची चळवळ आतां-पावेतों चालू होती. या पक्षाच्या परिषदेचीं अधिवेशनें बहुतेक सालोसाल भरलीं. या अधिवेशनांस राजेसाहेब अगर राजप्रतिनिधि हजर राहण्याची शक्यता ह्या वेळपर्यंत कधींच निर्माण झाली नव्हती. आतांपर्यंत या अधिवेशनांतून राज्य-कारभारावर टीका होत असे. पण, काळ पालटला कीं, अशक्य वाटणाऱ्या गोष्टींची शक्यता निर्माण होते. आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे गेल्या इ. स. १९४७ च्या मार्च महिन्यांत प्रजासभेचें अधिवेशन पाली येथें भरविण्यांत आलें. त्या प्रजापरिषदेचे अध्यक्ष कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे सर चिटणीस श्री. शंकरराव देव हे होते; व अधिवेशनास, नवीन मंत्रिद्वयांनीं खास निमंत्रण केल्या-वरून, श्री. राजेसाहेब स्वतः उपस्थित होते. अध्यक्ष या नात्यानें श्री. देव यांचें भाषण झालें. त्यांत ते म्हणाले :—

" अपूर्व काळांत ही परिषद भरत आहे. प्रजापरिषदेला श्रीमंतांची उपस्थिति ही पहिलीच आजची वेळ आहे. परस्परांच्या सहकार्याच्या गोष्टी बोलण्याची प्रथा आजपर्यंत आपल्या संस्थानांत राजा व प्रजा यांच्या दरम्यान नव्हती; पण, आज तो सुयोग आला आहे. याचें कारण परिस्थितीच होय. हिंदुस्थानवर जी सार्वभौम सत्ता राज्य करीत होती, ती आतां संपत आली

आहे. ब्रिटिश सत्ता लोप पावत आहे, मावळत चालली आहे; आणि हिंदी जनतेची सत्ता उदयाला येत आहे, प्रस्थापित होत आहे, हें आपणांस माहीत आहेच. लोप पावत आहे ती नष्ट न होतां, लोप पावणारी सत्ता उदय होणाऱ्या सत्तेला, हस्तांदोलन करून, आम्ही तुम्हांला सत्ता देत आहोंत असें परकीय सरकार हिंदुस्थानांतील लोकसत्तेला सांगत आहे. हा अपूर्व योग आहे, यांत शंका नाहीं. कारण, आजपर्यंतच्या इतिहासांत असें उदाहरण नाहीं. त्याचेंच छोटेंसें दृश्य आज आपण भोर संस्थानांत पाहत आहोंत. जें इंग्रज करीत आहेत, तेंच जर भोरचे राजे करूं लागले, तर त्यांचें अभिनंदन करावयाला आपण तयार असलें पाहिजे. सचिवांनीं जाहीर केलें आहे कीं, मी संपूर्ण सत्ता प्रजेच्या हातीं देण्यास तयार आहें. याची गुणग्राहकता करण्यास मी तयार आहें.”

श्री. देवांच्या भाषणानंतर श्रीमंत राजेसाहेब यांनीं भाषण करून पूर्वीच जाहीर केलेल्या आपल्या राज्यकारभाराच्या धोरणास पुष्टि दिली, ( हें श्रीमंतांचें भाषण परिशिष्टांत नं. ५ ठिकाणीं दिलें आहे. ) व अधिवेशनास उपस्थित राहून आपल्या भाषणानें आपण व प्रजा दोन नाहीं, अशी सर्वांची खात्री पटवून दिली. राजेसाहेबांच्या या प्रकारच्या प्रजेशीं समरस होण्याच्या वागणुकीमुळें सर्वांनाच धन्यता वाटली.

ह्या परिषदेंत जे ठराव पास झाले, त्यांमध्यें भोर संस्थाननें संघराज्यांत सामील होण्याविषयींचा पांचवा ठराव महत्त्वाचा होता.

---

तहकूब ठेवण्यांत आले. दरबारतर्फे Suits Valuation Act. संस्थानला लागू करण्यासाठीं बिल कायदेमंडळापुढें मांडण्यांत आलें. हें बिल सर्वानुमतें पास करण्यांत आलें. प्रश्न ४५ विचारले. त्यांचीं खुलासेवार उत्तरें दरबारकडून देण्यांत आलीं.

या बैठकींत सैनिकांस युद्धांत विजय प्राप्त व्हावा अशी ईश्वराची प्रार्थना करणारा एक ठराव होता व दुसऱ्या ठरावानें श्रीमंत राजेसाहेबांना नरेंद्र मंडळाचें कायमचें सभासदत्व प्राप्त झाल्याबद्दल कायदेमंडळानें त्यांचें अभिनंदन केलें होतें. तिसऱ्या ठरावानें श्रीमंत राजकुमार रावसाहेब मॅट्रिक्युलेशनची परीक्षा यशस्वी रीतीनें उत्तीर्ण झाले, म्हणून त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें. ता. १६ ऑक्टोबर रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं कायदेमंडळाच्या सर्व सभासदांना मेजवानी दिली.

या कायदेमंडळाची ता. ३ मार्च १९४१ रोजीं जादा बैठक भरविण्यांत आली. बैठकीचें काम फक्त दोन दिवस चाललें श्रीमंत राजेसाहेबांनीं १९३८ इ. सालीं घोषणा करून नेमलेल्या घटना-कमिटीचा रिपोर्ट अभिप्रायासाठीं कायदेमंडळापुढें मांडावा अशी कायदेमंडळानें श्रीमंत राजेसाहेबांना विनंति केल्यावरून, सदर रिपोर्ट या बैठकींत कायदेमंडळापुढें मांडण्यांत आला. या रिपोर्टावर दोन दिवस चर्चा करून त्याबद्दलचा आपला अभिप्राय ता. १२-४-१९४१ च्या आंत श्रीमंत राजेसाहेबांना सादर करण्याकरितां बिनसरकारी सभासदांची एक कमिटी, कायदेमंडळांत ठराव मांडून, नेमण्यांत आली.

घटना-कमिटीच्या रिपोर्टावर अभिप्राय देण्याकरितां ही बैठक भरविली असल्यामुळें, या बैठकींत नेहमींप्रमाणें ठराव, प्रश्न वगैरे काम ठेवण्यांत आलें नव्हतें. तथापि, श्रीमंत राजेसाहेबांना साम्राज्य सरकारकडून के. सी. आय्. इ. हा किताब नुकताच देण्यांत आला होता, त्याबद्दल अभिनंदन करण्यासाठीं एक ठराव कायदेमंडळांत मांडण्यांत आला व तो सर्वानुमतें पास करण्यांत आला.

कायदेमंडळाचें १० वें अधिवेशन नियमांस अनुसरून ता. १२ एप्रिल १९४१ पासून भरविण्यांत आलें. ही बैठक ३ दिवस चालली. सुरुवातीस

कायदेमंडळाच्या अध्यक्षांनीं भाषण करून ब्रिटिश हिंदुस्थानांतील पद्धतीवर संस्थानामध्यें ग्रामसुधारणेचें कार्य करण्याकरितां या साल्च्या अंदाजपत्रकांत रकमेची तरतूद करण्याचें दरबारनें ठरविल्याचें जाहीर केलें.

या बैठकींत २७ ठराव पास झाले, २ नापास झाले, ९ तहकूब ठेवण्यांत आले व ४ परत घेतले गेले. ३७ प्रश्न विचारण्यांत आले. त्यांचीं दरबारकडून खुलासेवार उत्तरें देण्यांत आलीं.

कायदेमंडळानें या बैठकींत राजगड तालुक्यांतील शिवगंगानदीवरील पुलाचें काम पुरें केल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांचें अभिनंदन केलें. श्रीमंत राजकुमार रावसाहेब कॉलेजची पहिल्या वर्षाची परीक्षा २ ऱ्या वर्गांत पास झाल्याबद्दल कायदेमंडळानें त्यांच्या अभिनंदनपर ठराव पास केला; आणि कोल्हापूर संस्थानचे अधिपति हिज हायनेस श्रीमंत छत्रपति राजाराम महाराज यांच्या आकस्मिक निधनाबद्दल कायदेमंडळास फार दुःख वाटत असल्याबद्दलचा ठराव कायदेमंडळानें पास केला.

भोर कायदेमंडळाच्या सन १९४०-४१ या सालांतील दोन्ही बैठकींत मिळून पास झालेल्या ठरावांपैकीं ज्यांना दरबारकडून मान्यता देण्यांत आली, त्यांत लोकोपयुक्त व सार्वजनिक हिताचे खालील ठराव होते :

१. संस्थानांत प्रौढांचें शिक्षण सुरू करण्याची व्यवहार्य योजना.

२. संस्थानांतील शेती सुधारण्याकरितां श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या खाजगींतून रु. १००० दिलेल्या देणगीचा योग्य विनियोग करण्याकरितां केलेल्या सूचना.

३. संस्थानच्या राज्यकारभाराच्या खात्यांतून कार्यक्षमता वाढविण्याच्या व काटकसरीच्या दृष्टीनें संस्थानच्या नोकरांच्या पगाराचें प्रमाण सुधारण्याकडे लक्ष देऊन पगाराचें स्केल लागू करण्याबाबतच्या केलेल्या सूचना.

४. संस्थानांतील मागासलेल्या आणि हरिजन समाजाच्या सामाजिक, आर्थिक आणि शैक्षणिक परिस्थितीची चौकशी करून ती सुधारण्याप्रीत्यर्थ योजनांचा रिपोर्ट करणें.

५. राजगड तालुक्यांतील वेळवंड खोरें भागांतील लोकांची आर्थिक परिस्थिति सुधारण्याकरितां उपाय-योजना करण्याच्या सूचना.

यांशिवाय, शिरवळ येथें गुरांचा बाजार भरविणें, सुधागड तालुक्यांत जांभूळपाडा गांवीं लोकांच्या सोयीसाठीं स्टँप विकत मिळण्याची सोय करणें आणि प्रत्येक रजिस्ट्रेशनच्या ऑफिसमध्यें दरबारीचा फलक लावण्याची तजवीज करणें, वगैरे बाबतच्या ठरावांस दरबारनें मान्यता दिली.

कायदेमंडळाचें ११ वें अधिवेशन ता. ३ आक्टोबर १९४१ रोजीं सुरू होऊन चार दिवस चालू होतें. ता. ३ रोजीं दुपारीं ३ वाजतां श्रीमंत राजेसाहेब यांनीं बैठकीच्या सुरुवातीस येऊन भाषण केलें. या भाषणांत त्यांनीं प्रामुख्यानें ज्या गोष्टींचा उल्लेख केला, त्यांत भोर संस्थानच्या रयतेपैकीं सैन्यभरतींत जे प्रत्यक्ष लढाईवर जातील, त्यांच्याकरितां दरबारनें ज्या सवलती देण्याचें ठरविलें, व जाहीर केलें, त्यांचा व लवकरच एक शेतकी-कमिटी नेमून तिच्याकडून संस्थानची शेतकीविषयक पहाणी करण्याचें ठरविलें असल्याचा उल्लेख होता.

या बैठकींत एकूण ३८ प्रश्न मे. सभासदांकडून विचारण्यांत आले. त्यांस दरबारकडून समाधानकारक उत्तरें देण्यांत आलीं.

सभासदांनीं मांडलेल्या ३८ ठरावांपैकीं २१ पास झाले, ६ नाकारले गेले, ९ परत घेतले आणि २ तहकूब ठेवण्यांत आले. या बैठकींत स. १३५१ फसलीचें बजेट चर्चेसाठीं मांडण्यांत आलें होतें. तसेंच, दरबारतर्फे सोसायटीज रजिस्ट्रेशन ॲक्ट सन १८६० इ. चा, इ. स. १९४१ च्या सप्टेंबरपर्यंतच्या दुरुस्त्यांसह, संस्थानला लागू करण्याबाबतचें बिल कायदेमंडळांत मांडण्यांत आलें, व तें सर्वानुमतें पास करण्यांत आलें.

या बैठकींत पास झालेल्या ठरावांत भोर संस्थानांतील शिरवळ गांवीं उंसाची लागवड करून तेथें साखरेचा कारखाना काढण्याची दरबारनें खटपट करावी अशी शिफारस करणारा ठराव एकमतानें मान्य करण्यांत आला. तो ठराव असा :—

( अ ) "अलीकडे सर्वत्र, ब्रिटिश हद्दींतच काय, पण कित्येक संस्थानांतून सुद्धां साखरेचे कारखाने काढण्यांत आले आहेत व आणखीहि

चित्रांक १२




पाली येथें प्रजापरिषदेच्या अधिवेशनास ता. २७।३।४७ रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांची श्री. शंकरराव देव, प्रजापरिषदेचे अध्यक्ष, यांच्याबरोबर उपस्थिति.
डावीकडून उजवीकडे—श्रीमंत राजेसाहेब व श्री. शंकरराव देव (उभे) [सं. पा. ५९

निघण्याचा संभव आहे. आपल्या भोर संस्थानमध्यें भाटघरसारखें प्रख्यात धरण असतांना सुद्धां अद्यापपर्यंत असा कारखाना निघूं नये, याचें कारण समजत नाहीं. तरी, आपल्या संस्थानमध्यें साखरेचा कारखाना काढण्याचा प्रयत्न व्हावा, व त्याच्या उत्तेजनार्थ त्यास आनुषंगिक अशा योग्य सवलती असाव्यात.

( ब ) " जरूर तर, या कामीं ब्रिटिश सरकारकडे ( अप्रोच व्हावें ) जावें लागणार असल्यास, तोहि प्रयत्न जरूर व्हावा.

( क ) " हा ठराव मे. रेसिडेंटसाहेब यांच्याकडे पाठविण्यांत यावा." अशी या कायदेमंडळाची श्रीमंत राजेसाहेब यांच्या चरणीं प्रार्थना आहे.

## भोर संस्थान कायदेमंडळाची जादा बैठक

घटना-कमिटीनें गव्हर्नमेंट ऑफ भोर स्टेट व कायदेमंडळाच्या कामकाजाचे नियम यांचे मसुदे तयार करून ते श्रीमंत राजेसाहेब यांना एप्रिल १९४२ मध्यें सादर केले. हे दोनही मसुदे भोर संस्थान कायदेमंडळापुढें ठेवून त्यांबाबत कायदेमंडळाचा अभिप्राय घेण्यांत आला. याकरितां कायदेमंडळाची जादा बैठक ता. १३ व १४ जून १९४२ रोजीं भोर येथें कौन्सिल हॉलमध्यें भरली होती. या बैठकींत दोन्ही मसुद्यांवर चर्चा करून त्यांत केलेल्या तरतुदीबद्दल कायदेमंडळानें आपलें मत व्यक्त केलें.

## भोर शहर म्युनिसिपालिटीचा कारभार

भोर शहर म्युनिसिपालिटीला निवडणुकीचें तत्त्व लागू केल्यावर, पहिली लोकनियुक्त म्युनिसिपालिटी सन १९३९ सालींच अस्तित्वांत आली. म्युनिसिपालिटीचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष कै. ग. मा. पानसे, बी.ए., एलएल्.बी., हे होते. त्यानंतर पुढील १।२ निवडणुकी व्यवस्थित होऊन म्युनिसिपालिटीचा कारभार एकंदरीनें बरा चालला होता. सन १९४५ मध्यें निवडणुकी होऊन प्रजासभा-पक्षाचे बरेच लोक म्युनिसिपालिटीवर निवडून आले. त्यांचा कारभार फारच अव्यवस्थितपणें चालू झाला. म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व चेअरमन हे, डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल ॲक्टप्रमाणें त्यांच्याकडे सोंपविलेलीं कर्तव्यें योग्य प्रकारें करीत नसत. नियमांप्रमाणें, सभासद लागोपाठ अनेक सभांस गैर-

हजर राहिल्यास त्यांचें सभासदत्व रद्द होतें, असें असूनहि अशा गैरहजर राहिलेल्या सभासदांचें सभासदत्व या वेळच्या अध्यक्षांनीं चालू ठेवलें. सभांच्या नोटिसा कायद्याप्रमाणें दिल्या जात नसत. सभेचीं प्रोसिडिंगें चुकीचीं व बनावट केलीं जात. गांवांतील पाणीपुरवठ्याबाबतच्या अनेक तक्रारींकडे दुर्लक्ष केलें जाई. शहरच्या आरोग्याबाबत म्युनिसिपालिटी अत्यंत हलगर्जीपणा करूं लागली. बारीकसारीक कारणांवरून अनेक नागरिकांना निष्कारण सतावण्याकडे म्यु. ची प्रवृत्ति वाढली. अशा प्रकारें भोर म्युनिसिपालिटीच्या कारभारांत अत्यंत बेजबाबदारपणा वाढल्याचें दिसून आल्यावर, त्या वेळचे स्थानिक स्वराज्य खात्याचे मंत्री ना. द. शं. वाळिंबे यांनीं, संस्थानच्या कलेक्टरचा रिपोर्ट आल्यावरून, एकंदर प्रकरण संस्थानच्या कारभारीमंडळापुढें ता. १३ डिसेंबर १९४७ रोजीं निर्णयासाठीं मांडलें. कारभारीमंडळानें विचार करून, मंत्री यांनीं सदर प्रकरणीं दिलेला अभिप्राय लक्षांत घेऊन, भोर म्युनिसिपालिटीचें विसर्जन करून कलेक्टरची नेमणूक अॅडमिनिस्ट्रेटर म्हणून करावी व त्यानें म्यु. चा कारभार हातीं घ्यावा अशी श्री. राजेसाहेबांना शिफारस केली. हा कारभारीमंडळाचा ठराव मंजूर करून श्री. राजेसाहेबांनीं, डि. म्यु. अॅ. कलम १७९ पोट कलम १ प्रमाणें अधिकार चालवून, ता. १५।१२।१९४७ पासून भोर म्युनिसिपालिटीची जनरल बॉडी विसर्जित केली व नवीन निवडणुकी करण्याबद्दल हुकूम केला.

## भोर संस्थान चतुर्थ ( प्रातिनिधिक ) कायदेमंडळ

### अधिवेशन १ लें

मे १९४२ मध्यें नवीन घटनेनुसार निवडणुकी होऊन कायदेमंडळाचें १ लें अधिवेशन ता. १५ तें १८ माहे नोव्हेंबर १९४२ रोजीं भरलें. नवीन घटनेप्रमाणें या बैठकीचे अध्यक्ष म्हणून मे. श्रीधर आत्माराम नाईक, रिटायर्ड स्मॉल कॉज कोर्ट जज्ज, पुणें, या बिनसरकारी गृहस्थाची श्रीमंत राजेसाहेबांनीं नेमणूक केली. हें पहिलेंच अधिवेशन असल्यामुळें, प्रथम अध्यक्षांसुद्धां सर्व सभासदांचा शपथविधि झाला. उपाध्यक्ष म्हणून मे. ग. मा. पानसे व चेअरमन म्हणून मे. ल. र. मोडक यांच्या निवडणुकी कायदेमंडळानें केल्या. नंतर,

कौन्सिल हॉलमध्यें येऊन श्री. राजेसाहेबांनीं भाषण करून कायदेमंडळाचें उद्घाटन केलें. सन १९३८ सालीं हीरक-महोत्सव-प्रसंगीं केलेल्या घोषणेंत नवीन कायदेमंडळ अस्तित्वांत आल्यावर ५ वर्षांनीं मंत्री नेमण्याचें श्रीमंतांनीं जाहीर केलें होतें. परंतु, कालाच्या ओघाबरोबर लोकांच्या वाढलेल्या आकांक्षा लक्षांत घेऊन, एक वर्षाच्या आंत मंत्री नेमण्याचा आपला मनोदय श्रीमंत राजेसाहेबांनीं या वेळीं केलेल्या भाषणांत आपखुषीनें जाहीर केला. श्रीमंत राजेसाहेबांच्या भाषणानंतर बैठकीचा पुढील कार्यक्रम सुरू झाला. सन १३५२ फसली ( इ. स. १९४२ ) सालचें बजेट कायदेमंडळापुढें मांडून त्यावर चर्चा झाली. नवीन प्राप्त झालेल्या अधिकारानुसार सभासदांनीं बजेटवर कपातींच्या सूचना मांडल्या व त्यांवर चर्चा झाली.

या अधिवेशनांत हरिजन विद्यार्थ्यांकरितां वसतिगृह बांधणें, कायदेमंडळांत लोकनियुक्त बहुमत, हरिजन प्रतिनिधींस राखीव जागा, स्त्री-प्रतिनिधींची नेमणूक, इत्यादि प्रगतिपर सुधारणा केल्याबद्दल व एक वर्षांत लोकनियुक्त मंत्री नेमून त्याजकडे राष्ट्रसंवर्धक ( Nation Building Departments ) खातीं देण्याचें जाहीर केल्याबद्दल आणि दरसाल रु. २५००० खाजगी खर्चाच्या रकमेपैकीं दौलतीकडे देण्याचें ठरविल्याबद्दल श्रीमंतांचें अभिनंदन करणारे, तसेंच भोर स्टेट बँक स्थापन करणें, इत्यादि विषयांवरील ठराव पास झाले. संस्थानच्या जमाखर्चाचे हिशेब तपासण्याकरितां कायदेमंडळाची पब्लिक अकौंट्स कमिटी नवीन दिलेल्या हक्कास अनुसरून नेमण्यांत आली.

## अधिवेशन २ रें

कायदेमंडळाचें दुसरें अधिवेशन ता. १८ तें २० एप्रिल १९४३ मध्यें भरलें. ब्रिटिशमधील कायदे, त्या वेळपावेतोंच्या दुरुस्त्यांसह, भोर संस्थानला लागू करणें जरूर असल्यानें तें ठरविण्याकरितां लॉ कमिटीची नेमणूक करणें, नवीन धरणें बांधणें, सरकारी ओढयांतील जमिनी पीकें करण्याकरितां लोकांना देणें, आणि धान्यपुरवठा व नियंत्रण करणें, यांविषयीं महत्त्वाचे ठराव पास करण्यांत आले.

## अधिवेशन ३ रें

तिसरें अधिवेशन ता. ३ तें ६ ऑक्टोबर १९४३ रोजीं भरलें. निवडणुकीच्या अर्जांत लांचलुचपतीच्या कृत्यामुळें श्री. शं. ल. लिमये यांची निवडणूक कोर्टानें रद्द ठरविली, व त्यांच्या जागीं त्यांच्या खालोखाल मतें मिळालेले उमेदवार श्री. मध्वराज व्यंकटेश शिंगरे हे निवडून आले. श्री. लिमये यांच्या ऐवजीं श्री. शिंगरे हे या बैठकीस हजर होते. कौन्सिलचे उपाध्यक्ष मे. पानसे हे निधन पावल्यामुळें, त्या जागेवर मे. करपे यांची निवड झाली.

या बैठकींतील महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे कायदेमंडळाच्या बँक कमिटीनें केलेल्या भोर स्टेट बँकेच्या शिफारशीस दरबारनें दिलेली मान्यता आणि संस्थान सरकार व सरकारी नोकर यांनीं नोकरीच्या नात्यानें केलेल्या कृत्यांबाबत त्यांच्याविरुद्ध दिवाणी दावा, सिव्हिल प्रोसिजर कोडाच्या कलमांप्रमाणें, करण्याच्या रयतेच्या हक्कावर मागील कारकीर्दींत घालण्यांत आलेला निर्बंध काढून टाकून, दरबारवर दावा लावण्यास दिलेली परवानगी या होत. या दोन्ही गोष्टी दरबारतर्फे मे. रानडे यांनीं बैठकीच्या प्रारंभींच जाहीरपणें कायदेमंडळास सांगितल्या.

दुसरी गोष्ट म्हणजे प्रजासभेचे पुढारी श्री. गोपीनाथराव पोतनीस यांस अटक करून बिनमुदत कैदेंत ठेवल्याबद्दल प्रजासभापक्षानें निषेध करून ता. ३ रोजीं कायदेमंडळांतून सभात्याग ( walk-out ) केला ही होय. दुसऱ्या दिवशीं ता. ४ रोजीं पोतनीस यांच्या स्थानबद्धतेची कारणें दरबारचा खुलासा म्हणून मे. रानडे यांनीं कायदेमंडळास निवेदन केलीं. तसेंच, लोकपक्षाचे सभासद मे. शिंगरे यांनीं प्रजासभापक्षानें निषेधपत्रकांत केलेल्या विधानांचा निषेध व्यक्त करून वस्तुस्थिति-निदर्शक खुलाशाचें पत्रक वाचून दाखविलें.

सन १३५३ फसली सालचें बजेट मांडून तें कायदेमंडळांत पास करण्यांत आलें.

मागील बैठकींत नेमलेल्या कायदेमंडळाच्या लॉ कमिटीनें शिफारस केल्याप्रमाणें इंडियन पार्टनरशिप ॲक्ट, इंडियन सेल ऑफ गुडस् ॲक्ट, इंडियन निगोशिएबल इन्स्ट्रुमेंट्स ॲक्ट, इंडियन सक्सेशन ॲक्ट व बॉंबे को-ऑपरेटिव्ह सोसायटीज् ॲक्ट, हे कायदे लागू करण्याची कायदेमंडळानें राजेसाहेबांना

शिफारस केली; व त्यास श्रीमंत राजेसाहेबांची मान्यता मिळून ते संस्थानमध्यें लागू करण्यांत आलें.

बँक स्थापन करण्यास मान्यता दिल्याबद्दल व दरबारवर दावे लावण्याबाबत असलेला निर्बंध काढल्याबद्दल श्री. राजेसाहेबांचें कौन्सिलनें अभिनंदन केलें.

## अधिवेशन ४ थें

कायदेमंडळाचें ४ थें अधिवेशन ता. २२ तें २५ मे १९४४ इ. रोजीं भरलें. लोकनियुक्त सभासद मे. माधवराज व्यंकटेश शिंगरे यांची, पहिल्या अधिवेशनांत जाहीर केल्याप्रमाणें, श्री. राजेसाहेबांनीं ता. १ डिसेंबर १९४३ पासून सोपीव खात्यांचे मंत्री म्हणून नेमणूक केली. ते मंत्री या नात्यानें या बैठकींस हजर होते. कायदेमंडळाच्या तिसऱ्या अधिवेशनानंतर निवडणुकीच्या अर्जांचा निकाल होऊन, सभासदत्व रद्द झाल्यामुळें व कांहीं सभासदांच्या निधनानें रिकाम्या झालेल्या जागा भरण्याकरितां पोटनिवडणुकी झाल्या. त्यांत मे. डॉ. वाळिंबे, मे. देवी, मे. दारवटकर, मे. देशमूख, मे. गुजर व मे. रायरीकर हे नवीन निवडून आलेले सभासद या बैठकीस हजर होते. नवीन निवडून आलेले श्री. लिमये यांस, कोर्टानें नोटीस बजावल्यामुळें, बैठकीस हजर राहतां आलें नाहीं. या नोटिशीच्या निषेधार्थ एक पत्रक वाचून दाखवून प्रजासभापक्षानें ता. २२ रोजीं कायदेमंडळांतून सभात्याग ( walk-out ) केला. पत्रकांत वापरलेल्या आक्षेपार्ह शब्दांबद्दल दरबारच्यातर्फे मे. रानडे, अॅ. दिवाण, यांनीं तीव्र शब्दांत निषेध व्यक्त केला.

या बैठकींत राखीव व सोपीव खात्यांचीं अंदाजपत्रकें, भोर संस्थानच्या सन १९४३ च्या दुरुस्त कायद्याप्रमाणें, अनुक्रमें मे. फायनान्स मेंबर व मंत्री यांनीं कायदेमंडळापुढें मांडलीं. राखीव खात्याच्या बजेटवर चर्चा झाली. आणि सोपीव खात्याचें बजेट मतास टाकून एकमतानें पास झालें.

ता. २२ रोजीं मे. शिंगरे, मंत्री, यांनीं, सभासदांचा पाठिंबा त्यांना नसल्यामुळें, आपल्या मंत्रिपदाचा राजीनामा श्री. राजेसाहेब यांना सादर केला;

आणि तो त्यांनीं मंजूर केल्याचें मे. दिवाणसाहेब यांनीं ता. २३ रोजीं सकाळीं बैठकीच्या सुरुवातीस कायदेमंडळास निवेदन केलें.

या बैठकींत नोकरवर्गास पगारवाढ करणें व टाइमस्केल लागू करणें, हरिजनांस शिष्यवृत्त्या देणें, प्राथमिक शिक्षण संस्थानांतील तालुक्यांच्या मुख्य ठिकाणीं सक्तीचें करणें, कंट्रोल-व्यवस्था, वगैरे संबंधीं ठराव बहुमतानें पास झाले. या सर्व ठरावांस श्रीमंत राजेसाहेब यांनीं मान्यता दिली.

## अधिवेशन ५ वें

कायदेमंडळाचें ५ वें अधिवेशन ता. १० तें १२ नोव्हेंबर १९४४ रोजीं भरलें. पोट-निवडणुकीविरुद्ध झालेल्या तक्रारअर्जांचे निकाल होऊन झालेल्या निवडणुकी, लांचलुचपतीच्या कृत्यांमुळें, रद्द ठरविण्यांत आल्या व त्यांच्या जागां-वर निवडून आले म्हणून मान्य करण्यांत आलेले सभासद मे. दबडघाव, मे. थोपटे, मे. ठकार, मे. खोले व मे. पासलकर, हे त्या बैठकीस उपस्थित होते. सरकारी सभासदांतही नवीन नेमलेले दिवाण मे. मुंडकूर व मे. बावडेकर आणि सरकार-नियुक्त बिनसरकारी सभासद मे. खासनीस व मे. देसाई हे नवीन सभासद हजर होते. मे. शिंगरे यांची ता. १ माहे नोव्हेंबर १९४४ पासून श्री. राजे-साहेबांनीं पुन्हां नेमणूक केली होती, व ते मंत्री या नात्यानें हजर होते.

या बैठकींत खेडोपाडीं पिण्याच्या पाण्याची सोय करणें, शेती सुधारण्या-करितां पाटबंधारे बांधणें, रस्ते दुरुस्त करणें, नवीन साकू बांधणें, स्टेट बँक स्थापन केल्याबद्दल श्रीमंतांचें अभिनंदन करणें, युद्धोत्तर-पुनर्घटना, औद्योगिक वाढ करणें, कोऑपरेटिव्ह सोसायट्या स्थापन करणें, इत्यादि विविध ठराव एकमतानें पास झाले.

## डि. लोकल बोर्ड

भोर संस्थानांत सन १९३२ सालीं तालुका लोकल बोर्डस् स्थापन करण्यांत आलीं. त्यांची, सन १९४२ इ. सालीं निवडणुकीचें तत्त्व लागू करून, पुनर्घटना केली. ही हकीकत पूर्वीं आलीच आहे. संस्थानच्या तालुक्यांच्या लहान क्षेत्रांत उत्पन्नाच्या मानानें विशेष सुधारणा करतां येणें अशक्य असल्याचें वरील

१६।१७ वर्षांच्या अनुभवावरून दिसून आल्यामुळें, हीं लोकल बोर्डस् रद्द करून त्यांऐवजीं सर्व संस्थानकरितां एकच डिस्ट्रिक्ट लोकल बोर्ड स्थापन करण्यांत यावें, अशी योजना संस्थानचे नवीन लोकनियुक्त मंत्री मे. शं. ल. लिमये यांनीं श्रीमंत राजेसाहेब यांच्यापुढें मांडली. त्या योजनेस राजेसाहेबांनीं मान्यता दिली. त्या वेळच्या लोकल बोर्डांची मुदत मे १९४७ अखेर संपते, ती नोव्हेंबर १९४७ पर्यंत वाढवून, दरम्यानच्या काळांत नवीन डिस्ट्रिक्ट लोकल बोर्ड कायदा तयार करावा व त्यास अनुसरून १ डिसेंबर १९४७ पासून डिस्ट्रिक्ट लोकल बोर्ड अंमलांत आणावें, असा आदेश श्रीमंत राजेसाहेब यांनीं मंत्र्यांना दिला. डिस्ट्रिक्ट लोकल बोर्ड स्थापन करण्याचें ठरविण्यांत आल्यामुळें, तालुका लोकल बोर्डांच्या मे १९४७ मध्यें होणाऱ्या निवडणुकी रद्द करण्यांत आल्या.

## रा. शिंगरे लोकनियुक्त मंत्री

नवीन घटनेप्रमाणें अस्तित्वांत आलेल्या भोर संस्थान कायदेमंडळाच्या पहिल्या बैठकींत ता. १५-११-४२ रोजीं उद्घाटनाचें भाषण करतांना श्रीमंत राजेसाहेबांनीं लोकनियुक्त मंत्री एक वर्षांत नेमण्याचें आश्वासन दिलें. त्यास अनुसरून ता. १५-११-१९४३ रोजीं भोर कायदेमंडळांतील लोकनियुक्त सभासद मे. मध्वराज व्यंकटेश शिंगरे यांना पहिले लोकनियुक्त मंत्री म्हणून ता. १-१२-१९४३ पासून नेमल्याचें जाहीर केलें. ही नेमणूक जाहीर झाल्याबरोबर, श्रीमंतांच्या या प्रगतिपर धोरणाचें अनेक हितचिंतकांकडून अभिनंदन करण्यांत आलें. श्री. शिंगरे हे लोकपक्षाचे प्रमुख असल्यामुळें ता. १७-११-१९४३ रोजीं भोर संस्थान लोकपक्षाचे अध्यक्ष श्री. के. व्ही. केळकर, एम. ए., एल्एल्. बी., पुणें, श्री. वि. र. ठकार, बी.ए., एल्एल्. बी., सेक्रेटरी, लोकपक्ष, आणि सभासद श्री. म. हे. देव, एम. ए., नगरभूषण ना. पां. थोपटे, श्री. का. ठ. जाधव, श्री. भ. ब. कोंडेदेशमूख, श्री. बाठे, कॉन्ट्रॅक्टर, वगैरे मंडळींनीं पुणें लक्ष्मीविलास बंगल्यांत श्रीमंतांच्या भेटीस येऊन सर्वांनीं श्रीमंतांचें अभिनंदन करून पुष्पहार समर्पण केला. या प्रसंगीं लोकपक्षाचे सभासद श्री. शिंगरे यांना मंत्री नेमून लोकपक्षाचा गौरव केल्याबद्दल, श्री. केळकर यांनीं श्रीमंतांना धन्यवाद दिले. यांखेरीज अनेक

हितचिंतकांनीं तारा व पत्रें पाठवून श्रीमंतांचें अभिनंदन केलें. वर्तमानपत्रांतून भोरच्या प्रगतिपर राज्यकारभाराबद्दल गौरवाचे लेख आले. पुढें कांहीं दिवसांनीं मे. शिंगरे यांना, आपणास कौन्सिलमध्यें बहुमत नाहीं असें वाटल्यावरून, त्यांनीं ता. २२ मे १९४४ रोजीं राजीनामा दिला. निवडणुकीचे वेळीं झालेल्या लाचलुचपतीच्या कामासंबंधानें कोर्टामध्यें खटले चालून प्रथम निवडून आलेले बरेच सभासद कोर्टानें नालायक ठरविले व त्यांच्या जागीं दुसरे उमेदवार निवडून आल्याचें ठरविलें. हे निवडून आलेले लोक लोकपक्षाचे असल्यामुळें, शिंगरे यांस बहुमत आहे असें दिसून आल्यावरून, त्यांची पुन्हा ता. १ नोव्हेंबर १९४४ रोजीं श्री. राजेसाहेबांनीं मंत्री म्हणून निवड केली. त्याबद्दल शिंगरे यांचा फार गौरव झाला.

रा. शिंगरे यांनीं ता. १ माहे नोव्हेंबर १९४४ तें ता. ६ फेब्रुवारी १९४६ पर्यंत मंत्री म्हणून काम केलें. यांनीं लोकनियुक्त मंत्री म्हणून कांहीं कामें बरीं केलीं. संस्थानांतील दोन राजकीय पक्ष, लोकपक्ष व प्रजापक्ष, यांपैकीं लोकपक्षाचे रा. शिंगरे होते.

ता. ६।२।१९४६ रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं भोर कायदेमंडळच बरखास्त केलें. त्याबरोबरच रा. शिंगरे यांचें मंत्रिपदही गेलें. ता. ६ फेब्रुवारी १९४६ तें १ मार्च १९४७ पर्यंत मंत्र्याची जागा रिकामी होती. ता. ६ फेब्रुवारी १९४६ च्या जाहीरनाम्यानें भोर संस्थान कायदेमंडळाच्या निवडणुकीचा कार्यक्रमही जाहीर करण्यांत आला. तथापि, जूनमध्यें निवडणुकी करणें तर पाऊसकाळ त्या सुमारास किंबहुना त्यापूर्वींच जोरानें सुरू होईल, लोक शेतकीच्या कामांत गुंतलेले राहतील, मत देण्याकरितां पुष्कळांना येतां येणार नाहीं व उमेदवारांनाही निवडणुकीचें प्रचारकार्य करण्यास सोयीचें होणार नाहीं; सबब, निवडणुकी, जूनमध्यें न करतां, नोव्हेंबर १९४६ मध्यें कराव्या असें प्रजाजनांकडून सुचविण्यांत आलें. याप्रमाणें निवडणुकीच्या तारखांत फरक करावयाचा, तर तो संस्थानच्या सर्व तालुक्यांतील प्रजापुढाऱ्यांच्या विचारें करणें योग्य होईल व केवळ कांहीं लोक म्हणतात, म्हणून फरक करणें बरोबर होणार नाहीं, असें वाटल्यावरून कारभारीमंडळानें, श्रीमंत राजेसाहेबांच्या विचारें, पुणें येथें संस्थानच्या

सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांची परिषद भरविली व सर्वानुमतें निवडणुकी नोव्हेंबर १९४६ मध्यें केल्या असतां हरकत नाहीं असें मत अजमावल्यावर, त्याप्रमाणें निर्णय जाहीर करण्यांत आला. त्यामुळें प्रजेला व दरबारलाही निवडणुकीबाबतची पूर्व-तयारी करण्यास पुरेसा अवधि मिळाला. या निवडणुकीबाबतचे सर्व अंतिम अधिकार श्रीमंत राजेसाहेब यांनीं कारभारीमंडळाचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांना दिले होते. त्यांनीं कार्यक्रमाप्रमाणें सर्व जाहीरनामे, मतदारांच्या याद्या, वगैरे ठरलेल्या तारखांस प्रसिद्ध केल्या. जूनमध्यें व्हावयाच्या निवडणुकी नोव्हेंबरमध्यें करण्याचें ठरविल्यावर, प्रजासभेनें कायदेमंडळाची घटना बदलावी, लोकनियुक्त सभासदांची संख्या वाढवावी, सरकारी सभासद केवळ नांवापुरतेच नेमावे व सरकारनियुक्त बिनसरकारी सभासद नेमावयाचे, ते संस्थानांतील अल्प-संख्याक, व्यापारी, कारखानदार, आदिवासी, आणि हरिजन इत्यादींच्या हित-संबंधांचें रक्षण करणारे, कायदेमंडळांत निवडून आलेल्या बहुमतवाल्या पक्षाच्या संमतीनें, नेमावे, इत्यादि सूचना केल्या. या प्रश्नांचा विचार कारभारीमंडळानें लोकपुढाऱ्यांची परिषद पुणें येथें भरवून केला; आणि, अशा रीतीनें प्रजेचें मत घेऊन कारभारीमंडळानें दिलेल्या सल्ल्यानुसार, कायदेमंडळाची नवीन घटना श्री. राजेसाहेब यांनीं जाहीरनामा प्रसिद्ध करून ता. २-९-४६ रोजीं घोषित केली. या घटनेनें नवीन होणाऱ्या कायदेमंडळांत संस्थानच्या पांच तालुक्यांस, प्रत्येकीं ३ प्रमाणें, १५, सर्व संस्थानकरितां हरिजन २, इनामदारतर्फें १, आणि भोर शहराकरितां १, याप्रमाणें १९ लोकनियुक्त व आदिवासी व मजूर यांच्या हितरक्षणासाठीं १, स्त्रियांचा प्रतिनिधि १, व्यापारी व कारखानदार यांचा प्रतिनिधि १ आणि तज्ज्ञ २ याप्रमाणें लोकनियुक्त १९ व सरकारनियुक्त बिनसरकारी ५ आणि सरकारी अधिकारी २ अशा २६ सभासदांचें कायदे-मंडळ बनविण्याचें ठरविलें.

लोकनियुक्त १९ जागांवर प्रजासभेचे प्रतिनिधि निवडून आले. यांच्या व विशेषतः प्रजासभेचे चालक श्री. वझे यांच्या संमतीनें सरकारनियुक्त बिनसरकारी सभासदांची निवड करून त्यांचीं व सरकारी अधिकाऱ्यांचीं नांवें ता. ३०-१२-४६ रोजीं श्री. राजेसाहेबांनीं गॅझेटद्वारें जाहीर केलीं, व ता. २४ जानेवारी १९४७ रोजीं नवीन अस्तित्वांत येणाऱ्या लोकनियुक्त मंत्र्याकडे

कोणकोणतीं खातीं सोपीव म्हणून देण्यांत येणार, तें प्रसिद्ध केलें. यापूर्वीच्या मंत्र्याकडे ( १ ) शिक्षण ( २ ) स्थानिक स्वराज्यसंस्था ( ३ ) वैद्यक व सार्वजनिक आरोग्य ( ४ ) व्हेटर्नरी ( ५ ) ग्रामसुधारणा ( ६ ) व व्हॅक्सिनेशन, एवढींच खातीं सोपीव होतीं. आतां, त्यांत नवीन खालील खातीं सोपीव करण्यांत आलीं.

( १ ) शेतकी ( २ ) जंगल ( ३ ) पुरवठाखातें ( ४ ) वजनेंमापें ( ५ ) ॲडल्टरेशन ऑफ फुड स्टफस् ( ६ ) रजिस्ट्रेशन ( ७ ) जन्म-मृत्यु नोंद ( ८ ) एक्साइज ( ९ ) सहकारी सोसायट्या ( १० ) जत्रा ( ११ ) पी. डब्ल्यू. डी. ( १२ ) उद्योगधंदे व ( १३ ) धर्मादायसंस्था.

यांतील, पी. डब्ल्यू. खात्यांतील रु ५००० च्या वरील खर्चाचीं कामें आणि वीज-पुरवठयाबाबतचे करार आणि उद्योगधंदे यांच्या वाढीबाबतचे करार करणें, यांबाबत लोकनियुक्त मंत्री यांनीं संस्थानच्या दिवाणांचा सल्ला घ्यावा अशी शर्त घातली.

वरील खात्यांशिवाय बाकीचीं खातीं, म्हणजे ( १ ) संरक्षण, ( २ ) परराष्ट्रीय व राजकीय संबंध, ( ३ ) इनाम, तैनात व सरंजाम, ( ४ ) श्रीराम देवस्थान व अंबवडेंसंस्थान आणि ( ५ ) खाजगी-राजघराण्यांतील व्यक्तिगत बाबी व खासगी उत्पन्न हीं, राखीव म्हणून श्री. राजेसाहेबांनीं आपल्याकडे ठेवलीं.

५. नवीन निवडून आलेल्या लोकांत प्रजापक्षाचें बहुमत होतें असें वर म्हटलेंच आहे. कायदेमंडळांतील पक्षप्रमुख म्हणून ना. गो. बा. पोतनीस यांची निवड झाली. श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांची व त्यांनीं आपले सहकारी म्हणून निवडलेले ना. शं. ल. लिमये, बी. एस्सी., एल्एल्.बी., यांची मंत्री म्हणून ता. १ मार्च १९४७ पासून नेमणूक केली व शिंगरे यांजकडे सोपविलेल्या ६ सहा खात्यांत आणखी १३ खात्यांची वाढ करून तीं त्यांजकडे सोपविलीं. या दोघांनीं मंत्री म्हणून आपआपल्या खात्यांचें काम ता. ३ सप्टेंबर १९४७ पर्यंत केलें. दोघांनीं ( Joint Responsibility ) संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वावर एकमेकांच्या सहकार्यानें कामें केलीं. ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं श्री. राजेसाहेबांनीं भोर संस्थानचा राज्यकारभाराबाबतचा इ. स. १९४७ चा कायदा संस्थानला

लागू केला, व संस्थानला संपूर्ण जबाबदारीची राज्यपद्धति–Responsible Government–लागू केली. या फेरबदलामुळें ना. पोतनीस व ना. लिमये यांचे राजीनामे घेऊन व ते मंजूर करून, कायदेमंडळांतील पक्षप्रमुख म्हणून ना. गोपीनाथ बाळकृष्ण पोतनीस यांस नवीन कायद्याप्रमाणें मंत्रिमंडळ बनविण्यास श्री. राजेसाहेब यांनीं फर्माविलें. श्री. राजेसाहेबांच्या आदेशाप्रमाणें ना. गो. बा. पोतनीस यांनीं स्वत: आपलें व ना. शं. ल. लिमये, ना. डॉ. सदाशिव शंकर वाळिंबे व ना. दा. बा. पोतनीस असे तिघे सहकारी मंत्री म्हणून श्री. राजेसाहेब यांस सर्वांचीं नांवें सादर केलीं व कोणाकडे कोणतीं खातीं असावीं हेंही कळविलें. ना. गो. बा. पोतनीस यांची ही योजना मान्य करून ता. ३ माहे सप्टेंबर १९४७ पासून हे चौघे मंत्री आपल्या खात्याचा कारभार पूर्ण अधिकारानें पाहूं लागले. या मंत्रिमंडळानें ता. ८ ऑक्टोबर १९४७ पर्यंत, म्हणजे सुमारें एक महिना व चारच दिवस, काम केलें. या एक महिन्यांतील कारभारांत Joint Responsibility च्या तत्त्वाप्रमाणें कामें चालविणें ना. गो. बा. पोतनीस, मुख्य मंत्री, यांना अशक्य होऊन गेलें. प्रत्येक जण आपल्या अधिकाराचा स्वतंत्रपणें उपयोग करूं लागला. कोण काय हुकूम करतो, याची दखल एकमेकास नसे. जो तो म्हणे, मी आपल्या खात्याचा पूर्ण मुखत्यार आहें. राज्यकारभारांत एकमेकांच्या धोरणांत बिलकूल मेळ राहिला नाहीं. इतकेंच नव्हे, तर सन १९४७ च्या कायद्याप्रमाणें अधिकारांत नसलेलीं कामेंही, आपल्या अधिकारांत आहेत असें निराधार मानून, मंत्र्यांकडून होऊं लागलीं. ना. गो. बा. पोतनीस यांनीं कायद्यांत ठरविलेल्या (Joint Responsibility) संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वाप्रमाणें कामें करण्यास मान्यता दिली होती. पण, इतर मंत्र्यांच्या विरोधी वागणुकीमुळें तें तत्त्व अंमलांत आणणें अवघड झाल्यामुळें, रा. गोपिनाथपंत पोतनीस यांनीं मंत्रिमंडळाचा राजीनामा दिला. तो खालीलप्रमाणें—

श्रीराम समर्थ

जय हिंद

कँप पुणें, ता. ७।१०।४७

श्रीमंत सरकार हिज हायनेस राजेसाहेब, सं. भोर, के. सी. आय. इ.,

सर रघुनाथराव पंडित पंतसचिव स्वामीचे सेवेसी, कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे.

आम्ही आज ता. ७-१०-४७ रोजीं आपण आमचेवर सुपूर्त केलेल्या पंतप्रधानकीचा ( First Minister ) राजीनामा देत आहों. इतर सर्व मिनिस्टर्स यांचें सहकार्य लाभेलच असें मला वाटत नाहीं. Joint Responsibility अंगावर घेऊन वागणें बऱ्याच गोष्टींमुळें अशक्य झालें आहे. उदाहरणार्थ, एका अंमलदाराला सस्पेंड केलें व एकाला भलत्याच अधिकारपदावर नेमलें. या दोन्ही गोष्टी अगर आणखीही पुष्कळ गोष्टी मला पसंत नाहींत. तेव्हां, माझी मिनिस्ट्री यापुढें चालू ठेवावी असें मला वाटत नाहीं. तरी, कृपा करून माझा राजीनामा पतकरावा. आपण मागाल त्या कामांत आपणाशीं सहकार्य करून काम करण्यास मी सदैवच तयार आहें. कळावें. आनंद वृद्धि असो. सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना.

आपला आज्ञांकित सेवक,

**गो. बा. पोतनीस**

मुख्य मंत्री, सं. भोर.

मंत्र्यांच्या कारभाराबद्दलच्या अनेक तक्रारी-गोष्टी श्रीमंतांच्या कानांवर आधींच आल्या होत्या ( पो. सु. यांस सस्पेंड केलें व लिखिते यांस कमिशनर नेमलें ). तेव्हां, राज्यकारभारांतील ही बेदिली अशीच पुढें चालू राहणें इष्ट नव्हतें; सबब, सर्व साधकबाधक गोष्टींचा विचार करून, मुख्य मंत्री म्हणून ना. गो. बा. पोतनीस यांनीं दिलेला राजीनामा श्रीमंतांनीं ताबडतोब स्वीकारला. अशा रीतीनें पहिलें मंत्रिमंडळ बरखास्त झालें. कायदेमंडळाचे पक्षप्रमुख ना. गो. बा. पोतनीस होते, हें वर म्हटलेंच आहे. तेव्हां, त्यांनाच नवीन मंत्रिमंडळ बनविण्यास राजेसाहेबांनीं सांगितलें व त्यांनीं सादर केलेल्या नांवांस व खातेविभागणीस मंजुरी दिली. ह्या मंत्रि-मंडळांत ना. गो. बा. पोतनीस हे मुख्य मंत्री म्हणून पूर्वीप्रमाणेंच राहिले, व ना. द. शं. वाळिंबे, ना. म. कृ. डोंगरे व ना. रा. द. साळुंके हे त्यांचे सहकारी मंत्री झाले. या मंत्रिमंडळानें ता. ९-१०-४७ पासून

अधिकारसूत्रें हातीं घेतलीं. पण, त्यानंतर बऱ्याच कटकटी सुरू झाल्या. ना. गो. बा. पोतनीस यांनीं ता. ७।१०।४७ रोजीं मंत्रिमंडळाचा राजीनामा दिला, ही गोष्ट कायदेमंडळांतील प्रजासभापक्षाच्या सभासदांस मान्य नव्हती, असें दिसून आलें. कायदेमंडळांतील सभासदांनीं आपली खास बैठक भरवून ना. गो. बा. पोतनीस यांनीं दिलेला राजीनामा व नवीन मंत्र्यांचीं नांवें सुचविलीं, ही गोष्ट पक्षाचे संमतीवांचून केली, ह्याजबद्दल त्यांच्याविरुद्ध अविश्वासाचा ठराव पास केला व पक्षप्रमुख म्हणून दुसरे सभासद ना. चं. गो. आगाशे यांची निवड केली, व तसें श्रीमंत राजेसाहेब यांना कळविलें; व ना. गो. बा. पोतनीस यांचें नवीन मंत्रिमंडळ रद्द करून, पक्षप्रमुख म्हणून ना. आगाशे यांस मंत्रिमंडळ बनविण्यास आदेश द्यावा अशी मागणी केली. ना. पोतनीस यांस हा ठराव अर्थातच मान्य नव्हता. अविश्वासाचा ठराव कायदेमंडळाच्या बैठकींत पास होणें जरूर होतें. तसा तो झाला नव्हता हें ना. गो. बा. पोतनीस यांचें म्हणणें श्रीमंत राजेसाहेबांना योग्य वाटल्यामुळें, त्यांनीं, ना. चं. गो. आगाशे यांना पक्षप्रमुख म्हणून मंत्रि-मंडळ बनविण्याचा आदेश मिळावा म्हणून केलेल्या विनंतीचा विचार न करतां, ना. गो. बा. पोतनीस व त्यांचे मंत्री हेच कायम केले. शिवाय, ना. आगाशे यांनीं कायदेमंडळाच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला होता व पक्षप्रमुखत्व स्वीकारलें होतें. याच वेळीं दक्षिणी संस्थान संघराज्य स्थापन करण्याच्या वाटाघाटी चालू होत्या. ता. १७ ऑक्टोबर १९४७ रोजीं भोर येथें दक्षिणेंतील आठ संस्थानिकांनीं संघराज्याच्या Covenant कॉव्हेनंटवर सह्या करून, संयुक्त दक्षिणसंस्थान स्थापन करण्याचा निर्णय घेतला. या करारांत संघराज्याच्या घटना-समितीवर संघांत सामिल झालेल्या आठ संस्थानांनीं आपले प्रतिनिधि संस्थानच्या कायदेमंडळाकडून व, कायदेमंडळ नसेल, तेथें तेथील राजकीय पक्षाकडून निवडून पाठवावे असें ठरविण्यांत आलें होतें. भोर संस्थानच्या कायदेमंडळाचे अध्यक्ष व उपाध्यक्ष यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला होता व पक्षप्रमुखाविरुद्ध बहुमतवाल्या पक्षानें खाजगी बैठकींत अविश्वासाचा ठराव नुकताच पास केला होता. या बहुमतवाल्या पक्षाचा संघराज्य-स्थापनेस विरोध होता. पक्षप्रमुख ना. गो. बा. पोतनीस हे व त्यांचे सहकारी मंत्री संघराज्यस्थापनेस अनुकूल होते. त्यांनीं, कायदेमंडळांतील प्रजासभापक्षाच्या सभासदांची विरोधी भूमिका लक्षांत

घेऊन, संघराज्याच्या घटनासमितीवर भोर संस्थानचे प्रतिनिधि निवडावयाचें काम भोर संस्थान प्रजासभेकडे सोपवावें व कायदेमंडळ त्याकरितां बरखास्त करावें अशी ता. २२ आक्टोबर १९४७ रोजीं मुद्दाम पत्र पाठवून श्रीमंत राजेसाहेबांना विनंति केली. ती येणेंप्रमाणें :—

राजा श्रीमंत सर रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब पंडित पंतसचिव, के. सी. आय. ई., राजेसाहेब, सं. भोर, स्वामींचे सेवेसीं

कृ. साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे,

आम्ही खाली सह्या करणार मंत्री, सं. भोर, यांची श्रीमंत सरकार राजेसाहेब यांस अशी विनंति आहे कीं, दक्षिणी संस्थान संघराज्याच्या कॉव्हेनंटमध्यें ठरविण्यांत आल्याप्रमाणें, संघराज्याच्या घटनासमितीवर भोर संस्थानचे जे चार प्रतिनिधि पाठवावयाचे आहेत, ते भोर संस्थान प्रजापरिषदेकडून निवडले जावेत व याकरितां ( Assembly ) कायदेमंडळ बरखास्त करण्यांत यावें.

सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना.

आज्ञांकित

**गोपिनाथ बाळकृष्ण पोतनीस**

**दत्तात्रय शंकर वाळिंबे**

**महादेव कृष्ण डोंगरे**

**राघोबा दगडोबा साळुंखे**

श्रीमंतांनीं ती विनंति मान्य केली. त्यांनीं ता. १७ आक्टोबर रोजींच संघराज्याच्या कॉव्हेनंटवर ( घटनापत्रक ) सही करून संघराज्यास स्वतःची मान्यता दिली होती.

पुढें, वेल्हें येथें संघराज्याच्या घटनासमितीवर भोर संस्थानचे प्रतिनिधि निवडण्यासंबंधानें प्रजा-परिषदेची सभा झाली. त्यांत खालील चार गृहस्थ निवडून आले :

नगरभूषण नानाजी पांडुरंग थोपटे, गोपिनाथराव पोतनीस, दत्तोपंत मोडक व शंकरराव साळुंके.

भोर संस्थान प्रजापरिषदेच्या दे. भ. शंकररावजी देव, अखिल भारतीय कॉंग्रेसचे सरचिटणीस, यांच्या अध्यक्षतेखालीं पाली येथें ता. २६-३-४७ रोजीं झालेल्या जाहीर अधिवेशनांत दक्षिणी संस्थानांच्या संघराज्यस्थापनेस अनुकूल ठराव सर्वानुमतें पास झाला होता. ( तो ठराव परिशिष्टांत नं. ५ ठिकाणीं दिला आहे.) त्यास अनुसरून श्री. राजेसाहेबांनीं आपलें संघराज्याबाबतचें धोरण ठरवून संघराज्याच्या करारास संमति दिली होती. प्रजासभेच्या जाहीर परिषदेंत ज्या मंत्र्यांनीं संघराज्याच्या ठरावास अनुकूल मत दिलें होतें, तेच पुढें संघराज्यविरोधी झाले. तसें, त्यांनीं त्यानंतर जो ठराव केला, त्यावरून पुढें स्पष्ट दिसून आलें. संस्थानचे मुख्य मंत्री ना. गो. बा. पोतनीस हे प्रजासभेचे पुढारी होते. ते संघराज्याबाबत परिषदेनें पास केलेल्या ठरावास चिकटून होते. प्रजापरिषदेंतील इतर पुढारी जरी बदलले, तरी ना. पोतनीस यांनीं आपली भूमिका कायम ठेविली होती. ना. पोतनीस संस्थानचे मुख्य मंत्री होते व घटना कायद्याच्या तत्त्वाप्रमाणें संस्थानाधिपतींनीं मुख्य मंत्र्याच्या धोरणास अनुसरून राज्यकारभार चालवावा असें ठरलें असल्यामुळें व तसें वागण्याचें श्री. राजेसाहेबांचें धोरण असल्यामुळें, एकदा संघराज्यास मान्यता दिल्यावर, त्याच दिशेनें प्रगति चालू राहणें इष्ट वाटत असल्यानें, भोर संस्थानच्या प्रतिनिधींची निवड संघराज्याच्या घटना-समितीवर केली जाणें श्रीमंत राजेसाहेबांस आवश्यक वाटत होतें. म्हणून, त्यांना ना. गो. बा. पोतनीस यांच्या विनंतीप्रमाणें कायदेमंडळ बरखास्त करून प्रति-निधि निवडण्याचें काम प्रजापरिषदेकडे सोंपविणें इष्ट वाटलें; व ता. २३-१०-४७ रोजीं भोर संस्थान कायदेमंडळाचें त्यांनीं विसर्जन केलें; आणि आपल्या खास अधिकारान्वयें राज्यकारभार पूर्ववत् चालू राहण्यासाठीं ना. गो. बा. पोतनीस यांच्या मंत्रिमंडळाची मुदत वाढविली, व ता. २० डिसेंबर १९४७ रोजीं, संघराज्याचें मंत्रिमंडळ अस्तित्वांत येईपर्यंत, या चार मंत्र्यांनीं काम पाहावें असें ठरविलें.

## श्री. न. चिं. केळकर यांची कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षत्वाच्या जागेवर नेमणूक व जबाबदार राज्यपद्धतीची स्थापना

भोर संस्थानच्या कायदेमंडळास निवडणुकीचें तत्त्व लागू करून, सन १९४२ मध्यें निवडणुकी होऊन, नवें कायदेमंडळ अस्तित्वांत आलें. १९४३ च्या डिसेंबरपासून लोकनियुक्त मंत्र्यांची नेमणूक केली. अशा प्रगतिपथावरील कारभार सुमारें २ वर्षें चालल्यावर, लोकांच्या वाढत्या आकांक्षा व हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितींत झपाट्यानें होत चाललेला युद्धोत्तर कालांतील बदल, हीं लक्षांत घेऊन, श्रीमंत राजेसाहेब यांनीं **ता. ६ माहे फेब्रुवारी १९४६** रोजीं भोर संस्थानच्या आज्ञापत्रकद्वारें ( जादा गॅझेटमध्यें ) नवीन राजकीय सुधारणांचा हप्ता दिल्याचें जाहीर केलें. सन १९३८ इ. सालीं घोषणा करून निवडणुकीचें तत्त्व कायदेमंडळास लागू करतांना, ज्या गोष्टी लोकनियुक्त कायदेमंडळ अस्तित्वांत आल्यानंतर पांच वर्षांनीं करण्याचें त्यांनीं जाहीर केलें, त्या गोष्टींपैकीं मंत्री एक वर्षानेंच नेमला व बाकीच्या गोष्टी म्हणजे ( १ ) विधिमंडळाचा अध्यक्ष लोकनियुक्त सभासदांमधून निवडणेचा अधिकार, ( २ ) लोकनियुक्त मंत्र्याचा संस्थानच्या कार्यकारी मंडळांत समावेश आणि ( ३ ) प्रीव्हि पर्स व इतर अवश्य त्या बाबी सोडून, बाकीचें बजेट, सर्टिफिकेशनचा अधिकार राखून ठेवून, कायदेमंडळांत मतास टाकणें, या त्याच दिवशीं दिल्याचें त्यांनीं जाहीर केलें.

सन १९४२ सालीं अस्तित्वांत आलेलें कायदेमंडळ या जाहीरनाम्याच्या तारखेपासून रद्द करून, नवीन कायदेमंडळाच्या निवडणुकी जून सन १९४६ च्या आंत करण्यांत येतील असें घोषित केलें.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे भोर संस्थानच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष आतांपर्यंत श्रीमंत राजेसाहेब होते. त्याची पुनर्घटना करून अध्यक्षाच्या जागीं एक वर्ष मुदतीनें पुणें येथील सुप्रसिद्ध साहित्यिक साहित्यसम्राट् दे. भ. नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर, बी.ए., एल्एल्.बी., यांची नेमणूक केली.

चित्रांक १३



श्रीमंत राजेसाहेब यांनीं ता. ६।२।४६ रोजीं श्री. न. चिं. केळकर यांना एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष नेमलें, त्या वेळचें छायाचित्र.

डावीकडून उजवीकडे—श्री. रावबहाद्दूर शिजूत, श्रीमंत राजेसाहेब, श्री. न. चिं. केळकर, श्री. रावसाहेब साने. [ सं. पा. ८०

अशा प्रकारची, म्हणजे कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षपदीं लोकांचे पुढारी नेमण्यांत आले, ही गोष्ट, जी तोंपर्यंत कोणत्याही संस्थानांत घडली नाहीं, ती ह्या संस्थानांत घडली, त्याजबद्दल सूज्ञ लोकांस विशेष आनंद वाटला.

श्रीमंत राजेसाहेब व श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांचा परिचय फार जुना म्हणजे सुमारें ५० वर्षांपासूनचा होता. श्रीमंत राजेसाहेब हायस्कूलमध्यें शिकत असतांना तात्यासाहेबांचे दिवंगत वडील बंधु त्यांना शिक्षक म्हणून कांहीं दिवस होते. त्यांच्यामुळें तात्यासाहेबांशीं श्रीमंत राजेसाहेबांचा परिचय झाला व तो पुढें तसाच वृद्धिंगत झाला. या वेळीं सर्व महत्त्वाच्या राज्यकारभाराची धुरा श्री. तात्यासाहेब यानीं आपल्या शिरावर घेण्यास अनुमति दिल्यामुळें श्रीमंतांना परम संतोष झाला. या कार्यकारी मंडळाचे दिवाण व कौन्सिलर हे दोन ( २ ) सभासद आणि कायदेमंडळाच्या निवडणुकी झाल्यावर लोकनियुक्तांपैकीं एका ( १ ) सभासदाची मंत्री म्हणून नेमणूक केल्यावर, तोही कार्यकारी मंडळाचा सभासद नेमण्यांत येणार होता. कार्यकारी मंडळाच्या कामकाजाबाबत नियम तयार करण्यांत आले असून ( १ ) कार्यकारी मंडळाच्या कामकाजाची पद्धति कशी असावी, ( २ ) सभासदांनीं आपआपल्या वैयक्तिक अधिकारांत कोणकोणतीं कामें करावीं, ( ३ ) कार्यकारी मंडळानें आपल्या अधिकारांत कोणत्या कामांचा निर्णय करावा, ( ४ ) राजेसाहेबांच्या निर्णयाकरितां आपला अभिप्राय नमूद करून कोणतीं कामें कार्यकारी मंडळानें पाठवावीं व ( ५ ) श्रीमंत राजेसाहेबांच्या खास अधिकारांत कोणत्या गोष्टी राहतील, यांची स्पष्ट विभागणी करण्यांत येऊन, त्याप्रमाणें कार्यकारी मंडळाचें काम पद्धतशीर सुरू झालें. याप्रमाणें कामाची विभागणी झाल्यामुळें, कामें लवकर उरकण्यास चांगलीच मदत झाली असून, आतांपावेतों कामांत होत असलेल्या दिरंगाईबद्दल होणाऱ्या टीकेस बराच आळा बसला. कार्यकारी मंडळाचें काम एका विवक्षित पद्धतीनें चालू होऊन त्याचें नेतृत्व तात्यासाहेबांसारख्या दक्ष व कार्यकुशल कर्णधाराकडे देण्यांत आल्यामुळें राजेसाहेबांच्या सदूहेतूबद्दल संस्थानच्या प्रजेंत विश्वास निर्माण होण्यास फार मदत झाली. सुरुवातीपासूनच तात्यासाहेबांनीं अशी पद्धत अनुसरली कीं, वर्तमानपत्रांत जाहीर नोटीस देऊन लोकांच्या काय तक्रारी असतील, त्या मागवावयाच्या; त्या ज्या त्या खात्याकडे पाठवून त्यांसंबंधीं सर्व हकीकत

आणि खातेप्रमुखाचा अभिप्राय आणवावयाचा, आणि कारभारी मंडळाच्या बैठकीच्या वेळीं तो अर्जदार समक्ष हजर ठेवून त्याच्याकडून त्याची बाजू व सरकारी अधिकाऱ्यांकडून दरबारची बाजू समजून घेऊन, समक्ष वाटाघाटीनें प्रकरणांचा निर्णय करावयाचा; आणि, पुन्हां कोणत्या कामाचा काय निर्णय केला, याची वर्तमानपत्रांत प्रसिद्धि करावयाची. या कार्यपद्धतीनें दरबारचें प्रजेमध्यें वजन फार मोठया प्रमाणांत वाढलें व पक्षकारास तक्रारीस कसलीच जागा राहिली नाहीं. या पद्धतीनें पूर्वीच्या सुमारें ५-७ वर्षांत अनिर्णित राहिलेल्या अशा अनेक प्रकरणांचा कारभारी मंडळानें निर्णय केला. कार्यकारी मंडळाचें अध्यक्षपद स्वीकारावें म्हणून तात्यासाहेबांना विनंति केली, त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांना असें आश्वासन दिलें होतें कीं, ‘तुमच्याकडून होणाऱ्या हरएक कामांत माझें तुमच्याशीं सहकार्य राहील’ आणि या आश्वासनाप्रमाणें जीं जीं कामें कारभारी मंडळाच्या शिफारशीनें श्रीमंत राजेसाहेब यांजकडे निर्णयाकरितां पाठविण्यांत आलीं, तीं सर्व त्यांनीं, एकहि अपवाद न करतां, जशींच्या तशीं मान्य केली. कार्यकारी मंडळाचे सभासद व अध्यक्ष यांचें सहकार्य व त्यांच्याशीं श्रीमंत राजेसाहेबांचें हार्दिक सहकार्य, यांमुळें अनेक महत्त्वाच्या गोष्टींचा निर्णय अल्पावधींत लागला.

वर उल्लेख केलेल्या जाहीरनाम्यांत आणखी एक महत्त्वाची गोष्ट श्रीमंत राजेसाहेब यांनीं घोषित केली. या जाहीरनाम्यापूर्वी नुकतीच दिल्ली येथें नरेंद्रमंडळाची बैठक झाली होती. त्या बैठकीच्या वेळीं नरेंद्रमंडळाचे चॅन्सेलर हिज हायनेस नबाबसाहेब, भोपाळ, यांनीं एक संस्मरणीय भाषण केलें. त्या भाषणांत सर्व संस्थानिकांनीं आपल्या संस्थानच्या प्रजाजनांना नागरिकत्वाचे मूलभूत हक्क उपभोगण्याचें स्वातंत्र्य द्यावें, असा सर्व संस्थानिकबंधूंना त्यांनीं उपदेश केला, आणि नागरिकत्वाचे मूलभूत हक्क कोणकोणते तेंहि स्पष्ट शब्दांत जाहीर केलें. त्यांनीं घोषित केलेले सर्व हक्क भोर संस्थानच्या प्रजेस श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यापासून उपभोगण्याची पूर्ण मुभा होतीच; तथापि, कायद्याच्या स्वरूपांत ते अद्यापपावेतों ग्रथित केले नव्हते; म्हणून, भोपाळ नरेशांनीं उद्घोषित केलेले सर्व हक्क कायद्यांत ग्रथित करून, ते संस्थानच्या प्रजेस अबाधितपणें भोगतां येतील, ही गोष्ट या जाहीरनाम्यांत त्यांनीं पुन्हां प्रसिद्ध केली.

## नागरिकत्वाचे मूलभूत हक्क

( १ ) कोणाहि व्यक्तीचें स्वातंत्र्य हिरावून न घेणें; कायद्यास अनुसरून नाहीं, अशा रीतीनें त्याचें निवासस्थान अगर मालमत्ता यांत प्रवेश न करणें, ताब्यांत न घेणें अगर सरकारजमा न करणें.

( २ ) प्रत्येक व्यक्तीस Habeas Corpus ( जज्जापुढें आपणास उभें करून अटकेच्या कायदेशीरपणाची चौकशी होण्यासाठीं मागणी करण्याचा ) हा हक्क असणें. हा हक्क, युद्ध, बंड अगर गंभीर स्वरूपाची अंतर्गत बंडाळी उत्पन्न होणें, अशा स्थितींत, तसें जाहीर करून, स्थगित करतां येणार आहे.

( ३ ) कायदा अगर नीति याविरुद्ध नसलेल्या कारणाकरितां, तसेंच लष्करी जमाव नाहीं व शस्त्रविरहित अशा रीतीनें, कोणाही व्यक्तीस मतस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य आणि सभास्वातंत्र्य यांचा हक्क असणें.

( ४ ) कोणाही व्यक्तीस धर्मस्वातंत्र्याचा हक्क असणें.

( ५ ) कोणीही—धर्म, जात अगर पंथ लक्षांत न घेतां—कायद्याच्या दृष्टीनें समान लेखणें.

( ६ ) कोणासही सार्वजनिक नोकरी, मानसन्मान व अधिकाराची जागा प्राप्त होणें व कोणताहि व्यापार अगर धंदा करतां येणें, यांबाबत केवळ धर्म, जात अगर पंथ या कारणास्तव, नालायक न समजला जाणें.

( ७ ) संस्थानांत वेठ अगर बिगार बंद करणें.

( ८ ) अंमलबजावणीखातें व न्यायखातें यांची फारकत करून, न्यायखात्याचा कारभार तज्ज्ञ आणि निःपक्षपाती न्यायाल्याकडे सोंपविणें आणि व्यक्तीव्यक्तीमधील व संस्थान आणि व्यक्ति यांमधील तंटयांचा निवाडा निःपक्षपातीपणानें होईल अशी तजवीज असणें.

( ९ ) संस्थानिकांनीं स्वतःचा खासगी खर्च आणि दौलतीचा खर्च यांची अगदीं तुटक विभागणी करून, दौलतीच्या केवळ ( Net ) उत्पन्नाशीं खाजगी खर्चाचें योग्य असें शेंकडा प्रमाण ठरविणें.

( १० ) करांची आकारणी योग्य व न्याय्य प्रमाणांत करणें, आणि त्यांपैकीं पुष्कळसा ठराविक अंश लोकहिताकडे—विशेषतः राष्ट्र-संवर्धक खात्यांकडे—खर्चाकरितां देणें.

याप्रमाणें, कार्यकारी मंडळाची पुनर्घटना, कायदेमंडळाची अधिकार-वृद्धि आणि नागरिकत्वाच्या हक्कांचें दान, या गोष्टी भोर संस्थानच्या सन १९४६ च्या दुरुस्त कायद्यांत ग्रथित करून, तो कायदा संस्थानमध्यें जारी करण्यांत आला.

वर उल्लेख केलेला जाहीरनामा खालीलप्रमाणें :—

## जाहीरनामा

आम्ही आमच्या प्रजाजनांच्या वाढत्या राजकीय आकांक्षा लक्षांत घेऊन, ता. ६ माहे फेब्रुवारी सन १९४६ रोजीं हु. द. ठ. नं. ८ चा केला. त्यांत मुख्यतः नागरिकत्वाचे मूलभूत हक्क ( Fundamental Rights ) ग्रथित केले. तसेंच, खालील महत्त्वाच्या सुधारणा दिल्याचें जाहीर केलें आहे.

( १ ) कायदेमंडळाचा अध्यक्ष लोकनियुक्त सभासदांतून निवडण्याचा कायदेमंडळास अधिकार असणें.

( २ ) मंत्री हा एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचा सभासद म्हणून घेणें.

( ३ ) Privy Purse ची रक्कम व इतर कांहीं जरूर त्या बाबी सोडून, बाकीचें बजेट, सर्टिफिकेशनचा अधिकार आपल्या-आपल्याकडे राखून ठेवून, कौन्सिलच्या मतास टाकणें.

त्या वेळेपासूनच लोकनियुक्त प्रतिनिधींचा आमच्या राज्यकारभाराशीं जास्त सलोख्याचा संबंध कसा येईल, या दृष्टीनें आम्ही विचार करीत होतों; व अशा विचारांतींच कायदेमंडळांतील लोकनियुक्त प्रतिनिधींच्या संख्येची व कायदेमंडळाच्या अधिकारक्षेत्राची वाढ करून लोकनियुक्त मंत्र्यांना राज्यकारभारांतील कांहीं महत्त्वाच्या खात्यांच्या दैनंदिन कारभाराचा प्रत्यक्ष

अनुभव घ्यावा व थोड्याच काळांत जवळजवळ सर्वच राज्यकारभाराची जबाबदारी त्यांच्यावर सोंपवावी, म्हणून आम्हीं पुढील योजना मुक्रर केली आहे.

ता. २ माहे सप्टेंबर १९४६ रोजीं ठ. नं. ४ चा प्रसिद्ध केला. त्यांत भोर संस्थानच्या नव्या विधिमंडळाची घटना, तसेंच दोन मंत्र्यांची नेमणूक, हे दोन महत्त्वाचे भाग होते. नवीन कायदेमंडळांत लोकनियुक्त सभासद १९ व जे ५ सरकारनियुक्त सभासद नेमावयाचे, तेहि लोकप्रतिनिधींना पसंत पडतील, अशा तऱ्हेनें असण्याची योजना केलेली आहे. फक्त दोनच सरकारी अधिकारी या कायदेमंडळांत राहावयाचे आहेत. निवडणुका व नेमणुका होऊन विधिमंडळाची संपूर्ण रचना झाल्यानंतर, लोकप्रतिनिधींना प्रत्यक्ष राज्यकारभारांत जास्त भाग घेण्याची संधि मिळावी, म्हणून दोन मंत्री म्हणजे Ministers नेमावयाचे असून, त्यांच्याकडे पूर्वीं मंत्री यांजकडे जीं खातीं सोंपविण्यांत आलीं होतीं, त्यांखेरीज जरूर तीं आणखी खातीं सोंपविण्यांत येतील असें जाहीर झालेंच आहे.

नुकत्याच नवीन निवडणुका झाल्या व त्यांचा आतां निकाल लागला असून, आमच्या प्रजेनें कायदेमंडळांतील आपल्या प्रतिनिधींची निवड केली आहे. सरकारनियुक्त पांच सभासदांच्या नेमणुकाही जाहीर झाल्या आहेत. आतां मंत्री यांच्याकडे जादा कोणतीं खातीं द्यावयाचीं, याविषयीं पूर्ण विचार करून व आमच्या प्रजाजनांपैकीं कांहीं पुढाऱ्यांशीं विचारविनिमय करून, पुढीलप्रमाणें खातीं मंत्री यांजकडे सोंपविण्याचें आम्हीं ठरविलें आहे.

| मंत्री यांजकडे हल्लीं असलेलीं खातीं | मंत्री यांजकडे नवीन देण्यांत येणारीं खातीं |
| --- | --- |
| १. शिक्षण | 1. Agriculture |
| २. स्थानिक स्वराज्य-संस्था | 2. Forest |
| ३. वैद्यक व सार्वजनिक आरोग्य | 3. Control (Civil Supplies) |
| ४. व्हेटरिनरी | 4, Weights and Measures |
| ५. ग्रामसुधारणा | 5. Adulteration of Food stuffs and other articles |
| ६. व्हॅक्सिनेशन | |

6. Registration of Documents
7. Registration of Births, Deaths, Marriages
8. Excise
9. Co-operative Societies
10. Pilgrimage
11. P. W. D.
12. Development of Industries
13. Religious and Charitable Endowments

मंत्र्यांकडे सोंपविण्यांत येणाऱ्या नवीन खात्यांच्या बाबतींत पुढील निर्बंध घालण्यांत येत आहेत :

( १ ) P. W. D.

( अ ) ५००० रुपयांपेक्षां अधिक खर्च लागणाऱ्या कोणत्याहि एका बांधकामाला दिवाणांची संमति घेणें मंत्र्यांना आवश्यक राहील. अशीं बांधकामें सुरू करण्याचें ठरविण्याचा दिवाणांना अधिकार राहील. मात्र, तीं सुरू करण्यापूर्वी त्यासंबंधांत मंत्र्यांचा सल्ला घेण्यांत येईल, व तीं सुरू करण्याचें ठरल्यास, त्यांची व्यवस्था मंत्र्यांमार्फत होईल.

( ब ) Electricity ( वीज ) बाबतचें Administration ( कारभार ) व त्यावरील देखरेख, या

बावी मंत्र्यांकडे राहतील; पण, नवीन करार करणें झाल्यास, असे करार दिवाणांना मंत्र्यांचा सल्ला घेऊन करतां येतील.

( २ ) Development of Industries हल्लीं असलेल्या कारखान्यांवर मंत्र्यांचा ताबा चालेल; पण, या कारखान्यांबरोबर नवीन करार करणें झाल्यास, ते दिवाणांना मंत्र्यांचा सल्ला घेऊन करतां येतील, अथवा नवीन कारखाने काढावयाचे झाल्यास, तसें करतांना व अशा कारखान्यांना द्यावयाच्या सवलती ठरवितांना अगर त्यांसंबंधीं करार करतांना, दिवाण मंत्र्यांचा सल्ला घेतील; आणि या नवीन कारखान्यांवरहि मंत्र्यांचा ताबा चालेल.

पूर्वीं सोंपविलेलीं खातीं ६ व नवीन सोंपविण्यांत येणारीं खातीं १३ मिळून १९ खातीं लोकप्रतिनिधींच्या हातीं देण्यांत येणार आहेत.

ता. ६ फेब्रुवारी १९४६ रोजीं आम्हीं केलेल्या घोषणेनंतर हिंदुस्थानच्या राजकीय क्षेत्रांत झपाट्यानें बदल होत चाललेला आहे. त्याचे पडसाद संस्थानच्या राजकारणावरही जोरानें उमटत आहेत. आम्हीं राज्यकारभाराची धुरा हातीं घेतल्यापासून आमचें धोरण आमच्या प्रजेनें संस्थानच्या राज्यकारभारांत भाग घ्यावा असें असल्यानें, इ. स. १९२८ सालींच कायदेमंडळाची आम्हीं स्थापना केली, व त्यानंतर वेळोवेळीं लोकप्रतिनिधींना काम करण्यास उत्तरोत्तर जास्त वाव मिळेल, अशा रीतीनें हक्क देऊं लागलों. आतां, आमच्या प्रजाजनांच्या इच्छा व आकांक्षा लक्षांत घेऊन, संस्थानचा राज्यकारभार लोकप्रतिनिधींच्या

हातांत जितका जास्त देतां येईल, तितका द्यावा, इतकेंच नव्हे, तर जवळजवळ सर्वच राज्यकारभाराचीं खातीं लोकनियुक्त मंत्र्यांच्या हातीं सोंपवावीं, अशी आमची प्रबळ इच्छा आहे. पण, त्याबरोबर इतरही कांहीं महत्त्वाच्या घडामोडी पाहतां व लक्षांत घेतां, तूर्त वर नमूद केल्याप्रमाणें जादा खातीं मंत्री यांजकडे ताबडतोब सोंपविण्याचें आम्हीं निश्चित केलें आहे.

अशा रीतीनें खातीं सोंपीव करून नवीन मंत्रिमंडळ अस्तित्वांत आल्या-वर, श्री. न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर हे Executive Council चे अध्यक्ष म्हणून, त्यांची काम करण्याची मर्जी असेल तोंपर्यंत, राहतील. त्यानंतर दिवाण अगर श्रीमंत राजेसाहेब नेमतील, तो अनुभवी अधिकारी Executive Council चा अध्यक्ष म्हणून काम करील.

ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं आम्ही राज्यावर आल्यास २५ वर्षें पूर्ण होत आहेत, व अशा या महत्त्वाच्या व सुमंगल प्रसंगीं आम्ही लोकनियुक्त मंत्र्यांकडे राज्यकारभाराची सर्व जबाबदारी सोंपविणार आहोंत. मात्र, पुढील नमूद केलेलीं खातीं ( Reserved ) राखीव म्हणून राहातील.

( १ ) संरक्षण ( परंतु, पोलिस, शिबंदी व पागा—मंत्र्यांकडे सोंपीव खातीं म्हणून देण्यांत येतील ).

( २ ) परराष्ट्रीय खातें, तसेंच राजकीय संबंध.

( ३ ) इनाम, तैनात व सरंजाम, श्रीराम संस्थान व अंबवडें संस्थान.

( ४ ) खाजगी ( राजघराण्याच्या व्यक्तिगत बाबी व खाजगी उत्पन्न).

यावरून आम्हीं योजलेल्या सुधारणांचें स्वरूप लक्षांत येईल. त्याचें वर्णन थोडक्यांत असें करतां येईल कीं, ब्रिटिश हद्दींत स. १९१९ इ. च्या घटना-कायद्यान्वयें जीं खातीं लोकनियुक्त मंत्र्यांच्या स्वाधीन करण्यांत आलीं, तीं ( वर निर्दिष्ट केलेल्या निर्बंधांसह ) आमच्या संस्थानांत ताबडतोब मंत्र्यांच्या स्वाधीन करण्यांत येतील आणि ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं या खात्यांच्या बाब-तींतील निर्बंध रद्द करून, तीं खातीं व बाकीचीं खातीं ( वर निर्दिष्ट केलेल्या अपवादांसह ) पूर्णपणें मंत्र्यांच्या स्वाधीन करण्यांत येतील; आणि अशा रीतीनें

ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं सामान्यतः संपूर्ण स्वराज्याचा कारभार आमच्या संस्थानांत सुरू होईल. संस्थानच्या आतांच्या घटना-कायद्यांत दुरुस्ति करून मंत्र्यांना खालसांतील इ. स. १९१९ च्या कायद्याप्रमाणें सत्ता देण्याचें आम्हीं योजिलें होतें. परंतु, द्विदल राज्यपद्धतीचा अंमल अल्पकाळ टिकणारा असल्या-मुळें, ही दुरुस्ति न करतां, १९१९ चाच कायदा ( जरूर त्या फेरफारासह ) तूर्त अंमलांत आणण्यांत येईल; व ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं जें पूर्ण सत्तासंक्रमण करण्याचें आम्हीं निश्चित केलें आहे, त्यास अनुरूप असा नवीन घटना-कायदा तयार करण्याचें काम आम्ही एखाद्या तज्ज्ञाकडे आतांच सोंपवीत आहोंत. त्याचा हेतु हा कीं, हा मसुदा तयार होऊन ता. १८ ऑगस्ट १९४७ या नियोजित दिवशीं नवीन कायद्याचा अंमल होण्यास आम्हीं ठरविल्याप्रमाणें सुरुवात व्हावी.

क्रमशः, पण थोडक्या वेळांत, सत्तासंक्रमण व्हावें, अशी ही योजना आम्हीं मुक्रर केली आहे; व त्यामुळें आमची अशी खात्री आहे कीं, आमचे प्रिय प्रजाजन या क्रमशः आपोआप विकास पावणाऱ्या सत्तासंक्रमणाचा आनंदानें स्वीकार करतील आणि हें सत्तासंक्रमण यशस्वी रीतीनें, तसेंच शांतपणें, पार पाडण्यास मनापासून मदत करतील, अशी आम्हांस बळकट उमेद आहे. ता. २४ जानेवारी १९४७ इ.

**न. चि. केळकर**<br>
**ल. र. साने**　　} 　　**राजेसाहेब, भोर**<br>
**श्री. ग. वझे**

## जंगल कमिटी

सन १९३८ च्या डिसेंबरमधील घोषणेंत जाहीर केल्याप्रमाणें, घटना-कमिटीबरोबरच जंगल-कमिटी नेमल्याचें ता. १८ ऑगस्ट सन १९३९ च्या दरबारच्या वेळीं श्रीमंतांनीं जाहीर केलें. ही कमिटीही मे. श्रीधर गणेश वझे, बी.ए., यांच्याच अध्यक्षतेखालीं नेमली; आणि पांच सरकारी व पांच बिन-सरकारी सभासदांची त्यांत नेमणूक केली. या कमिटीकडे खालीं दिलेल्या विषयांसंबंधीं चौकशी करण्याचें काम सोंपविण्यांत आलें.

# जंगल कमिटी

सार्वभौम सरकार व भोर दरबार यांच्या दरम्यानचे हितसंबंध अगर करारमदार यांस अनुसरून, संस्थानच्या तिजोरीवर बोजा न पडेल व अंतरित उत्पन्नाचा प्रश्नहि उपस्थित न होईल, तसेंच संस्थानचें आत्यंतिक हित व रयतेचे पिढ्यानुपिढ्यांचे हितसंबंध लक्षांत घेऊन व लोकांच्या हिताच्या उत्कट इच्छेनें व त्यांच्या खऱ्या व रास्त तक्रारी, गैरसोयी व अडचणी दूर करण्याच्या उदात्त हेतूनें, संस्थानमधील जंगल-बाबींचा विचार व चौकशी करून योजना व शिफारशी करण्याकरितां खालील गृहस्थांची कमिटी नेमण्यांत येत आहे.

चेअरमन–बिनसरकारी–मे. श्रीधर गणेश वझे, बी.ए.

| सरकारी सभासद | बिनसरकारी सभासद |
|---|---|
| १. रा. कोंडो महादेव कुमठेकर, बी.ए., एल्एल्.बी. | १. मे. चंद्रशेखर गोविंद आगाशे, बी.ए., एल्एल्.बी. |
| २. रा. विनायक गोविंद रानडे, एम्.ए., एल्एल्.बी. | २. ,, सदाशिव कृष्णराव शिंदकर |
| ३. रा. नरहर गोपाळ अंबेकर, बी.ए. | ३. ,, दामोदर बाळकृष्ण पोतनीस |
| ४. रा. सा. वामन रामचंद्र साने | ४. ,, कोंडो गणेश देव |
| ५. रा. गुरुराव राघवेंद्र कमळापूरकर | ५. ,, पांडुरंग बळवंत शिळीमकर |

कमिटीनें हल्लींच्या फॉरेस्ट डिमार्केशनमुळें लोकांस अडचणी होत असल्यास, त्याबाबत कोठें व कशा रीतीनें, डिमार्केशनमध्यें, लोकांच्या तक्रारी निवारण करण्याकरितां, कितपत बदल केला पाहिजे व तो कसा घडवून आणावा, त्याबाबत सूचना कराव्यात.

जंगलच्या निर्णित अगर अनिर्णित बाबींसंबंधीं लोकांचीं गाऱ्हाणी असतील, त्यांची चौकशी करावी.

जंगलच्या बाबतींत नुकतेंच जें सेटलमेंट केलें आहे, त्याबद्दल लोकांचीं जीं गाऱ्हाणीं असतील, त्यांची चौकशी करावी.

ब्रिटिश सरकारनें मोठ्या खर्चानें बांधलेल्या खडकवासलें तलावांत गाळ सांचून त्या सरकारची तक्रार न येईल अशा रीतीनें, जंगल रक्षणाच्या सर्वसाधारण नियमांस अनुसरून, हल्लीं जंगलमध्यें लागवडीस जमिनी देतां येतील काय ? असल्यास, तें कोठें व कितपत याबद्दल चौकशी करून, त्याबाबत गांववार शिफारशी कराव्यात.

विशेषत:, भातखाचरें वगैरेंच्या दृष्टीनें लागवडीचें क्षेत्र वाढवितां आल्यास, संस्थानच्या व रयतेच्या दृष्टीनें हिताचें आहे, ही गोष्ट प्रामुख्यानें नजरेंत असूं द्यावी.

**गुरचरण, राबटहाळ, जळाऊ लाकडें वगैरे**

गुरचरण, राबटहाळ, सरपणाचीं शिरओझीं, शाकारणीचें गवत, यांबाबत हल्लींची वहिवाट कशी आहे, त्याबाबत लोकांच्या खरोखर कांहीं अडचणी अगर तक्रारी आहेत काय, असल्यास, त्या कोणत्या प्रकारें दूर करितां येण्याजोग्या आहेत, याबद्दलहि सूचना कमिटीनें कराव्यात.

**इनामदार वगैरे**

जंगल-रक्षणाची सर्व जबाबदारी पाळून, इनामदार, इसाफतदार व इतर हक्कदार, दुमालदार यांचे हितसंबंध त्यांस कसे उपभोगितां येतील, त्यांच्या तक्रारी व अडचणी काय आहेत व त्या दूर कशा करितां येतील, त्याबाबत उपाययोजना सुचविण्यांत याव्यात.

**सर्वसाधारण धोरण, नियम वगैरे**

रयतेस सुखावह होईल, ह्या रीतीनें जंगलाबाबत संस्थानचें धोरण सर्वसाधारणपणें कसें ठेविलें जावें व हल्लींच्या पद्धतीमध्यें काय सुधारणा करणें इष्ट आहे, हल्लींच्या नियमांत काय बदल पाहिजे, त्या बाबतींत सूचना कमिटीनें कराव्यात.

धनगरमहाल-बाबीसंबंधानें ‘ लोकांवर दुबार कर बसतो ’ असें जें कांहीं लोकांचें म्हणणें आहे, तें कितपत खरें आहे; व तशी परिस्थिति असल्यास, त्या बाबतींत काय तजवीज करावी, याबद्दल शिफारशी कमिटीनें श्रीमंत राजेसाहेब यांजकडे कराव्यात.

वरील गोष्टींबाबत कमिटीनें जरूर त्या गांवीं जाऊन चौकशी करून व सदर बाबतींतील कागदपत्र पाहून रिपोर्ट करावा.

या एकंदर बाबतींत विचार करतांना कांहीं शंका उत्पन्न झाल्यास अगर अडचणी आल्यास, त्यांबाबत चेअरमन यांनीं श्रीमंतांकडे रिपोर्ट करून, श्रीमंतांच्या हुकुमाप्रमाणें पुढील काम चालवावें.

---

कमिटीच्या कामास ता. ५ नोव्हेंबर १९३९ रोजीं सुरुवात झाली. पहिल्या बैठकींत कमिटीनें मागणी केल्याप्रमाणें, संस्थानच्या जंगल खात्याच्या माहितीची एक सविस्तर हकीकत तयार करून, ती ऑगस्ट १९४० मध्यें कमिटीस पुरविण्यांत आली. या हकीकतींत ज्या ज्या कागदपत्रांचा उल्लेख करण्यांत आला होता, त्यांच्या नकला कमिटीस पुरविण्यांत याव्यात अशी कमिटीच्या अध्यक्षांनीं दरबारला विनंति केली. त्याप्रमाणें कागदपत्र कमिटीस पुरविण्यांत आले.

जंगल-कमिटीच्या ता. ५ नोव्हेंबर सन १९३९ रोजीं भरलेल्या पहिल्या बैठकींत दरबारनें लोकांच्या जंगलसंबंधीं तक्रारी कमिटीकडे पाठविण्याबद्दल एक जाहीरनामा प्रसिद्ध करावा असें ठरविण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें जाहीरनामा ता. २६ नोव्हेंबर सन १९३९ रोजीं संस्थानांत गांवोगांव प्रसिद्ध करण्यांत आला. या जाहीरनाम्यास अनुसरून कमिटीकडे संस्थानच्या निरनिराळ्या भागांतून एकूण १६० तक्रारअर्ज आले. या अर्जांची चौकशी करण्याकरितां जंगल-कमिटीनें आपल्यापैकीं सरकारी एक व बिनसरकारी एक, अशा दोन सभासदांची एक पोट-कमिटी नेमली. या पोट-कमिटीनें अर्जांच्या चौकशीचें काम ऑगस्ट १९४० मध्यें सुरू केलें. ह्या पोट-कमिटीनें चौकशीच्या कामाची पद्धत अशी स्वीकारली कीं, ज्या मनुष्यानें अगर गांवच्या लोकांनीं अर्ज केलेला असेल, त्यास लेखी अगर तोंडी पुराव्यासाठीं कमिटीपुढें समक्ष बोलवावयाचें; अर्जाबाबत त्याचा लेखी जबाब घ्यावयाचा, त्याचा कागदोपत्रीं पुरावा दाखल करून घ्यावयाचा; त्यांच्या तक्रारीबाबत सरकार-दप्तरांमधील कागद पाहावयाचे; त्या कागदांवरून सरकारतर्फे माहीतगार इसमाचा जबाब घ्यावयाचा; सरकारी

कागदपत्र दाखल करून घ्यावयाचे; आणि या सर्वांचा विचार करून तक्रारी-बाबत आपला अभिप्राय नमूद करावयाचा. या पद्धतीनें पोट-कमिटीपुढें आलेल्या सर्व अर्जांची चौकशी पोट-कमिटीनें पुरी केली.

जंगल कमिटीनें कमिटीकडे सोंपविलेल्या इतर प्रश्नांपैकीं सरकारी फॉरेस्टांतील जमिनी, ठराविक आकार दर एकरामागें घेऊन, रयत लोकांना लागवडीस देण्याबाबतच्या प्रश्नांची वाटाघाट केली असून, त्यांना जंगलांत राबटहाळ, गुरचरण, सरपण, कोलिंव गवत, वगैरेबाबत काय काय सवलती द्यावयाच्या याबाबत कमिटीनें आपल्या शिफारशी ता. २९-६-४६ रोजीं कारभारी मंडळास सादर केल्या. त्या कारभारी मंडळानें अभिप्रायासह का. मं. ठ. नं. १८१ ता. २८ माहे ऑगस्ट १९४६ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांकडे मंजुरीसाठीं पाठविल्या व राजेसाहेबांनीं ता. ३ माहे आक्टोबर १९४६ इ. रोजीं त्यांस मान्यता दिली. नंतर, त्याप्रमाणें अंमलबजावणीचे हुकूम देण्यांत आले. तें जादा गॅझेट खालीं दिलें आहे.

## कारभारी मंडळ, भोर

ठराव नं. १८१

ता. २८ माहे ऑगस्ट सन १९४६ इ.

**विषयः**—जंगल-कमिटीच्या शिफारशी

भोर संस्थान जंगल-कमिटीच्या अध्यक्षांकडून ता. २९-६-४६ इ. रोजींच्या पत्रासोबत जंगलसंबंधीं प्रश्नांबाबत कमिटीच्या शिफारशी श्रीमंत राजे-साहेब यांस सादर करण्यांत आल्या. त्या शिफारशी अभिप्रायासाठीं त्यांनीं कारभारी-मंडळाकडे पाठविल्या. त्या पाहून कारभारी-मंडळ आपला अभिप्राय खालीलप्रमाणें नमूद करीत आहे.

१. फॉरेस्टांतील वरकस जमिनीचें गद्दी जमिनींत रूपांतर करण्या-करितां लोकांना निरंतर लागवडीस जमिनी देण्याबाबतच्या शिफारशीचा ठराव ( परिशिष्ट अ [ १ ] ) कमिटींत एकमतानें पास करण्यांत आला असल्यामुळें, सदर शिफारस जशीच्या तशीच मंजूर करावी.

२. फॉरेस्टांतील वरकस जमिनी एकरीं सहा आणे आकार घेऊन लोकांना दळे-लागवडीस देण्याची शिफारस कमिटीनें एकमतानें केलेली आहे. त्याचप्रमाणें भोर संस्थान शेतकी-कमिटीनें दळे-पद्धत बंद करून हिरड्याची लागवड संस्थानच्या फॉरेस्टमध्यें करावी, म्हणून केलेली शिफारस जंगल-कमिटीस मान्य आहे. त्याप्रमाणें हिरड्याची लागवड फॉरेस्टमध्यें करावी असेंहि जंगल-कमिटीनें एकमतानें सुचविलें आहे. हिरडा-लागवडीची योजना अंमलांत आणण्यास जो अवधि लागेल, त्या काळपर्यंतच दळे-पद्धतीची लागवड चालू ठेवणेची आहे. इतकेंच नव्हे, तर हिरडा लागवड सुरू झाल्यावर ती १० वर्षेंपर्यंत चालू राहून क्रमाक्रमानें बंद होत जाणार आहे. हें हिरडा-लागवडीच्या योजनेंतच नमूद केलें आहे. ती दळे-पद्धति कशी अंमलांत आणावी याविषयीं कमिटीनें आपल्या ठरावांत परिच्छेद ५, ६, ७ व ८ यांत सूचना केलेल्या आहेत. त्यांबाबत खालीलप्रमाणें तजवीज करावी.

( अ ) दळे-लागवडीस जमिनी देतांना एकरीं आकार सहा आणे-प्रमाणें घ्यावा.

( ब ) परिच्छेद ६ व ७ प्रमाणें गांवांचे दहा दहा विभाग पाडणें. जंगलची वांटणी पद्धतशीर होण्याकरितां प्रत्येक गांवचें किती जंगल तोडणें, यासंबंधीं तपशीलवार वर्किंग प्लॅन तयार करणें, इत्यादींची योजना रा. फॉरेस्ट ऑफिसर यांनीं, रा. फॉरेस्ट ॲडव्हायसर यांच्या सल्ल्यानें व तालुका मामलेदार यांच्या मदतीनें तयार करून, मे. दिवाणसाहेब यांस सादर करावी. सदरहू योजना मे. दिवाणसाहेब यांनीं आपल्या अभिप्रायासह कारभारी मंडळापुढें मांडून मान्यता घेतल्यावर पुढील तजवीज त्या योजनेनुसार करावी.

( क ) परिच्छेद ८ प्रमाणें गांववार पंच नेमणें, जमिनीचा खंड वसूल करणें, पंचांच्या निवडणुकी करणें, पंचांवरील जबाबदारी कबुलायती घेणें, वगैरे बाबतचे नियम, कमिटीनें आपल्या शिफारशींसोबत जोडलेल्या अंमलदाराच्या कर्तव्याबाबतच्या मि. अलेक्झांडर शिवन, असि. कलेक्टर, यांच्या सूचनांच्या आधारें, मे. दिवाणसाहेब यांनीं फॉरेस्ट ॲडव्हायसर यांच्या सल्ल्यानें तयार करून, त्यास कारभारी मंडळाची मान्यता घेऊन त्याप्रमाणें तजवीज करावी.

याप्रमाणें ठरावाची अंमलबजावणी ताबडतोब होण्याच्या दृष्टीनें वर उल्लेख केलेल्या अंमलदारांनीं त्यांजकडे सोंपविलेलीं कामें करावीं.

( ड ) कमिटीच्या शिफारशीप्रमाणें दळे-लागवड क्रमशः बंद करून हिरडा-लागवड ताबडतोब अंमलांत आणण्याकरितां काय काय तजवीजी करावयास पाहिजेत, यासंबंधीं अभिप्रायाचा रिपोर्ट रा. फॉरेस्ट ॲडव्हायसर यांनीं जोशी-कमिटीच्या रिपोर्टांतील हिरडे-लागवडीच्या योजनेचा विचार करून कारभारी मंडळास सहा महिन्यांत सादर करावा.

३. सरकारी फॉरेस्टांत सेटलमेंटच्या वेळीं गेलेलें गायरानाचें क्षेत्र मोफत गुरें चारण्याकरितां लोकांना परत उपलब्ध करून देण्याबद्दलचा ठराव कमिटीनें सर्वानुमतें पास केलेला आहे. या शिफारशीप्रमाणें फॉरेस्टांतील गायरानाचें क्षेत्र मोकळें करावें असा आमचा अभिप्राय आहे.

४. संस्थानच्या फॉरेस्टांत रयतेस काय काय सवलती असाव्यात, यांची यादी कमिटीनें एकमतानें तयार करून त्या यादीप्रमाणें सर्व सवलती देण्याबद्दल शिफारस केलेली आहे. या यादीप्रमाणें सर्व सवलती संस्थानच्या रयतेस मिळणें आवश्यक आहे. सबब, या सर्व सवलती रयतेस देण्यांत याव्यात. मात्र, या सवलती दिल्याचें जाहीर केल्याबरोबर, त्या रयतेस कशा प्रकारें उपभोगितां येतील, फॉरेस्टखात्यानें त्यांसंबंधीं काय काय खबरदाऱ्या घेणें जरूरीचें आहे, सवलतींचा दुरुपयोग होऊं लागल्यास त्याविरुद्ध काय उपाययोजना करावी, याबाबत नजीकच्या पुणें, कुलाबा, सातारा, इत्यादि ब्रि. जिल्ह्यांत जे प्रचलित नियम आहेत, त्या पद्धतीवर संस्थानकरितां नियम तयार करून ते गॅझेटमध्यें व जाहीरनामे काढून हुजुरच्या सहीनें प्रसिद्ध करण्याची तजवीज रा. फॉरेस्ट ॲडव्हायसर यांनीं ताबडतोब करावी.

५. पूर्ण इनाम गांवच्या इनामदारांच्या हक्काबाबत कमिटीनें बहुमतानें पास केलेला ठराव मान्य करण्यांत यावा. या ठरावानें भोर संस्थानांतील जंगलची व्यवस्था दरबार, इनामदार, हक्कदार व बाकी प्रजानन यांना सोईची व सुखाची होईल. अशा ज्या शिफारशी ही फॉरेस्ट-कमिटी करील त्या शिफारशी अंमलांत आणण्याबद्दल इनामदारांकडून दरबारनें प्रथम संमति घेऊन, इनामदारांचें

जें जंगल सरकारी राखीव जंगलांत सामील केलें असेल, तें इनामदारांच्या ताब्यांत व वहिवाटीस देण्याची विलंब न लावतां दरबारनें तजवीज करावी अशी कमिटीची शिफारस आहे.

तसेंच, इसाफत, शराकत व सरंजाम या गांवांतून साऱ्याचें उत्पन्न ज्या प्रमाणांत पावणेचा इसाफतदार, शराकदार व सरंजामदार यांना हक्क असेल, त्या प्रमाणांत जंगलाचें उत्पन्न त्यांना देण्यांत यावें, अशी कमिटीची एकमताची शिफारस आहे.

या कमिटीच्या शिफारशीबाबत आमचा अभिप्राय असा आहे कीं,

१. सन १९३६ सालीं इनाम, इसाफत, सरंजाम व शराकत, या गांवांचे केलेलें सेटलमेन्ट ताबडतोब रद्द करण्यांत यावें.

२. इनाम गांवांतील जंगल राखीव जंगलांतून कमी करून तें इनामदारांच्या ताब्यांत व वहिवाटीस द्यावें. मात्र, तें ताब्यांत देण्यापूर्वी भोर संस्थानच्या जंगल व्यवस्थेबाबत या ठरावांतील परिच्छेद १ तें ४ यांत संस्थानच्या जंगलाबाबत ज्या सवलती द्याव्यात अशी कमिटीची शिफारस आहे व ज्या मंजूर कराव्या असा कारभारी मंडळानें आपला अभिप्राय दिला आहे, त्या सर्व सवलती व अशा प्रकारच्या सवलती कमिटीच्या शिफारशीनुसार दरबार आपणहून देण्याचें ठरवील, त्या सर्व सवलती सर्व प्रकारच्या इनामदारांनीं आपआपल्या इनाम गांवांतील रयतेस देण्याची लेखी कबुली दिल्याशिवाय त्यांचीं जंगलें त्यांच्या वहिवाटीस देऊं नयेत.

शिवाय, सर्व प्रकारच्या इनामदारांनीं आपल्या गांवांतील जंगलाची व्यवस्था मन मानेल तशी ठेवून संस्थानच्या नजीकच्या जंगलाला विघातक होईल अशी वर्तणूक ठेवूं नये, म्हणून या सर्व इनाम गांवांस फॉरेस्ट ॲक्टाचें कलम ३५ प्रमाणें ताबडतोब नोटीस द्यावी. ही नोटीस दिल्यापासून तीन तें बारा वर्षांच्या अवधींत जरूर तर सेटलमेन्ट करावयाचें असल्यामुळें, अशी नोटीस देण्यास हरकत नाहीं, असें आमचें मत आहे.

| | | |
|---|---|---|
| K. R. Shitut | ल. र. साने | न. चिं. केळकर |
| सभासद | सभासद | अध्यक्ष |
| कारभारी मंडळ, भोर. | कारभारी मंडळ, भोर. | कारभारी मंडळ, भोर. |

चित्रांक १४



हि. हा. शंकरराव मॅन्शन्स ( गेस्ट हाउस ).

[ सं. पा. १०२

सरकार श्रीमंत राजेसाहेब सं. भोर यांचे हुजूरांस रवाना. ता. २९ माहे सप्टेंबर सन १९४६ इ.

**न. चिं. केळकर**
अध्यक्ष, कारभारी मंडळ, भोर.

यांसी

कारभारी मंडळाचा ठराव मंजूर केला असे, कळावें, ता. ३ माहे आक्टोबर सन १९४६ इ.

**राजेसाहेब, सं. भोर**

## नोकरवर्गांच्या सुखसोयी
## प्रवासभाडें व भत्ता, महागाईभत्ता व पगारवाढ

महायुद्धजन्य परिस्थितीमुळें सर्वत्र महर्गता पराकोटीस पोंचली. त्याची झळ भोर संस्थानासही पोंचल्याखेरीज राहिली नाहीं. त्यामुळें प्रवासभाडें व भत्ता व पगार यांत वाढ करणें ओघानेंच प्राप्त झालें. प्रवास-भाडेभत्त्यासंबंधीं रुळींत सर्वसाधारणपणें सत्रापटीनें वाढ करण्यांत आली.

दौलतीकडील सर्व खात्यांतील नोकरवर्गास महागाईभत्ता दोन वेळ आणि पगारवाढ एक वेळ केली. महागाईभत्त्याचा वार्षिक खर्च, राज्यकारभाराचीं सर्व खातीं मिळून, रु. १८,९६० व पोलीसखातें, पागा व शिबंदीकडील हत्यारी नोकरवर्ग यांस रु. १५,४९२ लागूं लागला. या दोन्ही रकमा मिळून एकूण रु. ३४,४५२ दरसाल रक्कम खर्च पडूं लागली. किल्ल्याचे गडकरी वतनदार नोकर आहेत. त्यांना सुद्धां ही वाढ देण्यांत आली. महागाईभत्ता साधारणपणें दरमहा रु. ३ प्रमाणें वाढविला. पोलीस खात्यास मात्र प्रत्येक पोलीसला रु. ६ प्रमाणें वाढ केली. याशिवाय, सर्व खात्यांत पगारवाढ केली आहे. त्याचा खर्च दरसाल सुमारें १२,१४४ रुपये वाढला. प्रवासभत्त्याची वाढ सत्रापटीनें केली.

पोलीसखातें कार्यक्षम व्हावें, म्हणून त्यास सन १९४२-४३ सालापासून टाइमस्केल लागू करण्यांत आलें. टाइमस्केल लागू करण्याच्या योजनेच्या कामांत

कोल्हापूर येथील रेसिडेन्सीकडील पोलीस ॲडव्हायजर यांचा सल्ला घेण्यांत आला होता; व त्यांनीं केलेल्या सूचनानुसार केलेली योजना लागू केल्याचें मे. रेसिडेंटसाहेब ले. क. गेसफर्ड यांना कळविण्यांत आल्यावर, त्यांनीं पत्र पाठवून आनंदपूर्वक श्री. राजेसाहेबांचें अभिनंदन केलें. ता. १२-६-१९४२ च्या सदरहू पत्रांत ते लिहितात :—

" Your demi-official letter dated the 9th June, with which you enclosed the final orders on the Police reorganisation proposals. I am indeed most glad to see that you have accepted my Police Adviser's proposals in their entirety. I am sure that you have done a most wise thing in taking this step and I congratulate you. The advice that has been given to you comes *from somebody who is an expert in that line* and I am sure it will not be only correct but most beneficial. My best wishes for your Police force in the years to come."

श्रीमंत राजेसाहेब व श्री. युवराजसाहेब यांच्या खाजगी तैनातींतील नोकरवर्ग, तसेंच वतनी, श्रीरामसंस्थान, काशी, अंबवडें, आंबाडखिंड, वाई, खासगी व्यापार व दास्तान, इत्यादि सर्व खात्यांकडील नोकरवर्गास दरमहा महागाईभत्ता देण्यांत आला. प्रथम महागाईभत्ता देण्यांत आला, तो अपुरा पडतो असें दिसून आल्यावरून, त्यांत पुन्हां वाढ केली. या बाबीचा वार्षिक खर्च रु. ५,१६० पांच हजार एकशें साठपर्यंत वाढला.

केवळ महागाईभत्ता वाढवून भागेल असें दिसेना. नोकरवर्गाची पगार-वाढ व्हावी अशी पुन: मागणी आली. त्या मागणीचा सहानुभूतिपूर्वक विचार करून, वर उल्लेख केलेल्या वतनीकडील सर्व खात्यांतील नोकरांना श्री. राजे-साहेबांनीं पगारवाढ केली. त्यामुळें वार्षिक खर्चांत एकंदर दोन हजार नऊशें सोळा ( २,९१६ ) रुपयांनीं वाढ झाली.

## दक्षिणेंतील संस्थानांकरितां कोल्हापूर येथें समाईक हायकोर्टाची स्थापना

हिंदुस्थान सरकारच्या राजकीय खात्याच्या प्रतिनिधीकडून संस्थानांतील कारभाराच्या एकत्रीकरणाबाबत संस्थानांचे रेसिडेंट व पोलिटिकल एजंटस् यांना

चित्रांक १५



हर हायनेस श्री. सौ. जिजीसाहेब मराठी शाळा.

[सं. पा. १०५

निरनिराळ्या सूचना आल्या. त्यांत पोलीस खातें व न्यायखातें ही संस्थानांच्या समूहाकरितां एकत्रित करण्याबाबत सूचना होती. पोलीसखातें एकत्र करण्याबाबत बरीच वाटाघाट दक्षिणेंतील संस्थानिक व कोल्हापूरचे रेसिडेंट यांच्या दरम्यान झाली. परंतु, ती योजना व्यवहार्य न झाल्यामुळें, प्रत्येक संस्थाननें आपलें पोलीसखातें कार्यक्षम ठेवावें, असें ठरविण्यांत आलें. पोलीसच्या शिक्षणाची सोय झाली व त्यांना पगाराचें टाइमस्केल लागू करून, त्यास स्थैर्य आणलें गेलें. पुढें न्यायखातें एकत्र करण्याच्या विषयास चालना मिळाली. त्यांत दक्षिणेंतील संस्थानांत दोन गट पडले, व दोन गटांचीं दोन हायकोर्टें स्थापन करावीं असें ठरलें. एकंदर सतरा संस्थानांपैकीं कोल्हापूर गटांत नऊ संस्थानें सामिल झालीं; व सांगली गटांत बाकीचीं ८ संस्थानें होतीं. हिंदुस्थान सरकारच्या राजकीय खात्याच्या मतें सर्व सतरा संस्थानांचें मिळून एकच हायकोर्ट व्हावें असें असल्यामुळें, सांगली गटानेंही कोल्हापूर गटांत सामिल व्हावें असे प्रयत्न चालू होते. परंतु, त्या गटांतील संस्थानिकांचा एक कोर्ट होण्यास विरोध असल्यामुळें, तो प्रश्न तसाच अनिर्णित राहिला. इ. स. १९४५-४६ सालभर या वाटाघाटी चालू होत्या. रेसिडेंट व संस्थानिक यांच्या दरम्यान अनेक बैठका होऊन अखेर कोल्हापूर गटांत सामिल होण्यास मान्यता देणाऱ्या ९ संस्थानांपुरतें—कोल्हापूर, जत, मुधोळ, सावंतवाडी, औंध, मिरज, फलटण, भोर, कुरुंदवाड ( ज्यु. )—एक समाईक हायकोर्ट कोल्हापूर येथें स्थापन करण्यांत आलें व त्याचें कामकाज ता. १ मार्च १९४६ पासून सुरू झालें. कोल्हापूर गटांत सामिल होण्यास आपली मान्यता असल्याचें श्रीमंत राजेसाहेब यांनीं ता. २४-११-४५ रोजीं कोल्हापूरचे रेसिडेंट ले. क. सी. डब्ल्यू. एल्. हार्वे (C. W. L. Harvey) यांना पत्रानें कळविलें. त्या पत्राचें उत्तर ता. २८ नोव्हेंबर १९४५ रोजीं रेसिडेंट हार्वे यांनीं श्रीमंतांना धाडलें. त्यांत त्यांनीं म्हटलें आहे कीं,

"Thank you very much for your letter of 24th Nov. 1945 telling me that you have decided to join the Deccan States Joint High Court.

"I appreciate the reasons which influenced you in your decision, and, if I may say so, I am sure that, the decision was a very wise one."

भोर येथील कोर्टांचे निकालावरील अपीलें या समाईक हायकोर्टाकडे निकालाकरितां पाठविण्यांत येऊं लागलीं. संस्थानच्या प्रजाजनांस निःपक्षपाती न्याय मिळावा, या हेतूनें श्रीमंत राजेसाहेब यांनीं संस्थानांतील कायदेमंडळाच्या निवडणुकीसंबंधीं तक्रार-अर्जही, कोल्हापूरच्या हायकोर्टाच्या जज्जांना ' कमिशनर ' म्हणून नेमून, त्यांच्याकडे निर्णयाकरितां सोंपविले.

भोर संस्थान समाईक हायकोर्टांत सामिल झाल्यामुळें, त्यासंबंधींचा एक कायदा जाहीर करणें आवश्यक झालें. सबब, भोर स्टेट हायकोर्ट ॲक्ट या नांवाचा कायदा करून तो भोर संस्थानच्या गॅझेटमध्यें, ता. १४-२-४६ चें जादा गॅझेट काढून, प्रसिद्ध करण्यांत आला. या योजनेमुळें संस्थानच्या प्रजेस निःपक्षपाती न्याय मिळण्याची चांगली सोय झाली.

कोल्हापूर येथील या समाईक हायकोर्टाचा खर्च, ज्या ११ संस्थानांकरितां हें कोर्ट स्थापन करण्यांत आलें, त्या सर्व संस्थानांकडून वर्गणी घेऊन करण्यांत येई. मार्च १९४६ पासून कोर्ट सुरू झालें, तेव्हांपासून एक वर्षाची वर्गणी भोर संस्थानला सुमारें ९००० नऊ हजार रुपये द्यावी लागली. खर्चाच्या दृष्टीनें विचार करतां, हें समाईक हायकोर्ट भोर संस्थानला बरेंच जडीप झालें. तरी पण, सांगली गटाच्या हायकोर्टयोजनेस ह्याही पेक्षां जास्त खर्च येणार होता. शिवाय, सांगली गटाचें हायकोर्ट अस्तित्वांत येईल अगर कसें, ह्याबद्दल बरीच शंका असल्यानें, व कोल्हापूर येथील समाईक हायकोर्ट मात्र सत्वर चालू होणार असल्यानें, भोर दरबारनें वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें कोल्हापूर गटांत सामिल होण्याचा महत्त्वपूर्ण निर्णय प्रजाहिताच्या दृष्टीनें घेतला. भोर येथें हायकोर्टाकडील कामाकरितां एका स्पेशल हायकोर्ट जज्जाची नेमणूक एक महिना अगर दोन महिने, कामाच्या मानानें, करण्याची तोंपर्यंतची प्रथा होती; व सर्व काम तेवढ्या मुदतींत पुरेंही होत असे; आणि खर्चाचा हिशेब लक्षांत घेतला, तर हें काम अवघ्या ५०० पासून १००० पाचशें ते एक हजार रुपयांपर्यंत होई. सर्व संस्थानांकरितां एक हायकोर्ट असावें ही हिंदुस्थान सरकारची योजना मान्य करावी लागल्यामुळें, खर्चाचा विचार करतां येणें शक्य नव्हतें. संस्थानमधील पूर्वीच्या हंगामी हायकोर्टाकडून योग्य न्याय मिळत नव्हता,

चित्रांक १६



भोर वस्तु-संग्रहालय ( शेपर्ड म्युझिअम ), एक भाग ( चरित्र खंड २, पान ५६६ ).

असाही बिलकूल प्रवाद नव्हता. आजपर्यंत झालेले हायकोर्टाचे निवाडे नि:पक्षपातीपणाचे होते, असेंच सर्वत्र लोकमत होतें व अजूनही आहे.

ता. १ मार्च १९४६ पासून कोल्हापूर येथें समाईक हायकोर्टाचें काम चालू झालें. हायकोर्टाच्या ॲक्टप्रमाणें सामिल संस्थानाधिपतींच्या बोर्डाच्या पहिल्या वर्षाचे चेअरमन म्हणून श्री. भवानराव श्रीनिवासराव पंतप्रतिनिधि, राजेसाहेब, सं. औंध, यांनीं काम केलें. फेब्रुवारी १९४७ अखेर त्यांची मुदत संपली; व ता. १ मार्चपासून हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, सं. भोर, हे हायकोर्ट-बोर्डाचे चेअरमन झाले. या हायकोर्ट-बोर्डाची ता. २४-४-४७ रोजीं पुणें येथें एक बैठक झाली. यानंतर लौकरच देवास संस्थानचे अधिपति यांना कोल्हापूरच्या महाराणीसाहेब यांनीं दत्तक घेतलें व ते हि. हा. श्री. छत्रपति शहाजीराजे या नांवानें कोल्हापूरच्या गादीवर बसले. त्यांना कोल्हापूरसुद्धां दक्षिणेंतील संस्थानांचें एक हायकोर्ट असणें मान्य नव्हतें. त्यामुळें, त्यांनीं आपलें अंग समाईक हायकोर्टामधून काढून घेऊन, स्वतंत्र हायकोर्ट कोल्हापूर संस्थानकरतां बनविलें. कोल्हापूर फुटून निघाल्यामुळें बाकीच्या संस्थानांना आपल्यापुरतें संयुक्त हायकोर्ट आर्थिकदृष्ट्या कोल्हापूर येथें चालू ठेवणें अशक्य असल्याचें दिसून आल्यामुळें, बोर्डाची मीटिंग पुणें येथें श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं ता. १९-६-४७ रोजीं होऊन, ता. १ ऑगस्ट १९४७ पासून कोल्हापूर येथील हायकोर्ट रद्द करण्यांत आलें. संयुक्त हायकोर्टाच्या योजनेंत सामिल झालेल्या संस्थानांनीं आपआपल्या संस्थानांत पूर्वीप्रमाणें हायकोर्ट सुरू केलें.

## प्रकरण ७ वें

# लोकोपयोगी कार्य

### हिज हायनेस शंकरराव मॅन्शन्स

भोर गांवच्या बाहेर राहावयाचें म्हटल्यास, तसें आधुनिक दृष्ट्या सोयीस्कर असें ठिकाण नव्हतें. रामबागेंतील बंगला हें एकच काय तें ठिकाण असे; व श्रीमंत राजेसाहेब, युवराज असतांना, त्या ठिकाणीं मधून मधून राहतही असत. पण, तो बंगला जुन्या पद्धतीचा व एकमजली बांधलेला व अपुरा असून, विशेषत: हवा व उजेड यांच्या कमतरतेमुळें आरोग्यदृष्ट्या योग्य नसल्यानें, आपणास गांवाबाहेर राहावेंसें वाटल्यास अद्ययावत् स्वरूपाचा बंगला बांधलेला असावा असें फार दिवस श्रीमंतांच्या मनांत होतें. स्वत:स राहतां यावें ही जशी मुख्य दृष्टि यांत होती, तशीच बडे पाहुणे आल्यास त्यांच्या राहण्याची अथवा मोठ्या प्रमाणावर एकादा समारंभ करावयाचें म्हटल्यास, त्याचीही सोय करतां यावी, हाही हेतू त्यांत होता. पण, राज्यकारभारांतील इतर आवश्यक व निकडीच्या बाबी अगोदर हातीं घेणें इष्ट असल्यानें, ही योजना स. १९४० इ. पावेतों मागें टाकावी लागली. नंतर, सवड मिळाल्यावर, श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपली योजना, जुन्या बंगल्याशेजारींच, पण मोकळ्या जागेंत, भरपूर हवा व उजेड असलेला असा, दुमजली बंगला बांधून अंमलांत आणली. या बंगल्यांत चार बेडरूम्स व चार ऑफिस रूम्स, असून एक रिसेप्शन हॉल व एक प्रशस्त डिनरहॉल आहे. सर्व खोल्यांत इलेक्ट्रिक लाइट असून आधुनिक पद्धतीच्या फर्निचरनें त्या सुसज्ज आहेत. बंगल्याच्या पुढें नवीन धर्तीची बागहि तयार केली आहे. या सर्वांप्रीत्यर्थ खर्च रु. ७०२७५ झाला आहे. बंगला बांधून झाल्यावर त्यास 'हिज हायनेस शंकरराव मॅन्शन्स' असें नांव देऊन आपल्या परमपूज्य पित्याचें तें कायमचें स्मारक करावें, असा अगदीं उचित असाच विचार श्रीमंतांनीं कायम केला.

चित्रांक १७




भोर पॅलेस लायब्ररी ( स्विफ्ट लायब्ररी ) एका भागाचें छायाचित्र ( चरित्र खंड २, पान ५६१ ).

[ सं. पा. १०५

## ले. क. पी. गेसफोर्ड यांच्या हस्तें हिज हायनेस शंकरराव मॅन्शन्स याचें उद्‌घाटन

दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेंट ले. क. पी. गेसफोर्ड यांच्या हस्तें रामबागेंत नवीन बांधलेल्या बंगल्याचें उद्‌घाटन ता. २६ फेब्रुवारी १९४१ रोजीं, वार्षिक भेटीकरितां दुपारीं ४ वाजतां ते भोरास आल्याबरोबर, झालें. समारंभाच्या सुरुवातीस श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वागतपर भाषण करून बंगल्याचें उद्‌घाटन करून त्यास हि. हा. शंकरराव मॅन्शन्स असें आपल्या परमपूज्य पित्याचे स्मरणार्थ नांव देण्याची क. गेसफोर्ड यांस विनंति केली.

या विनंतीस मान देऊन क. गेसफोर्ड यांनीं बंगल्यास लाविलेलें चांदीचें कुलूप काढून इमारत उघडल्याचें आणि तिचें नांव 'हिज हायनेस शंकरराव मन्शन्स' असें ठेवल्याचें जाहीर केलें.

इमारतींत हिंडून सर्व इमारत पाहून परत आल्यावर, मे. रेसिडेंटसाहेब यांनीं भाषण केलें. त्यांच्या भाषणांतील महत्त्वाचा भाग पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

"The guest-house, as seen by us just now, is indeed a fine construction. It is beautiful in design and artistic in workmanship, as to leave very little to be desired.

The Rajasaheb's desire to name it after his father as "His Highness Shankarrao Mansions" is verily proper. The name is appropriate, as it will remind all to come of the Rajasaheb's solicitude for the comforts and convenience, not only of his subjects, but also of the guests that will have occasion to come here to see him or visit this place. All those coming hereafter to reside in this place will, I am sure, feel real pleasure and be grateful to the Rajasaheb for the construction of this very comfortable building, and I express my gratefulness for them also on this very occasion. The Rajasaheb's desire to name it as "His Highness Shankarrao Mansions" bespeaks much, both of his regard and reverence for his father and also his concern for the comfort of his guests. Nothing can be more fitting memorial than that."

याप्रमाणें भाषण झाल्यावर, पानसुपारी होऊन, हा समारंभ समाप्त झाला. रात्रीं मे. रेसिडेंटसाहेब व त्यांच्याबरोबरचे पाहुणे यांना मेजवानी देण्यांत आली.

## ले. क. पी. गेसफोर्ड यांच्या हस्तें हर हायनेस जिजीसाहेब मराठी शाळेचें उद्घाटन

### मराठी प्राथमिक शाळा

भोर येथील प्राथमिक मराठी शाळेंतील मुलांची संख्या फार झपाट्यानें वाढूं लागल्यामुळें, शाळेची इमारत फारच अपुरी पडूं लागली. तेव्हां, राजा रघुनाथराव हायस्कूलच्या इमारतीशेजारींच दोन मजली एक नवीन इमारत मराठी शाळेकरितां बांधण्यांत आली. या इमारतींत आठ वर्गांची सोय करण्यांत आली असून, शिवाय चार खोल्या शिक्षक, लायब्ररी वगैरेंकरितां बांधण्यांत आल्या आहेत. ही इमारत बांधण्याच्या कामीं रु. २१,३८९ खर्च लागला असून मुलांना बसण्याकरितां बाकें, टेबलें, खुर्च्या, वगैरे फर्निचर रु. ५००० चें खरेदी केलें आहे. श्रीमंत राजेसाहेबांच्या मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांच्या स्मरणार्थ या शाळेचें नांव हर हायनेस जिजीसाहेब प्रायमरी स्कूल असें ठेवलें आहे. या शाळेचें उद्घाटन मे. गेसफोर्ड, रेसिडेंटसाहेब, यांच्या हस्तें झालें. ता. २७ फेब्रुवारी १९४१ रोजीं सकाळीं १० वाजतां शाळेच्या इमारतीनजीक मे. रेसिडेंटसाहेब यांचें श्रीमंत राजेसाहेब, कौन्सिलर्स व शाळाधिकारी यांनीं स्वागत केलें.

श्रीमंत राजेसाहेबांनीं प्रास्तविक भाषण करून साहेबबहादुरांना इमारत खुली करून तिचें नामकरण करण्याची विनंति केली.

श्रीमंतांच्या भाषणानंतर साहेबबहाद्दूर इमारतीच्या दरवाज्यापाशीं गेले व त्यास असलेलें कुलूप उघडून इमारत खुली केल्याचें व "हर हायनेस जिजीसाहेब मराठी शाळा" असें तिचें नांव ठेवल्याचें त्यांनीं जाहीर केलें. शाळेचे दरवाज्याजवळ फोटो घेतल्यावर, साहेबबहाद्दूर स्वस्थानीं परत आले व त्यांनीं आपलें उद्घाटनाचें भाषण वाचून दाखविलें. भाषण संपल्यावर पानसुपारी होऊन समारंभ संपला.

### भोर वस्तुसंग्रहालय ( म्युझियम )

याची हकीगत श्रीमंतांच्या इतिहासाच्या द्वितीय खंडामध्यें पान ५६६ वर दिली आहे. Sir William Sheppard, K.C.I.E. हे पुण्याचे कलेक्टर व पोलिटिकल एजंट १८९९ तें १९०४ पर्यंत असतांना व श्रीमंत हे युवराज

असतांना त्यांना फार उपयोगीं पडले; म्हणून, श्रीमंतांनीं त्यांच्या अमोलिक मदतीबद्दल उतराई होण्याच्या दृष्टीनें, ह्या वस्तुसंग्रहालयास Sir William Sheppard Museum असें नांव १८ ऑगस्ट १९४१ सालीं दिलें.

## पॅलेस लायब्ररी

याची हकीगत श्रीमंतांच्या इतिहासाच्या द्वितीय खंडामध्यें पान ५६९ वर दिली आहे. Mr. L. C. Swift, I.C.S, हे पुण्याचे कलेक्टर व पोलिटिकल एजंट १९०३ तें १९०५ व १९१० तें १९१२ पर्यंत असतांना व श्रीमंत हे युवराज असतांना त्यांना फार उपयोगीं पडलें; म्हणून, श्रीमंतांनीं त्यांच्या बहुमूल्य मदतीचें स्मारक करण्याच्या दृष्टीनें, ह्या लायब्ररीचें L. C. Swift Library असें नामाभिधान १८ ऑगस्ट १९४१ सालीं केलें.

## श्रीमंत राजेसाहेब यांनीं पालीस भेट दिली.

श्रीमंतांची स्वारी ता. ९ डिसेंबर १९४१ रोजीं पालीस गेली. ता. १० रोजीं पाली येथील रा. गणेश भास्कर ऊर्फ दादासाहेब साने यांनीं चालविलेल्या शाळेस, त्यांच्या विनंतीवरून, सकाळीं १०-३० वाजतां भेट दिली. श्री. साने यांनीं शाळा स्थापन करण्याच्या सुरुवातीपासून एकंदर प्रगतीची सविस्तर हकीकत निवेदन केली. या संस्थेस कोणीं कोणीं काय काय देणगी दिली, तें त्यांनीं सांगितलें. नंतर पुणें येथील महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे सुपरिंटेंडंट आणि सुधागड एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष श्री. लक्ष्मण रामचंद्र मोडक, M. A. यांनीं भाषण करून शाळा स्थापन करण्याच्या कामीं काय काय अनुभव येतात, त्याचें वर्णन केलें. नंतर, राजेसाहेबांनीं भाषण करून, श्री. साने यांनीं केलेल्या परिश्रमाबद्दल त्यांचें अभिनंदन केलें व संस्थेस रु. १००० देणगी दिली.

## शिवगंगा नदीवरील पुलाचा नामकरण-समारंभ व मांगिरा ओढ्यावरील पुलाचें उद्‌घाटन व नामकरण

राजगड तालुक्यांत वेलें-नसरापूर रस्त्यावर नसरापूरनजीक मैल १ व २ यांच्या दरम्यान शिवगंगा नदीवर नवीन पूल बांधण्यांत आला. या पुलाच्या उद्‌घाटन-समारंभाची हकीकत के. सी. आय. इ. पदवी प्राप्तीनंतरच्या श्रीमंतांच्या संस्थानमधील दौऱ्याच्या वर्णनांत पुढें दिलेली आहे.

या पुलाचा नामकरण-समारंभ ले. क. पी. गेसफोर्ड, रेसिडेंटसाहेब, कोल्हापूर, यांच्या हस्तें ता. १० फेब्रुवारी सन १९४२ रोजीं करण्यांत आला. सर्व मंडळी आसनस्थ झाल्यावर, श्रीमंत राजेसाहेब यांनीं भाषण केलें. त्यानंतर मे. म. हे. देव, एम्.ए., भोर कायदेमंडळाचे उपाध्यक्ष, यांनीं भाषण करून मे. रेसिडेंटसाहेब यांना पुलाचा नामकरण-विधि करण्याची विनंति केली. या विनंतीस अनुसरून ले. क. गेसफोर्ड हे पुलापाशीं गेले व त्यावर बसविलेल्या नामफलकावरील आवरण बाजूला करून पुलास श्री. राजेसाहेब यांच्या इच्छेप्रमाणें Evans-Gordon Bridge असें नांव दिल्याचें त्यांनीं जाहीर केलें. येथें त्यांचा फोटो घेण्यांत आला. नंतर, आपल्या जागेवर परत येऊन बसल्यावर, त्यांनीं भाषण केलें. त्यांतील उतारा खालीं दिला आहे:—

" At the outset, I must thank Shrimant Raja Saheb for inviting me to unveil the tablet to name the bridge after my predecessor Lt. Col. K. A. G. Evans-Gordon. This very fact reveals the regard of the Rajasaheb for the Political officers, connected with the State. I note with great satisfaction the benevolent attempts so far made by the Rajasaheb by spending large amounts for the improvements of the road-communications in the State. They serve to bring happiness and prosperity to the people. A bridge connects two banks of the river or a big stream and brings people on either side in closer contact. A bridge is a boon to the people."

शिवगंगा पुलाच्या उद्‍घाटनाचा फोटो, ले. क. इव्हान्स गॉर्डन यांचें नांव पुलास दिलें असल्यामुळें, श्रीमंत राजेसाहेब यांनीं त्यांजकडें पाठविला. त्याबद्दल आभाराचें ता. २३-२-४२ चें पत्र दिल्लीहून क. इव्हान्स गार्डन यांनीं पाठविलें. त्या पत्रांत त्यांनीं लिहिलें होतें कीं,

" It is very kind of you to think of sending me this memento of a very important event in State history and one in which you have been kind enough to couple my name."

हा समारंभ संपल्यावर मे. रेसिडेंटसाहेब श्रीमंत राजेसाहेब यांच्यासह भोरास आले. वाटेंत भाटघर येथें मेमोरियल बिल्डिंगमध्यें चहा घेतला. भोर येथें रामबागेंतील शंकरराव मॅन्शन्समध्यें मे. रेसिडेंट व त्यांच्या पत्नी यांनीं मुक्काम केला.

चित्रांक १८



श्रीयुत दादासाहेब साने यांनीं पाली येथें चालविलेल्या इंग्रजी शाळेस श्रीमंतांची भेट. डावीकडून उजवीकडे—श्रीयुत केशवराव लिमये, श्री. दादासाहेब साने व श्रीमंत राजेसाहेब.

[ सं. पा. १०५

ता. ११ फेब्रुवारी १९४२ रोजीं सकाळीं ८ वाजतां मे. रेसिडेंटसाहेब यांच्या हस्तें भोरपासून सुमारें १ मैलावर असलेल्या, महाड-पंढरपूर सडकेवरील, मांगिरा ओढ्यावर रु. १०,१६३ खर्च करून बांधलेल्या पुलाचें उद्घाटन व नामकरण झालें. त्याकरितां रामबागेंतून मे. रेसिडेंटसाहेब ८ वाजतां मांगिरा ओढ्यानजीकचे मंडपांत आले. श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून त्या पुलाचें महत्त्व थोडक्यांत सर्वांस निवेदन केलें व 'गेसफर्ड ब्रिज' हें नामाभिधान द्यावें, अशी इच्छा प्रदर्शित केली. नंतर, मे. रेसिडेंटसाहेब यांनीं पुलापाशीं जाऊन त्याचे दोन्ही बाजूंस बांधलेली रेशमी फीत कापून वाहतुकीसाठीं पूल खुला केल्याचें व 'गेसफोर्ड ब्रिज' असें त्याचें नांव ठेवल्याचें जाहीर केलें. तेथून परत येऊन. त्यांनीं भाषण केलें. त्यांतील उतारा खालीं दिल्याप्रमाणें आहे :—

"I feel greatly honoured by the kind invitation of Shrimant Raja Saheb to open this bridge which is to be named after me. I listened with great interest and pleasure to the history of this bridge and also that of the Mahad-Pandharpur road, which links Konkan and the Deccan. It is an important artery for pilgrims and for goods also. As an important artery, it carries a volume of traffice of goods. Great difficulties are experienced, especially in the rainy season, as the road is crossed by several Nalas and the Nira river. By constructing this bridge, the Raja Saheb has removed one obstacle on the way and he is going to remove the remaining obstacles as funds would permit in future. When that programme is carried out, this important road would be an all-weather road. You, his subjects, have reason to be grateful to your Raja Saheb, for his care and consideration of his subjects. In modern times roads are life-blood in communications. Bridges and roads are the essentials of a well-run State. Without them people cannot communicate. Now, I take this opportunity to again congratulate the Raja Saheb."

## पडघवली येथील शाळेचा उद्घाटन-समारंभ

सुधागड तालुक्यांतील पडघवली या गांवीं स्थानिक लोकांच्या सहकार्यानें सुरू करण्यांत आलेल्या शाळेचा उद्घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांनीं

ता. ३०-१-१९४४ रोजीं पडघवली येथें जाऊन केला. पडघवलीचे रहिवाशी व भोर कायदेमंडळाचे सदस्य श्री. लक्ष्मण रामचंद्र मोडक, एम.ए.,एस्.टी.सी. यांनीं श्री. राजेसाहेबांचें स्वागत केलें. श्री. आबासाहेब आठवले यांनीं शाळेचा पूर्वेतिहास निवेदन केला. शाळागृहाची हकीकत श्री. फाटक यांनीं सांगितली.

पडघवली येथील 'मित्रसमाज' या संस्थेनें श्रीमंत राजेसाहेबांना मानपत्र दिलें; आणि त्या वेळीं श्री. गडकरी यांनीं केलेल्या 'प्रेमसंन्यास' या नाट्यकृतीची प्रत श्रीमंतांना अर्पण केली. श्रीमंत राजेसाहेब यांनीं समयोचित भाषण करून शाळा उघडल्याचें जाहीर केलें व "कै. केशव रामचंद्र दिवेकर शाळा" असें तिचें नामकरण केलें. सदर कार्यास उत्तेजन म्हणून श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. ३०० तीनशेंची देणगी दिली.

## पाली हायस्कूलास भेट

श्रीमंत राजेसाहेब ता. १५ मार्च १९४५ रोजीं पाली येथें गेले असतां, पाली येथें तत्पूर्वी थोड्याच दिवसांत स्थापन झालेल्या हायस्कूलला, चालकांच्या विनंतीवरून, श्रीमंत राजेसाहेब यांनीं भेट दिली. सदर हायस्कूल श्रीयुत गणेश भास्कर ऊर्फ दादासाहेब साने, श्री. गो. रा. लिमये, प्रभृति मंडळींच्या परिश्रमानें सुरू झालेलें आहे. स्वागत, शाळेच्या स्थापनेच्या इतिहासाचें निवेदन, मुलांचे खेळ, वार्षिक सामन्यांचें वृत्त-कथन, इत्यादि कार्यक्रमानंतर श्री. राजेसाहेब यांनीं विद्यार्थ्यांना बक्षिसें दिलीं; आणि, ज्या ज्या सद्गृहस्थांनीं या हायस्कूलच्या स्थापनेस आर्थिक साहाय्य केलें, अशांना श्रीमंतांच्या हस्तें विडा व नारळ देण्यांत आला. श्रीमंत राजेसाहेब यांनीं समयोचित भाषण करून संस्था स्थापन करण्याच्या कामीं कार्यकर्त्यांनीं घेतलेल्या परिश्रमाचा गौरव करून, शाळेस दरसाल रु.१००० एक हजार ग्रॅन्ट देण्याचें जाहीर केलें; आणि श्री. दादासाहेब साने यांच्या तोंपर्यंतच्या सार्वजनिक कार्याबद्दल त्यांना रु. १००० एक हजार रुपये देणगी देऊन श्री. राजेसाहेबांनीं आपली गुणग्राहकता व्यक्त केली. याशिवाय, मुलांना खाऊसाठीं रु. १०० देणगी म्हणून श्रीमंतांनीं दिले.

या समारंभाच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं दिलेल्या देणगीबद्दल श्री. दादासाहेब साने यांनीं श्रीमंतांस पत्र पाठवून आभार मानले. त्या पत्रांत ते म्हणतात:—

चित्रांक १९



ले. क. गेसफर्ड, रेसिडेंट, यांनीं शिवगंगा नदीवरील पुलाचें ता. १०।२।१९४२ रोजीं
'ईव्हन्स गॉर्डन ब्रिज्' असें नामाभिदान केलें.

[ सं. पा. १०६

पाली, ता. १६-३-४५

श्रीमंत राजेसाहेब पंतसचिव, स्वामींचे सेवेसी

अनंत प्रणामपूर्वक विज्ञापना ऐसीजे. आपण मला आजपर्यंत पुत्राप्रमाणें, बंधूप्रमाणें वागविलें. त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें.

काल आपण माझ्या गुणगौरवपर भाषण करून, मला व्यक्तिशः १००० रुपयांची देणगी दिली. त्या वेळीं माझें अंतःकरण इतकें भरून आलें व मला इतका गहिवर आला कीं, माझ्याच्यानें पुढें बोलवेना. आपण राजे, मी यःकश्चित् मनुष्य. आपल्या मुखानें माझा गुणगौरव झाला, याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. त्यामुळें माझी किंमत लोकदृष्ट्या शंभरपट वाढली. सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना.

श्रीमंतांचा नम्र सेवक,

**गणेश भास्कर साने**

## तांबट ओढ्यावरील पूल
## व
## पाली-सिद्धेश्वर रस्ता

सुधागड तालुक्यांत पाली-नाणोसें रस्त्यावर जांभुळपाड्यानजीक तांबट ओढा आहे. यावर पूल नसल्यामुळें पावसाळाच्या दिवसांत पुणें-पाली रस्ता कित्येक वेळां बंद पडतो. या ओढयावर पूल बांधण्याबद्दल सुधागड तालुक्यांतील प्रजेची फार दिवसांची मागणी होती. पण, हें काम बऱ्याच खर्चाचें असल्यामुळें, त्या वेळपावेतों पूल बांधणें शक्य झालें नव्हतें. इ. स. १९४६-४७ सालच्या बजेट-मध्यें या कामाकरितां रक्कम मंजूर करून या कामास सुरुवात झाली आहे. पूर्वीचें खर्चाचें इस्टमेट रु. ३५००० चें आहे. श्री. राजेसाहेब यांनीं ता. १८-११-४६ रोजीं पालीस भेट दिल्यावेळीं पुलाच्या पायाचा दगड बसविला असून हा पूल लवकरच तयार होऊन सुधागडमधील जनतेचे हाल थांबतील असा भरंवसा आहे.

सुधागड तालुक्यांत जसे ओढे व नाले बरेच आहेत, तसेंच, मुलूख डोंग-राळ असल्यामुळें, रस्तेही फार थोडे आहेत. त्यामुळें तेथील जंगल जरी पुष्कळ समृद्ध आहे व संस्थानला त्यापासून उत्पन्नही बरेंच येण्यासारखें आहे, तरी

वाहतुकीच्या साधनाच्या अभावीं उत्पन्न चांगलेंसें येत नव्हतें. वाहतुकीचीं साधनें वाढल्यास, उत्पन्नाच्या वाढीस चांगली मदत होणार होती. ही गोष्ट लक्षांत घेऊन, त्या तालुक्यांत नवीन रस्ते करण्याचें धोरण ठरविण्यांत आलें. त्यास अनुसरून पाली तें सिद्धेश्वर हा तीन मैलांचा रस्ता वरील सालीं बांधण्याचें काम सुरू केलें आहे. या रस्त्यास खर्च सुमारें रु. ३४००० होणार आहे.

पाली-सिद्धेश्वर रस्ता तयार करण्याचें काम सुरू करून देण्यासाठीं व तांबट-ओहोळावरील पुलाच्या पायाचा दगड बसविण्याकरितां श्रीमंत राजेसाहेब ता. १७ नोव्हेंबर १९४६ रोजीं पालीस गेले होते. हेतु शुद्ध व पवित्र असला, म्हणजे मनुष्य अनेक विरोधांना तोंड देऊन अखेर कसा यशस्वी होतो, याचा प्रत्यय या प्रवासांत भरपूर अनुभवास आला. या वेळीं निसर्गाचा प्रकोप होऊन श्री. राजेसाहेब वादळांत सांपडले होते. त्यांच्यासारखा धीराचा व कणखर वृत्तीचा मनुष्य नसता, तर तो सर्व कार्यक्रम रद्द करून परत फिरला असता. ता. १८ रोजीं हे कार्यक्रम ठेवले होते. सकाळपासूनच वादळी हवा सुरू झाली होती. तथापि, श्रीमंत राजेसाहेबांनीं चिकाटीनें पाली-सिद्धेश्वर रस्ता सुरू करण्याचा कार्यक्रम पार पाडला. सायंकाळीं तिवरें गांवानजीक पान-सुपारीचा स्वीकार करून, पुढें तांबट-ओहोळावरील पुलाच्या पायाचा दगड बसविण्याकरितां ते निघाले, तों पाऊस फार जोराचा सुरू झाला. तांबट-ओहोळास एकदम फार पाणी आलें. मोटार ओढ्याजवळ आली, तोंच एंजिनमध्यें पाणी शिरून, तें बंद पडलें व राजेसाहेबांना खालीं उतरून ओढ्यांतून पायीं पलीकडे जावें लागलें. पलीकडील तीरावर येऊन पायाचा दगड पावसांतच कसाबसा बसवून कार्यक्रम उरकला. हा कार्यक्रम झाल्यावर ते पुण्यास जाणार होते. परंतु, वादळ व पाऊस यांनीं फार रौद्र स्वरूप धारण केल्यामुळें पुण्यास जाण्याचा बेत रद्द करावा लागला. रात्रीं परत परळी येथें जाऊन मुक्काम करून ता. १९ रोजीं सकाळीं ते पुण्यास गेले.

---

चित्रांक २०



ओढ्यावरील पुलाचें Lt. Col. Gaisford यांनीं ता. ११।२।४२ रोजीं उद्घाटन केलें व त्याचें नांव 'Gaisford Bridge' असें ठेवण्यांत आलें.

[ सं. पा. १०७

## प्रकरण ८ वें

# भोर संस्थानांत व्यापारवृद्धि

भोर संस्थान इतर सर्व सुखसोयींच्या दृष्टीनें प्रगत आहे, असा त्याचा लौकिक दूरवर पसरलेला आहे. परंतु, व्यापार नसल्यामुळें, त्याची जितकी भरभराट व्हावयास पाहिजे, तितकी होऊं शकत नाहीं. या बाबतींत तें मागासलेलं आहे, असें संस्थानाबाहेरील व संस्थानांतील जनतेचें मत झालेलें होतें. ही उणीव दूर होणें जरूर असल्याची जाणीव श्रीमंतांना फार पूर्वीपासून झालेली होती. ही गोष्ट वेळोवेळीं—उदाहरणार्थ, भोर येथील वीज-पुरवठा, शिरवळ येथील गिरणी, राजा रघुनाथराव मिल, वगैरेंचें उद्घाटन करितांना—त्यांनीं काढलेल्या उद्गारांवरून दिसून येते. भोर येथें वीज-पुरवठा कंत्राटदार यांजबरोबर करार करतांना, नवीन सुरू होणाऱ्या कारखान्यास सवलतीनें वीज पुरविली जावी, अशी तरतूद त्यांनीं करारांत केली होती; व राजा रघुनाथराव वीव्हिंग मिल्स हें त्याचेंच वास्तविक दृश्य फल होतें.

मुंबई येथील डेक्कन मर्चंटस् बँकेतर्फे श्रीमंत राजेसाहेब यांना ताजमहाल हॉटेलमध्यें ता. २५-९-४२ रोजीं लंच देण्यांत आला. ही व्यापारी लोकांची बँक असल्यामुळें, यांच्यापुढें आपलें मनोगत व्यक्त केल्यास, बराचसा उपयोग होईल अशी कल्पना येऊन, लंचच्या वेळीं केलेल्या टोस्टच्या भाषणांत त्यांनीं असें जाहीर केलें कीं, भोर संस्थानमध्यें कारखाने काढण्यासाठीं कोणी उद्युक्त झाल्यास, त्याला संस्थानकडून शक्य त्या (कन्सेशन्स) सवलती देण्यांत येतील. ह्या भाषणांतील उतारा खालीं दिला आहे.

"During some of the receptions arranged specially in my honour, I noticed that great emphasis was repeatedly laid on the establishment of industrial concerns in my State. Let me clear the position in this regard. From the very first days of my accession, I came to see that some features and natural aspects of the State territory are not conducive to the establishment of any major industry in it. Myself and

my Darbar are ever ready to extend any kind of reasonable and legitimate facility to those that would come and set up an industrial activity, which, I am sure, would thrive on account of cheap labour and abundant supply of Electric power. But, I very much regret to say that people come, make fishing enquiries and go away. So, despite our willingness to promote the healthy cause of industrial activity, no headway could so far be made in this direction. Here, let me once again reiterate, that myself and my Darbar would ever welcome and be ever ready to sympathetically consider any such proposal pertaining to industry. Looking to the resources of the State, financial assistance is bound to be limited. But, other facilities would be readily extended to the bonafide undertakings."

हें भाषण वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाल्यानंतर, कांहीं दिवसांनीं मुंबई येथील व्यापाऱ्यांनीं वरचेवर श्रीमंतांच्या भेटी घेऊन कारखाने काढण्यास परवानगी मागितली. त्यांच्या म्हणण्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करून, भरपूर व जरूर त्या सवलती देऊन, कारखाने उभारण्यास दरबारनें त्यांना परवानगी दिली. त्यास अनुसरून भोर येथें खालील कारखाने काढण्यांत आले आहेत :

(१) भोर ट्रेडिंग कंपनी लि., नांवचा ( तंबूचा ) कारखाना.

(२) दि भोर इंडस्ट्रीज लि., नांवचा कारखाना.

(३) श्री लक्ष्मी टेक्स्टाइल मिल्स, नांवची सुताची गिरणी.

(४) दी राजा रघुनाथराव मिल्स, नांवची कापडाची गिरणी.

(५) दि पेपर फॅक्टरी, कागद तयार करण्याचा कारखाना.

या सर्व कारखान्यांचे चालक फार उत्साही व चांगले भांडवलदार असल्या-मुळें, हे सर्व कारखाने लवकरच चांगल्या नांवारूपास येतील अशी आशा वाटत असून, श्रीमंतांचें फार दिवसांचें उद्दिष्ट साध्य होऊन, भोर प्रजाजनांसही त्याचा लाभ होईल अशीं चिन्हें दिसत आहेत. वर उल्लेख केलेल्या कारखान्यांची प्रगती किती वेगानें चालू आहे, हें खालील तपशिलावरून लक्षांत येईल.

चित्रांक २१



मुंबई ताजमहाल हॉटेलमध्यें डेक्कन मर्चंटस् को. बँकेच्यातर्फे श्रीमंत राजेसाहेब यांना लंच देण्यांत आला. २५।९।४२ [ स. पा. १११

चित्रांक २२



भोर ट्रेडिंग कंपनी, रंगशाळा

## १ भोर ट्रेडिंग कंपनी लि.

भोर ट्रेडिंग कंपनीनें ब्रि. सरकारच्या मिलिटरी खात्यास तंबूचा पुरवठा सुमारें १३,००,००० रुपये किंमतीचा केला; आणि या तंबूच्या कामांत कंपनीस सुमारें रु. ६४,००० आणि कापड, विजेचें सामान, वगैरे कामांत रु. २,३०,००० इतका नफा झाला आहे. या कारखान्यांत सुमारें २५० मजूर काम करीत असतात.

## २ भोर इंडस्ट्रीज लि.

भोर इंडस्ट्रीज लिमिटेड, या कारखान्यास सुरुवात झाल्यापासून ब्रिटिश सरकारास उपयोगी अशा मालाचा पुरवठा या कारखान्यानें १४,५०००० रु. चौदा लक्ष पन्नास हजार किंमतीचा केला, त्यापासून कंपनीस सुमारें ५०,००० रुपये नफा झाला. या कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांची संख्या सुमारें १०० वर असून, ते सर्व भोर येथील आहेत. या कंपनीचा कापड रंगविण्याचा विभाग उघडला असून स्प्रे पेंटिंगचें कापड तयार होऊं लागलें आहे. या भागाकडे सुमारें १०० मजूर गुंतले आहेत. ट्विन-टेक्सकापडाचा विभाग उघडण्याचा समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें १४ एप्रिल १९४६ इ. रोजीं झाला.

## ३ श्री लक्ष्मी टेक्स्टाइल मिल्स लि.

या कारखान्यास भोर दरबारची परवानगी मिळाल्यानंतर कारखान्याची इमारत तयार होऊन मशिनरी आणून प्रत्यक्ष काम सुरू होण्याच्या कामीं बऱ्याचशा अडचणी आल्या. कंपनीनें अहमदाबाद येथील मशिनरी खरेदी केली व ती आणण्याचें काम चालू असतां सरकारच्या परवानगीवांचून मशिनरी उलगडून पॅक करणें व दुसरीकडे हालविणें यांस बंदी करणारा हुकूम हिंदुस्थान सरकारनें जारी केला. त्या हुकुमाप्रमाणें कंपनीनें परवानगी आणविल्यावर मशिनरी उलगडून पॅक करून भोर येथें आणविण्यांत आली. यांत बरेच दिवस गेले. या दरम्यानच्या कालांत कारखान्याकरितां जरूर असणारी इमारत भोरशेजारीं येवलीचे हद्दींत भाडघरनजीक सोयीस्कर ठिकाणीं बांधण्यांत आली. ता. २ एप्रिल १९४४ इ. रोजीं कामास प्रथम सुरुवात झाली. ता. १६ एप्रिल

१९४४ रोजीं या मिलचा उद्घाटनसमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झाला. या दिवसापासून कारखाना नियमितपणें सुरू झाला असून, उत्तम प्रतीचें सूत यांत तयार होऊं लागलें आहे; आणि हल्लींच्या परिस्थितींत जास्तींत जास्त सूत तयार करण्याचा प्रयत्न कंपनी करीत आहे. या समारंभाच्या वेळीं श्री. एम्. जी. देसाई यांचें स्वागतपर भाषण झालें. त्यांतील उतारा खालीं दिला आहे :

" I have great pleasure in welcoming you all here this evening on the occasion of the opening ceremony of Shri Laxmi Textile Mills.

" I am sure, I am voicing the feelings of every one of you present here, when I say, that the Company has been exceptionally fortunate in obtaining the co-operation and goodwill of His Highness Shrimant Raja Saheb of Bhor, whose presence here today I particularly welcome. Shrimant Rajasaheb's unceasing interest in the industrial advancement of the State are well known. It is hardly necessary for me to say on this occasion what great advantages would result to the State and His Highness's subjects by the establishment of a Textile Mill in his capital.

" Besides enabling the local population to obtain supplies of yarn, without the addition of the costs of transport and overhead charges that supplies from outside would entail, the working of the Mill within the State would mean employment to a considerable number of workers, occupation to many of the local tradesmen and distributors, both wholesale and retail and the circulation of the money turned over within the State. I am sure Shrimant Rjasaheb had these valuable considerations in mind, when he kindly and generously conceded the various concessions that the Shri Laxmi Textile Mills Ltd. are privileged to enjoy. I hope Shrimant Rajasaheb would continue to bestow the same generous co-operation and concessions for many and varied other industries to be established within the State to its lasting benefit and that of his people."

चित्रांक २३



भार ट्रेडिंग कंपनींत श्रीमंत राजेसाहेबांना पार्टी दिली. [ सं. पा. ११३

## ४ राजा रघुनाथराव मिल्स

राजा रघुनाथराव मिल्स या कारखान्यांत स्थानिक गरजेस लागणारें कापड तयार होतें. याही कारखान्यांत काम करणारे मजूर सर्व भोर येथीलच आहेत. त्यांची संख्या ७० तें ८० च्या दरम्यान असते. यांत तयार होणारें कापड साधारण करड्या रंगाचें, मांजरपाठ आणि निरनिराळ्या रंगांचें व नमुन्यांचें कोटाचें कापड असतें. याशिवाय, धोतरजोड्या, साड्या वगैरेही तयार होतात. सर्व मालास मागणी चांगली आहे. या मिलमध्यें सूत काढण्याच्या विभागाकरितां इमारतीचें बांधकाम चालू असून, सूतकताईस लवकरच सुरुवात होईल.

## ५ दि पेपर फॅक्टरी

दि पेपर फॅक्टरी (कागद तयार करण्याचा कारखाना) : पेपर कारखान्याच्या इमारतीस लागणारें सामान युद्धपरिस्थितीमुळें पुरेसें मिळत नसल्यामुळें, त्याच्या उभारणीस थोडा दिनावधि लागला.

वरील कारखाने भोरास निघाल्यामुळें, भोर येथील व आसपासच्या खेड्यांतील पुष्कळ लोकांस कामें मिळून, भोर संस्थानलाही रॉयल्टीच्या रूपानें दरसाल जास्त जास्त रक्कम मिळण्याची व्यवस्था झाली आहे.

इ. स. १९४६-४७ वर्षीं जवळ जवळ ४५००० रुपये संस्थानला मिळाले आहेत व १९४७-४८ वर्षीं ७५००० पासून एक लाखापर्यंत उत्पन्न मिळण्याचा संभव आहे.

## भोर स्टेट बँक

भोर संस्थानमध्यें बँक नसल्यामुळें व्यापारवृद्धीस अडथळा होत असल्याचें श्रीमंत राजेसाहेबांच्या नजरेस आलें, व त्यांनीं भोरास एक बँक स्थापन करण्याचें योजिलें. बँक स्थापन करण्याबद्दल प्रजाजनांकडूनही बऱ्याच वेळां मागणी आली होती. कायदेमंडळांत ठराव पास होऊन बँक स्थापन करावी अशी मागणी वरचेवर करण्यांत आली होती; परंतु, या ना त्या कारणामुळें बँक स्थापन करणें स. १९४४ इ. पावेतों शक्य झालें नव्हतें. भोर संस्थान चतुर्थ कायदेमंडळाच्या पहिल्या बैठकींत लोकनियुक्त सभासद कै. स. कृ. शिंदकर यांनीं भोर स्टेट बँकेची योजना तयार करण्याकरितां कमिटी नेमण्यांत यावी असा ठराव मांडला होता व तो

सर्वानुमतें पासही झाला. मुंबई येथें डेक्कन मर्चंट्स् बँकेच्या समारंभाच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं केलेल्या भाषणामुळें भोर येथें कारखाने काढण्यास उत्सुक असा व्यापारी वर्ग श्रीमंतांच्या भेटीस येण्यास नुकतीच सुरुवात झाली होती. कारखाने काढण्यास परवानगी देणें व्यापारवृद्धि होण्याच्या दृष्टीनें आवश्यक होतें; आणि कारखाने काढल्यास, बँकेची उणीव वेळोवेळीं भासणार, ही गोष्ट लक्षांत घेऊन स्वतःची इच्छा अंमलांत आणण्यास ही संधि योग्य आहे असें जाणून, सभासद शिंदकर यांच्या ठरावास मान्यता देऊन श्रीमंतांनीं बँक-कमिटी नेमली. कमिटीनें बँकेची योजना तयार करून ती अल्पावधींत श्रीमंतांना सादर केली. ती योजना श्रीमंतांनीं थोडया फेरफारानें मान्य केली; आणि बँकेचीं आर्टिकल्स ॲन्ड मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशन, बँक विषयांतील तज्ज्ञांकडून तयार करण्यांत येऊन प्राथमिक पूर्व तयारी झाल्यावर, ता. १९ ऑगट १९४४ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं बँकेचा **उद्घाटन–समारंभ** मोठ्या थाटानें करण्यांत आला. बँकेचें ऑफिस राजवाडयाच्या चौकांत गेस्टहाउस नं. १ च्या इमारतींत ठेवलें. ब्यँकेच्या डायरेक्टर बोर्डांत सरकारनियुक्त सभासद पांच, त्यांपैकीं या विषयाचे तज्ज्ञ मुंबईचे श्रीयुत वर्दे हे आहेत; व बिन-सरकारी म्हणजे शेअरहोल्डर्स तर्फे चार असे ९ डायरेक्टर्स असून, संस्थानचे दिवाण हे बँकेचे चेअरमन म्हणून पहिलीं सुमारें तीन वर्षें काम करीत होते. बँकेचें भांडवल एकूण रु. ५,००,००० असून त्यापैकीं फक्त निमें म्हणजे २,५०,००० ची विक्री केलेली आहे. लोकांचा बँकेवर विश्वास बसावा, म्हणून दरबारनें यापैकीं निम्या रकमेचे रु. १, २५,००० किंमतीचे शेअर घेतले आहेत आणि बँक व्यवस्थित चालू लागून तिला चांगला नफा मिळेपर्यंत शेअरहोल्डर्सना शेंकडा ३ तीन टक्क्यांप्रमाणें डिव्हिडंड देण्याची हमी दरबारनें पहिलीं तीन वर्षे घेतली होती. बँकेच्या मॅनेजरच्या जागीं बँकिंग विषयांत तज्ज्ञ व होतकरू अशा इसमाची नेमणूक करण्यांत आली असून, त्यांच्या देखरेखीखालीं बँकेचे व्यवहार सुरळीत चालू झाले आहेत.

भोर संस्थानांतील सुधागड तालुका हा फार दूर पडत असल्यामुळें, तेथील लोकांस भोरच्या बँकेचा फारसा उपयोग होऊं शकत नाहीं असें दिसून आलें, आणि लोकांनींहि याच कारणाकरितां मागणी केल्यावरून त्या तालुक्याचें

चित्रांक २४



भोर इंडस्ट्रीज कं. च्या ( श्रीमंतांच्या हस्तें ) Twintex शाखेचें उद्घाटन. ता १४।४।४६ [ सं. पा. ११३

मुख्य ठिकाण पाली, येथें ब्यँकेची शाखा उघडण्यांत आली आहे. या शाखेचा उद्घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें ता. १५-३-१९४५ इ. रोजीं वर्षप्रतिपदेच्या सुमुहूर्तावर झाला. पाली येथें समाज-सेवा-संघाच्या इमारतींत शाखा-ऑफिस ठेवलें आहे.

## भोर स्टेट बँकेच्या शिरवळ शाखेचा उद्घाटन-समारंभ

भोर स्टेट बँकेचा भोर व पाली येथील कारभार व्यवस्थितपणें चालू लागला असें दिसून आल्यावर, बँकेचा व्यवहार विस्तृत करण्याच्या दृष्टीनें आणि शिरवळ भागांतील लोकांची बँकेची शाखा शिरवळ येथें सुरू करावी अशी निकडीची आलेली मागणी लक्ष्यांत घेऊन, ता. १३ जून १९४७ पासून शिरवळ येथें बँकेचें ऑफिस उघडण्यांत आलें. हें ऑफिस सुरू करण्याचा समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झाला. या सुरुवातीच्याच दिवशीं शिरवळ भागांतील लोकांनीं चालू खातें व सेव्हिंग्ज् खातें यांत रु. ५४,००० रक्कम भरली. Well begun is half done या म्हणीप्रमाणें बँकेच्या शाखेची सुरुवात चांगली झाली.

## शिरवळ येथें विजेच्या पॉवर हाउसचें उद्घाटन

भाटघर येथील वीज शिरवळजवळून लोणंद वगैरे ब्रिटिश हद्दींतील गांवांना नुकतीच नेलेली आहे. भोर संस्थानामधील शिरवळ हा गांव भोरच्या खालोखाल महत्त्वाचा असल्यामुळें, तेथें उजेडाची असलेली उणीव या वीज-सान्निध्याचा फायदा घेऊन दूर करावी असें वाटल्यावरून, श्रीमंत राजेसाहेबांनीं भोर येथील वीज-पुरवठा कंत्राटदार नगरभूषण थोपटे यांना अल्प व्याजानें रु. १०,००० दहा हजार कर्जाऊ देऊन वीज शिरवळ गांवांत नेण्याचें काम त्यांच्याकडे सोपविलें. त्याकरितां खांब रोवणें, तारा जोडणें, वगैरे प्राथमिक सर्व तयारी झाल्यावर, थोपटे यांनीं शिरवळ येथें बांधलेल्या Sub-Station Power House चा उद्घाटन-समारंभ पार पाडण्याची योजना ता. २८ ऑगस्ट १९४० रोजीं केली. त्याकरितां श्रीमंत राजेसाहेब दुपारीं चार वाजतां भोराहून निघून शिरवळास गेले; नगरभूषण थोपटे यांनीं त्यांचें स्वागत केलें. त्यांनीं आपल्या सुरुवातीच्या भाषणांत धंद्यांतील आपले अनुभव सांगून, या ठिकाणीं वीजपुरवठ्याची योजना करण्यांत श्रीमंत राजेसाहेबांनीं केलेल्या साहाय्याचा

कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला; व वीजेचा शेतकीच्या व उद्योगधंद्याच्या कामीं लोकांना उपयोग करून घेणें सोयीचें व्हावें, म्हणून सवलतीच्या दरानें वीज देण्याचें आपण योजिलें असल्याचें सांगितलें. शिरवळ येथील रहिवाशी श्री. ह. स. देशपांडे यांनीं नंतर भाषण केलें. तें परिशिष्टांत नं. ६ ठिकाणीं दिलें आहे. यानंतर, श्रीमंत राजेसाहेब यांनीं थोडेंसें भाषण करून, पॉवर हाउस उघडल्याचें जाहीर केलें. नंतर नगरभूषण थोपटे यांनीं दिलेल्या अल्पोपाहाराचा स्वीकार करून श्रीमंत राजेसाहेब भोरास परत आले.

## साखरेचा कारखाना काढण्याविषयीं भोर दरबारचे प्रयत्न

हिंदुस्थान सरकारनें मॉरिशस, जावा, चायना, वगैरे परदेशांतील ठिकाणांपासून हिंदुस्थानांत येणाऱ्या साखरेवर ( Import duty ) आयात कर बसविल्यामुळें, साहजिकच हिंदुस्थानांत साखरेच्या कारखान्यांना उत्तेजन मिळालें. कर बसल्यानंतरच्या एका वर्षांत हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं ४० च्या वर साखर-कारखाने उभारले गेले. फलटणसारख्या संस्थानांतही एक कारखाना लागलीच काढण्यांत आला. या कारखान्यास भाटघर डॅमचें पाणी कॅनालच्या साहाय्यानें देण्यांत येऊं लागलें. भाटघर डॅम भोर संस्थानमध्यें बांधलेला असल्या-मुळें, त्याच्या पूर्वेकडील संस्थानचा प्रदेश—विचित्रगड तालुक्याचा पूर्व भाग (शिरवळ भाग)—यांत उंसाचें पीक होईल कीं काय, व तेथें साखरेचा कारखाना काढल्यास, कितपत फायदेशीर होईल, याबद्दल श्रीमंत राजेसाहेब यांनीं तज्ज्ञां-कडून पाहणी करविली. शिरवळ भागांतील जमीन उंसाच्या पिकास सर्वथैव योग्य असल्याचा त्यांचा अभिप्राय मिळाला. परंतु, मुख्य व तितकाच महत्त्वाचा दुसरा प्रश्न असा उत्पन्न झाला कीं, उंसाच्या पिकास पाणी लागणार, तें भाटघर धरणां-तून मिळावयास पाहिजे होतें. तें मिळावयाचें कसें ? भाटघर धरण भोर संस्थान-मध्यें बांधलें असलें, तरी त्याची मालकी ब्रि. सरकारकडे होती. पाणी घेणें झाल्यास, ब्रिटिश सरकारची परवानगी मिळणें जरूर होतें. भोर संस्थानमध्यें साखरेचा कारखाना निघावा अशी पुष्कळ दिवसांपासून राजेसाहेबांची उत्कट इच्छा होती. त्यांतच भोर संस्थानच्या तृतीय कायदेमंडळाच्या ११ व्या बैठकींत बिनसरकारी सभासदांनीं साखरेचा कारखाना भोर संस्थानमध्यें ताबडतोब उभार-ण्यांत यावा असा ठराव एकमतानें पास केला. या ठरावांत कायदेमंडळानें या

चित्रांक २५



भोर इंडस्ट्रीज कं. च्या Twintex शाखेचें उद्घाटन

[सं. पा. ११३

कामीं ब्रिटिश सरकारकडे जावें लागल्यास, तोही प्रयत्न जरूर करावा, अशी दरबारला शिफारस केली होती. श्रीमंत राजेसाहेबांच्या उत्कट इच्छेस या ठरावानें दुजोरा मिळाला. याचें प्रत्यंतर म्हणजे हा ठराव कायदेमंडळांत पास होण्यापूर्वींच त्या बैठकीच्या सुरुवातीस त्यांनीं केलेलें भाषण होय. या भाषणांत ते म्हणाले कीं,

" मे. शिंगरे यांनीं संस्थानांत साखरेचा कारखाना काढण्याचा प्रयत्न करण्याविषयींचा ठराव आणला आहे, हें चांगलें आहे. हा विषय आमच्या लक्षांत आज बरींच वर्षें आहे. परंतु, त्या दृष्टीनें प्रयत्न करण्यासही अनुकूल काल यावा लागतो. तसा अलीकडील दोन वर्षांत आला असल्याचें वाटतें. म्हणून, त्या दृष्टीनें दरबारनें पत्रव्यवहारही सुरू केला आहे, व त्याचा अनुकूल निकाल, विशेष दिवसगत न लागतां, होईल अशी आशा आहे. "

या भाषणांत श्रीमंत राजेसाहेबांनीं म्हटल्याप्रमाणें खरोखरीच सन १९४१ च्या ऑगस्टपासून भाटघर धरणाचें पाणी कारखान्यास मिळण्याबाबत ब्रि. सरकारशीं पत्रव्यवहार त्यांनीं सुरू केला होता. भाटघर धरण मुंबई सरकारच्या ताब्यांत असल्यामुळें त्यांच्या परवानगीची जरूरी होती. सबब, त्यांच्याबरोबर, कोल्हापूरच्या रेसिडेंटमार्फत, पत्र-व्यवहार सुरू करण्यांत आला. या पत्रव्यवहारांत हें धरण भाटघर येथील भोर संस्थानांतील वेळवंड नदी आडवून बांधलेलें आहे; हें धरण दोन वेळा बांधलें; त्या कामीं भोर दरबारनें अनेक प्रकारांनीं ब्रि. सरकारास मदत केलेली आहे; भोर संस्थानची जमीन सुमारें १८ चौरस मैल धरणांत गेली आहे; कित्येक गांवें धरणाच्या पाण्यांत बुडाल्यामुळें, संस्थानच्या लोकांचें फार नुकसान झालें आहे; धरणांत गाळ साचूं नये, म्हणून धरणाच्या दोन्ही बाजूंस सक्तीनें जंगल राखावें लागलें, त्याचा मोबदला संस्थानला मिळाला नाहीं; तलावाच्या खालच्या बाजूस वेळवंडी नदीस भोर संस्थानमधील दुसरी मोठी नीरा नदी मिळालेली असून इतरही नद्या मिळाल्या आहेत; या नद्यांच्या पाण्याचा ब्रिटिश सरकार उपयोग करीत आहे; त्या पाण्यावर संस्थानची मालकी आहे; वेळवंडी नदीचा उगम भोर संस्थानांत असून त्या नदीस धरण बांधलें असलें, तरी पाण्यावर स्वामित्व संस्थानचें आहे; सबब, त्या नात्यानें संस्थानला कांहीं पाण्याचा उपयोग करण्याचा हक्क मिळणें जरूर आहे; हे व अशा प्रकारचे मुद्दे मांडून भोर संस्थानांत काढण्यांत येणाऱ्या कारखान्यास लागणारें उंसाच्या

पिकासाठीं पाणी विनामोबदला संस्थानला देण्यांत यावें अशी दरबारची मागणी होती. मुंबई प्रांताच्या गव्हर्नरपासून खालपर्यंत सर्व संबंधी अधिकाऱ्यांना समक्ष भेटून भोर दरबारची ही मागणी किती रास्त आहे हें समजावून देण्याचा श्रीमंत राजेसाहेबांनीं जातीनें प्रयत्न केला. यासंबंधीं सविस्तर हकीकत परिशिष्टांत नं. ७ ठिकाणीं दिलेल्या पत्रव्यवहारावरून ध्यानीं येणार आहे.

या बाबतींत बराच पत्रव्यवहार होऊन आपसांत वाटाघाटीनें याचा निर्णय होऊं शकेल असें न वाटल्यामुळें, लवाद नेमून त्यामार्फत याचा निकाल करावा व लवादाचा निर्णय उभयतांनीं मान्य करावा अशी योजना मुंबई सरकारनें सुचविली. लवादाची योजना दरबानें मान्य केली नाहीं. तेव्हां, मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर नेक नामदार सर रॉजर लमले यांनीं पत्र पाठवून श्रीमंत राजेसाहेबांना कळविलें कीं, "युद्धोत्तर पुनर्घटनेच्या योजनांत वीर व खडकवासला येथील धरणें वाढविण्याचा मुंबई सरकारचा विचार आहे. त्या कामीं मुंबई सरकारला दरबारशीं वाटाघाट करावी लागेल. त्या वाटाघाटीच्या वेळीं भोर दरबारनें साखरेच्या कारखान्यासाठीं पाणी मिळण्याबाबतचा प्रश्न मुंबई सरकारपुढें मांडावा. तेव्हां, त्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करण्यांत येईल." पुढें लवकरच, ने. ना. सर रॉजर लमले यांनीं सुचविल्याप्रमाणें, युद्धोत्तर पुनर्घटनेंतील खडकवासला व वीर येथें धरणें वाढविण्यासंबंधीं वाटाघाटी दरबारबरोबर मुंबई सरकारनें सुरू केल्या. या वाटाघाटी मुंबई सरकारतर्फे एक प्रतिनिधि, कोल्हापूर रेसिडेन्सीचा एक प्रतिनिधि आणि भोर दरबारचा एक प्रतिनिधि अशा तिघांच्या दरम्यान झाल्या. ता. ५ व २१ ऑक्टोबर १९४४ रोजीं वर उल्लेख केलेल्या प्रतिनिधींमध्यें झालेल्या चर्चेकरितां दरबारतर्फे जे मुद्दे मांडण्यांत आले, त्यांबाबत मुंबईसरकारनें आपला निर्णय रेसिडेन्सीमार्फत ६ नोव्हेंबर १९४४ चें पत्र पाठवून दरबारला कळविला. तो खालीलप्रमाणें:

प्र. १ धरणांत जाणाऱ्या जमिनीचा मोबदला जमीन, दिवाणी फौजदारी हक्कांसह, देतां येणार नाहीं; किंवा जमीन जाईल तितक्या आकाराची इनाम जमीनही देतां येणार नाहीं.

प्र. २ भोर स्टेटमधील नद्यांना धरण होत असल्यामुळें, त्या पाण्यावरील संस्थानच्या हक्काबद्दल धरणापासून ब्रि. सरकारला होणाऱ्या नफ्यावर शेंकडा ठराविक प्रमाणांत रक्कम संस्थानला देतां येणार नाहीं.

प्र. ३ संस्थानच्या रयतेला इरिगेशनच्या सर्व सवलती देण्यांत येतील. धरणांत जाणारी सर्वच जमीन सर्व वर्षभर पाण्याखालीं राहणारी नसते; अशा जमिनींत हंगामी पीक काढण्याकरितां संस्थानच्या रयतेस सवलत देण्यांत येईल.

प्र. ४, ५, १४ हे प्रश्न रिपेरियन हक्कांबाबत आहेत. या बाबतींत पूर्वीप्रमाणेंच नावा चालविण्यास परवानगी देण्यांत येईल. धरणाच्या वरच्या बाजूस बंधारे घालण्यास मुंबई सरकारची कांहीं एक हरकत नाहीं. परंतु, अशा बंधाऱ्यांमुळें धरणाच्या पाण्याच्या क्षेत्रास व त्याच्या उपयोगास अडथळा येतां कामा नये.

प्र. ६, १० युद्धोत्तर योजनांबाबत मुंबई सरकारला फार सहानुभूति आहे; व ज्या योजना संस्थान हातीं घेईल, त्या कामीं सरकारचें जरूर तें साहाय्य मिळेल.

प्र. ७, ८, ९, १६ ओव्हरलॅपसह जास्तींत जास्त ३००० तीन हजार एकर जमिनींत पीक करण्यास पुरेसें पाणी संस्थानला घेतां येईल. हें पाणी लेक व्हायटिंग ( भाटघर धरण ) मधून उंचीवरील कॅनॉल काढून अगर लिफ्ट-पंपानें नीरा नदींतून घेतां येईल.

(१६) वरील ३००० एकर पिकाकरितां लागणाऱ्या पाण्यापैकीं ५०० एकर जमिनीकरितां लागणारें पाणी लेक व्हाइटिंगमधून दरसाल ताबडतोब देण्यांत येईल आणि बाकीच्या २५०० एकर जमिनीस लागणारें पाणी वीर धरण वाढविण्याचें काम पुरें झाल्यानंतर देण्यांत येईल. संस्थानमध्यें लहान लहान उद्योगधंदे विजेच्या साहाय्यावर चालू करण्यासाठीं लागणारा जरूर तो वीजेचा पुरवठा करण्यास मुंबई सरकार तयार आहे. परंतु, हा पुरवठा जास्त लागल्यास, भाटघर येथील वीजेच्या स्टेशनची वाढ केल्यास करतां येईल, व त्या कामीं संस्थानच्या मागणीस प्राधान्य ( अग्रता ) देण्यांत येईल.

(११) इलेक्ट्रिसिटी ॲक्टप्रमाणें थोपटे यांच्या वीजपुरवठ्याचें कॉन्टॅक्ट रद्द करतां येणार नाहीं. परंतु, थोपटे यांनीं आपलें विजेचें लायसेन्स दरबारच्या नांवें बदलावें असा अर्ज दिल्यास, तसें करण्यास सरकारची कांहीं एक हरकत नाहीं.

खडकवासला धरणाचें पाणी संस्थानला मिळावें असें प्रश्न नं. ७ मध्यें म्हटलेलें आहे. यासंबंधीं दरबारजवळ कांहीं एक योजना नाहीं; आणि मुंबई सरकारलाहि या पाण्याबद्दल फार मागणी असल्यामुळें, दरबारची याबद्दलची मागणी मान्य करतां यावयची नाहीं; परंतु, दरबारकडून कांहीं निश्चित स्वरूपाची योजना मांडण्यांत आल्यास, मुंबई सरकार त्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करील. सध्यांच्या स्थितींत कसलीहि हमी देतां येत नाहीं.

प्र. १२, १३, १५ भोर संस्थानला बाधक होतील, अशा नवीन योजना सध्यां मुंबई सरकारनें आंखलेल्या नाहींत. अशा कांहीं योजना हातीं घेण्याचें ठरल्यास, त्या बाबतींत संस्थानची अगोदर संमति घेण्यांत येईल.

चालू योजनांमुळें पाण्याखालीं जाणाऱ्या जमिनीचें क्षेत्र शक्य तों बरोबर काढण्यांत आलें आहे. प्रत्यक्ष पाहणींत फरक पडून फार अंतर दिसून आल्यास, त्याबाबत संस्थानला आगाऊ कळविण्यांत येईल.

संस्थानचा हिंदुस्थान सरकारशीं प्रत्यक्ष संबंध असला, तरी मुंबई सरकार कायद्याप्रमाणें शक्य ती मदत संस्थानला करील.

या पत्रांतच ऑक्टोबरच्या बैठकींत वाटाघाट न झालेल्या एका प्रश्नाबाबत खुलासा करण्यांत आला कीं, भाटघर येथील वीजेचा पुरवठा वाढविण्याकरितां वीर धरणानजीक एक Balancing Tank बांधावयाचें आहे. त्यांत सर्व जमीन ब्रिटिश सरकारची जात असल्याचें दिसून आल्यास, वाटाघाटीचें कारण नाहीं. परंतु, स्टेटचीहि कांहीं जमीन जाईल असें दिसून आल्यास, वीरधरणाच्या योजनेस आतां मान्यता मिळाली असल्यानें, व त्यासंबंधींच हें काम असल्यानें, त्यासहि दरबारची मान्यता आहे असें समजून काम सुरू करण्यांत येईल.

वरील सोळा मुद्यांवर मुंबई सरकारनें कळविलेल्या निर्णयाबाबतचें आपलें मत दरबारनें ता. ३० जानेवारी १९४५ रोजीं पत्र पाठवून कळविलें. कांहीं मुद्यांना मान्यता देऊन कांहीं प्रश्नांवर पुनः खुलासा विचारण्यांत आला व त्याचें उत्तर मुंबई सरकारकडून रेसिडेंटमार्फत ता. २४-४-४५ च्या पत्रानें कळविण्यांत आलें. तें:—

प्र. १ पैशाच्या रूपानें मोबदला द्यावयाचा, तो नवीन भाटघर धरण वाढविण्याच्या वेळीं ज्या पद्धतीनें ( By capitalising the assessment and other present and prospective sources of income ) दिला, तसा देण्यांत येईल.

प्र. ७, ८; ३००० एकर हे ओव्हरलॅपसुद्धां समजण्याचे आहेत. ५०० एकरला सुरवातीस पाणी-पुरवठा करतां येईल.

प्र. ९ वीजेचा पुरवठाही बॅलन्सिंग टँक झाल्यावरच वाढवितां येईल. वीर धरण बांधून तयार झाल्यावर, म्हणजे सुमारें ७ व्या वर्षापासून, देण्यांत येईल, असें मुंबई सरकारकडून कळविण्यांत आलें होतें.

श्रीमंत राजेसाहेब जानेवारी १९४७ मध्यें दिल्लीस नरेंद्र मंडळाच्या बैठकीस गेल्यावेळीं त्यांनीं या प्रश्नासंबंधीं माहितीची नोट ने. ना. व्हाइसरॉय-साहेब यांना समक्ष सादर केली.

रॉयल्टी, मोबदला जमीन व शुगर एक्साइज या प्रश्नांवर स्वतंत्रपणें वाटाघाटी कराव्यात असें रेसिडेंटकडून सुचविण्यांत आलें.

ओव्हरलॅपच्या प्रश्नावर मुंबई सरकारशीं पुनः वाटाघाटी सुरू करण्यांत आल्या. मुंबई सरकारचे इरिगेशन खात्याचे सेक्रेटरी मि. आर. एच. हॅमेट व पब्लिक वर्कस् खात्याचे चीफ एंजिनिअर रा. सी. जी. काळे यांची दरबारचे प्रतिनिधि रा. सा. साने व सल्लागार रा. आर. जी. सुळे, C. I. E. Retd. Superintending Engineer Deccan Irrigation Circle, यांच्या दरम्यान चर्चा झाली. या चर्चेंत त्या वेळपावेतोंच्या अनिर्णित मुद्यांवर खालीलप्रमाणें निर्णय घेण्यांत आले.

( १ ) पूर्वीं ठरलेल्या ३००० एकरांपेक्षां ओव्हरलॅपचें एकरेज मान्य करतां येत नाहीं.

( २ ) मुंबई सरकारच्या पब्लिक वर्क्स खात्याची ३००० एकरला १२४ इंचेस ( Inches ) याप्रमाणें एक वर्षांत विभागून पाणी देण्यास हरकत नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांतील कारखान्यांना मॉन्सून ३० इंच, रबी ४१ इंच, व उन्हाळी पिकें ५३ इंच, या प्रमाणांत पाणी दिलें जातें. त्याचप्रमाणें संस्थानला द्यावें. भोर दरबारशीं मुंबई सरकारनें रेसिडेन्सीमार्फत यासंबंधींच वाटाघाटी सुरू केल्या. त्या बाबतींत त्रिवर्गाचा बराच पत्रव्यवहार होऊन अखेर ३ मार्च १९४६ रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं खालील अटींवर वरील दोन्ही धरणें मुंबई सरकारनें बांधण्यास आपली संमति असल्याचें रेसिडेंट यांस कळविलें.

१. भोर संस्थानमध्यें साखरेचा कारखाना सुरू झाल्यावर शुगर एक्साइजचें सर्व उत्पन्न संस्थानला मिळावें.

२. उंसाच्या क्षेत्राची जी परवानगी ३००० एकरची देण्यांत येणार आहे, त्याखेरीज ३० टक्के ओव्हरलॅप क्षेत्राची परवानगी असावी.

३. संस्थानचें जेवढें क्षेत्र धरणाच्या पाण्याखालीं जाईल, तेवढें मोबदला-क्षेत्र मिळावें.

४. भाटघर धरणाच्या पाण्यावरील रॉयल्टीचा प्रश्न समाधानकारक सुटलेला नाहीं. त्यासंबंधांत दरसाल ठराविक शेंकडा प्रमाणांत उपयोग केलेल्या पाण्याचा मोबदला मिळावा.

५. शुगर फॅक्टरीच्या ३००० एकरकरितां लागणारें परमिट मिळणें सुलभ व्हावें, म्हणून मुंबई इलाख्याच्या साखरेच्या परिमाणांत ( Quota ) संस्थानच्या परिमाणाचा समावेश करण्यांत यावा.

यानंतर, ता. ४-३-४६ व ७-३-४६ रोजीं राजेसाहेबांनीं रेसिडेंटला पत्रें पाठवून खालील मुद्दे आग्रहानें मांडले.

१. शुगर एक्साइजची मध्यवर्ती सरकारची पॉलिसी बदलण्यापूर्वींच पाणी मिळून साखरेचा कारखाना संस्थानमध्यें सुरू झाला असतां, शुगर एक्साइजचें किती तरी उत्पन्न दरबारला मिळून संस्थानची व रयतेची भरभराट होण्यास चांगली मदत झाली असती. परंतु, धरणाचें पाणी देण्याचें मुंबई सरकारनें हा वेळपावेतों नाकारल्यामुळें, ती गोष्ट घडूं शकली नाहीं; व त्यामुळें संस्थानचें नुकसान झालें.

२. धरणांत जाणाऱ्या जमिनीच्या मोबदल्यांत नजीकची जमीन रयतेस मिळावी इतकेंच नव्हे, तर ती वीर धरणाचें पाणी तिला मिळेल अशी नजीक असावी. लोकांच्या जमिनी ॲक्वायर करणें फार कठीण होईल. त्यांचा फार विरोध होईल. मोबदला-जमीन दिल्यास, लोकांच्या जमिनी घेणें सुलभ होईल. ( जमिनी दिवाणी फौजदारी हक्कांसह न मिळाल्या, तरी चालतील. ) प्रजा, मोबदला जमिनी मिळाल्यास, आपल्या जमिनी खुषीनें देईल. याप्रमाणें जमिनी न मिळाल्यास, ॲक्विझिशनचा प्रश्न फार अवघड होईल. लोकांत फार असंतोष पसरेल.

३. संस्थानच्या हद्दींत नवीन धरणें बांधण्याच्या योजना यापुढें मुंबई-सरकारनें हातीं घेऊं नयेत.

चित्रांक २७



हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांचा, श्रीलक्ष्मी टेक्सटाइल मिल्स व राजा रघुनाथराव मिल या दोन फॅक्टरीतर्फे श्रीलक्ष्मी टेक्सटाइल मिलचे आवारांत सत्कार ता. १९।८।४७

[ स.'पा. ११४

४. जर एखाद्या वर्षी धरणांतील पाणी जास्त असल्यामुळें, ठराविक प्रमाणापेक्षां जादा इतर कारखान्यांना देतां आलें, तर त्याच प्रमाणांत तें संस्थानला देण्यांत यावें. मात्र, त्याबद्दल--अशा जास्त पाण्याबद्दल—पाणीपट्टी दरबारला द्यावी लागेल.

५. इतर कारखान्यांना १२४ इंच देण्यांत येणारें पाण्याचें प्रमाण वाढविण्यांत आलें, तर त्याच प्रमाणांत संस्थानला मिळणारें प्रमाणही वाढविण्यांत यावें. त्याचा दर १५ रु. एकरीं ठरविण्यांत आला, तो बदलण्यांत येऊं नये. पाणीपुरवठा कमी झाला, तर तो इतर कारखान्यांप्रमाणें संस्थानचाही कमी होईल.

६. मुंबई सरकारच्या पब्लिक वर्क्स खात्याच्या अगर तत्सम खात्याच्या अधिकाऱ्यांना पाणी मोजण्याच्या ठिकाणीं केव्हांही अनिर्बंध प्रवेश असावा. पाण्याचा ठराविक कोटाच उपयोगांत आणला जातो, याकडे संस्थानच्या अधिकाऱ्यांनीं काळजीपूर्वक लक्ष पुरवावें.

७. दुसऱ्या साखर-कारखान्यांना ज्या पद्धतीनें पाणी ( कोटा ) पुरविलें जातें, त्याच पद्धतीनें संस्थानलाही पुरविलें जाईल.

८. पाण्याचें ठराविक प्रमाण ( कोटा ) न वाढल्यास, उंसाच्या अगर इतर पिकाच्या एकरेजचें प्रत्यक्ष प्रमाण किती आहे, ह्याकडे मुंबई सरकार लक्ष देणार नाहीं.

नोट : कलम ५ बाबत विशेष खुलासा:—३००० एकरांला १२४ इंच हें प्रमाण दक्षिणेंतील कॅनॉलवर चालणाऱ्या कारखान्यांच्या बाबतींत सर्वसाधारणपणें आहे. तें बदलण्यांत आल्यास, तो बदल संस्थानलाही लागू होईल.

---

याप्रमाणें मुंबई सरकार व भोर दरबार त्यांच्या वाटाघाटींत निर्णय घेतले. वाटाघाटीच्या सुरवातीपासून शेवटपर्यंत ज्या शर्ती उभयपक्षीं मान्य झाल्या, त्यांबद्दल उभयतांत लवकरच एक कररनामा करण्यांत होणार होता.

करारनाम्याचा मसुदाही मुंबई सरकारकडून कोल्हापूरच्या रेसिडेंटमार्फत दरबारकडे ता. ७ मे रोजीं पाठविण्यांत आला होता. हा मसुदा दरबारकडे आल्यावर श्री. राजेसाहेबांनीं तो संस्थानच्या कारभारी-मंडळाकडे संमत करण्यासाठीं पाठविला. या वेळीं कारभारी मंडळांत लोकनियुक्त मंत्री ना. गो. बा. पोतनीस

व ना. शं. ल. लिमये हे होते व अध्यक्ष श्री. न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर हे होते. कारभारी मंडळांत या मसुद्यावर चर्चा झाल्यावेळीं ना. गो. बा. पोतनीस व ना. शं. ल. लिमये यांनीं तो जसाचा तसा मान्य करण्याचें नाकारलें, व त्यांत दुरुस्त्या व्हावयास पाहिजेत असें मत व्यक्त केलें. वीर धरण वाढविण्यामुळें संस्थानच्या रयतेची बरीच म्हणजे सुमारें ३००० तीन हजार एकरपर्यंत जमीन पाण्याखालीं बुडेल असा अंदाज होता. ज्या ज्या लोकांची जमीन पाण्यांत बुडेल, त्यांना मोबदला-जमीन नजीकची कॅनॉलच्या पाण्याचा उपयोग करतां येईल, अशी मुंबई सरकारनें द्यावी असें या उभयता मंत्र्यांचें म्हणणें होतें. मुंबई सरकार जमीन देण्यास तयार नव्हतें. परंतु, पी. डब्ल्यू. डी. खात्याचे मंत्री या नात्यानें ना. पोतनीस यांनीं मुंबई सरकारचे मंत्री ना. गिल्डर यांना, श्री. राजेसाहेबांना न विचारतां, परस्पर पत्र पाठवून वीर डॅमबाबत करावयाच्या करारासंबंधीं वाटाघाटी पुनः नव्यानें सुरू कराव्या असें ता. १६ जुलै १९४७ रोजीं कळविलें. या पत्रामुळें करार होण्याचें काम लांबणीवर पडलें. ना. पोतनीस यांना ना. गिल्डर, मुंबई सरकारचे मंत्री, यांनीं वाटाघाटीस बोलाविलें. त्या वेळीं त्यांनीं अनेक प्रश्न उपस्थित केले. त्यांचा निर्णय लवकर लागेल असें न वाटल्यावरून, मुंबई सरकारनें वीर डॅम बांधण्याची योजना स्थगित केली. करार झाला नाहीं, व साखरेचा कारखाना संस्थानमध्यें उभारण्याचे प्रयत्न स्वप्नवत् ठरले. ता. ८ मार्च १९४८ पासून भोर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें; यामुळें, संस्थानमध्यें कारखाना उभारून तो भरभराटीस यावा, तसेंच हा करार पुरा होऊन व संस्थानला भाटघर धरणापासून होणारा वीजपुरवठा पुष्कळ प्रमाणांत वाढून व वीजेवर चालणारे लहान लहान उद्योगधंदे संस्थानांत निघून, त्यांची वाढही सहजीं होऊन, संस्थानचें औद्योगिक महत्त्व वाढलेलें पाहावें ही श्रीमंत राजेसाहेबांची मनीषा होती, ती, मूळ करारच न झाल्यामुळें, पुरी होऊं शकली नाहीं.

चित्रांक २८



श्रीमंतांच्या हस्ते भोर स्टेट बँकेचें उद्घाटन ता. १९ ऑगस्ट १९४४.

[ सं. पा. ११६

# प्रकरण ९ वें

# ग्रामोद्धार कार्य

## भोर संस्थान शेतकी कमिटी

भोर संस्थानची बहुतेक सर्व प्रजा गरीब आहे. शेतकी हेंच प्रामुख्यानें त्यांच्या उपजीविकेचें साधन आहे. सबब, शेतीवर उदरभरण करणाऱ्या प्रजेच्या कल्याणाकरितां एकादी संधि आल्यास, तिचा योग्य उपयोग करण्याकडे श्रीमंत राजेसाहेबांची नेहमीं प्रवृत्ति असे. अशी संधि ते सहसा वाया जाऊं देत नसत. संस्थानचा बहुतेक सर्व मुलुख डोंगराळ आहे. त्यांत प्रामुख्यानें भात पिकतें. परंतु, हें जें पीक होतें तें, त्यांखेरीज होणाऱ्या नाचणी, वरी, सावा इत्यादि डोंगरी धान्यांसह लक्षांत घेतलें, तरी सर्व वर्षभर सर्वांना पोटभर धान्य मिळेल, इतकेंही तें असत नाहीं. कापूस, ऊंस, भुईमूग, इत्यादि धनोत्पादक पिकें संस्थानांत बिलकूल होत नसल्यामुळें, तद्विषयक कारखाने उभारणें अशक्य झालें; आणि त्याचा परिणाम म्हणजे संस्थानच्या प्रजेच्या हिताकरितां कांहींहि करितां येत नाहीं अशी स्थिति असे. तथापि, निसर्गाच्या या विरुद्ध वातावरणांत देखील संस्थानच्या शेतकऱ्यांसाठीं, शेतकीच्या आधुनिक साधनांचा उपयोग करून किंवा फुरसतीच्या वेळीं कांहीं घरगुती धंदे सुरू करून, कांहीं करतां येईल काय, व तें कोणत्या मार्गानें करतां येईल, हें पहाण्याच्या उद्देशानें श्रीमंत राजेसाहेबांनीं संस्थानची शेतकीविषयक पाहणी करण्याचें ठरविलें; व त्याकरितां ता. ३१-१-१९४२ रोजीं शेतकी विषयांतील तज्ज्ञ, म्हणजे श्री. के. व्ही. जोशी, एम्.एजी., रि. डेप्युटी डायरेक्टर ऑफ रुरल डेव्हलपमेंट, पुणें, श्री. व्ही. के कोगेकर, एम्.एजी., रिटायर्ड डिव्हिजनल सुपरिंटेंडेंट ऑफ ॲग्रिकल्चर, पुणें आणि श्री. एच्. पी. परांजपे, बी.ए., रिटा. असि. हॉर्टिकल्चरिस्ट, पुणें, या त्रिवर्गांची एक कमिटी नेमली. या कमिटीनें एक प्रश्नपत्रिका प्रसिद्ध करून लोकांकडून माहिती मागविली, आणि संस्थानभर दौरा काढून पाहणी केली. निरनिराळ्या ठिकाणच्या लोकांच्या समक्ष भेटी घेऊन, शेतकीविषयावर त्यांच्याबरोबर चर्चा केली; आणि त्या लोकांकडून करण्यांत आलेल्या सूचना लक्षांत घेऊन, रिपोर्ट तयार केला, व तो श्रीमंत राजेसाहेबांना सादर

केला. श्रीमंतांनीं तो रिपोर्ट जंगल-कमिटीकडे पाठवून दिला. त्याची हकीगत वर आलेलीच आहे.

## खेड-शिवापूर ग्रामोद्धार केंद्रातर्फे श्रीमंतांना मानपत्र

पुणें येथील डेक्कन ॲग्रिकल्चर असोसिएशन या संस्थेनें खेड-शिवापूर येथें एक ग्रामोद्धार-केंद्र चालविलें आहे. या संस्थेच्या चालकांच्या विनंतीवरून श्रीमंत राजेसाहेबांनीं या ग्रामोद्धार-केंद्रास ता. २१ मार्च सन १९४० रोजीं भेट दिली. तेथें संस्थेंतील एक सदस्य मि. कोगेकर यांनीं संस्थेनें चालविलेल्या कार्याचें प्रात्यक्षिक दाखविलें. तसेंच, सुधारलेल्या बी-बियाण्यांचे उपयोग, आधुनिक शेतीचीं यांत्रिक साधनें, पिकांचे रोग निवारण्याचे उपाय, वगैरेंची माहिती त्यांनीं श्रीमंतांना सांगितली. डॉ. साठे यांनीं या केंद्रांत चालविलेल्या Maternity, Child-Welfare and Health Centre ची माहिती निवेदन केली. पाणी-शोधन यंत्राची माहिती रा. ब. सहस्रबुद्धे यांनीं दिली. नंतर खेडला जातांना संस्थेच्या इमारतीची जागा मि. जठार यांनीं श्रीमंतांना दाखविली. खेड येथें तेथील देशमुखांनर्फे श्रीमंतांना मानपत्र अर्पण करण्यांत आलें.

नंतर, श्रीमंत राजेसाहेब यांनीं राजगड तालुक्यांतील कासुर्डी या गांवास भेट दिली. या ठिकाणीं डे. ॲग्रि. असोसिएशनतर्फे एक शाळा चालविली आहे. या शाळेपुढें उभारलेल्या भव्य मंडपांत समारंभ झाला. मि. अण्णाजी पांडुरंग कोंडे, देशमूख, मि. जठार, मि. कोगेकर व मि. गोखले यांनीं भाषणें करून संस्थेनें निरनिराळ्या ठिकाणीं चालविलेल्या कार्याची माहिती सांगितली, आणि संस्थेच्या गरजा श्रीमंतांना निवेदन केल्या. शेतकीच्या कामांत विशेष कामगिरी केल्याबद्दल तीन खेडुतांना व शाळेंत पास झालेल्या ९ विद्यार्थ्यांना श्रीमंतांनीं बक्षिसें दिलीं. श्रीमंतांनीं आपल्या भाषणांत संस्थेनें चालविलेल्या ग्रामोद्धाराच्या कार्याबद्दल गुणग्रहणपर उद्गार काढले आणि संस्थेस रु. ४०० चारशेंची देणगी दिली.

## परळी येथील विहिरीचें उद्घाटन

सुधागड तालुक्यांतील परळी गांवीं हरिजनांकरतां एक विहीर बांधण्यांत आली आहे. त्या विहिरीचा उद्घाटनसमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झाला. त्याकरतां श्रीमंत राजेसाहेब पनवेल, खारपाडा, नागोठणें या मार्गानें

चित्रांक २९



भार ९८८ बकच्या पाला यथील शाखेचें श्रीमंतांच्या हस्तें उद्घाटन, ता. १५।३।४५ इ.

[ सं. पा. ११७

चित्रांक ३०




भोर स्टेट बँकेच्या शिरवळ येथील शाखेचें श्रीमंतांच्या हस्तें उद्घाटन, ता. १३।६।४७ इ.

[सं. पा. ११७

ता. ९ डिसेंबर सन १९४१ रोजीं पालीस गेले; व तेथून परळीस ता. १० रोजीं दुपारीं गेले. परळीच्या अलीकडे पाली-नाणोसें रस्त्यापासून परळी येथील हरिजन-वस्तीपर्यंत श्रीमंतांना मिरवणुकीनें नेण्यांत आलें. या समारंभास रोहे तालुक्याचे त्या वेळचे मामलेदार श्रीयुत घाटकांबळे ( हे हरिजन वर्गांपैकीं होते. ) स्वतः उपस्थित होते. समारंभाकरतां तयार केलेल्या मंडपांत श्रीमंत स्थानापन्न झाल्यावर, हरिजन सेवक संघाचे सेक्रेटरी, श्री. केशवराव लिमये, यांनीं कांहीं हरिजनांची श्रीमंतांना ओळख करून दिल्यावर, संघाचे अध्यक्ष श्री. बाप्पासाहेब देशमुख यांनीं प्रास्ताविक भाषण केलें. श्री. केशवराव लिमये यांनीं सुधागड तालुक्यांतील हरिजनांच्या पाणी-पुरवठ्यासाठीं संघानें केलेल्या परिश्रमाचें वर्णन केलें. नंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून ह. से. संघाच्या कार्याचा गौरव केला, आणि विहीर उघडल्याचें जाहीर करून ' सीताकुंड ' असें तिचें नांव ठेविलें व संघास रु. २०० दोनशेंची देणगी दिली. श्री. सितारामपंत टिळक यांनीं सर्वांचे आभार मानले. ते आपल्या भाषणांत म्हणाले,

" हरिजन स्त्री-पुरुष, मुलें-मुली खेळीमेळीनें एकत्र बसलेल्या सभेंत श्रीमंत राजेसाहेब स्वतः येऊन बसतात व उपदेश करतात, हें दृश्य आम्हां खालसांतील लोकांना हेवा वाटणारें आहे. पुढें कदाचित् काळ पालटेल; पण, आज अगदीं खालच्या समजल्या गेलेल्या व समाजानें उपेक्षा केलेल्या समाजांत श्रीमंत राजेसाहेब यांनीं मिसळणें, ही गोष्ट अपूर्व व अभिनंदनीय अशीच आहे."

हा समारंभ झाल्यावर श्रीमंत राजेसाहेब पुण्यास परत आले. वाटेंत रा. माधवराव डोंगरे यांच्याकडे अल्पोपाहाराचा त्यांनीं स्वीकार केला.

*

# प्रकरण १० वें

# थोरांच्या भेटी

## ले. कर्नल इव्हान्स गॉर्डन यांची भोरास तिसरी भेट

दक्षिणी संस्थानांचे रेसिडेन्ट ले. क. के. ए. जी. इव्हान्स गॉर्डन, सी. आय. इ. यांनीं आपल्या सेक्रेटरीसह ता. २६ जानेवारी सन १९४० रोजीं भोरास तिसऱ्यांदा भेट दिली. मुक्काम तीन दिवस होता. या मुक्कामांत श्रीराम मंडपांत दरबार भरवून त्यांना म्युनिसिपालिटीतर्फे मानपत्र देण्यांत आलें. राजा रघुनाथराव हायस्कूलला त्यांनीं भेट देऊन मुलांना बक्षिसें दिलीं. श्री. सौ. गंगूताईसाहेब वाचनालयास त्यांनी भेट दिल्यावेळीं, त्यांना भोर येथील महिला मंडळातर्फे मकर-संक्रांतीनिमित्त भरविण्यांत आलेलें तिळगुळाच्या जिनसांचें व भरतकामाचें प्रदर्शन दाखविण्यांत आलें. भोर येथील स्त्रियांनीं हातानें तयार केलेल्या कांहीं वस्तू त्यांना फारच पसंत पडल्या. अशा पसंत झालेल्या कांहीं वस्तू, त्या करणाऱ्या स्त्रियांनीं त्यांना भेट म्हणून दिल्या.

## ले. क. पी. गेसफर्ड यांची भोरास भेट

ता. २७-२-४१ रोजीं ११ वाजतां रेसिडेन्टसाहेबबहाद्दुरांनीं राजा रघुनाथराव हायस्कूलला भेट दिली. तेथें शाळाधिकारी यांनीं शिक्षणखात्याच्या प्रगतीचा अहवाल वाचून दाखविला, व मिसेस गेसफोर्ड यांच्या हस्तें मुलांना मिठाई व पुस्तकें वाटण्यांत आलीं. साहेबबहाद्दुरांच्या भेटीनिमित्त मुलांना सुटी देण्यांत आली.

दुपारीं १२ वाजतां श्री. राजेसाहेबांनीं साहेबबहाद्दुरांची खाजगी भेट घेतली.

तिसऱ्या प्रहरीं ४-३० वाजतां राजवाड्यांतील श्रीराममंडपांत दरबार भरवून साहेबबहाद्दुरांना भोर शहर म्युनिसिपालिटीचें मानपत्र वाचून दाखवून अर्पण करण्यांत आल्यावर, साहेबबहाद्दुरांनीं समयोचित भाषण करून म्युनिसिपालिटीनें केलेल्या सुधारणांबद्दल आपली पसंति व्यक्त केली.

चित्रांक ३१



परळी येथील हरिजनांकरितां बांधलेल्या विहिरीचें श्रीमंतांच्या हस्तें उद्घाटन, ता.१०।१२।४१ इ. [सं. पा. १२८

नंतर पानसुपारी, अत्तर, गुलाब वांटण्यांत येऊन वाड्याच्या पुढील चौकांत फोटो घेण्यांत आला. तसेंच, रेसिडेन्ट मि. गेसफर्ड व सेक्रेटरी मेजर विलोबी यांचा, हत्तीवर अंबारींत ते बसले असतांना, फोटो घेण्यांत आला.

सायंकाळीं पाहुण्यांना अंबवडें येथें श्री. शंकराजी नारायण यांची समाधि, झुलता पूल आणि परत येतांना वाटेंत मांगिरा पुलाची जागा दाखविण्यांत आली.

ता. २८ फेब्रुवारी रोजीं साहेबबहादूर बरोबरच्या मंडळींसह महाबळेश्वरास गेले.

## नेक नामदार सर रॉजर लमले, मुंबई इलाखाधिपति, यांची भोरास भेट

मुंबई इलाख्याचे अधिपति नेक नामदार सर रॉजर लमले यांनीं, लेडी लमले व मिस लमले यांच्यासमवेत, ता. २९ सप्टेंबर सन १९४१ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांच्या विनंतीनुसार भोरास भेट दिली. त्यांचे मिलिटरी सेक्रेटरी मि. पॉक हेही त्यांच्याबरोबर आले होते. भोर येथें हिज हायनेस शंकरराव मॅन्शन्समध्यें त्यांचा मुक्काम होता. भोरास आल्याबरोबर श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांचें स्वागत करून युवराज श्री. भाऊसाहेब, राजकुमार श्री. रावसाहेब व दरबारचे ऑफिसर्स यांची त्यांना ओळख करून दिली.

दुपारीं १२-३० वाजतां नेक नामदार यांच्या स्वागतार्थ श्रीराममंडपांत दरबार भरविण्यांत आला होता. दरबारांत श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून त्यांचें स्वागत केलें व भोरास भेट दिल्याबद्दल त्यांचे आभार मानले. नेक नामदार साहेबांनीं समयोचित शब्दांत उत्तर दिलें.

नंतर हारतुरे, अत्तर, गुलाब, वांटण्यांत आल्यावर, पानसुपारी होऊन दरबार समाप्त झाला.

लंच झाल्यावर नेक नामदार साहेब श्रीमंत राजेसाहेबांचा निरोप घेऊन सुमारें २-३० वाजतां निघून पुण्यास परत गेले.

## कुरुंदवाड संस्थानाधिपतींची भोरास भेट

श्रीमंत चिंतामणराव भालचंद्र ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन यांचा राज्यारोहण समारंभ कुरुंदवाड येथें ता. ३० सप्टेंबर सन १९४१ रोजीं मोठ्या

थाटानें साजरा झाला. त्यानंतर, ता. ४ आक्टोबर रोजीं त्यांनीं भोरास भेट दिली. राज्यारोहणानंतर ते प्रथमच भोरास आले असल्यामुळें, गार्ड ऑफ ऑनरची सलामी देऊन त्यांचें स्वागत करण्यांत आलें. दरबार हॉलमध्यें त्यांच्या आगमनाप्रीत्यर्थ दरबार भरविण्यांत आला. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांचें स्वागत करून अभिनंदन केलें. नंतर श्रीमंत राजेसाहेबांनीं सर टी. माधवराव यांचें " हिज हायनेस महाराजासाहेब, बडोदें, यांना उपदेश " हें पुस्तक श्री. बाळासाहेबांना भेट म्हणून दिलें. पानसुपारी, अत्तर, गुलाब वाटण्यांत आल्यावर, दरबार समाप्त झाला. नंतर चहापान झालें; व श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज व श्री. चीफसाहेब कुरुंदवाड हे पुण्यास परत गेले.

## ले. क. सी. जी. एन्. एडवर्डस, रेसिडेन्ट, कोल्हापूर, यांची भोरास भेट

ले. क. पी. गेसफोर्ड यांची बदली होऊन त्यांच्या जागीं नवीन आलेले रेसिडेन्ट, ले. क. सी. जी. एन. एडवर्डस् यांनीं, मिसेस एडवर्डस् व सेक्रेटरी कॅ. बाझलगेट व मिसेस बाझलगेट यांच्यासह, ता. १३ माहे फेब्रुवारी १९४३ रोजीं भोरास भेट दिली. या त्यांच्या प्रथम भेटीनिमित्त दरबार भरविण्यांत येऊन, दरबारांतील स्वागताच्या भाषणांत रु. ३००० तीन हजार वॉर फंडास देण्याचें श्रीमंत राजेसाहेबांनीं जाहीर केलें. याच वेळीं भोर म्युनिसिपालिटीनें त्यांना मानपत्र दिलें. त्यास साहेबबहाद्दुरांनीं उत्तर दिलें. नंतर म्युझियम, लायब्ररी, तसेंच किंग जॉर्ज दि फिफ्थ सिल्व्हर जुबिली हॉस्पिटल, या संस्थांस त्यांनीं भेट दिली. राजा रघुनाथराव हायस्कूल व ह. हा. जिजीसाहेब मराठी स्कूल, या शिक्षणसंस्थांना त्यानंतर त्यांनीं भेटी दिल्या. हायस्कूलमध्यें नेहमींप्रमाणें शाळाधिकारी यांनीं शिक्षणाचा अहवाल वाचल्यानंतर, साहेबबहाद्दुरांनीं उत्तर दिलें. मिसेस एडवर्डस् यांनीं बक्षिसें व खाऊ मुलांना वाटला. तेथून जातांना वाटेंत श्री. सौ. गंगुताईसाहेब वाचनालय संस्थेस त्यांनीं भेट दिली. नंतर भाटघर धरण पाहिलें. अंबवडें येथील श्रीशंकराजी नारायण यांच्या समाधीचें दर्शन घेतलें. त्या वेळीं भोर येथें त्यांचा ३ दिवस मुक्काम झाला. दरबारांतील भाषणांत श्रीमंतांच्या प्रगत राज्यकारभाराबद्दल आणि म्युनिसिपालिटीनें केलेल्या सुधारणे-

चित्रांक ३२



ले. क. सी. जी. एन्. एडवर्डस्, रेसिडेंट यांची भोरास भेट, ता. १४।४।४४

[ सं. पा. १३३

बद्दल त्यांनीं प्रशंसापर उद्गार काढले. तसेंच, युद्ध साहाय्यार्थ रु. ३००० तीन हजार दिल्याबद्दल श्रीमंतांचे आभार मानले.

## दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेन्ट ले. क. सी. जी. एन्. एडवर्डस् यांचें भोरास दुसऱ्यांदा आगमन

कोल्हापूर येथील दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेन्ट ले. क. सी. जी. एन्. एडवर्डस् यांनीं, मिसेस एडवर्डस् व सेक्रेटरी मि. रॉडरिक पार्कस् यांच्यासह, ता. १३-४-१९४४ रोजीं भोरास दुसरी भेट दिली. भोरास त्यांचा मुक्काम तीन दिवस झाला. ता. १४ रोजीं भोर संस्थानच्या पोलीसचे स्पोर्ट्स परेड ग्राउंडवर झाले, ते पाहून त्यांनीं समाधान व्यक्त केलें व यशस्वी खेळाडूंना मिसेस एडवर्ड्स यांनीं बक्षिसें वाटलीं. याच दिवशीं सायंकाळीं ५ वाजतां राजवाड्यांत भरविण्यांत आलेल्या दरबारांत श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून युद्धसाह्यार्थ रु. २००० दोन हजारांची देणगी जाहीर केली. साहेबबहाद्दुरांनीं देणगीबद्दल समाधान व्यक्त केलें. ते म्हणाले:—

"For these reasons I am particularly glad to receive today the Raja Saheb's further contribution of Rs. 2000/- to His Excellency the Viceroy's War Purposes Fund; and I shall have pleasure in forwarding it to His Excellency.

"It is gratifying to hear that your Superintendent of Police, Rao Saheb Paithankar, succeeded in detecting a serious dacoity case at Survad village in the Rajgadh Taluka and, further to learn that this excellent result was made possible by the prompt report from the Mamlatdar of Rajgadh. I congratulate both these officers. In these troubled times it is of paramount importance for a State to possess an efficient and contented police force. I am happy to be able to say in this Darbar, Raja Saheb, that you are fully alive to the importance of this. In 1942, at the suggestion of my Police Adviser, you reduced the number of your police force by 62 men and effected some improvement in the scales of pay of the remaining personnel. Recently too, you have introduced dearness allowance for your police force; and I need hardly say that, expenditure of this kind represents money well spent. I think,

however, that the improvements do not yet go far enough; and I feel very strongly that, unless scales of pay and dearness allowance for the police in the Deccan States are made to approximate to similar scales in the Deccan districts of the Bombay Province, the recruitment of suitable personnel is bound to present difficulties and ultimately produce a loss in efficiency."

त्यानंतर, संस्थानचे अॅ. दिवाण रावसाहेब विनायक गोविंद रानडे, एम.ए., एल्‌एल्‌.बी. यांना हिंदुस्थान सरकारकडून देण्यांत आलेल्या 'रावसाहेब' या पदवीची सनद व पदक साहेब बहाद्दुरांनीं रावसाहेब रानडे यांस देऊन त्यांचें या दरबारांत अभिनंदन केलें. रात्रीं रामबागेंतील हि. हा. शंकरराव मॅन्शन्समध्यें साहेब बहाद्दुरांना थाटाची मेजवानी देण्यांत आली. ता. १५ रोजीं सकाळीं सुमारें १० वाजतां साहेबबहाद्दुर भोराहून निघून कोल्हापुरास परत गेले.

## साहित्यसम्राट् श्री. केळकर यांचा सत्कार

पुणें येथील प्रसिद्ध पुढारी साहित्यसम्राट् श्री. नरसिंह चिंतामण उर्फ तात्यासाहेब केळकर यांचा व श्रीमंत राजेसाहेबांचा परिचय फार जुना आहे. श्री. तात्यासाहेब केळकर यांचे कै. ज्येष्ठ बंधू श्रीमंत राजेसाहेबांचे शिक्षक होते. तेव्हांपासून, म्हणजे सन १८९७ इ. सालापासून, सुमारें ५० वर्षें पूर्वींचा स्नेह असल्यामुळें, श्री. तात्यासाहेबांच्या सल्लामसलतीचा वेळोवेळीं श्रीमंतांना फार उपयोग झालेला आहे. श्री. तात्यासाहेबांच्या वयास सत्तर वर्षें पूर्ण झालीं होतीं. यास्तव, श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. १२-६-१९४४ रोजीं भोर येथें श्री. तात्यासाहेबांना बोलावून व खास दरबार भरवून त्यांचा सत्कार केला. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं केलेलें भाषण व त्यास श्रीयुत तात्यासाहेबांनीं दिलेलें उत्तर हीं एकमेकांच्याविषयीं पूर्वायुष्यांतील अनेकविध प्रसंगांच्या आठवणींनीं भरलेलीं व स्नेहभावानें ओथंबलेलीं अशींच झालीं. श्रीमंत राजेसाहेबांचें श्री. तात्यासाहेबांविषयींचें प्रेम व आदर इतकीं उत्कट आहेत कीं, त्यानंतर संस्थानच्या कार्यकारी मंडळाची पुनर्घटना श्रीमंत राजेसाहेबांनीं करून, त्याच्या अध्यक्षपदीं श्री. तात्यासाहेबांची योजना करून संस्थानचा राज्यकारभार कांहीं दिवस त्यांच्या सल्ल्यानुसार चालविला होता. तत्पूर्वींही वेळोवेळीं श्री. तात्यासाहेबांचा सल्ला श्री. राजेसाहेब

चित्रांक ३२



साहित्यसम्राट् न. चिं. केळकर यांचा, यांच्या वयास ७० वर्षे पुरीं झाल्याबद्दल, मोर येथें सत्कार, ता. १२।६।४४ इ. [ सं. पा. १३४

घेत होतेच. परंतु, त्यांच्या बाहेरच्या सर्व व विविध कार्यांपासूनच्या निवृत्तीचा फायदा घेऊन, त्यांच्या स्नेहरूप सल्ल्याचा चिरस्थायी उपयोग आपणांस व्हावा या दृष्टीनें, राज्याची धुरा श्री. तात्यासाहेबांच्याकडे सोपविण्यांत श्रीमंत राजेसाहेबांनीं आपलें दूरदर्शित्वच व्यक्त केलें. श्री. तात्यासाहेब यांनींही तितक्याच प्रेमानें व आपुलकीच्या भावनेनें राज्यकारभार चालविण्याचें धोरण ठेविलें. उभयतांसही ही गोष्ट अत्यंत भूषणावह झाली आहे. श्री. राजेसाहेब यांनीं केलेल्या भाषणांतील उतारा परिशिष्टांत नं. ८ ठिकाणीं दिला आहे.

## डॉक्टर भडकमकर यांचा सत्कार

'आधुनिक अश्विनीकुमार' अशी पदवी पावलेले महाराष्ट्रांतील नामवंत डॉक्टर रामकृष्ण हरी भडकमकर, एम्.डी. यांचा व श्रीमंत राजेसाहेबांचा परिचय बराच जुना आहे. श्रीमंत राजेसाहेबांचें अंतर्गळाचें ऑपरेशन व त्यानंतरचा त्यांचा दीर्घकालीन आजार, यांमध्यें डॉक्टरसाहेबांच्या विद्येचा चिरस्मरणीय उपयोग झाला. तेव्हांपासूनच डॉ. भडकमकर यांच्या विषयींचा श्रीमंतांचा आदर द्विगुणित झाला. ऑपरेशन व तदनुषंगिक आजार, या प्रसंगीं डॉ. भडकमकर यांनीं घेतलेल्या श्रमाचा योग्य मोबदला श्रीमंतांनीं त्या वेळींच त्यांना दिला. परंतु, त्यांच्याविषयींचा आदरभाव सतत वाढत राहिला. त्यांच्याविषयीं वाटणारा हा आदर त्यांना ता. १६ जून १९४४ रोजीं भोर येथें बोलावून दरबारांत त्यांचा सत्कार करून श्रीमंत राजेसाहेबांनीं व्यक्त केला. या निमित्तानें श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांना रु. १०००/– एक हजाराचा आहेर ( चांदीचें ताट, फ्लॉवर पॉट, पोषाख इत्यादि रूपानें ) केला. श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या भाषणांत त्यांच्या कार्याचा गौरवपूर्वक उल्लेख करून, त्यांना सुयश चिंतिलें. डॉ. भडकमकरांनीं यथोचित भाषण करून श्रीमंत यांचे आभार मानले. 'गुणी गुणं वेत्ति' गुणी मनुष्यच सद्गुणाची किंमत जाणतो.

## सर जॉन कॉलव्हिल यांचें भोरास आगमन

ता. १६-१०-१९४४

मुंबईप्रांताधिपति सर जॉन कॉलव्हिल, जी. सी. आय. ई., टी. डी., आपल्या पत्नी लेडी कॉलव्हिल व कन्या मिस कॉलव्हिल यांच्यासमवेत, ता. १६-१०-१९४४ रोजीं भोरास आले होते. रामबागेंतील संस्थानी अतिथि-

गृहांत, हि. हा. शंकरराव मॅन्शन्समध्यें, त्यांची राहण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. ११-३० वाजतां आगमनोत्तर त्यांचें यथोचित स्वागत श्रीमंत राजेसाहेब यांनीं केल्यानंतर, नेकनामदार यांचें, पत्नी व कन्या यांसह ते गजारूढ असलेल्या स्थितींत, छायाचित्र घेण्यांत आलें. नेक नामदारसाहेबांचे मिलिटरी सेक्रेटरी कर्नल पॉक, मिसेस पॉक व ए.डी.सी. द्वय यांचेंहि अंबारिस्थ असें छायाचित्र घेतल्यावर, श्रीमंत राजेसाहेब राजवाडयांत परत आले. नेक नामदार साहेबांच्या आगमनार्थ राजवाडयांत श्रीराममंडपांत दरबार भरवून श्री. राजे-साहेबांनीं त्यांचें अत्यादरपूर्वक स्वागत केलें. त्यास नेक नामदार यांनीं समयोचित उत्तर देऊन, भोर संस्थान व मुंबई सरकार यांचे स्नेहाचे संबंध पूर्वीप्रमाणेंच वृद्धिंगत व्हावेत अशी इच्छा प्रदर्शित करून, स्वागताबद्दल श्री. राजेसाहेबांचे आभार मानले. तें भाषण खालीं दिलें आहे.

## Extract of the speech of H. E. the Governor Sir John Colville at the time of his visit to Bhor on 16th Oct. 1944

" I am proud to hear, Rajasaheb, of your noteworthy record of the State's relations with His Majesty's Goverment in India, and of the fine contribution which Bhor has made to the War efforts. I note, too, your firm assurance that the Bhor Darbar will continue this support till victory has been won.

" I have heard with pleasure your remarks about the State's co-operation with my Government in the irrigation schemes, in particular, the Llody Dam, and in our Abkari policy; and I assure you that my Government will not fail to take full advantage of this co-operation in post-war reconstruction schemes, especially those relating to irrigation and co-operation, both in planning and execution, between my Province and the neighbouring States, and the co-operation which you, Raja Saheb, have so willingly and readily offered, will be gladly availed of, and I can assure you that my Government warmly appreciate it.

चित्रांक ३४



डॉ. रामकृष्ण हरि भडकमकर यांचा, यांच्या वयास ६० वर्षे पुरीं झाल्याबद्दल भोर येथें सत्कार. ता. १६।६।४४ इ. [सं. पा. १३५

चित्रांक ३५



सर जॉन कॉलव्हिल, मुंबईचे गव्हर्नर, यांची भोरास भेट, ता. १६।१०।४४ इ.

[ सं. पा. १३६

" I am glad to know of the enlightened and progressive policy of the Bhor Darbar in the improvement of social and economic condition. This is the aim of all good government, and I look forward to the period, after victory over our enemies has been won, when we can devote ourselves wholeheartedly to the great tasks of development which lie ahead of us.

" But, victory has not been won, and until then our primary duty is to provide the sinews of war, and in particular to maintain the strength of our armed forces. I hope, therefore, Raja Saheb, that everything, which the Bhor Darbar can do will be done to stimulate and help on recruiting to His Majesty the King-Emperor's forces. "

दरबारनंतर, शंकरराव मॅन्शन्समध्यें लंच घेतल्यावर, श्रीमंत राजेसाहेबांचा निरोप घेऊन नेक नामदारसाहेब आपल्याबरोबरच्या मंडळींसह पुण्यास परत गेले.

## रेसिडेन्ट थॉम्सन यांची भोरास भेट

ता. १७-१०-१९४४

कोल्हापूर व दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेन्ट मि. जे. एच. थॉम्सन, आय.सी.एस., यांनीं ता. १७-१०-४४ रोजीं भोरास भेट दिली. ता. २०-१०-४४ इ. पर्यंत त्यांचा मुक्काम भोरास होता. ता. १७ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां राजवाडयांत दरबार भरवून श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांचें हार्दिक स्वागत केलें. या दरबारांत भोर शहर नगरपालिकेनें त्यांना मानपत्र अर्पण केलें. श्रीमंतांच्या स्वागतपर भाषणास व नगरपालिकेच्या मानपत्रास समयोचित उत्तर देऊन मे. रेसिडेंट यांनीं श्रीमंत राजेसाहेबांचे आभार मानले व नगरपालिकेनें केलेल्या सुधारणांचा गौरवपूर्वक उल्लेख केला. दरबार आटोपल्यानंतर, रामबागेंत परत जातांना रेसिडेन्टसाहेब यांना, किंग जॉर्ज दी फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल व कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय, या संस्था दाखविण्यांत आल्या. रात्रीं हि. हा. शंकरराव मॅन्शन्समध्यें त्यांना श्री. राजेसाहेबांनीं मेजवानी ( डिनर पार्टी ) दिली. ता. १८ रोजीं सकाळीं ८-३० वाजतां परेड ग्राउंडवर स्वार, शिबंदी व पोलीस यांचे खेळ (पोलीस स्पोर्ट्स) रेसिडेन्टसाहेबांना

करून दाखविण्यांत आले. यशस्वी खेळाडूंना त्यांच्या हस्तें बक्षिसें दिलीं. नंतर १० वाजतां आंबवडें येथील श्री. शंकराजी नारायण यांची समाधि, झुलता पूल, इत्यादि त्यांनीं पाहिले. दुपारीं त्यांनीं श्रीमंत राजेसाहेब यांना खाजगी भेट ( Private visit ) दिली. सायंकाळीं ५ वाजतां भाटघर धरण पाहिल्यानंतर, धरणाच्या उत्तर टोंकाच्या मेमोरियल बिल्डिंगमध्यें त्यांचें चहापान झालें. नंतर पावर हाउस पाहून, ते भोरास परत आले. ता. २०-१०-४४ रोजीं तिसऱ्या प्रहरीं रेसिडेन्टसाहेब पुण्यास गेले.

## रेसिडेन्ट ले. क. हार्वे यांची भोरास भेट

दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेन्ट ले. क. हार्वे, ओ.बी.ई., एम.सी. यांनीं ता. ५ जून १९४५ रोजीं भोरास भेट दिली. ता. ८ पर्यंत भोर येथें त्यांचा मुक्काम झाला. श्रीमंत राजेसाहेबांनीं हि. हा. शंकरराव मॅन्शन्समध्यें त्यांचें स्वागत केलें. याच दिवशीं मुंबई विद्यापीठाच्या प्रवेश परीक्षेचा निकाल लागला, त्यांत श्रीमंतांची नात श्री. राजकुमारी विमलाराजे या उत्तीर्ण झाल्याचें वृत्त नुकतेंच समजल्यामुळें, त्यांना बरोबर आणून श्री. राजेसाहेबांनीं त्यांची रेसिडेन्ट-साहेबांना ओळख करून दिली. ता. ६ रोजीं सकाळीं रेसिडेन्टसाहेबांनीं संस्थानच्या पोलीस, स्वार व शिबंदी यांची पाहणी केली. भोर येथें झालेल्या खुनाच्या तपास-कामांत ज्या पोलीस ऑफिसर्सनीं व लोकांनीं चातुर्य दाखविलें, त्यांना रेसिडेन्टसाहेबांच्या हस्तें बक्षिसें देण्यांत आलीं. नंतर, पोलिसांनीं केलेले खेळ त्यांनीं पाहिले व यशस्वी खेळाडूंना बक्षिसें दिलीं. परेड ग्राउंडवरून परत रामबागेंत येतांना, त्यांनीं तुरुंग पाहून कैद्यांची विचारपूस केली. दुपारीं २-३० वाजतां श्रीमंत राजेसाहेबांची रेसिडेन्टसाहेबांबरोबर खाजगी भेट झाली. सायंकाळीं ५-३० वाजतां भाटघरास जातांना, राजा रघुनाथराव हायस्कूल त्यांना दाख-विण्यांत आलें. पुढें, तंबूचा कारखाना व कापडाच्या गिरण्या याही त्यांनीं पाहिल्या. भाटघर येथें मेमोरिअल बिल्डिंगमध्यें नंतर चहापान झालें. रा. ब. जोशी, एक्झिक्यूटिव्ह एंजिनिअर, यांनीं भाटघर धरण, पावर हाउस इत्यादि रेसिडेन्टसाहेबांना दाखविलें.

चित्रांक ३६



ले. क. हार्वे, रेसिडेंट, यांची भोरास भेट, ता. ७।६।४५ इ. [ सं. पा. ११८

# प्रकरण ११ वें

# संस्थानांतील समारंभ

## हलव्याचें प्रदर्शन

भोर येथें नुकत्याच स्थापन करण्यांत आलेल्या महिला मंडळाच्या विद्यमानें मकरसंक्रमणानिमित्त हलव्याच्या जिनसांचें प्रदर्शन भोर येथें श्री. सौ. गंगूताई-साहेब पंतसचिव वाचनालयाच्या दिवाणखान्यांत भरविण्यांत आलें होतें. या प्रदर्शनाचा उद्‌घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांनीं ता. २५ जानेवारी सन १९४० रोजीं केला. महिला मंडळाच्या संचालिका सौ. मालतीबाई देवधर व सौ. चंद्रिकाबाई दबडघाव यांच्या सतत परिश्रमाचें व सामाजिक कार्यलालसेचें द्योतक असेंच हें प्रदर्शन होतें. तें उघडतांना केलेल्या भाषणांत श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्त्रीसमाजास प्रोत्साहन देण्याच्या हेतूनें चालकांचा गौरवपूर्वक उल्लेख करून त्यांच्या कार्यास मदत म्हणून रु. ५१ एकावन व बक्षिसें देण्याकरितां रु. ५० पन्नास याप्रमाणें देणगी दिली; आणि प्रदर्शनांत मांडलेल्या वस्तू फारच उत्कृष्ट प्रकारच्या व कलापूर्ण असल्याबद्दल स्पष्ट शब्दांत प्रशंसोद्गार काढले. भाषण परिशिष्टांत नं. ९ ठिकाणीं दिलें आहे.

## श्रीराम क्रीडा-भुवनाचा रौप्यमहोत्सव

भोर येथें श्रीराम-क्रीडाभुवन ऊर्फ टेनिस क्लब स्थापन झाल्यास सन १९४० मध्यें २५ वर्षें पूर्ण झालीं. संस्थेच्या चालकांनीं भुवनाचा रौप्यमहोत्सव समारंभ ता. १६ एप्रिल १९४० रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षते-खालीं साजरा केला. हा समारंभ टेनिस कोर्टाच्या आवारांत करण्यांत आला. या वेळीं क्लबचे असलेले एक प्रमुख सभासद व भोरचे तेव्हांचे कलेक्टर मि. शंकर सखाराम काळे यांनीं भाषण करून श्रीमंतांचें स्वागत केलें. नंतर, कांहीं वेळ टेनिस खेळणें झालें. त्यांत श्रीमंत राजकुमार बापूसाहेब व श्री. रावसाहेब यांनीं कांहीं वेळ भाग घेतला होता. नंतर, श्री. फडणीस वकील यांनीं संस्थेचा २५ वर्षांचा अहवाल वाचून दाखविला. ज्युबिली-समारंभानिमित्त त्यापूर्वीं नुकत्याच टेनिस टूर्नामेन्ट्स करण्यांत आल्या होत्या. त्यांचे निकाल रा. रा. परांजपे मास्तर

यांनीं जाहीर केले. यशस्वी खेळाडूंना श्रीमंतांच्या हस्तें बक्षिसें देण्यांत आल्यावर, श्रीमंतांनीं भाषण केलें. त्यांतील उतारा परिशिष्टांत नं. १० ठिकाणीं दिला आहे.

## राष्ट्रीय सेविका समितीचा वार्षिक उत्सव

भोर येथील राष्ट्रीय सेविका समितीचा वार्षिक उत्सव राजा रघुनाथराव हायस्कूलच्या क्रीडांगणावर ता. २७ ऑगस्ट सन १९४१ रोजीं साजरा करण्यांत आला. या समारंभाचें अध्यक्षस्थान श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वीकारलें होतें. संस्थेच्या चालिका सौ. चंद्रिकाबाई दबडघाव यांनीं भाषण करून श्रीमंतांचें स्वागत केलें. नंतर, श्रीमंतांनीं समितीच्या कार्यास उद्देशून चार उत्तेजनाचे शब्द सांगितले. तें भाषण उद्बोधक असल्यामुळें परिशिष्टांत नं. ११ ठिकाणीं दिलें आहे. समितीस भगवा झेंडा दिला. समितीच्या चालकांच्या विनंतीवरून श्रीमंत राजेसाहेबांनीं समितीचें नांव कै. श्री. सौ. लक्ष्मीबाई राणीसाहेबांचे स्मरणार्थ, " राणी लक्ष्मीबाई सेविका समिति " असें ठेविलें व झेंडा उभारला. नंतर, झेंडावंदन करून, समितींतील मुलींनीं लेजीम, ड्रिल वगैरे खेळ खेळून दाखविले. श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. ५० पन्नासची समितीस देणगी दिली.

## सामक सत्कार-समारंभ

भोर हायस्कूलचे हेडमास्तर व संस्थानचे शाळाधिकारी गुरुवर्य विष्णु केशव सामक, बी.ए. यांनीं जवळजवळ तीन तपें अध्यापनकार्य उत्कृष्टपणें केलें. त्यांच्या हाताखालीं शिक्षण घेऊन तयार झालेला, नांवारूपास आलेला आणि योग्यतेस चढलेला त्यांचा छात्रवर्ग संस्थानांत व संस्थानाबाहेर बऱ्याच मोठ्या प्रमाणांत आहे. या सर्व विद्यार्थ्यांनीं गुरुवर्य सामक यांच्याविषयीं व त्यांनीं चालविलेल्या कार्याविषयीं त्यांना वाटणारा आदर त्यांचा सत्कार फार मोठ्या प्रमाणावर ता. ११ माहे जून १९४४ रोजीं करून व्यक्त केला. या सत्काराच्या निमित्तानें सर्व विद्यार्थ्यांनीं वर्गणी जमवून गुरुवर्य सामक यांना रु. १००० एक हजाराची थैली अर्पण केली. श्रीमंत राजेसाहेबांनीं श्री. युवराज भाऊसाहेब यांच्या हस्तें रा. सामक यांचा या प्रसंगीं रु. २०० चा आहेर ( शेला, पागोटें व चांदीचा सेट ) देऊन गौरव केला. या समारंभाचें अध्यक्षस्थान सर्व विद्यार्थ्यांच्या विनंतीस मान देऊन श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वीकारलें होतें; त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत सामक यांच्या कार्याबद्दल धन्योद्गार काढले. या समारंभाची

चित्रांक ३७



आदिवासी परिषदेचें पालीजवळील दापोडें गांवीं भरलेलें ५ वें अधिवेशन. [ सं. पा. १४१

हकीकत श्रीमंत राजेसाहेबांच्या या चरित्रांत विशेषत्वानें लोकांच्या नजरेस येण्यासारखी आहे. कारण, रा. सामक हे भोर संस्थानचे रहिवासी, संस्थानांतील इनामदार आणि त्याहीपेक्षां उल्लेख करण्याची गोष्ट म्हणजे श्रीमंत राजेसाहेबांचे नोकर. नोकराचा धन्यानें गौरव केल्याचीं उदाहरणें फार क्वचितच सांपडतात. रा. सामक नोकर असले, तरी त्यांनीं केलेलें अध्यापन कार्य ध्यानीं घेऊन व सत्कार-समारंभाचें अध्यक्षपद स्वीकारून राजेसाहेबांनीं त्यांचा गौरव करण्यांत इतरांना अनुकरणीय उदाहरण घालून दिलें, ही गोष्ट कौतुकास्पद नाहीं असें कोण म्हणेल ?

## श्रीमंत राजेसाहेबांची सुधागड तालुक्यास भेट

श्रीमंत राजेसाहेब यांच्या अंगीं उत्कट प्रजावात्सल्य असल्यानें, सुधागड तालुक्यांतील कार्यकर्त्यांनीं आग्रहाची विनंति केल्यावरून, श्रीमंत ता. १६ नोव्हेंबर १९४६ रोजीं दुपारीं पुण्याहून निघून संध्याकाळीं पालीस पोहोंचले. दुसऱ्या दिवशीं ता. १७ नोव्हेंबर १९४६ रोजीं सकाळीं सुधागड तालुक्यांतील आदिवासींच्या उन्नतीप्रीत्यर्थ झटणाऱ्यांचें कार्य प्रत्यक्ष पाहावें, म्हणून पालीपासून नजीक असलेल्या दापोडें गांवच्या टेकडीच्या माथ्यावरील कातकरी लोकांच्या वस्तींत मुद्दाम भरविलेल्या सुधागड तालुका आदिवासी सेवामंडळाच्या अधिवेशनासाठीं श्रीमंतांची स्वारी गेली. त्या समारंभासाठीं मुंबई प्रांताचे अर्थमंत्री ना. वैकुंठभाई मेहता, अध्यक्ष म्हणून, आले होते. यथोचित श्रीमंतांचें स्वागत-कार्य ( यांत विशेष उल्लेख करण्यासारखी गोष्ट म्हणजे दोन तीनशें कातकऱ्यांनीं दिलेली मानाची सलामी व त्यांचा नाच ही होय ) झाल्यावर, श्रीमंतांनीं छोटेंसें भाषण करून आदिवासी सेवा-मंडळाच्या कार्यास वैयक्तिक रु. २०० दोनशें रुपयांची देणगी दिली. त्यांचें भाषण खालीं दिलें आहे.

## श्रीमंतांचें भाषण

श्रीयुत वैकुंठलालभाई, श्री. वांद्रेकर व उपस्थित प्रजाजनहो,

आपण आज येथें एकत्र जमल्याचें पाहून आम्हास परम संतोष वाटत आहे. हल्लींच्या काळीं प्रत्येक माणसाला त्याचें योग्य तें स्थान मिळालेंच पाहिजे. अज्ञानामुळें व अशिक्षितपणामुळें अगर इतर अन्य कारणानें कांहीं लोकांची परिस्थिति नीट नसल्यानें, ती सुधारण्याकडे लक्ष सत्वर देणें न्यायाचें नाहीं,

असें कोण म्हणेल ? आम्हाला स्वत:ला आमचे सर्व प्रजाजन सारखेच आहेत. गरीब, श्रीमंत, अशिक्षित, सुशिक्षित–तो कसाहि असला, तरी तो आमचा राजनिष्ठ प्रजाजन असेल, तर तो केव्हांहि आम्हाला प्रियच राहणार.

आजच्या समारंभाला श्रीयुत तपासे हे आयत्या वेळीं हजर राहूं न शकल्यानें, त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ आपणांस होणार नाहीं. पण, आम्हांस खात्री आहे कीं, श्रीयुत तपासे हे ह्या कार्याला जरूर तें मार्गदर्शन व साहाय्य करतील.

आदिवासी म्हटल्या जाणाऱ्या वन्य जाती–उदाहरणार्थ, कातकरी, ठाकूर वगैरे-यांची सुधारणा व्हावी अशी आमची मनापासूनची इच्छा असल्यानें, यंदाच्या-सालीं प्रथमारंभ म्हणून पांचशें ५०० रुपयांची तरतूद बजेटमध्यें आम्हीं केली आहे; व रा. वांद्रेकर यांच्या साहाय्यानें काय करणें जरूर आहे, याबद्दल आमच्या कारभारी-मंडळानें विचारही केला आहे. कारभारी मंडळानें ज्या गोष्टींबद्दल विचार केला, त्यांपैकीं प्रमुख गोष्ट म्हणजे कातकरी व जंगल कंत्राटदार यांच्या आपसांतील व्यवहारावर विशिष्ट नियंत्रण घालणें, ही होय. कातकऱ्यांचा धंदा जंगल-तोड व कोळसे करणें हा असल्यानें, त्यांना जंगल-कंत्राटदारांकडून कामाचा योग्य मुशाहिरा मिळावा; व त्यांच्यावर अन्याय्य दडपण आणणें अगर अशाच तऱ्हेचे अन्य प्रकार न व्हावे, म्हणून ब्रिटिश हद्दींत याबाबत ज्या योजना अंगीकारल्या आहेत, त्याच सर्वसाधारणपणें येथेंहि यंदाच्या सालापासून अंमलांत आणण्याचें ठरविलें आहे.

आजचे सन्माननीय मंत्री श्रीयुत वैकुंठलालभाई ह्यांचें मार्गदर्शन आपणाला लाभलें आहे, ही पण भाग्याची व आनंदाची गोष्ट आहे; त्यांच्या व रा. वांद्रेकर यांच्या अनुभवाचा फायदा पूर्णत्वानें आपण करून घ्याल अशी उमेद आहे. त्याचप्रमाणें आम्ही अशी इच्छा प्रदर्शित करतों कीं, ज्या ज्या वेळीं आपणाला जरूरी लागेल, त्या त्या वेळीं श्रीयुत वांद्रेकर हे आपणास जरूर तें साहाय्य करतील; तसेंच, श्रीयुत तपासे यांच्याकडून ज्या उपयुक्त सूचना येतील, त्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार आमचें कारभारी मंडळ करील असें आम्ही सांगतों.

आजच्या प्रसंगीं आम्हीं रुपये दोनशें २०० ची देणगी आदिवासी यांच्या सुधारणेच्या कामासाठीं जाहीर करतों.

---

चित्रांक ३८



श्रीमंतांच्या अध्यक्षतेखालीं शिरवळजवळ ‘ शिंगरे रुग्णालया’चें उद्घाटन ता. २।३।४७ इ.        [ सं. पा. १४६

ह्या जंगलांतील प्रजाजनांना इतक्या जवळून आपला राजा पाहण्यास मिळाला व त्यांच्या तोंडून प्रत्यक्ष निघालेले प्रजावात्सल्याचे शब्द ऐकावयास मिळाले, यामुळें कातकरी, ठाकूर वगैरे जमलेल्या सर्वांना विशेषच आनंद झाला.

याच दिवशीं दुपारीं पाली गांवीं सरकारी बँक उघडण्याचा समारंभ श्रीमंतांच्या अध्यक्षतेखालीं झाला. या प्रसंगीं ना. वैकुंठभाई मेहेता हे मुख्य वक्ते म्हणून हजर होते. श्रीमंत राजेसाहेब व नामदार मंत्री मेहेता यांचीं समयोचित भाषणें झालीं. या समारंभाच्या वेळीं पाऊस आल्यानें समारंभाचा जरा विरस झाला. तरीपण, राजेसाहेब यांनीं पाऊस पडत असूनहि समारंभ पूर्णपणें पार पडेपर्यंत बसून आपली प्रखर कर्तव्यनिष्ठा व सहनशीलता व्यक्त केली.

" आपणांपुढें बरेंच काम आहे, व आम्हालाहि इतर जरूरीचीं कामें असल्यानें, आम्ही श्रीयुत वैकुंठलालभाई व श्रीयुत वांद्रेकर ह्यांचें हार्दिक स्वागत करून व आपल्या सभेच्या कामाला सुयश चिंतून आपली रजा घेतों."

असें आपल्या भाषणाच्या शेवटीं म्हणून श्रीमंत तेथून गेले.

सोमवार ता. १८ नोव्हेंबर १९४६ रोजीं पावसाची सतत धार लागली असूनही ' पाली-सिद्धेश्वर ' रस्त्याचा प्रारंभ म्हणून योजलेला समारंभ श्रीमंतांनीं अत्यंत निष्ठेनें उरकला. सिद्धेश्वर व पाली यांच्या दरम्यान मुद्दाम उभारलेल्या मंडपांत श्रीमंतांचें स्वागत केलें गेल्यावर, श्रीमंतांनीं भाषण करून थोडक्या शब्दांत त्या रस्त्याचें महत्त्व किती आहे, वगैरे गोष्टींचा उल्लेख केला. पावसाची झड लागली असूनही लोकांची चिकार गर्दी झाली होती. श्रीमंतांची स्वारी अगदीं अक्षरशः भिजत होती; पण, योजलेला सर्व कार्यक्रम पार पडेपर्यंत त्यांनीं यत्किंचितही घाई केलीं नाहीं. समारंभ आटोपून श्रीमंतांची स्वारी निघतांना ज्याच्या त्याच्या तोंडीं आपल्या राजाविषयीं वाटणारा आदर व प्रेम व्यक्त करणारे शब्द निघत होते.

दुपारीं, नेहमींप्रमाणें भोजनाचा कार्यक्रम उरकल्यावर, निरनिराळ्या लोकांचे हार वगैरे घेऊन श्रीमंतांची स्वारी दुपारीं ५ वाजतां पुण्यास परत जाण्यासाठीं पालीहून निघाली. वाटेंत शेतकरी संघातर्फेची पानसुपारी तिवरें गांवीं घेऊन, स्वारी पुढें निघाली. पाऊस पडतच होता. जांभूळपाड्याजवळील अंबा नदीला पाणी आल्यानें, नावेंतून श्रीमंतांची स्वारी पैल तीराला गेली.

नाणोसें नाक्यावर पानसुपारी घेऊन पुढें गेल्यावर तर पावसाचा जोर वाढत जाऊन त्यांतच वादळ आकस्मिक सुरू झालें. प्रत्येक क्षणीं पुढें जावें अगर कसें, हा विचार मनांत डोकावत होता. अखेरीस मुरकुटवाडीजवळील पुलावरून जोराचें पाणी जात असल्यानें, मोटार पलीकडे जाणें अशक्य आहे असें दिसून आल्यावर, श्रीमंतांची स्वारी नाइलाजास्तव परत फिरली. पण, वादळामुळें वाटेंत वृक्ष उन्मूळून पडलेले दूर करीत, कसें तरी काळोखांत परळी गांव गाठलें व तेथील एका गुजर व्यापाराच्या घरीं रात्रभर मुक्काम करून दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्रीमंतांची स्वारी पुण्यास परत गेली. ती मिट्ट काळोखी रात्र, तें भेडसावणारें वादळ व तो मुसळधार पाऊस, ह्यांची आठवण कदापि विसरली जाणार नाहीं, असाच तो काळ-प्रसंग होता. पण, प्रभू श्रीरामचंद्र-कृपेनें श्रीमंतांची स्वारी आपल्या परिवारासह सुखरूपपणें परत गेली, हें ऐकून सुधागड प्रजाजनांनाहि आनंद झाला.

वास्तविक त्या महिन्यांत असा मुसळधार पाऊस व राक्षसी वादळ होत नाहीं. पण, मुंबई प्रांतांत जवळजवळ सगळीकडेच त्या दिवशीं असाच जोराचा पाऊस व वादळ झाल्याचें वृत्त नंतर कळून आलें.

## पाली हायस्कूलच्या इमारतीचा व कौशिक क्रीडांगणाचा उद्घाटन-समारंभ

भोर संस्थान प्रजासभेच्या वार्षिक अधिवेशनास श्रीमंत राजेसाहेब गेल्या-वेळीं सुधागड एज्युकेशन सोसायटीच्या इंग्रजी शाळेच्या इमारतीचा व शाळेच्या क्रीडांगणाचा उद्घाटन-समारंभ त्यांनीं ता. २६-३-४७ रोजीं केला. प्रजासभेच्या अधिवेशनास संस्थानमधील सर्व कार्यकर्ते सहजच येणार व श्रीमंत राजेसाहेबही उपस्थित राहणार, या संधीचा योग्य असाच फायदा सोसायटीच्या चालकांनीं घेतला. शिक्षणासारख्या पवित्र कार्यास कोण नको म्हणणार? सुधागड एज्यु-केशन सोसायटी ही संस्था सुधागड तालुक्यांतील सुविद्य व निःस्वार्थी अशा चालकांच्या परिश्रमानें सुरू झालेली असून, ती संपूर्णपणें लोकाश्रयावर चालविलेली आहे. श्री. बापूसाहेब लिमये, श्री. दादासाहेब साने, रा. चिमणराव कुलकर्णी इत्यादि सद्गृहस्थांचे परिश्रमच ही संस्था सुरू करण्यास कारणीभूत झाले आहेत. सुरुवातीच्या बाल्यावस्थेंतून ती आतां युवावस्थेंत प्रवेश करूं लागली आहे.

चित्रांक ४



श्रीमंत राजेसाहेबांच्या कारकीर्दीचा बाविसावा राज्यारोहणदिन ता. १८।८।४४ इ. [ सं. पा. १४८

श्रीमंत राजेसाहेब यांनीं या संस्थेच्या बाल्यावस्थेपासूनच तिला आर्थिक मदत दिली आहे व दरसाल रु. १००० कायम देणगी ( ग्रँट ) आदल्या सालपासूनच सुरू केली होती. लोकांच्या परिश्रमानें सुरू झालेल्या अशा संस्थांकडे पाहण्याची श्रीमंत राजेसाहेबांची दृष्टि नेहमींच आपुलकीची असते; व ही संस्था तर भोर संस्थानच्या रयतेनें संस्थानांतच चालू केलेली. मग, तिच्याविषयीं कन्यातुल्य ममत्व राजेसाहेबांना कां न वाटावें ? संस्थेच्या चालकांनीं लोकाश्रयावर बांधलेल्या इमारतीचें उद्घाटन श्रीमंतांनीं मोठ्या आनंदानें केलें. या प्रसंगीं त्यांनीं काढलेल्या उद्गारांवरून त्यांची शिक्षण कार्याबद्दलची आस्था चांगल्या रीतीनें व्यक्त होत आहे.

ते म्हणाले:—

" शिक्षणासारख्या पवित्र कार्याला मदत करणें म्हणजे पर्यायानें ती ईशसेवाच करणें आहे. संपत्तीचा विनियोग शिक्षण, वैद्यकीय मदत, यांसारख्या मानवी जीविताच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त व पवित्र अशा कार्यांकडे झाला, तरच ती संपत्ति मिळविण्याचें सार्थक्य व श्रेय आहे. महाराष्ट्रांत उत्तम नांव-लौकिकाला पावलेल्या डेक्कन एज्युकेशन सोसायटी, शिक्षण प्रसारक मंडळी, वगैरेसारख्या शिक्षण संस्थांचा आदर्श या सुधागड शिक्षण संस्थेनें आपल्यापुढें ठेवला व त्याप्रमाणें तिचे चालक कार्य करीत राहिले, तर कार्यकर्त्यांच्या प्रयत्नाला सुयश आल्यावांचून राहणार नाहीं. दरबार दरसाल एक हजार रुपयांची ग्रँट शाळेच्या चालू खर्चासाठीं देत आहेच. तथापि, शिक्षण खातें हें आतां मंत्र्यांकडे दिलें असल्यानें, ते या संस्थेच्या गरजेकडे योग्य तें लक्ष देतीलच.

शाळेच्या उद्घाटनाबरोबरच त्यांनीं शाळेकरितां तयार करण्यांत आलेल्या क्रीडांगणाचाही उद्घाटनसमारंभ केला व त्याचें " कौशिक क्रीडांगण " हें नांव जाहीर केलें. बौद्धिक शिक्षणाच्या तरतुदीबरोबरच शारीरिक शिक्षणाची तरतूद करण्यांत संस्थेनें औचित्य दाखविल्याबद्दल त्यांनीं चालकांना धन्यवाद दिले. हें क्रीडांगण भोर संस्थानचे विख्यात प्रजाजन व बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेटचे ( संस्थापक व चालक ) मॅनेजिंग एजंट श्री. चंद्रशेखर गोविंद आगाशे यांनीं दिलेल्या उदार देणगींतून बांधण्यांत आलें आहे.

श्रीमती ठकूबाई प्रधान यांनीं आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ रु. ५००० पांच हजार रुपये देणगी दिल्यामुळें, इमारतीस " यशवंत भगवंत सुळे बिल्डिंग,"

श्री. गणेश बाळकृष्ण वडेर यांनीं रु. ५००० पांच हजार देणगी दिली, म्हणून त्याप्रीत्यर्थ " वडेर मिडल स्कूल " आणि क्रीडांगणाकरितां श्री. आगाशे यांनीं रु. १००० एक हजार दिल्यामुळें, त्यांच्या इच्छेप्रमाणें, " कौशिक क्रीडांगण " याप्रमाणें नामाभिधानें केलीं आहेत.

## शिंगरे रुग्णालयाचा उद्घाटन-समारंभ

भोर संस्थानचे माजी लोकनियुक्त मंत्री, श्री. मध्वराज व्यंकटेश शिंगरे, यांनीं संस्थानच्या विचित्रगड तालुक्यांतील शिरवळ गांवापासून पुणें-बंगलोर रस्त्यावर सुमारें २।। मैल अंतरावर स्वतःच्या बंगल्यांत सन १९४७ च्या मार्च महिन्यापासून रुग्णालय सुरू केलें. या शिंगरे रुग्णालयाचा उद्घाटन-समारंभ मुंबई प्रांताचे आरोग्यमंत्री ना. डी. डी. एम्. गिल्डर, एम्. डी. यांच्या हस्तें ता. २ मार्च १९४७ रोजीं झाला. या समारंभाचें अध्यक्षस्थान, श्री. शिंगरे यांनीं विनंति केल्यावरून, श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वीकारलें होतें. श्री. शिंगरे यांनीं कांहीं दिवस भोर संस्थानचे लोकनियुक्त मंत्री म्हणून काम केलें होतें. त्या वेळीं त्यांच्याकडे शिक्षण, आरोग्य इत्यादि लोकोपयोगी खातीं होतीं. महायुद्धाच्या ऐन भराच्या कालांत जिकडे तिकडे धान्य-टंचाई झाली. त्या वेळीं शिंगरे यांच्या पुतण्यानें भोर संस्थानला धान्य पुरविण्याचें काम संस्थानचे अधिकृत एजंट या नात्यानें केलें. या धान्य-एजन्सीच्या कामांत झालेल्या नफ्याचा विनियोग संस्थानच्या रयतेस औषधोपचार करण्याच्या महत्त्वाच्या कामाकडे करण्याचें शिंगरे यांनीं योजिलें व या परोपकाराच्या कृत्यांत सहभागी होण्यानें आपल्या प्रजेचेंच कल्याण होणार आहे ही गोष्ट ध्यानीं घेऊन, श्रीमंत राजेसाहेबांनीं उद्घाटन समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें औचित्य दाखवून, अशा लोकोपयोगी संस्थांबद्दलचें आपलें प्रेम व्यक्त केलें. या रुग्णालयांत तूर्त १५ रोग्यांची तेथेंच राहून औषधोपचार घेण्याची व बाळंतपणाची सोय करण्यांत आलेली आहे. औषधोपचार आयुर्वेदिक पद्धतीनें करण्याचें चालकांनीं ठरविलें आहे. पुणें येथील ख्यातनाम डॉ. जालनापूरकर, डॉ. साठे, डॉ. बेन्द्रे, रासने व बिडकर, इत्यादि डॉक्टरांचें साहाय्य व सल्ला या रुग्णालयास मिळणार आहे. डॉ. गिल्डर यांनीं आपल्या भाषणांत अशा तऱ्हेचीं रुग्णालयें ठिकठिकाणीं निघावींत व या रुग्णालयाची कीर्ति केवळ मुंबई प्रांतांतच नव्हे, तर अखिल हिंदुस्थानांत पसरावी अशी इच्छा व्यक्त केली.

चित्रांक ४१



श्रीछत्रपति शिवाजीमहाराज

श्रीमंत राजेसाहेब म्हणाले:—" सर्व तऱ्हेनें परिपूर्ण असें हॉस्पिटल काढणें सरकारला, विशेषत: लहान संस्थानच्या, शक्य नसतें. याकरितां, लोकोपयोगी संस्थांना जनतेचेंच साहाय्य मिळालें पाहिजे. आपल्या देशाच्या हवामानास आंग्ल औषधांपेक्षां आर्यवैद्यकी औषधेंच जास्त उपयोगी असून, आम्ही आर्य-वैद्यकीचे अभिमानी आहोंत. यापुढें आयुर्वेदास जास्त मानाचें स्थान प्राप्त होईल यांत शंका नाहीं. "

---

## प्रकरण १२ वें

# राज्यारोहण दिन-समारंभ

हि. हा. श्रीमंत राजेसाहेब हे ता. १८ ऑगष्ट सन १९२२ रोजीं गादीवर बसले. तेव्हांपासून दरसाल ता. १८ ऑगष्ट रोजीं श्रीमंतांचा राज्यारोहण-दिन-समारंभ साजरा करण्याची प्रथा पडलेली होती. त्या दिवशीं भोर येथें दरबार भरवून गतवर्षाच्या राज्यकारभाराचें इतिवृत्त दिवाण वाचीत. नंतर श्रीमंतांचें भाषण होई. त्यानंतर दरबारास आलेल्या सर्व मंडळींना At Home देण्यांत येत असे. शाळेंतील मुलांना मिठाई वगैरे कार्यक्रम होत. असेच प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं दरबार भरवून गतसालच्या राज्यकारभाराचें वृत्त वाचून दाखविणें, शाळेंत मुलांना मिठाई वाटणें, वगैरे कार्यक्रम होत असत. भोर येथें स्वार व शिबंदी लोकांची सकाळच्या प्रहरीं परेड होऊन गार्ड ऑफ ऑनरची सलामी श्रीमंतांना देण्यांत येऊन, तोफांच्या सलामीचा मान त्यांना मिळाल्यापासून, तोफा उडविण्यांत येत. याखालीं दिलेले राज्यारोहण-समारंभ, त्यांचें कांहीं वैशिष्ट्य असल्यामुळें देण्यांत येत आहेत.

### श्रीमंत राजेसाहेबांचा ६२ वा वाढदिवस-समारंभ

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यापासून त्यांचा राज्यारोहण-दिन दरबार भरवून साजरा करण्याची प्रथा पाडण्यांत आली होती. त्यांच्या जन्मदिनाचा समारंभ करण्यांत येत नसे; परंतु, सन १९३९ इ. साल त्या जन्मदिनाच्या दृष्टीनें महत्त्वाचें असल्यामुळें, ह्या सालीं त्यांचा जन्म-दिवस समारंभपूर्वक साजरा करण्यांत आला.

सन १९३९ ऑक्टोबर ८ तारखेस श्रीमंतांना ६२ वें वर्ष लागलें. यापूर्वीं एक वर्ष त्यांच्या वयाचीं ६० वर्षें पूर्ण होऊन ६१ वे वर्षांत त्यांनीं पदार्पण केलें.

त्या वेळीं संस्थानांतील प्रजाजनांनीं व संस्थानबाहेरच्या हितचिंतकांनीं, तसेंच त्यांच्या स्नेही मंडळींनीं, अपूर्व उत्साह दाखवून त्यांच्या वयाचा षष्ट्यब्दिपूर्ति समारंभ, म्हणजे हीरकोत्सव ( Diamond Jubilee ) पार पाडला होता.

चित्रांक ४२



हिंदवी स्वराज्याच्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सवाच्या स्मारक स्तंभाची पायाभरणी, नसरापूरनजीक चेलाडी नाक्याच्या उत्तरेस. [ सं. पा. १५४

या सन १९३९ इ. सालच्या वाढदिनाच्या दिवशीं भोर येथील नोकरवर्गानें श्रीमंत राजेसाहेबांची अल्पस्वल्प सत्कार करण्यास परवानगी मागितली. आपल्या नोकरांस पगार बेताचेच आहेत, या गोष्टीची श्रीमंतांना जाणीव असल्यामुळें, वर्गणी करून सत्कार करण्याची आवश्यकता नाहीं असें श्रीमंतांनीं त्यांना कळविलें. परंतु, तशी परवानगी न दिल्यास, श्रीमंतांच्याविषयीं वाटत असलेला आदरभाव व पूज्यबुद्धि व्यक्त करण्यास दुसरी संधी आपणांस कधींच मिळणें शक्य नाहीं असें नोकरवर्गास वाटत असल्याचें सत्कार-कमिटीनें श्रीमंतांना सांगितल्यामुळें, त्यांनीं मोठ्या नाखुषीनें या सत्कार-स्वीकारास मान्यता दिली. या सर्व नोकर-वर्गास व संस्थानबाहेरच्या हितचिंतकांस श्रीमंतांनीं या दिवशीं मेजवानी दिली. संस्थानबाहेरून आलेल्या लोकांत बॅ. खाजगीवाले व त्यांच्या पत्नी, श्री. आपासाहेब लिखिते, श्री. गोविंदराव बाबळे, पुणें म्युनिसिपालिटीचे ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर व त्यांच्या पत्नी इत्यादि प्रमुख मंडळी होती.

दुपारीं ४ वाजतां श्रीराम मंडपांत दरबार भरविण्यांत आला. त्या वेळीं नोकरवर्ग सत्कार-समितीचे अध्यक्ष रा. सा. वामन रामचंद्र साने यांनीं समयोचित भाषण करून नोकरवर्गाला श्रीमंतांसंबंधीं वाटत असलेली आदरबुद्धि व्यक्त केली व 'फूल नाहीं, फुलाची पाकळी' म्हणून तयार करण्यांत आलेली सोन्याची दौत व लेखणी श्रीमंतांस नोकरवर्गातर्फे त्यांनीं अर्पण केली. श्रीमंतांनीं थोडक्यांत भाषण करून या देणगीचा स्वीकार केला. या समारंभाच्या वेळीं भोरच्या कांहीं प्रमुख नागरिकांना व संस्थानच्या तालुक्यांतील कांहीं प्रमुख व्यक्तींना हीरक-महोत्सवानिमित्त पदकें श्रीमंतांनीं दिलीं. तसेंच, संस्थानांतील गरीब शेतकऱ्यांना शेतीचे उपयोगाकरितां देण्यासाठीं, प्रत्येक तालुक्यास रु. २०० प्रमाणें, पांच तालुक्यांस मिळून रु. १००० एक हजार रुपयांची देणगी आपल्या खाजगींतून देण्याचें जाहीर केलें. या समारंभास सर्व संस्थानांतील प्रमुख लोक आलेले असल्यामुळें, या संधीचा फायदा घेऊन, त्या सर्वांस युद्धकार्यास ब्रिटिश सरकारास शक्य तें साहाय्य करणें आपणा सर्वांचें कर्तव्य आहे व त्या कामीं सर्वांनीं मदत करावी, असें श्रीमंतांनीं आपल्या भाषणांत सांगितलें.

## राज्यारोहण-दिन समारंभ सन १९४३ इ.

सालाबादप्रमाणें दरबार भरवून ता. १८ ऑगस्ट १९४३ हा दिवस साजरा करण्यांत आला. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यास २१ एकवीस वर्षें पूर्ण झालीं. भोर येथें नवीन सुरू झालेल्या सर्व कारखान्यांचे मालक श्रीमंतांच्या निमंत्रणास मान देऊन समारंभास उपस्थित होते. या दिवशीं तंबू कारखान्याचे मालक शेट पदमसी यांनीं श्रीमंतांना गौरवार्थ चहाचा चांदीचा सेट नजर केला. श्रीमंतांनीं आपल्या भाषणांत पांचही कारखान्यांचा नामनिर्देश करून त्यांची उत्तरोत्तर भरभराट व्हावी, अशी इच्छा प्रदर्शित केली.

## राज्यारोहण-दिन समारंभ सन १९४४ इ.

श्रीमंत राजेसाहेब संस्थानच्या गादीवर आल्यास ता. १८ माहे ऑगस्ट सन १९४४ रोजीं २२ वर्षें पूर्ण झालीं. त्या निमित्तानें बाविसावा राज्यारोहण-दिन समारंभ भोर येथें दरबार भरवून साजरा करण्यांत आला. या समारंभास भोर स्टेट बँकेचे डायरेक्टर्स आणि भोरनजीकच्या कारखान्यांचे मालक शेट पुष्पकुमार ठाकरसी, पदमसी शेट, दामोदरदास शेट, इत्यादि पाहुणे आले होते. दरबारांत स. १९४३-४४ इ. सालांतील घडामोडींचा अहवाल संस्थानच्या दिवाणांनीं वाचून दाखविला. श्रीमंत राजेसाहेबांनीं केलेल्या भाषणांत संस्थानांत शांतता राहिल्याबद्दल समाधान व्यक्त केलें व युद्धांत दोस्तांना जय लवकर प्राप्त व्हावा अशी प्रार्थनापूर्वक इच्छा प्रदर्शित केली. या समारंभाच्या निमित्तानें त्यांनीं The Royal Indian Navy and its Benevolent Association या संस्थेस रु. ५०० पांचशेंची देणगी दिली.

## राज्यारोहण-दिन समारंभ स. १९४५ इ.

श्रीमंत राजेसाहेब संस्थानच्या गादीवर आल्यास ता. १८ ऑगस्ट १९४५ रोजीं २३ वें वर्ष पूर्ण होऊन २४ वें लागलें. दरसालप्रमाणें दरबार भरविण्यांत आला होता. या दिवसाचें वैशिष्ट्य हें होतें कीं, सन १९३९ सालीं सुरू झालेलें महायुद्ध, जपानच्या संपूर्ण शरणागतीनंतर, संपुष्टांत आल्याची बातमी २-३ दिवसच अगोदर आल्यामुळें, सर्वांना उत्सव साजरा करण्यास एक प्रकारचा हुरूप वाटत होता. राज्यकारभारासंबंधीं गतवर्षांतील हकीगतीचें

चित्रांक ४३



हिंदवी स्वराज्याच्या त्रिशत सांवत्सरिक महोत्सवाच्या प्रीत्यर्थ उभारलेलें स्मारक. [सं. पा. १५६

वृत्त-निवेदन, श्रीमंतांचें भाषण, इत्यादि कार्यक्रम रीतीप्रमाणें करण्यांत आले, व विजयानिमित्त रात्रौ दीपोत्सव करण्यांत आला.

## श्रीमंत राजेसाहेबांच्या राज्यारोहणाचा पंचविसावा वाढदिवस-समारंभ १९४६

श्रीमंत राजेसाहेब यांना गादीवर आल्यास, ता. १८ ऑगस्ट १९४६ रोजीं चोवीस वर्षें पूर्ण होऊन पंचविसाव्या वर्षांत त्यांनीं पदार्पण केलें. तन्निमित्त सालाबादप्रमाणें श्रीराममंडपांत दरबार भरविण्यांत येऊन तत्पूर्वीच्या वर्षांतील राज्यकारभारविषयक अहवाल संस्थानचे दिवाण यांनीं वाचून दाखविला. त्यांत, श्रीमंत राजेसाहेब यांची ता. २ फेब्रुवारी १९४६ ची राज्यकारभार-सुधारणेची घोषणा, नरेंद्रमंडळाच्या स्थायी समितीवर श्रीमंतांची निवडणूक, नवीन लोकल-बोर्ड कायद्यास दिलेली मान्यता, पाली-सिद्धेश्वर रस्त्याच्या खर्चास दिलेली मंजुरी, तांबट ओहोळावरील पूल इत्यादींचा उल्लेख असून, खर्चाच्या त्या सालीं विशेष रीत्या मंजूर केलेल्या रकमांबाबत व इतर राज्यकारभारविषयक गोष्टी खालील-प्रमाणें निवेदन केल्या आहेत.

"यंदाचे सालीं सुधारणा-फंडाकरितां नवीन रु. ६०००० मंजूर करण्यांत आले आहेत. ते ग्रामसुधारणा, आरोग्य, आर्थिक उत्पादन, इत्यादि गोष्टींकडे खर्च व्हावयाचे आहेत; व त्याबाबत जबाबदार लोकांच्या स्थानिक कमिट्या स्थापन करून त्यांच्यामार्फत वरील फंडाचा उपयोग करण्याचें ठरविलें आहे. सुधागड तालुक्यांतील आदिवासी लोकांसाठीं रु. ५०० बजेटमध्यें मंजूर करण्यांत आले आहेत.

"श्रीमंत राजेसाहेब यांनीं खालीं लिहिल्याप्रमाणें यंदा जादा खर्च करण्यास स्पेशल मंजुरी दिली आहे.

( १ ) नवीन टाइमस्केल योजना रु. २७०००, ( २ ) महागाई-भत्ता रु. ५६०००, ( ३ ) तांबट ओहोळ पूल रु. ३९०००, ( ४ ) सुधारणा फंड रु. ६००००, ( ५ ) तगाई देणेकरितां रु. ४००००.

"भोर संस्थानांतील विधिमंडळाच्या नवीन निवडणुकी केव्हां व्हाव्या याची चर्चा कारभारी मंडळानें लोकमताच्या पक्षोपपक्षांना व दलित वर्गाला निमंत्रण देऊन त्यांच्या समवेत केली व त्यांच्या अनुमोदनानें निवडणुकी येत्या

नोव्हेंबरपर्यंत पुढें ढकलण्यांत आल्या आहेत. नोकर वर्गाच्या एकंदर १५ ग्रेडस् ठरविण्यांत आल्या आहेत.

" प्रोसेस फीची वाढ झाली होती, ती बंद करण्यांत आली आहे."

त्याचप्रमाणें कंट्रोलसंबंधींचें निवेदन:—

" सर्व संस्थानांत सुमारें १११ दुकानें उघडण्यांत येऊन त्यांच्यामार्फत विक्री करण्यांत येते. दर पांच मैलांच्या परिघांत हीं दुकानें ठेवण्यांत आलीं आहेत. दरबारास ज्वारी, गहू वगैरे धान्यें बाहेरून आणावीं लागलीं व दरबारास जरी सव्वाचार शेर दर रुपयास विकत घ्यावी लागली, तरी लोकांस धान्य स्वस्त देण्याकरितां रु. ३०००० तोटा सोसून, दरबारनें तीं धान्यें दर रुपयास साडेपांच शेरांप्रमाणें संस्थानांत विकलीं."

याप्रमाणें हकीगत अहवालांत नमूद केली आहे.

अहवाल-वाचनानंतर श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण झालें. त्यांत, श्रीं शिवछत्रपतींच्या स्वराज्य-स्थापन शपथेसंबंधीं साजरा केलेल्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सव व स्मारकस्तंभ, कार्यकारी मंडळावर बिनसरकारी अध्यक्षाची व कायदेमंडळानें निवडलेल्या मंत्र्याची नेमणूक, कोल्हापूर येथें स्थापन झालेल्या समाईक हायकोर्ट-योजनेंत प्रवेश, नोकरवर्गास दिलेला जादा महागाई आलावन्स व लागू केलेलें नवें टाइमस्केल व यांमुळें खर्चांत रु. ८३००० त्र्यायशीं हजार होणारी दरसालची वाढ, संघराज्याबद्दलची वाटाघाट, इत्यादि महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश होता.

दरबार समाप्त झाल्यानंतर दरसालप्रमाणें जमलेल्या मंडळींना अल्पोपाहार देण्यांत आला.

चित्रांक ४४




स्तंभाच्या पूर्वबाजूस श्री शिवछत्रपतींचा शिक्का

[ सं. पा. १५६

चित्रांक ४५



स्तंभाच्या पश्चिम बाजूस श्री शिवछत्रपति व त्यांचे सवंगडी श्रीभवानी देवीपुढें स्वराज्य स्थापनेची शपत घेत आहेत.

[सं. पा. १५६

# प्रकरण १३ वें

# हिंदवी स्वराज्य स्थापना-स्मारक

## त्रिशत-सांवत्सरिक महोत्सव

श्रीशिवछत्रपतींनीं हिंदवी स्वराज्य स्थापन करण्याचा आपला निश्चय व्यक्त केला, त्यास ता. २७ एप्रिल १९४५ रोजीं तीनशें वर्षें पूर्ण झालीं. म्हणून, पुणें येथें हिंदवी स्वराज्य-स्मारक-मंडळ इतिहासप्रेमी विद्वज्जनांनीं स्थापून, त्या-करवीं महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं त्रिशतसांवत्सरिक-महोत्सव साजरा करण्यांत आला. भोर संस्थान हें हिंदवी स्वराज्याची मातृभूमी. शिवछत्रपतींनीं स्वराज्य-स्थापनेपूर्वींच्या सर्व हालचाली हल्लींच्या भोर संस्थानच्या मुलखांत प्रामुख्यानें केल्या. त्या वेळचे सर्व महत्त्वाचे किल्ले भोर संस्थानांत व संस्थानच्याच ताब्यांत असून, ते त्या वेळच्या इतिहासाची जिवंत साक्ष अजूनही देत आहेत. स्वराज्याचें तोरण बांधलें, तो तोरणा ऊर्फ प्रचंडगड आणि श्रीशिवछत्रपतींची प्रथमची राजधानी राजगड, तसेंच इतिहासप्रसिद्ध रोहिडा हे किल्ले भोर संस्थानांतच आहेत. पंतसचिव हेही छत्रपतींच्या प्रधानमंडळांतील तिसरे प्रधान असून, सध्यां संस्थानच्या गादीवर असलेले पंतसचिव हे, पूर्वजांच्या पुण्याईनें, आजहि स्वराज्याचा उपभोग घेत आहेत. अशा स्थितींत भोर संस्थानमध्यें त्रिशतसांव-त्सरिक महोत्सव साजरा करण्यांत यावा व आला ही उचित अशीच गोष्ट झाली. पुण्याच्या हिंदवी स्वराज्य-स्मारक-मंडळाच्या चालकांत महाराष्ट्रांतील नामवंत इतिहासप्रेमी व्यक्ति होत्या. साहित्यसम्राट् श्री. नरसिंह चिंतामण केळकर, प्रो. दत्तो वामन पोतदार, सह्याद्रीचे संपादक श्रीयुत दिनकर विनायक काळे व हिंदुस्थान सरकारच्या पुराणवस्तु संशोधन खात्याचे सेवानिवृत्त डायरेक्टर-जनरल रा. ब. काशिनाथ नारायण दीक्षित हे या स्मारक-मंडळाचे प्रमुख होते. त्यांनीं श्रीमंत सरकार राजेसाहेबांची भेट घेऊन स्मारकाची कल्पना त्यांच्यापुढें मांडली. यापूर्वींच रा. ब. दीक्षित यांनीं असें स्मारक संस्थानमध्यें करण्याबद्दल, ते दिल्ली येथें असतांना, येथें पत्र पाठवून श्रीमंतांना विनंति केली होती. श्रीमंतांनीं एक क्षणाचाहि विलंब न लावतां, त्यांची योजना मान्य करून, सदर कार्याप्रीत्यर्थ रु. २०,००० वीस हजारांपर्यंत खर्च करण्यास मंजुरी दिली.

सर्व पूर्वतयारी झाल्यावर, ता. २७ मे १९४५ रोजीं संस्थानच्या राजगड तालुक्यांतील नसरापूर गांवापासून १ मैल अंतरावर असलेल्या श्रीक्षेत्र बनेश्वर येथें हा समारंभ साजरा करण्यांत आला. समारंभास पुणें, मुंबई वगैरे ठिकाणांहून बरीच इतिहासप्रेमी मंडळी मुद्दाम आली होती. भोर संस्थानमधील व आसपासच्या ब्रिटिश मुलुखांतीलही मावळेबंधूंचा जमाव सुमारें १५००० पंधरा हजारांपर्यंत जमला होता. इतक्या सर्व लोकांच्या भोजनाची व्यवस्था बनेश्वरीं दरबारकडून करण्यांत आली होती. श्री बनेश्वर देवालयाच्या पूर्व अंगास मुद्दाम उभारलेल्या भव्य मंडपांत हा समारंभ झाला. समारंभाचा कार्यक्रम पोवाडे-गायनानें सुरू झाला. श्रीयुत दि. वि. काळे यांनीं उत्सवमंडळानें अंगिकारलेल्या कार्याची माहिती निवेदन केली. श्री. न. चिं. केळकर व प्रो. पोतदार यांनीं या उत्सवाच्या महत्त्वाबद्दल भाषणें केलीं. प्रो. पोतदार यांनीं या प्रसंगीं श्रीयुत ग. ह. खरे यांनीं तयार केलेलें 'भोर संस्थानांतील ऐतिहासिक मार्गदर्शन' हें मराठी पुस्तक श्रीमंत राजेसाहेब यांना समर्पण केलें. श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून ( भाषण परिशिष्टांत नं. १२ ठिकाणीं दिलें आहे. ) उत्सव मंडळाचे आभार मानले. याच समारंभाचा दुसरा भाग नसरापूरच्या पूर्वेस १ मैलावर पुणें-बंगलोर रस्त्याच्या कडेला चेलाडी नाक्याशेजारीं साजरा करण्यांत आला. स्मारक-मंडळानें या समारंभाच्या निमित्तानें एक स्मारकस्तंभ उभारावा अशी सूचना केली होती. ती श्रीमंतांनीं मान्य करून, या स्मारक-स्तंभाच्या पायाची शिला तेथें बसविली. येथें उभारलेल्या भव्य शामियान्यांत सर्व मंडळी स्थानापन्न झाल्यावर, 'बेल भांडार' या कवितेचें गायन झालें. श्री. काळे यांनीं 'विजय स्मारक स्तंभ' उभारावयाचा, त्याची विस्तृत माहिती निवेदन केली. रा. ब. दीक्षित यांनीं शिवरायाच्या कारकीर्दीचें महत्त्व किती आहे, तें सांगून जयस्तंभा-वर कोणकोणतीं चित्रें खोदण्यांत येणार आहेत व लेख लिहिण्यांत येणार आहेत, त्यांची सर्वसामान्य माहिती सांगितली. श्रीमंत राजेसाहेबांनीं पायाचा दगड बसविला, व खालीलप्रमाणें भाषण केलें:—

" स्तंभासाठीं ही जागा पसंत करण्याचें कारण, म्हणजे ही जागा मोक्याची असून, येथूनच श्रीशिवाजीमहाराजांची पहिली राजधानी जो राजगड किल्ला त्याला जाणारी वाट फुटते. राजगडावरच छत्रपति श्री. राजाराम

चित्रांक ४६



स्तभाच्या दक्षिण बाजूस परिपूर्ण सामर्थ्य व शौर्य दर्शविणारें

ढाल-तलवार चिन्ह. [सं. पा. १५६

महाराजांचा जन्म झाला. राजगडच्या पलीकडे जो प्रचंडगड ऊर्फ तोरणा किल्ला आहे, तो घेऊन बालशिवाजीनें स्वराज्याचें जणूं तोरणच बांधलें. त्या किल्ल्याला जाण्याची वाट येथूनच आहे. मराठेशाहींतील खेडेबारें नांवानें ओळखला जाणारा प्रदेश कोणा जिज्ञासूस जर पहावयाचा झाला, तर त्यालाही येथूनच जाणें प्राप्त आहे; व आम्हाला अशी आशा, नव्हे खात्री आहे कीं, यापुढें अनेक जण केव्हां तरी राजगड, तोरणा वगैरे किल्ले पहावयास येतील व आपल्या गतवैभवाचीं हीं स्मृतिचिन्हें प्रत्यक्ष डोळ्यांखालीं घालतील.ह्या स्तंभाच्या जागेपासून दक्षिणेस जो रस्ता पूर्वपश्चिम जात आहे, तो युद्धोत्तर पुनर्घटनेच्या काळीं National Highway म्हणजे दोनशें फूट रुंदीचा होणार असल्यानें, त्या रस्त्याला साहजिकच जास्त महत्त्व प्राप्त होणार आहे. या व अशाच इतर कारणांमुळें, आम्ही ही जागा स्तंभासाठीं मुक्रर केली. त्या रस्त्यावरून जाणाऱ्या-येणाऱ्यानें विनासायास हा स्तंभ पाहिला, व मराठ्यांच्या गतवैभवाची कल्पना त्याला आली, तरी मोठेंच काम साधेल. स्तंभ कसा होणार आहे, याची कल्पना येथेंच ठेवलेल्या स्तंभाच्या छोट्या मानचित्रावरून सहज येणारी आहे.

" अशोकाच्या जयस्तंभाकडे पाहून जशी अशोकाच्या थोरपणाविषयींची कल्पना मनांत येते, तशीच ह्याही स्तंभाकडे पाहून मराठे-वैभवाची भव्य कल्पना लोकांना येवो असें आम्ही इच्छितों. स्तंभ हा स्वतः जरी अचेतन असला, तरी जादूच्या कांडीप्रमाणें, प्रेक्षकांच्या अंतःकरणांत मात्र नवचैतन्य व स्फूर्ति उत्पन्न करण्याची शक्ति त्यांत खात्रीनें असते. आजच्या व पुढें येणाऱ्या पिढ्यांना मराठ्यांच्या गतवैभवाची आठवण सतत रहावी, या हेतूनें हा स्तंभ बांधण्याचें आम्हीं योजिलें. स्तंभ कसा असावा, त्यावरील नक्षीकाम कसें असावें, त्यावर मजकूर काय असावा, वगैरे बाबतींत रावबहादुर दीक्षित यांनीं अमोलिक सहाय्य केलें, याचा निर्देश करणें आम्ही उचित समजतों. सध्यांच्या जागतिक युद्धकाळांतल्या बिकट परिस्थितीमुळें जरी कांहीं अडचणी आल्या, तरी त्या दूर होऊन ह्या स्तंभाचें काम यथाकाल पूर्ण होईल असा आम्हास भरंवसा वाटतो. "

सरते शेवटीं, न. भू. ना. पां. थोपटे यांनीं सर्वांचे आभार मानल्यावर, समारंभ समाप्त झाला.

ह्या स्मारक-स्तंभाचें सर्व काम पूर्ण झालें असून, त्याच्या चोहों बाजूंस संगमरवरी पाट्या, चित्रें व लेखांनीं युक्त अशा, बसविल्या आहेत. चार पाट्यांवर मजकूर संस्कृत, इंग्रजी, हिंदी व मराठी या भाषांमध्यें एकच कोरला आहे. या समारंभाच्या निमित्तानें भोर संस्थानांतील ऐतिहासिक स्थलवर्णनाचें एक इंग्रजी 'Here Came Swarajya' या नांवाचें व एक मराठी, अशीं दोन पुस्तकें प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत.

---

चित्रांक ४७



स्तंभाच्या उत्तर बाजूस सामर्थ्य व शौर्य दर्शविणारं
धनुष्य-बाण चिन्ह [सं. पा. १५६

## प्रकरण १४ वें

# संस्थानाबाहेरील समारंभ

### मुंबई प्रांतिक दुय्यम शिक्षक परिषदेतर्फेंच्या प्रदर्शनाचा उद्‌घाटन-समारंभ

पुणें येथें ता. ४ नोव्हेंबर १९३९ रोजीं मुंबई प्रांतिक दुय्यम शिक्षकांच्या परिषदेचें ४ थें अधिवेशन नूतन मराठी विद्यालयांत भरविण्यांत आलें होतें. या परिषदेनिमित्त भरविलेल्या प्रदर्शनाचा उद्‌घाटन-समारंभ वरील तारखेस श्रीमंत राजेसाहेब यांनीं केला. प्रदर्शनाचें उद्‌घाटन करितांना श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेल्या भाषणांत प्रदर्शनाच्या खर्चाकरितां रु. ३०० ची देणगी दिल्याचें जाहीर केलें. भाषण परिशिष्टांत नं. १३ ठिकाणीं दिलें आहे.

### पुणें येथील मुलींच्या हायस्कूलचा वार्षिक बक्षिस-समारंभ

पुणें येथील मुलींचें हायस्कूल ( हुजूरपागा ) या संस्थेचा वार्षिक बक्षिस-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें ता. २२ डिसेंबर सन १९३९ इ. रोजीं करण्यांत आला. संस्थेची नवीन इमारत, क्रीडांगण, डोमेस्टिक सायन्स ( गृह-शिक्षण ) वर्ग आणि या समारंभानिमित्त भरविण्यांत आलेलें मुलींच्या हस्त-कौशल्याचें प्रदर्शन, वगैरे श्री. राजेसाहेबांना दाखविण्यांत आलें. इतर कार्यक्रम झाल्यावर, श्रीमंतांनीं समयोचित भाषण करून संस्थेस रु. ५०० ची देणगी दिली. या देणगीचा उपयोग गायन-शिक्षणाकडे करण्यांत यावा अशी श्रीमंतांनीं आपली इच्छा प्रदर्शित केली. भाषण परिशिष्टांत नं. १४ ठिकाणीं दिलें आहे.

### पुणें येथील आरोग्य मंडळाचा रौप्य-महोत्सव

पुणें आरोग्य मंडळास सन १९४० सालीं २५ वर्षें पूर्ण झालीं. तन्निमित्त मंडळाच्या चालकांनीं रजतमहोत्सव समारंभ केला. या समारंभाचें अध्यक्षस्थान, चालकांच्या विनंतीवरून, श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वीकारलें होतें. हा समारंभ पुणें येथें गोखले–स्मारक–मंदिराच्या दिवाणखान्यांत ता. २५ मार्च सन १९४० रोजीं झाला. संस्थेचे अध्यक्ष बॅरिस्टर गाडगीळ यांनीं स्वागताचें भाषण केलें. डॉ. पराडकर यांनीं संस्थेनें गेल्या २५ वर्षांत केलेल्या कामाची माहिती सांगितली.

श्री. न. चिं. केळकर, प्रो. द. वा. पोतदार, श्री. पोपटलाल शहा प्रभृति वक्त्यांचीं आरोग्य-मंडळाच्या कामाबाबत भाषणें झाल्यावर, डॉ. साठे यांनीं विनंति केल्यावरून, श्रीमंत राजेसाहेब यांनीं Silver Jubilee Souvenir or Memorial Book या पुस्तकाचें प्रसिद्धीकरण करून समारंभास उचित असें भाषण केलें. या समारंभास श्रीमंत राजेसाहेब यांनीं रु. ३०० ची देणगी दिली. भाषणाचा उतारा परिशिष्टांत नं. १५ ठिकाणीं दिला आहे.

## पुणें येथील अनाथ हिंदु महिलाश्रमाचा उद्घाटन-समारंभ

अनाथ हिंदु महिलाश्रम, पुणें, या संस्थेनें आपल्या स्वतःची इमारत बांधली. या इमारतीचा उद्घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांनीं, चालकांच्या विनंतीवरून, ता. १४ ऑगस्ट सन १९४० रोजीं केला. समारंभापूर्वीं चालकांनीं राजेसाहेबांना सर्व इमारत हिंडून दाखविली. या समारंभाच्या वेळीं महिलाश्रमासंबंधीं माहितीचीं भाषणें श्री. ल. ब. भोपटकर, श्री. ज. स. करंदीकर, श्री. व्ही. जी. काळे व श्री. एन्. एस्. लोकूर प्रभृती मंडळींनीं केलीं. नंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून संस्थेनें चालविलेल्या लोकोपयोगी कार्याचा उचित शब्दांत गौरव केला. संस्थेचे सेक्रेटरी श्री. भिडे यांनीं या संस्थेस श्री. राजेसाहेबांनीं रु. ४०० ची देणगी दिल्याचें जाहीर केलें. नंतर, पानसुपारी वगैरे झाल्यावर, हा समारंभ समाप्त झाला. श्रीमंतांचें भाषण परिशिष्टांत नं. १६ ठिकाणीं दिलें आहे.

## डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या मुलींच्या शाळेचा वार्षिक समारंभ

पुणें येथील डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या मुलींच्या शाळेच्या दुसऱ्या वार्षिक संमेलनाच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारून सदर शाळेच्या मुलींना ता. १८ जानेवारी १९४१ रोजीं बक्षिसें वाटलीं. बक्षिसें वाटण्यापूर्वीं श्रीमंत राजेसाहेबांनीं सोसायटीचे आभार मानले व सोसायटीच्या विनंतीवरून मुलींना उपदेश केला. या शाळेस रु. २०० श्री. राजेसाहेबांनीं देणगी म्हणून दिले. भाषण परिशिष्टांत नं. १७ ठिकाणीं दिलें आहे.

## महाबळेश्वर येथें Bombay Presidency Baby and Health Week Association समारंभ

एप्रिल १९४१ मध्यें श्रीमंत राजेसाहेब दरसालप्रमाणें उन्हाळ्यानिमित्त

चित्रांक ४८




पुणें, अनाथ पंगूगृहाच्या दिवाणखान्यांत हि. हा. श्री. राजेसाहेब, सांगली, यांच्या हस्तें श्रीमंत राजेसाहेब, भोर व त्यांचे आजे श्रीमंत नानासाहेब ह्यांच्या छायाचित्रांचें अनावरण.

[ सं. पा. १६१

थंड हवेंत राहण्याकरितां महाबळेश्वर येथें गेले होते. तेथील मुक्कामांत ता. २६ मे रोजीं Bombay Presidency Baby and Health Week Association ची सर्व साधारण सभा, सार्वजनिक समारंभ आणि सिनेमा शो महाबळेश्वर येथें करण्यांत आले. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं, संस्थेच्या चालकांच्या विनंती-वरून, अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. या संस्थेनर्फे भरविण्यांत आलेल्या प्रदर्शनाचा (Health Exhibition) उद्घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेबांनीं केला. (श्रीमंतांचें भाषण नं. १८ ठिकाणीं परिशिष्टांत दिलें आहे.) या वेळीं रु. ३०० ची देणगी श्री. राजेसाहेबांनीं संस्थेस दिली.

## धन्वंतरी महोत्सव

पुणें येथील आयुर्वेद रसशाळेच्या विद्यमानें श्रीधन्वंतरी महोत्सव ता. १८ ऑक्टोबर १९४१ रोजीं साजरा करण्यांत आला. या समारंभास श्रीमंत राजेसाहेब गेले होते. या वेळीं आयुर्वेदाचार्य पु. ग. नानलशास्त्री यांनीं आयुर्वेद रसशाळेनें गेल्या वीस वर्षांच्या अवधींत केलेल्या प्रगतीची हकीकत सर्वांस सांगून, यापुढें संस्थेनें काय काय योजना आंखल्या आहेत, त्या निवेदन केल्या. अहमदनगर येथील वैद्यपंचानन गुणे शास्त्री यांनीं आयुर्वेदांतील रसायन शास्त्राचें माहात्म्य सोदाहरण श्रोत्यांना पटवून दिलें. नंतर, श्रीमंतांनीं भाषण करून, रसशाळेच्या कार्याचा गौरव करून, चालकांचें अभिनंदन केलें व रस-शाळेस उत्तरोत्तर भरभराट प्राप्त होवो अशी इच्छा प्रदर्शित केली. (भाषण परिशिष्टांत नं. १९ ठिकाणीं दिलें आहे.) नंतर श्री. न. चिं. केळकर व वैद्य यांनीं आभार मानले.

आयुर्वेद रसशाळा ही संस्था रजिष्टर करण्यांत आली असून, तिनें उभारलेल्या भांडवलांत रु. ५००० चे शेअर्स श्रीमंत राजेसाहेब यांनीं विकत घेऊन संस्थेस मदत केली आहे.

## पुणें येथील वेदपाठशाळेचा हीरक महोत्सव

पुणें येथील वेदपाठशाळेचा हीरक-महोत्सव ता. २६ ऑक्टोबर सन १९४१ रोजीं साजरा करण्यांत आला. या समारंभाचें अध्यक्षस्थान, संस्थेच्या चालकांच्या विनंतीवरून, श्रीमंत राजेसाहेब यांनीं मंडित केलें होतें. सुरुवातीस वेदमूर्ति साठे व गद्रे गुरुजी यांनीं वैदिक पद्धतीची प्रार्थना केली. श्रीजगद्गुरु

शंकराचार्य यांनीं भाषण करून, श्रीमंत राजेसाहेबांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति केली. श्री. केळकर वकील यांनीं संस्थेची सुरुवातीपासूनची हकीकत निवेदन केली. नंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं पाठशाळेच्या दिवाणखान्यांत लाविलेल्या संस्थेचे अध्यक्ष व सभासद यांच्या फोटोचें अनावरण केलें. शाळेंतील शिक्षकांना पारितोषकें देऊन त्यांचा गौरव करण्यांत आल्यावर, श्री. चित्रावशास्त्री, पुरुषोत्तम-शास्त्री रानडे, प्रो. वि. वि. दीक्षित व आयुर्वेदाचार्य नानलशास्त्री यांचीं वेदांचें हल्लींच्या काळीं महत्त्व वाढविण्याकरितां काय करणें जरूर आहे, या विषयावर भाषणें झालीं. श्रीमंत राजेसाहेबांचें समयोचित भाषण ( त्याचा उतारा परिशिष्टांत नं. २० ठिकाणीं दिला आहे. ) झाल्यावर समारंभ संपला. श्रीमंत राजेसाहेबांनीं या समारंभाच्या निमित्तानें संस्थेस रु. ५०० पांचशेंची देणगी दिली.

## पुणें येथील दे. ऋ. ब्रा. संस्थेंत श्रीमंत राजेसाहेब यांच्या तैलचित्राचें अनावरण

पुणें येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण संस्थेच्या इमारतींत श्रीमंत राजेसाहे-बांच्या तैलचित्राचा अनावरण समारंभ नामदार लोकनायक अणे यांच्या हस्तें ता. २१ डिसेंबर सन १९४१ रोजीं करण्यांत आला. या समारंभास श्रीमंत राजेसाहेब उपस्थित होते. प्रारंभीं सरदार श्री. बाळासाहेब पुरंदरे यांनीं प्रास्ता-विक भाषण केलें. त्यांत लोकोपयोगी सार्वजनिक संस्थांना उदारपणानें श्रीमंत राजेसाहेबांनीं देणग्या दिल्या असून, आपल्या संस्थानच्या प्रजेचें हित व कल्याण व्हावें, म्हणून त्यांच्या मनांत किती कळकळ वसत असते, या गोष्टीचा विशेष रीतीनें उल्लेख केला. श्री. व्ही. के. खासनीस यांनीं संस्थेचा अहवाल वाचून दाखविला; व श्रीमंत राजेसाहेबांनीं संस्थेस दिलेल्या रु. २००० दोन हजारांच्या चिरस्मरणीय व राजवैभवास साजेशा देणगीबद्दल संस्था त्यांची अत्यंत ऋणी असल्याचें सांगितलें. नंतर, श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार व श्री. बाबासाहेब चंद्रचूड यांचीं भाषणें झालीं. श्री. चंद्रचूड यांनीं श्री. राजेसाहेबांच्या अंगच्या धर्मनिष्ठा, दयाळूपणा व प्रजाहिततत्परता इत्यादि गुणांचा प्रामुख्यानें उल्लेख केला. रा. ब. आण्णासाहेब वैद्य व विद्यानिधि चित्रावशास्त्री यांनीं श्रीमंतांच्या तैलचित्राचें अनावरण या संस्थेंत करण्यास परवानगी दिल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांचें अभिनंदन केलें. नंतर, लोकनायक अणे यांनीं श्रीमंत राजेसाहेबांच्या

चित्रांक ४९



पुणें, दे. ऋ. ब्रा. परिषदेच्या ७ व्या अधिवेशनाचें उद्‌घाटन. ता. २०।५।४४ इ. [ पं. पा. १६५

चित्रांक ५०



भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचा रौप्यमहोत्सव, ता. ४।१।४३ इ.

[ सं. पा. १७०

तैलचित्राचें अनावरण करून, समयोचित भाषण केलें. अनावरण करतांना ते म्हणाले कीं, " I am greatly delighted to unveil the portrait of Shrimant Rajasaheb of Bhor. His reputation is widely spread." नंतर, श्रीमंत राजेसाहेबांचें आभाराचें भाषण ( तें परिशिष्टांत नं. २१ ठिकाणीं दिलें आहे.) व संस्थेतर्फे श्री. कों. म. कुमठेकर यांचें पाहुण्यांसंबंधीं आभारदर्शक भाषण झाल्यावर, समारंभ संपला.

## पुणें अनाथ पंगू गृह संस्थेंत श्रीमंत राजेसाहेब व त्यांचे आजे श्री. चिमणाजी रघुनाथ पंतसचिव यांच्या तैलचित्रांचें अनावरण

श्रीमंत राजेसाहेब यांनीं पुणें येथील डेव्हिड ससून अनाथ पंगू गृहास देणगी दिली असून, ते त्या संस्थेचे एक आश्रयदाते आहेत. श्रीमंत राजेसाहेबांचे पितामह कै. चिमणाजी रघुनाथ उर्फ नानासाहेब पंतसचिव यांनीं या संस्थेस फार मोठी देणगी दिली असून, ते या संस्थेचे आद्य आश्रयदाते होते. या उभयतां आश्रयदात्यांच्या उदारपणामुळें संस्था चिरस्थायी होण्यास फार मोठी मदत झाली असल्यामुळें, त्यांचें स्मरण संस्थेंत कायम स्वरूपांत राहण्यासाठीं त्यांच्या तैलचित्रांचें अनावरण ता. २१ फेब्रुवारी सन १९४२ रोजीं हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, सांगली, यांच्या हस्तें केलें. प्रथम फोटो घेतल्यावर, संस्थेचे व्हाइस-प्रेसिडेंट मि. के. एस्. जठार, सी. आय. इ. यांचें प्रास्ताविक भाषण व सेक्रेटरी डॉ. मो. ना. नातू यांचें रिपोर्ट-वाचन झाल्यावर, श्रीमंत राजेसाहेब फलटण यांनीं, संस्थेचे अध्यक्ष या नात्यानें, हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, सांगली, यांना श्री. राजेसाहेब भोर व त्यांचे पितामह यांच्या तैलचित्रांचें अनावरण करण्याची व असायलमच्या गरिबांना कपडे वाटण्याची विनंति केली. तैलचित्राचें अनावरण करण्यापूर्वी हि. हा. राजेसाहेब, सांगली, यांनीं आपल्या भाषणांत भोरच्या पंतसचिव् घराण्याच्या ऐतिहासिक महत्त्वाबद्दल विशेष रीतीनें उल्लेख केला. हि. हा. श्री. राजेसाहेब, सांगली, यांनीं केलेल्या भाषणाचा उतारा खालीं दिला आहे.

" भोर संस्थानच्या ज्या अधिपतींच्या तैलचित्रांचें अनावरण आज या संस्थेंत व्हावयाचें आहे, त्यांचा या गृहाशीं दीर्घ कालाचा ऋणानुबंध आहे. या

अधिपतिद्वयांच्या तैलचित्रांच्या अनावरणानें त्यांच्या संस्थेशीं असलेल्या नात्यांना एक प्रकारचें चिरस्थायी स्वरूप प्राप्त होत आहे. श्री. कै. नानासाहेब पंतसचिव हे या गृहाच्या अगदीं आरंभींच्या आश्रयदात्यांपैकीं होत. तसेंच, हल्लींचे श्रीमंत राजेसाहेब पंतसचिव हेहि या संस्थेचे एक प्रमुख आश्रयदाते आहेत. श्रीमंत चिमणाजी रघुनाथ ऊर्फ नानासाहेब हे भोरच्या इतिहासप्रसिद्ध पंतसचिव घराण्यांतील नववे पुरुष होत. हे हल्लींच्या राजेसाहेबांचे पितामह होत. त्यांच्या तैलचित्राचें अनावरण प्रथम व्हावयाचें आहे. श्रीमंत नानासाहेब हे अल्पवयी असतांना राज्यकारभाराची जबाबदारी त्यांच्यावर पडली, तेव्हां त्यांना पुष्कळ अडचणींतून मार्ग काढावा लागला. अशा स्थितींतही न डगमगतां, श्री. नानासाहेब यांनीं आपल्या कारकीर्दीची छाप जनतेवर बसविली. १८५७ सालच्या बंडामुळें धामधूम सुरू होती, तरी अवघ्या आठ वर्षांत सर्व कर्जाची परत फेड करून संस्थानचा कारभार त्यांनीं ब्रिटिशकडील नमुन्याचा केला. न्याय, जमाबंदी वगैरे खातीं वेगळीं करून, कारभार सुव्यवस्थित केला व प्रजेच्या शिक्षणाची सोय केली. अशा रीतीनें आपल्या व्यवस्थित राज्यकारभारानें प्रजेचा दुवा त्यांनीं मिळविला. त्यांनीं अनेक संस्थांना द्रव्यसाहाय्यही केलें. त्यांत या संस्थेसही त्यांनीं औदार्यानें देणगी दिली.

" कै. श्री. नानासाहेबांचे नातू हे भोर संस्थानचे विद्यमान राजेसाहेब अकरावे पंतसचिव होत. यांच्याही तैलचित्राचा अनावरण-समारंभ आतां व्हावयाचा आहे. अखिल भरतखंडांत, युरोप व इंग्लंडांत दोन वेळां प्रदीर्घ प्रवास केल्यामुळें, त्यांना व्यापक दृष्टि प्राप्त झाली आहे. ते अभ्यासू, विद्यासंपन्न, सुशील व जुन्यानव्याचा समन्वय करणारे आहेत, अशी त्यांची चोहोंकडे ख्याति असल्याचें आपण जाणत आहांतच. सन १९२२ सालीं राज्यसूत्रें त्यांच्या हातीं येतांच, त्यांनीं राज्यकारभारांत सुधारणा करून आपलें प्रजावात्सल्य प्रकट केलें. उच्च शिक्षणाकरितां स्कॉलरशिप्स ठेवून, दुय्यम शिक्षणाकरितां हायस्कूल काढून व प्राथमिक शिक्षण मोफत करून जनतेंत ज्ञानप्रसार होण्यास उत्तेजन दिलें. संस्थानांत दवाखाने काढून रयतेच्या दुःखांचें निवारण केलें. शेती-सुधारणा, ग्रामोद्धार इत्यादि राष्ट्रसंवर्धक खात्यांकडे लक्ष पुरविलें. म्युनिसिपालिटया व कायदेमंडळ स्थापन करून प्रजेस राजकीय हक्क सुपूर्त केले. रानडे एकॉनॉमिक इन्स्टिटयूट,

भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिटयूट, डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशन, किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल, भारत महिला विद्यापीठ, भारत इतिहास संशोधन मंडळ, महाभारत प्रकाशन मंडळ, बॉय स्काउट्स असोसिएशन, पुणें, रेडक्रॉस सोसायटी, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण मंडळ, इत्यादि अनेक महत्त्वाच्या संस्थांस देणग्या देऊन व त्यांचे सभासद अगर अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं आपल्या ज्ञानाचा व औदार्याचा फायदा या संस्थांना दिला आहे. भोर येथें लायब्ररी स्थापन करून त्यांनीं त्या शहरांत नवजीवन निर्माण केलें आहे. नोकर-वर्गाचे पगार व बढती यांबद्दल नियम करून त्यांस संतुष्ट केलें आहे. सांप्रतच्या युद्धांत साम्राज्य सरकारांस द्रव्यसाहाय्य व मनुष्यबळ ते पुरवीत आहेत. नरेंद्रमंडळांत प्रतिनिधि म्हणून व स्वकीय हक्कानें अशी त्यांनीं केलेली दुहेरी कामगिरी प्रशंसनीय आहे. राज्यकारभार हातीं आल्यापासून ५ वर्षांच्या आंत ९ तोफांच्या सलामीचा मान, १३ वर्षांत ' राजा ' ही पदवी, १८ वर्षांनीं नरेंद्रमंडळांत स्वतःची जागा व गेल्या सालीं के. सी. आय. इ. हा बहुमानाचा किताब त्यांस मिळाला आहे. इंग्लंडांत गेल्यावर तेथें बादशहांच्या भेटीचा मानही त्यांस मिळाला आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास, कै. श्री. नानासाहेब यांनीं सुधारणेचा जो मनू सुरू केला व जें प्रगतिपर धोरण आंखलें, त्याचाच श्री. राजेसाहेब हे पूर्ण विकास करीत आहेत. आपल्या उदार राज्यपद्धतीनें ते लोकादरास पात्र झाले आहेत व प्रजेचे आवडते, साम्राज्य सरकारचे विश्वासपात्र व नरेंद्रबंधूंना आपलेसे असे ते झाले आहेत. यास्तव, या ठिकाणीं श्री. राजे-साहेब यांच्या तैलचित्राचें अनावरण यथायोग्य आहे, असेंच कोणीही म्हणेल. "

श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यानंतर भाषण करून हि. हा. श्री. राजेसाहेब, सांगली, व श्री. राजेसाहेब, फलटण, यांचे, तसेंच संस्थेचे आभार मानले.

## महाराष्ट्रीय मंडळास मुंबईचे गव्हर्नर सर जॉन कॉलव्हिल यांची भेट

मुंबई इलाखाधिपति नेक नामदार सर जॉन कॉलव्हिल यांनीं ता. ६-१०-१९४३ रोजीं पुणें येथील महाराष्ट्रीय मंडळास भेट दिली. महाराष्ट्रीय मंडळाचे अध्यक्ष या नात्यानें श्रीमंत राजेसाहेबांनीं व मंडळाचे चेअरमन श्री. ल. ब. भोपटकर यांनीं नेक नामदार साहेबांचें स्वागत केलें. फोटो घेण्यांत आल्यावर, मंडळांतील विद्यार्थ्यांनीं Physical Culture Demonstration

केलें. नंतर प्रो. फडके यांनीं संदेश वाचल्यावर, चेअरमन श्री. ल. ब. भोपटकर यांनीं स्वागताचें भाषण केलें. त्यास ने. नामदार यांनीं समयोचित उत्तर दिलें. या प्रसंगानिमित्त आलेल्या देणग्या जाहीर करतांना, खानबहाद्दुर एम्. एन्. मेथा यांनीं श्रीमंत राजेसाहेब यांची रु. १००० एक हजाराची देणगी जाहीर केली. शेवटीं, श्री. राजेसाहेबांनीं भाषण करून पाहुण्यांचे आभार मानले.

## श्री. नाथीबाई दामोदरदास ठाकरसी कन्याशाळा या संस्थेचा रौप्यज्युबिली–महोत्सव

पुणें येथील श्रीमती नाथीबाई दामोदरदास ठाकरसी कन्याशाळा, या संस्थेस २५ वर्षें पुरीं झालीं. त्यानिमित्त संस्थेच्या चालकांनीं ज्युबिली-समारंभ ता. ५-१२-१९४३ रोजीं साजरा केला. या समारंभाचें अध्यक्षस्थान श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वीकारलें होतें. समारंभाच्या सुरुवातीस मुलींचीं स्वागतपर पद्यें व संभाषणें झालीं. नंतर, संस्थेच्या प्रगतीचें इतिवृत्त लेडी सुपरिंटेंडेंट सौ. रत्नमालाबाई फणसे यांनीं निवेदन केलें. नंतर, संस्थेच्या कांहीं विद्यार्थिनी आणि अध्यापक यांचीं संस्थेच्या प्रगत स्थितीवर प्रकाश पाडणारीं उद्‌बोधक भाषणें झालीं. संस्थेचे आद्य संस्थापक डॉ. गु. अण्णासाहेब कर्वे यांनीं भाषण केलें व समारंभानिमित्त ज्युबिली-ग्रंथ श्रीमंत राजेसाहेबांना अर्पण केला. श्रीमंतांनीं सदर ग्रंथ प्रकाशित केल्याचें जाहीर करून, आपलें अध्यक्षीय भाषण केलें, ( तें भाषण परिशिष्टांत नं. २२ ठिकाणीं दिलें आहे. ) व या समारंभानिमित्त संस्थेस रु. २०० ची देणगी दिली. समारंभाच्या शेवटीं संस्थेतर्फे मिसेस कामत यांनीं सर्वांचे आभार मानले.

## महाराष्ट्र चित्रकला-मंडळ, पुणें, या संस्थेचा बक्षिस-समारंभ

महाराष्ट्र चित्रकार-मंडळ, पुणें, या संस्थेचा १३ वा वाढदिवस संस्थेच्या चालकांनीं मोठा समारंभ करून ता. १३-१-१९४४ रोजीं साजरा केला. या प्रसंगीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. श्री. सरदार मुजूमदार यांनीं स्वागतपर भाषण केल्यावर, श्रीमंत राजेसाहेबांनीं अध्यक्षीय भाषण करून कलावंत चित्रकारांना बक्षिसें दिलीं. ( तें भाषण परिशिष्टांत नं. २३ ठिकाणीं दिलें आहे. )

## पुणें बालवीर संस्थेचा २५ वा वार्षिकोत्सव

पुणें येथील बालवीर संस्थेचा व श्रीमंत राजेसाहेबांचा कायमचा संबंध आहे. या संस्थेचे ते कायमचे अध्यक्ष आहेत. या संस्थेच्या स्थापनेस २५ वर्षें झालीं. त्यानिमित्त संचालकांनीं २५ वा वार्षिकोत्सव ( Anniversary ) Mr. F. G. Pears यांच्या अध्यक्षतेखालीं मोठ्या थाटानें ता. ६ मे १९४४ रोजीं संस्थेच्या निवासस्थानीं, Pant Sachiv Scout Headquarters मध्यें, साजरा केला. सदर प्रसंगीं श्री. के. एस्. जठार, सी. आय. ई. आणि श्री. वसंतराव देशमुख, पुणें शहर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष, यांचीं प्रास्ताविक भाषणें झालीं. नंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं उद्घाटनाचें भाषण Inaugural Speech केलें. ( तें परिशिष्टांत नं. २४ ठिकाणीं दिलें आहे. ) श्री. व्ही. एस्. भागवत यांनीं समारंभास आलेले शुभ संदेश आणि संस्थेच्या २५ वर्षांच्या कामगिरीचा अहवाल वाचून दाखविला. अध्यक्षांचें भाषण झाल्यावर श्री. एन. व्ही. किंकर यांनीं सर्वांचे आभार मानले.

या समारंभानिमित्त पंतसचिव स्काउट हेडक्वार्टर्स्‌मध्यें माशांचें प्रदर्शन ( Acquarium ) तयार करण्यांत आलें होतें, तें सर्वांनीं पाहिलें. श्रीमंत राजेसाहेब यांच्याबरोबर युवराज श्री. भाऊसाहेब हे या समारंभास हजर होते.

## दे. ऋ. ब्रा. संस्था, पुणें, परिषदेचें सातवें अधिवेशन

दे. ऋ. ब्रा. परिषद, पुणें, या संस्थेचें सातवें अधिवेशन पुणें येथें नानावाडयांत संस्थेच्या कार्यालयांत ता. २० व २१ माहे मे सन १९४४ या दोन दिवशीं भरविण्यांत आलें. परिषदेचें अध्यक्षस्थान नामदार श्री. दत्तात्रय व्यंकटेश बेळवी, बी.ए.,एल्‌एल्.बी., M. L. A., यांनीं मंडित केलें होतें. ता.२० रोजीं दुपारीं ४-३० वाजतां परिषदेस सुरुवात झाली. स्वागतपर पद्यें, वैदिक प्रार्थना व श्रीमत् जगद्‌गुरु शंकराचार्य व शिष्यस्वामी यांचीं आशीर्वादपर भाषणें झाल्यावर, श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण करून परिषदेचें उद्घाटन केलें. तें भाषण परिशिष्टांत नं. २५ या ठिकाणीं दिलें आहे. नंतर, स्वागताध्यक्ष श्री. गो. म. वैद्य यांनीं सर्वांचें अगत्यपूर्वक स्वागत केल्यावर, परिषदेस ज्यांना उपस्थित राहतां आलें नाहीं, अशा चहात्यांकडून आलेले संदेश वाचून दाखविण्यांत आले. नंतर, श्री. बेळवी यांनीं आपलें अध्यक्षीय भाषण वाचून दाखविलें. दे. ऋ. ब्रा.

संस्थेच्या मुंबई येथील मध्यवर्ती मंडळाचा वृत्तांत श्री. नानासाहेब काळे यांनीं निवेदन केला. मुंबई येथें मंडळाची इमारत बांधून तयार झाली आहे, असें त्यांनीं सांगितलें. यानंतर परिषदेचें काम दुसऱ्या दिवशीं दुपारपर्यंत तहकूब ठेवण्यांत आलें.

ता. २१-५-४४ रोजीं ४-३० वाजतां परिषदेच्या कामास पुन्हा सुरुवात झाली. या वेळीं दे. ऋ. ब्राह्मण परिचय-ग्रंथाची श्रोत्यांना ओळख करून देण्यांत आली; व सदर ग्रंथ श्री. सरदार बाळासाहेब पुरंदरे यांनीं संस्थेतर्फे श्रीमंत राजेसाहेबांना अर्पण केला. या परिषदेनिमित्त विद्यानिधि श्री. सिद्धेश्वर-शास्त्री चित्राव यांनीं हा ग्रंथ मुद्दाम तयार केला. श्रीमंत राजेसाहेबांनीं विद्यानिधि चित्रावशास्त्री यांना रु. १०१ ची देणगी देऊन, सदर कामगिरीबद्दल त्यांचा गौरव केला. याशिवाय, संस्थेस रु. १००० एक हजाराची देणगी दिली. संस्थेचे सेक्रेटरी श्री. वि. के. खासनीस, श्री. होनप, सरदार आबासाहेब मुजुमदार, विद्यानिधि चित्रावशास्त्री, वगैरे सद्‌गृहस्थांचीं सुविचारपरिप्लुत अशीं भाषणें झाल्यावर, रा. ब. वैद्य यांनीं सर्वांचे आभार मानले व परिषद समाप्त झाली.

## भांडारकर प्राच्य विद्यासंशोधन-मंदिराचा रौप्य-महोत्सव

पुणें येथील भांडारकर प्राच्य विद्यासंशोधन मंदिराचा ( Bhandarkar Oriental Research Institute ) रौप्य-महोत्सव समारंभ मंदिराच्या इमारतींत ता. ४ माहे जानेवारी १९४३ इ. रोजीं श्री. राजेसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत आला. श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज साहेबांना बरोबर घेऊन, समारंभास गेले होते. श्री. न. चिं. केळकर यांनीं श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांना अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंति केली. ती खालीलप्रमाणें:—

### श्रीयुत केळकर यांचें भाषण

" Ladies and gentlemen,

" I rise to propose, on your behalf, that His Highness the Raja Saheb of Bhor be requested to take the Chair on the present occasion. The proposal, I know, has only to be put, to be carried with acclamation. But, the importance of the occasion impells me to make a few observations, before I put my proposition to you.

"We meet here today to celebrate the Jubilee of "Bhandarkar Institute. And the occasion presents, in my opinion, a happy coincidence of three great cultural factors viz. the Institute itself, the Addressor of this evening and the Chairman elect. About the cultural value of the Bhandarkar Institute itself, I need not say much. For, the Orientalists, the world over, now recognize that it is a unique Institution of its kind in India, being devoted to research work, specially in Mahabharata, carried on on the most modern and scientific lines. And its organisers have a right to congratulate themselves upon the steady continuous work they have put in, under somewhat arduous financial conditions, to vindicate and justify the great name of Dr. Bhandarkar, with which the Institute has been associated. That is cultural factor, number one.

" Then as regards the great Pandit and scholar who is going to give us the principal address in the Jubilee programme, I would say that he may be regarded as the most effective present-day exponent of Indian Philosophy and culture, not only in India, but even more so, abroad. The well-wishers of the Benares Hindu University, myself among them, were sincerely gratified when they came to know, that Sir Radha-Krishnan had consented to take into his hands the leading string of that great cultural idealistic University, founded and still inspired by my great revered friend Pandit Malaviya, whom I always like to describe as the most typical Hindu in India. That is cultural factor number two.

" And now I turn to the Cultural setting of the Raja Saheb, whom we are going to request to take the Presidential Chair on the present occasion. The Raja Saheb is the present representative of an old noble family, which has earned for itself an honourable place in the Mahrata history. The founder of the family was a valiant soldier, a wise statesman and a trusted councillor of the great Shivaji Maharaja. He was one of the first eight Ministers who formed the famous council, called Astapradhana Mandala, the formation of which

makes out the constructive genius of Shivaji, as a constitutional ruler. The members of the Astapradhana Mandal were really the eight pillars, on whose strength the new and revived Hindavi Swarajya of Shivaji was established. Of course, when I mention Hindavi Swarajya, I advert here only to its cultural aspect, as relevant to my present purpose. And, I will ask you to imagine, what would have been the cultural fate of Maharastra, if that Hindavi Swarajya had not been successfully established?

"But, a time soon came, after the death of Shivaji, when darkness and destruction once more threatened Maharastra and the qualities of the members of the Astapradhana Mandal were to be tested, also in Shivaji's absence, as they were tested in his own life-time. And, during the dangerous period of 18 years i.e. from 1689 to 1707, the illustrious ancestor of the present Raja Saheb of Bhor was one of the few loyal servants and captains of the State, who successfully struggled to keep Maharastra alive and kicking. But, the true cultural valuation of that ancestor of the Raja Saheb cannot be complete without mentioning a further special point about him. And it is this, that Shankaraji Narayan Sachiv was not only a soldier and a statesman, but a truly spiritual soul. For, he ended his life as a Sanyasin, and also in the peculiar manner in which ordained Sanyasins are supposed to end their life.

शैशवेऽभ्यस्तवृत्तीनां यौवने विषयैषिणाम् ।
वार्धक्ये मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम् ॥ रघुवंश, कालिदास

"And here, I may make a moment's diversion to point out the peculiar good fortune of the Bhandarkar Institute, in that we have here amongst us today not only one but two representatives of the Ministers of the same Astapradhan Mandala, to which I have referred above. For, while the Raja Saheb of Bhor represents the Sachiv in the Mandala, the Raja Saheb of Aundh, one of the original patrons and now the Chairman of the Regulating Council of this Institute, I say

represents the Pratinidhi in that Mandala. And history bears testimony, that when Rajaram Maharaja was an exile in Jinji, wishfully calculating upon the precarious chances of his return to Maharastra, he had built his hopes mainly upon these two Chieftains, the Sachiv and the Pratinidhi. The chronicle of Rajaram Maharaja has it, in so many actual words,

'ते समयीं महाराजांनीं विचार केला कीं, चंदीवर किल्लेबंद होऊन लढाई देऊन पुरुषार्थ काय करावा ? येथून निघून पुन्हा देशीं जावें, रामचंद्रपंत फौज किल्ले बेलांग राखून आहेत. शंकराजी नारायण व परशरामपंत कर्ते; तें राज्य रक्षावें, तसें रक्षीत आहेत.'

( भाषांतर ) ' What is the use and the merit of remaining, so copped up, though fortified in Jinji? I should like to go back to my country. The Sachiv and Pratinidhi are able and powerful. They are already safeguarding the State in the best manner possible.'

"This proves that the ancestors of the Chairman of the Reception Committee of this Jubilee, and of the gentleman whom we are going to ask to take the chair at this evening's function, were together the same colleagues and co-workers in the cause of the preservation of the Hindu Culture of Maharastra 250 years ago, as their descendants are today in supporting the Bhandarkar Institute.

"The Raja Saheb of Bhor is not only a Raja or Ruler but a really enlightened and cultured ruler. He makes cause of learning his own and may be relied on for patronage for any really cultural undertaking. And, I lay special emphasis on the fact, because we have heard and have been hearing of some types of Rajas, in some parts of India, who are a disgrace to their class, and to associate culture with whom in the same breath would be a ridiculous absurdity.

"The Institute feels gratitude to the Raja Saheb of Bhor for what he has already done for the Institute and also may do for it hereafter. For, frankly, gratitude is said to be

another name for expectation of more favours to come. But, without adverting to that aspect, and once more emphasising the fact that he represents a historical family, which has contributed in all times to the preservation of Hindu Culture in Maharastra, I beg to conclude with putting to this meeting the formal proposal that the Raja Saheb be requested to take the Chair, "

नंतर, श्रीमंत राजेसाहेब, औंध, यांनीं प्रास्ताविक भाषण केलें व श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांनीं अध्यक्षीय भाषण केलें. तें परिशिष्टांत नं. २६ ठिकाणीं दिलें आहे. त्यानंतर, डॉ. आर्. एन्. दांडेकर यांनीं, आलेले शुभ संदेश वाचून दाखवून, संस्थेचे ऑनररी सभासद म्हणून नवीन नोंदविलेलीं नांवें वाचून तीं स्वीकारण्याचा ठराव मांडला. अध्यक्ष या नात्यानें श्रीमंत राजेसाहेबांनीं हा ठराव पास असल्याचें जाहीर केलें. डॉ. दांडेकर यांनीं संस्थेस या समारंभानिमित्त मिळालेल्या देणग्यांची यादी वाचून दाखविली. त्यांत श्रीमंत राजेसाहेब यांनीं रु. २५०० ( पंचवीसशें ) दिल्याबद्दल श्रोत्यांना निवेदन केलें; आणि ही रक्कम रु. ५०० ( पांचशें ) सर्वसामान्य फंडाकडे व रु. २००० ( दोन हजार ) Silver Jubilee Fellowship for Post-Graduate Research Work करितां, याप्रमाणें विभागून खर्च करावी अशी श्रीमंत राजेसाहेबांची इच्छा असल्याचें सांगितलें. यानंतर, समारंभानिमित्त तयार केलेल्या Silver Jubilee Volume चें प्रकाशन सर एस्. राधाकृष्णन् यांनीं केलें आणि संस्थेस आजपर्यंत ज्या ज्या उदारधींनीं देणगी देऊन मदत केली, त्यांना Silver Jubilee Medals दिलीं. सर एस. राधाकृष्णन् यांचें नंतर सुश्राव्य व्याख्यान झालें. श्री. बी. एस. कामत यांचें आभाराचें भाषण झाल्यावर, या दिवशींचा कार्यक्रम संपला.

ता. ५ रोजीं सकाळीं सर्व प्रतिनिधींचा, अध्यक्ष श्रीमंत राजेसाहेब यांच्यासह, फोटो काढण्यांत आला. सायंकाळीं ' महाभारताचें आरण्यक पर्व ' हा ग्रंथ श्रीमंत राजेसाहेब, औंध, यांना अर्पण करण्यांत आला.

## पुणें येथील किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटलमधील सिल्व्हर ज्युबिली मेमोरियल इमारतीची कोनशिला-स्थापना

पुणें येथील किंग एड्वर्ड मेमोरियल हॉस्पिटलच्या सिल्व्हर ज्युबिली बिल्डिंगची कोनशिला बसविण्याचा समारंभ नेक नामदार सर रॉजर लमले,

चित्रांक ५२



श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन, अधिपति, कुरुंदवाड (थि.) यांचें राज्यारोहण [ सं. पा. १७७

मुंबई इलाखाधिपति, यांच्या पत्नी लेडी लमले यांच्या हस्तें ता. १९ जानेवारी १९४३ रोजीं झाला. या समारंभास श्रीमंत राजेसाहेब उपस्थित राहिले होते. संस्थेचे अध्यक्ष श्री. एल्. आर्. गोखले यांनीं केलेल्या भाषणांत भोर संस्थानच्या मदतीचा खालील शब्दांत निर्देश केला.

"The Hospital was built out of the munificent donation of His late Highness the Rajasaheb of Bhor and some of the donors. In 1924, with the contribution received from the Red Cross Society, Poona Branch, and from H. H. the present Raja Saheb of Bhor, a septic ward was built and was opened by Lady Wilson."

## सातारा येथील विविध समारंभ

सातारा येथें डिसेंबर १९३९ मध्यें शारीरिक शिक्षण परिषद भरली. या परिषदेचें अध्यक्षस्थान बडोदें संस्थानचे अधिपति हिज हायनेस श्रीमंत प्रतापसिंह महाराज यांनीं मंडित केलें होतें. श्रीमंत राजेसाहेबांना परिषदेच्या चालकांनीं अगत्यपूर्वक निमंत्रण केल्यामुळें, श्रीमंत राजेसाहेब ता. ३ डिसेंबर रोजीं सातारा येथें गेले. या परिषदेस श्रीमंतांनीं रु. ३०० ची देणगी दिली. बडोदा नरेशांच्या भेटीनिमित्त झालेल्या, सातारा म्युनिसिपालिटीचें मानपत्र, श्री. महाराज संभाजीराव हायस्कूलच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ, इत्यादि समारंभांना श्रीमंत राजेसाहेब उपस्थित राहिले होते.

## केडगांव व पंढरपूर येथील समारंभ

ता. ८ फेब्रुवारी १९३८ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांच्या अंतर्गळाच्या व्यथेवर शस्त्रक्रिया करण्यांत आली. त्या शस्त्रक्रियेनंतर श्रीमंत राजेसाहेब अतिशय आजारी झाले. या दुखण्यांत त्यांची प्रकृति अत्यवस्थ झाली असतां, त्यांना लवकर बरें वाटावें, म्हणून, आराम पडल्यानंतर, केडगांव येथें श्री दत्तात्रेयाच्या व पंढरपूर येथें श्री पांडुरंगाच्या दर्शनास श्रीमंत राजेसाहेब यांनीं जाण्याविषयींचा युवराज श्रीमंत भाऊसाहेब यांनीं संकल्प केला होता. श्रीरामकृपेनें त्यांना कांहीं दिवसांनंतर आराम पडला, व ते त्या दुखण्यांतून पूर्णपणें बरे झाले.

श्रीमंत युवराजांचा वरील कृतसंकल्प श्रीमंत राजेसाहेबांना समजल्यावर, त्यांनीं थोडी सवड मिळाल्यानंतर, पंढरपूर व केडगांव यांकडे जाण्याचें ठरविलें.

प्रवासाची सर्व तयारी झाल्यावर, युवराज श्री. भाऊसाहेब व श्री. भैयासाहेब पळशीकर यांच्यासह, श्री. राजेसाहेब ता. २७ नोव्हेंबर १९४० रोजीं ५-३० वाजतां पुण्याहून निघून मोटारीनें केडगांव येथें गेले. श्रीगुरु नारायण महाराज यांचें दर्शन घेतलें. दुसऱ्या दिवशीं ता. २८ रोजीं सकाळीं ९-३० वाजतां तेथील श्री दत्तात्रेयाची महापूजा केली व रु. ६१ दक्षणा म्हणून सर्व द्विजवरांना व विद्यार्थ्यांना वाटण्यांत आले. या दिवशीं गुरुवार असल्यामुळें पालखीचा समारंभ पाहण्याचा व कीर्तन ऐकण्याचा लाभ श्री. राजेसाहेबांना मिळाला. श्री सद्गुरु नारायणमहाराज यांनीं श्री. राजेसाहेब, श्री. युवराजसाहेब व श्री. भैयासाहेब पळशीकर यांना दुपारीं भोजनास बोलाविलें होतें. भोजनानंतर श्री नारायण महाराजांचें श्री. राजेसाहेब यांनीं दर्शन घेतलें, आणि त्यांना रु. ३०० ची गुरुदक्षिणा, व जरीचा पीतांबर आणि शेला श्री दत्तात्रेयास अर्पण केला. नंतर, दुपारीं २-३० वाजतां, श्रीमंत राजेसाहेब आपल्या बरोबरच्या सर्व मंडळीसह केडगांवाहून पंढरपुरास जाण्यास निघाले, व तेथें सुमारें ७ वाजतां पोहोंचले. केडगांवाहून पंढरपूर सुमारें ११० मैल आहे. पंढरपूर येथें स्टेशनच्या रस्त्यावर असलेल्या मुरारजी कानजी धर्मशाळेंत श्री. राजेसाहेबांचा मुक्काम होता.

ता. ३० नोव्हेंबर रोजीं डब्ल्यू. बी. नौरोसजी ऑर्फनेज या संस्थेचे सुपरिंटेंडंट श्री. व्ही. एस. जव्हेरी आणि पेंशर्स रिलीफ असोसिएशनचे अध्यक्ष श्री. व्ही. एच. देवडे यांच्या विनंतीवरून, या दोन्ही संस्थांना श्रीमंत राजेसाहेबांनीं भेटी दिल्या.

ता. १ डिसेंबर रोजीं सकाळीं पंढरपूर येथील श्रीविठ्ठलाची महापूजा श्री. राजेसाहेबांनीं केली. या वेळीं जरीचा पीतांबर, शेला व पागोटें श्री. विठोबास आणि रेशमी पीतांबर व खण श्रीरुक्मिणी देवीस घातलीं. या महापूजेचा खर्च एकूण रु. १६७ झाला. या दिवशीं दुपारीं सुमारें २०० ब्राह्मण व सुवासिनी यांना भोजनास बोलाविलें होतें. भोजनोत्तर तिसऱ्या प्रहरीं ४ वाजतां वैदिक ब्राह्मणांची सभा भरविण्यांत येऊन त्यांना १०२ रु. दक्षिणा देण्यांत आली; व त्या ब्राह्मणांनीं वैदिक मंत्रांनीं दिलेल्या आशीर्वादाचें श्री. राजेसाहेबांनीं ग्रहण केलें. सायंकाळीं आंधळे, पांगळे व लुळे अशा स्त्री-पुरुषांना रु. १३८ किंमतीचें वस्त्रदान करण्यांत आलें.

ता. २ रोजीं पंढरपुरांतील गोरगरीब व आंधळे, पांगळे व लुळे अशा सुमारें २४०० लोकांना गाडगे महाराज यांच्या धर्मशाळेच्या नजीकच्या पटांगणांत जेवण घालण्यांत आलें. या जेवणाच्या वेळीं पंक्तींतून श्री. राजेसाहेब, श्री. युवराज भाऊसाहेब व श्री. भय्यासाहेब पळशीकर यांनीं स्वतः हिंडून पोटभर अन्न सर्वांना मिळेल, याकडे लक्ष पुरविलें.

पंढरपूर येथील श्रीमंत सरकारचे उपाध्ये वे. गोपाळ विश्वनाथ हे या सुमारास आजारी होते; म्हणून, दुपारीं ३ वाजतां त्यांचे चिरंजीव विश्वनाथ गोपाळ यांच्या नांवें उपाध्येपणाची सनद करून दिली; व रु. ५१ दक्षिणा म्हणून दिले. गाडगे महाराजांची धर्मशाळा पाहिली. नंतर, श्री. व्ही. बी. नौरोजी ऑर्फनेज व Foundling Asylum यांस भेट दिली. तेथील डॉक्टर व सुपरिंटेंडेंट यांनीं सर्व हॉस्पिटल श्री. राजेसाहेब यांना हिंडून दाखविलें. व बाल-बालिकांच्या वर्धनाची व्यवस्था कशी ठेविली जाते, त्याबद्दलची त्यांना माहिती सांगितली. नंतर, संस्थेतर्फे श्री. राजेसाहेबांना पानसुपारी देण्यांत आली. पानसुपारीस गांवांतील मामलेदार, हेल्थ ऑफिसर व कांहीं प्रतिष्ठित मंडळी उपस्थित होती. रा. काणे वकिलांनीं भाषण करून श्रीमंतांनीं भेट दिल्याबद्दल आभार मानले. त्यांस समयोचित उत्तर देऊन, संस्थेस रु. ३०० तीनशेंची राजेसाहेबांनीं देणगी दिली. नंतर, तेथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण संस्थेस श्रीमंतांनीं भेट दिली, व संस्थेच्या पानसुपारीचा स्वीकार केला. या संस्थेस रु. ३० तीस देणगी म्हणून दिले.

## बनारस येथील समारंभ

सन १९४१ इ. च्या मार्च महिन्यांत नरेंद्र-मंडळाच्या बैठकीसाठीं श्रीमंत राजेसाहेब दिल्लीला गेले होते. बैठक संपल्यानंतर ता. २० मार्च रोजीं दिल्लीहून ते बनारसला गेले.

ता. २२ रोजीं सकाळीं श्रीमंत राजेसाहेब, प्रो. आळतेकर यांच्यासह, जुन्या काशीचे नवीन उत्खनन केलेले अवशेष पहाण्यास गेले. नंतर, तेथून १२ मैलांवरील सारनाथ येथील बुद्ध-लेणीं पहाणेस गेले. सारनाथ येथें बौद्धकालीन स्तूप व विहार पाहण्यासारखे आहेत. तेथून परत आल्यावर, उत्खननांत नवीन सांपडलेल्या वस्तूंचें संग्रहालय पाहिलें. या ठिकाणीं बौद्धकालीन बुद्धाचे पुतळे, कोरीव दगड, वगैरे वस्तू पाहिल्या. नंतर, त्यांनीं अशोकाचा स्तंभ आणि बुद्धाच्या

अस्थींवर अखिल भारतीय महाबोधी संस्थेनें बांधलेलें बुद्धाचें देवालय पाहिलें. या अस्थि हिंदुस्थान सरकारनें महाबोधी संस्थेस दिलेल्या आहेत. या अस्थींची पेटिका वर्षांतून एकदां बाहेर काढण्यांत येऊन, सर्व लोकांना तिचें दर्शन घडावें, म्हणून तिची मिरवणूक काढण्यांत येते. या बुद्धदेवालयांतील भिंतींवर गौतम बुद्धाच्या आयुष्यांतील सर्व महत्त्वाच्या प्रसंगांचीं चित्रें जपानी चित्रकारांकडून काढविलेलीं आहेत.

दुपारीं गोसेवक श्री. चौंडेमहाराज श्रीमंतांना भेटण्यास आले होते. त्यानंतर बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे संस्थापक पंडित मदन मोहन मालवीय यांची श्रीमंत राजेसाहेबांनीं युनिव्हर्सिटीच्या इमारतींत जाऊन भेट घेतली. पंडित मालवीयांच्या समवेत श्रीमंतांचा फोटो घेण्यांत आला.

ता. २३ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांनीं श्रीगंगामाता व श्रीकाशीविश्वेश्वर यांची महापूजा केली. तिसऱ्या प्रहरीं ४ वाजतां काशी येथील श्रीशिवाशंकरेश्वराचे वहिवाटदार रा. खासनीस यांनीं तेथील ग्रामस्थांतर्फे के. सी. आय. इ. पदवी मिळाल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांना मानपत्र दिलें. नंतर, गोसेवक श्री. चौंडेमहाराज यांनीं स्थापन केलेल्या संस्था, ‘ श्रीसमर्थ भवन ’ नांवाची महाराष्ट्रीय लोकांकरितां बांधलेली धर्मशाळा आणि ‘श्रीराम गोदुग्धालय’ नांवाची, लोकांमध्यें गायीच्या दुधाचा प्रसार होण्यासाठीं उघडलेली, ‘डेअरी’, या दोन संस्थांचा उद्घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झाला. या समारंभाच्या वेळीं पंडित देवनायकाचार्य, पंडित वझेशास्त्री, श्री. नानासाहेब चाफेकर प्रभृति वक्त्यांचीं भाषणें झालीं. पंडित वझेशास्त्री यांनीं मानपत्र वाचून तें श्रीमंतांना अर्पण केल्यानंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं उत्तराचें भाषण करून सर्वांचे आभार मानले. ( मानपत्र व श्रीमंतांचें उत्तराचें भाषण परिशिष्टांत नं. २७ व २८ ठिकाणीं दिलें आहे ) व दोन्ही संस्था सुरू झाल्याचें जाहीर करून, रु. ३०० तीनशेंची देणगी दिली. यानंतर सर्वांनीं गोदुग्धपान केल्यानंतर, श्री. चौंडेमहाराजांनीं आभार मानले.

श्रीमंत राजेसाहेबांनीं नंतर ‘कोंटभट नाना गोडबोले आखाडा’ नांवाच्या शारीरिक शिक्षण संस्थेस भेट दिली; व तेथील पानसुपारीचा स्वीकार करून रु. १०० शंभरची संस्थेस देणगी दिली.

ता. २४ रोजीं बनारसहून निघून श्रीमंत राजेसाहेब, बरोबरच्या मंडळीसह, ता. २५ रोजीं मुंबईस परत आले.

भोरास पोंचल्यावर ता. ७ एप्रिल रोजीं घटना व जंगल कमिटीच्या सभासदांस श्रीमंत राजेसाहेबांनीं मेजवानीस बोलावून, त्या सर्वांना गंगाप्रसाद व चांदीचें भांडें प्रत्येकास भेट म्हणून दिलें. त्याचप्रमाणें कायदेमंडळाच्या सभासदांस ता. १४ एप्रिल रोजीं भोजनास बोलावून चांदीचें भांडें व प्रसाद त्यांनाही देण्यांत आला.

## मुंबई येथील समारंभ

मुंबई येथें डेक्कन मर्चेन्ट्स कोऑपरेटिव्ह बँकेचा सिल्व्हर ज्युबिली Silver Jubilee समारंभ ता. १९ व ता. २० सप्टेंबर १९४२ रोजीं झाला. या समारंभाकरितां श्रीमंत राजेसाहेब ता. १७ रोजीं पुण्याहून निघून मुंबई येथें गेले. ता. १९ रोजीं दुपारीं ३ वाजतां 'वनिताविश्रामसमाजा'च्या पटांगणांत मुद्दाम उभारलेल्या शामियान्यांत हा समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. स्वागतपर पद्यगायन झाल्यावर, डॉ. मो. बा. वेलकर यांनीं प्रास्ताविक भाषण करून अध्यक्षांची ओळख करून दिली. या भाषणांत त्यांनीं श्रीमंतांनीं संस्थानांत केलेल्या सुधारणांचा व त्यांच्या प्रगतिपर राज्यकारभाराचा गौरवानें उल्लेख केला. बँकेचे अकौंटंट श्री. ग. भै. साठे यांनीं अभिनंदनपर संदेश वाचून दाखविल्यानंतर, संस्थेचे सेक्रेटरी रा. कृ. वे. उपाध्ये यांनीं बँकेच्या सुरुवातीपासूनचें प्रगतीचें वृत्त श्रोत्यांस निवेदन केलें. नंतर, श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपलें अध्यक्षीय भाषण केलें. त्यांत बँकेनें केलेल्या सर्वांगीण प्रगतीबद्दल बँकेचे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. स. रा. सरदेसाई यांचें अभिनंदन केलें; व बँकेच्या कार्याची भरभराट होवो अशी इच्छा प्रदर्शित केली. ( हें भाषण परिशिष्टांत नं. २९ ठिकाणीं दिलें आहे. ) नंतर, श्री. आण्णासाहेब भोपटकर यांनीं डॉ. वेलकर यांच्या तैलचित्राचें अनावरण केलें व भाषण करून डॉ. वेलकर यांच्या सहाय्याबद्दल बँक सदैव ऋणी असल्याचें सांगितलें. श्रीमंत राजेसाहेबांच्या हस्तें मॅनेजिंग डायरेक्टर श्री. सरदेसाई यांना गोल्ड स्टार देण्यांत आला. तसेंच, तैलचित्रकार आर्टिस्ट हळदणकर यांना Souvenir आणि गायिका कु. मोहनतारा तळपदे हिला चांदीची डबी श्रीमंतांच्या हस्तें देण्यांत आली. डॉ. वेलकर व श्री. त्रि. बा. गांधी यांनीं आभार मानल्यावर समारंभ संपला.

ता. २०-९-४२ रोजीं दुपारीं श्री. राजेसाहेबांनीं डे. म. को. बँकेच्या ऑफिसला भेट दिली. श्री. सरदेसाई यांनीं बँकेची जागा श्रीमंतांना दाखविली. नंतर, श्री. सरदेसाई, डॉ. वेलकर, श्री. साठे व प्रो. न. र. फाटक यांचीं भाषणें झालीं. प्रो. फाटक यांनीं श्रीमंतांच्या राज्यकारभारविषयक प्रगतिपर धोरणाचा प्रामुख्यानें आपल्या भाषणांत उल्लेख केला. अल्पोपाहार व फोटो झाल्यावर हा समारंभ संपला.

ता. २२ रोजीं दुपारीं ५-३० वाजतां श्रीमंत राजेसाहेबांनीं श्री. भाटकर यांच्या लिथोवर्क्सला भेट दिली व त्यांनीं दिलेल्या अल्पोपाहाराचा स्वीकार केला.

ता. २४-९-४२ रोजीं दुपारीं १२-३० वाजतां ओरिएंट क्लबमध्यें श्री. सरदेसाई यांनीं श्रीमंत राजेसाहेब यांना लंच दिला. त्या वेळीं श्री. सरदेसाई यांचें श्रीमंतांच्या गुणवर्णनपर भाषण झालें. त्यास श्री. राजेसाहेबांनीं समयोचित उत्तर देऊन त्यांचे आभार मानले.

ता. २५-९-४२ रोजीं दुपारीं १ वाजतां डे. म. को. बँकेतर्फे ताज-महाल हॉटेलमध्यें लंच देण्यांत आला. त्यास श्रीमंत राजेसाहेब गेले होते. या वेळीं डॉ. वेलकर यांनीं भाषण केलें; व श्रीमंतांनीं उत्तरादाखल भाषण करून बँकेच्या चालकांचे आभार मानले.

ता. २७-९-४२ रोजीं डॉ. वि. न. आंबेकर, एम्. डी. यांच्याकडे बांद्रा येथें श्रीमंत राजेसाहेब लंचला गेले होते.

सायंकाळीं ५-२५ च्या मेलनें निघून श्रीमंत राजेसाहेब पुण्यास परत आले. बँकेच्या सिल्व्हर ज्युबिली समारंभास श्रीमंत राजेसाहेब हजर राहिल्याबद्दल श्री. सरदेसाई व डॉ. वेलकर यांच्याकडून आभाराचीं पत्रें आलीं. त्यांतील डॉ. वेलकर यांचें पत्र खालीं दिलें आहे.

डे. म. को. बँकच्या डॉ. एम्. बी. वेलकर यांचें ता. ८-१०-४२ चें पत्र :

" Many thanks for your kind letter dated 29th September 1942. I regret I could not acknowledge it earlier. Your presence amongst us, as the distinguished president of the Jubilee Celebrations of the Deccan Merchants Cooperative Bank Ltd., added richly to the decorum, the brilliancy and the right Royal atmosphere of the whole function. The citizens of Bombay and the share-holders of the Bank, who

चित्रांक ५३



मुंबई, दादर, येथील जनरल एज्युकेशन सोसायटीस श्री. राजेसाहेब यांची भेट.

[ सं. पा. १७९

attended the function in numbers, will always cherish your visit to this function, as one of their most happiest recollections. Mrs. Velkar desires me to thank you on our behalf for your kindly accepting our invitation to attend the "Anant Puja celebrations" at our residence. Your presence at the Anant Puja was greatly appreciated by my near relatives and close friends, who had assembled there on the occasion. Your genial nature, unassuming behaviour and the inborn courtesy have created a great impression on all of us.

" I hope and trust that there would be many more such occasions when we would meet and develop still further our new acquaintance. "

## श्रीमंत राजेसाहेब यांचे जामात कुरुंदवाड संस्थानाधिपति यांचें राज्यारोहण व तन्निमित्त श्रीमंत राजेसाहेब यांचें कुरुंदवाडास गमन

श्रीमंत राजेसाहेब, श्री. युवराज, श्री. सौ. माईसाहेब व युवराज-कन्यका कु. विमला राजे व कमला राजे यांच्या समवेत, ता. २९ सप्टेंबर १९४१ रोजीं पुण्याहून निघून कुरुंदवाड येथें तेथील राजेसाहेब यांच्या राज्यारोहण-समारंभाकरितां गेले. तेथें तोफांची सलामी देऊन, त्यांचें स्वागत करण्यांत आलें. ता. ३०-९-४१ रोजीं सकाळीं १०-३० वाजतां तेथील राजवाड्यांत दरबार भरविण्यांत आला. या दरबारांत कोल्हापूर येथील दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेंट ले. क. गेसफर्ड यांनीं भाषण करून नेक नामदार राजप्रतिनिधि लॉर्ड लिन्लियगो यांनीं पाठविलेला खलिता वाचून दाखविला; आणि संस्थानच्या गादीवर श्रीमंत चीफसाहेब यांना बसविलें. या वेळीं तोफांची सलामी देण्यांत आली. नंतर, श्रीमंत राजेसाहेब कुरुंदवाड यांचें भाषण होऊन, हा दरबार संपला. दुपारीं लंच देण्यांत आला. त्यावेळीं फोटो घेण्यांत आला. सायंकाळीं ५-३० वाजतां पुन्हा दरबार होऊन कुरुंदवाडच्या अधिपतींनीं आलेल्या आहेरांचा स्वीकार केला. श्री. राजासाहेब भोर यांनीं साडेतीन वस्त्रें व रोख रु. १००० एक हजारांचा आहेर केला. या दरबारच्या वेळीं रा. ब. विजयराघवाचार्य यांनीं उपदेशाचे चार शब्द कुरुंदवाडच्या अधिपतींना सांगितले. त्या दिवशीं दसरा असल्यामुळें सोनें वाटण्यांत येऊन, हा दरबार संपला.

ता. १ ऑक्टोबर रोजीं कुरुंदवाड अधिपांनीं श्रीमंत राजेसाहेब भोर व बरोबरची मंडळी यांना मेजवानी दिली व परत आहेर केले. श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांनीं कुरुंदवाडच्या रीजंट राणीसाहेबांना आहेर केला व त्यांच्या सर्व नोकर-वर्गाकरितां देणगी म्हणून रु. १००० एक हजार दिले. श्री. सौ. माईसाहेब, युवराज्ञी, यांनीं कुरुंदवाडच्या राजकुटुंबांतील स्त्रियांना लुगडीं दिलीं. या मुक्कामांत श्री. राजेसाहेब यांनीं तेथील चिंतामणि रिक्रिएशन क्लबला भेट देऊन रु. २०० दोनशेंची देणगी दिली. नंतर, दिवाणबहादूर ल. पां. कुळकर्णी यांच्याकडील चहाचा स्वीकार केला, व त्याच दिवशीं सायंकाळीं निघून ता. २ रोजीं सर्व मंडळींसह राजेसाहेब परत पुण्यास आले.

## कुरुंदवाडला द्वितीय भेट

कुरुंदवाड येथील वाचनालयांत संस्थानचे माजी अधिपति श्रीमंत अण्णा-साहेब पटवर्धन यांच्या छायाचित्राचा अनावरण-समारंभ श्री. राजेसाहेब, भोर, यांच्या हस्तें ता. ४ फेब्रुवारी सन १९४२ रोजीं करण्याचें योजिलें. त्याकरितां श्रीमंत राजेसाहेब ता. ३ रोजीं पुण्याहून निघून कुरुंदवाड येथें गेले. तेथें बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे व्हाइस-चान्सेलर सर एस्. राधाकृष्णन् यांनीं श्रीमंत राजे-साहेबांची भेट घेतली. ता. ४ रोजीं दुपारीं ३ वाजतां कुरुंदवाड येथील वाचनालयाचा रौप्य-महोत्सव श्री. भालचंद्र मेमोरियल हॉलमधें करण्यांत आला. स्वागत मंडळाचे अध्यक्ष, दि. ब. एल. पी. कुलकर्णी, यांनीं भाषण करून सर्वांचें स्वागत केलें; आणि श्री. एन. सी. केळकर यांना समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी विनंति केली. श्री. केळकर अध्यक्षपदीं विराजमान झाल्यावर, वाचनालयाचा अहवाल श्री. लेले यांनीं वाचून दाखविला. त्यानंतर श्रीमंत राजे-साहेबांनीं भाषण करून श्री. आण्णासाहेबांच्या तैलचित्राचें अनावरण केलें. तें भाषण परिशिष्टांत नं. ३० ठिकाणीं दिलें आहे. श्री. न. चिं. केळकर यांनीं बक्षिसें वाटलीं व अध्यक्षीय भाषण केलें. नंतर, श्रीमंत राजेसाहेब कुरुंदवाड यांनीं भाषण करून या समारंभानिमित्त वाचनालयाचें नांव "राजा सर रघुनाथराव पंडित पंचसचिव वाचनालय" असें ठेविल्याचें जाहीर करून वाचनालयास भोरच्या श्रीमंत राजेसाहेबांची रु. १०० शंभरची देणगी जाहीर केली. आभा-राचें भाषण व पानसुपारी होऊन हा समारंभ संपला.

चित्रांक ५४



बनारस हिंदु युनिव्हर्सिटीच्या रौप्यमहोत्सवाच्या वेळीं पंडित
मदनमोहन मालवीय यांच्यासह श्री. राजेसाहेब. [ सं. पा. १८०

दुसऱ्या दिवशीं श्री. राजेसाहेबांनीं कुरुंदवाड येथील Water Works Pumping Station पाहिलें. ता. ६ रोजीं श्रीमंत राजेसाहेब पुण्यास परत आले.

## दादर येथील जनरल एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलचा वार्षिक बक्षिस-समारंभ

श्रीमंत राजेसाहेब ता. ४ डिसेंबर १९४१ रोजीं मुंबईस गेले. ता. ५ रोजीं दुपारीं तीन वाजतां त्यांनीं दादर येथील जनरल एज्युकेशन सोसायटीच्या मुलींच्या शाळेस भेट दिली. शाळेची इमारत बांधण्याचें काम चालू होतें. संस्थेच्या चालकांनीं इमारत श्रीमंत राजेसाहेबांना सर्व वर्गांत हिंडून दाखविली. नंतर, मुलींकडून गाणें, नृत्य वगैरे कार्यक्रम करून दाखविण्यांत आले. तेथून परत येतांना, सदर शाळेंतील मुलांचें शारीरिक शिक्षण, कवाइत वगैरे शिवाजी-पार्कमध्यें झाली, ती श्रीमंतांनीं पाहिली. ता. ६ रोजीं ४ वाजतां दादर येथील लल्लूभाई छबिलदास हायस्कूलचा वार्षिक बक्षिस-समारंभ श्री. राजेसाहेबांच्या हस्तें झाला. मि. वैद्य यांनीं स्वागतपर भाषण केलें. हायस्कूलचे प्रिन्सिपाल मि. व्ही. के. जोशी यांनीं हायस्कूलच्या प्रगतीचा अहवाल वाचून दाखविला. या प्रसंगीं श्री. राजेसाहेबांनीं आपलें अध्यक्षीय भाषण केलें, तें परिशिष्टांत नं. ३१ ठिकाणीं दिलें आहे.

या समारंभाच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. ५०० पाचशें संस्थेस देणगी दिली व रु. २०० दोनशें मुलांना मिठाई वाटण्याकरितां म्हणून दिले. नंतर, मुलांना मिठाई वाटण्यांत आल्यावर, आभाराचें भाषण होऊन, हा समारंभ समाप्त झाला.

ता. ९ डिसेंबर रोजीं मुंबईहून श्रीमंत राजेसाहेब पुण्यास परत आले.

## बनारस हिंदू युनिव्हर्सिटीचा रौप्य महोत्सव

बनारस हिंदू युनिव्हर्सिटीच्या आमंत्रणावरून, सन १९४२ च्या जानेवारी महिन्यांत श्री. राजेसाहेब बनारसला गेले. तेथें बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचा रौप्य महोत्सव ता. २१ जानेवारी रोजीं श्रीमंत महाराजासाहेब ऑफ दरभंगा यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. या समारंभास श्री. राजेसाहेब, श्री. भाऊसाहेब, डॉ. जोशी व प्रा. सेक्रेटरी, रा. साने यांच्यासह, हजर राहिले. या

समारंभाकरितां सुमारें एक लक्ष समाज जमला होता. सुरुवातीस प्रार्थनागीतें म्हणण्यांत आलीं. नंतर, अभिनंदनपर संदेशाचें वाचन झालें. पुढें, युनिव्हर्सिटी-कडून पदवीदान जाहीर करण्यांत आलें. सर्व लोकांना उद्देशून मुख्य वक्ते म्हणून महात्मा गांधी यांचें भाषण झालें. आभाराचें भाषण होऊन कार्यक्रम समाप्त झाला. समारंभानंतर झालेल्या ॲट होम पार्टीस श्री. राजेसाहेब हजर राहिले होते. त्यानंतर सर सी. व्ही. रामन् यांचें A game of chance या विषयावर विनोदपूर्ण असें व्याख्यान श्रीमंत राजेसाहेबांनीं ऐकलें. या रौप्यमहोत्सवानिमित्त श्री. राजेसाहेबांनीं रु. ५००० पांच हजार रुपयांची देणगी दिली. पूर्वी दिलेली देणगी रु. ५००० व हे नवीन रु. ५००० एकूण रु. १००००दहा हजार श्री. राजेसाहेबांनीं दिले. भारतवर्षाच्या प्राचीन उत्खनन-कार्याकडे व इतिहास व सुधारणा यांच्या संशोधनाच्या कार्याकडे या रकमेच्या व्याजाचा विनियोग केला जावा असें चालकांच्या संमतीनें ठरवून ही रक्कम दिली. ही सर्व रक्कम श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या खाजगी खर्चाच्या रकमेंतून दिली आहे.

येथील मुक्कामांत ता. २२ रोजीं श्रीविश्वेश्वराची महापूजा श्री. राजेसाहेब यांनीं केली. बनारस युनिव्हर्सिटींत कुनवालकृष्ण व देवयानीकृष्ण यांच्या चित्रांचें प्रदर्शन पाहिलें. पंडित मदनमोहन मालवीय व सर राधाकृष्णन् यांच्या भेटी घेतल्या व पंडित मदनमोहन मालवीयांचेसह श्रीमंत राजेसाहेबांचा फोटो घेणेंत आला. प्रसादगुप्त यांनीं बांधिलेल्या भारतमाता मंदिर, हिंदुस्थानचा विस्तृत असा भूरचनेचा नकाशा ( Relief map ) व इतर निरनिराळया प्रदेशांचे नकाशे श्रीमंत राजेसाहेबांनीं पाहिले. या मंदिराकरतां व नकाशाकरतां खर्च एक लक्ष रुपये झाला, असें समजतें.

## महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजला श्रीमंत राजेसाहेब यांची भेट

श्रीमंतांनीं ता. ५ नोव्हेंबर १९४७ या दिवशीं, चालकांच्या विनंती-वरून, म. ए. सोसायटीचे अध्यक्ष या नात्यानें सोसायटीच्या कॉलेजला भेट दिली. त्या वेळेस सेक्रेटरी व श्रीयुत खाडये, प्रिन्सिपाल, यांनीं श्रीमंतांचें स्वागत करून, महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या कार्याची व विशेषतः या नवीन कॉलेजची माहिती सांगितली. त्यानंतर श्रीमंतांनीं यथोचित उत्तर दिलें व पुढें २००० दोन

चित्रांक ५५



श्री. राजे शामराज बहाद्दूर रायरायन्, राजवंत, हैदराबाद, यांच्या पुणें येथील
'रेणुका' नांवाच्या बंगल्याची वास्तुशांत झाली. ता. ४।६।१९४८ इ.

[ सं. पा. १८३

हजार रुपयांची देणगी पाठवून दिली. श्रीमंत राजेसाहेबांचें भाषण परिशिष्टांत नं. ३२ ठिकाणीं दिलें आहे. श्रीमंतांच्या या भेटीसंबंधानें महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेज मॅगॅझीनच्या फेब्रुवारी १९४८ च्या अंकामध्यें खालील मजकूर आलेला आहे :

" H. H. the Rajasaheb of Bhor, who is the President of our Society, paid a visit to our College on the 5th of Nov. 1947. He was taken round the College by Prin. Khadye, who then introduced the professors to him. The Rajasaheb has always taken a keen interest in higher education, and is visibly pleased when he has a circle of learned men around him. He responds generously to any appeal for funds, when the cause is worthy; and we make no doubt that in him we have a great friend, philosopher and guide, to whom we can look up for help. "

श्रीमंत राजेसाहेबांना महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे ५ नोव्हेंबर १९४४ रोजीं अध्यक्ष निवडण्यांत आलें, व त्यांनीं सोसायटीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा २७ ऑगस्ट १९४८ रोजीं दिला. तो मान्य करतांना खालीलप्रमाणें उत्तर आलें.

MAHARASHTRA EDUCATION SOCIETY, POONA.

( Sadasiv Peth, Near Peru Gate )
POONA CITY.

M. N. BHAT, M.A.,L.T.
Secretary
M. E. Society, Poona.

No. 379 OF 1948/49. SEPTEMBER 2, 1948.

Dear Mr. Joshi,

The General Body has desired me to convey to His Highness their grateful thanks for the very able manner in which His Highness bore the responsibility. They record their sincerest appreciation of the dignity, sagacious counsel and sympathy His Highness extended to the Society from time to time. His Highness' tenure has been remarkable in that it saw the resurrection of the Society's old College, thus fulfilling a long-cherished aspiration. His Highness' fatherly solicitude for the affairs of the Society has been our strength.

We have no doubt that His Highness will continue to look at the Society as his own and give us the benefit of his mature experience and wise counsel.

I conclude with a prayer for His Highness' continued long life, health and happiness.

Yours faithfully
Sd/-M. N. Bhat,
Secretary
Maharashtra Education
Society, Poona 2.

The Private Secretary,
to His Highness Raja Shrimant Sir Raghunathrao
Pant Sachiv, K.C.I.E.
Raja Saheb of Bhor,
Laxmi Vilas, Nathan Road,
Poona, 1.

## कै. दत्तोपंत आपटे स्मृतिदिन समारंभ

पुणें येथील प्रसिद्ध इतिहासज्ञ कै. दत्तात्रय विष्णु आपटे, बी.ए. यांचा तृतीय स्मृतिदिन पुणें येथें भारत इतिहास संशोधक मंडळाच्या सभागृहांत ता. २२ माहे ऑक्टोबर १९४६ रोजीं साजरा करण्यांत आला. या समारंभाचें अध्यक्षस्थान श्रीमंत राजेसाहेब यांनीं, दत्तोपंत आपटे स्मारक-मंडळाच्या चालकांच्या विनंतीस मान देऊन, स्वीकारलें होतें. या समारंभाच्या वेळीं भारत इतिहास संशोधक मंडळाचे कार्याध्यक्ष म. म. द. वा. पोतदार यांना स्प्रिंगेल ग्रंथाची टंकप्रत श्रीमंतांनीं अर्पण केली. नंतर, "चिंचवड श्रीदेव संस्थानचा संक्षिप्त इतिहास व देव-दप्तराचें स्थूल निरीक्षण" या निबंधाचें वाचन श्री. कृ. वा. पुरंदरे यांनीं केलें. त्यांना श्रीमंतांनीं 'आपटे-पारितोषिक' देऊन अध्यक्षीय भाषण केलें. त्यांत त्यांनीं महाराष्ट्रांत इतिहास संशोधनाची आवड लोकांमध्यें कै. विसुभाऊ राजवाडे यांनीं कशी निर्माण केली व त्यांनीं लावलेल्या संशोधनरूपी रोपट्याचा आज केवढा वृक्ष निर्माण झाला आहे, याची माहिती थोडक्यांत निवेदन केली; आणि त्यामध्यें कै. आपटे यांचें स्थान किती वरचें आहे, याचेंही श्रीमंतांनीं विवेचन केलें. कै. आपटे यांची संशोधनाची कार्यपद्धति अभिनव व निर्दोष होती, हें

चित्रांक ५६



श्री गणेश मोफत वाचनालय व ग्रंथालय, पुणे, संस्थेचा रौप्य-महोत्सव... ता. २।९।१९४५ इ. [सं. पा. १८३

प्रामुख्यानें त्यांनीं श्रोत्यांच्या नजरेस आणलें. तसेंच, हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं चालू असलेल्या इतिहाससंशोधनाच्या कार्यपद्धतींत व भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कार्यपद्धतींत फार फरक असून, मंडळाची पद्धति निर्दोष आहे असा आपला अभिप्राय व्यक्त केला. रा. पुरंदरे यांनीं चिंचवड संस्थानच्या देवस्थानाबद्दल माहितीपूर्ण व संशोधनात्मक निबंध लिहिल्याबद्दल श्रीमंतांनीं त्यांचा गौरवपूर्वक उल्लेख करून, या स्मारक मंडळाच्या कार्यास रु. ३०० तीनशेंची देणगी दिली.

## ‘ रेणुका ’ बंगल्यांतील भोजनसमारंभ

हैदराबादचे श्रीमंत राजेबहादुर रायरायन शामराज व त्यांच्या पत्नी श्रीमंत सौ. जान्हवी ताईसाहेब—श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांच्या भाची—यांच्या पुणें येथें ‘रेणुका’ नांवाच्या बंगल्यांत श्रीमंत राजेसाहेब, भोर, हे भोजनास गेले होते. त्या वेळेस सर्व कुटुंबांतील मंडळींचें छायाचित्र घेण्यांत आलें.

## श्रीगणेश मोफत वाचनालय व ग्रंथालय, पुणें

या संस्थेचा रौप्य-महोत्सव श्रीमंत राजेसाहेब ह्यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २।९।१९४५ रोजीं झाला.

श्रीमंत राजेसाहेब यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारल्यानंतर, प्रो. द. वा. पोतदार, बी. ए., शेठ पोपटलाल शहा, श्री. म. हे. देव, एम्. ए. व श्री. बा. भ. वाळवेकर ह्यांचीं ह्या समारंभास अनुरूप अशीं भाषणें झाल्यानंतर, श्रीमंत सरदार आबासाहेब मुजूमदार यांनीं ह्या संस्थेकरतां पुष्कळच श्रम घेतले असल्यामुळें, त्यांच्या तैलचित्राचें अनावरण करावें अशाबद्दल श्रीमंतांना विनंति केल्यावरून, त्यांनीं त्यांच्या तैलचित्राचें अनावरण केलें व ह्या संस्थेच्या रौप्य महोत्सवासंबंधीं समयोचित भाषण केलें. तें परिशिष्टांत नं. ३३ ठिकाणीं दिलेलें आहे ह्या शुभप्रसंगीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं ५०० पांचशें रुपयांची देणगी संस्थेकरितां जाहीर केली; तसेंच, सरदार मुजूमदार हे “ संगीत संग्रह ”—नांवाचा ग्रंथ तयार करीत आहेत, त्याकरितां ५०० पांचशें रुपयांची देणगी त्यांच्याकरितां जाहीर केली; व फोटो झाल्यानंतर हा समारंभ समाप्त झाला.

## सरदार आबासाहेब मुजूमदार यांचा षष्ठ्यब्दपूर्ति समारंभ

पुणें येथील श्रीमंत सरदार गं. ना. ऊर्फ आबासाहेब मुजूमदार, सी. आय. ई. यांचा षष्ठ्यब्दपूर्ति समारंभ ता. १५-९-४६ रोजीं सायंकाळीं ‘ डेक्कन सरदार

व दुमालदार' संस्थेच्या वतीनें शनिवार पेठ घ. नं. ४२४ मध्यें श्री. सरदार नातू यांच्या नव्या वाड्यांत साजरा झाला. अध्यक्षस्थानीं भोर संस्थानचे अधिपति हे होते. समारंभास दक्षिण महाराष्ट्रांतील अनेक सरदार व इनामदार उपस्थित होते. प्रारंभीं ईशस्तवन व स्वागतपर पदें झाल्यावर, सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्या गुणगौरवपर श्री. तात्यासाहेब केळकर, महामहोपाध्याय दत्तोपंत पोतदार, श्री. चित्राव शास्त्री, सरदार नातू, मास्तर कृष्णराव वगैरे वक्त्यांचीं भाषणें झालीं. श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं आपल्या भाषणांत सरदार मुजुमदार यांच्या लोकसेवेचा गौरव करून, कोणासही न दुखविणाऱ्या त्यांच्या वृत्तीची तारीफ केली.

महामहोपाध्याय पोतदार यांनीं श्रीमंत मुजुमदार यांनीं केलेल्या इतिहास-संशोधनाच्या कार्याचा गौरव करून, त्यांच्या चिकित्सक व अभ्यासू वृत्तीबद्दल त्यांची स्तुति केली.

मास्टर कृष्णराव यांनीं श्रीमंत मुजुमदारांनीं गायन-वादन-कलेचा किती खोल अभ्यास केला आहे, याची माहिती निवेदन केली.

वरील भाषणांनंतर सरदार पुरंदरे यांनीं मानपत्र वाचून दाखविलें, व मानपत्र आणि पोषाख अध्यक्षांच्या हस्तें श्रीमंत मुजुमदार यांना अर्पण केला.

सरदार मुजुमदार यांनीं जनतेचे व आपल्या मित्रमंडळींनीं केलेल्या या सत्काराबद्दल त्यांचे आभार मानले. श्रीमंत राजेसाहेबांचें समारोपादाखल भाषण झालें. त्यांनीं सरदार मुजुमदार व भोर दरबार यांचें नातें किती निकटचें आहे हें सांगून, श्री. मुजुमदार यांनीं केलेल्या विविध लोकसेवेचा गौरव केला व त्यांना ही सेवा करण्यास परमेश्वरानें उदंड आयुरारोग्य द्यावें, अशी सदिच्छा व्यक्त केली.

शेवटीं, सरदार विंचुरकर यांनीं आभार-प्रदर्शक भाषण केल्यावर, समारंभ संपला.

## हि. हा. श्रीमंत छत्रपति शहाजी महाराज यांच्या राज्याभिषेकाकरितां श्रीमंत राजेसाहेब यांची कोल्हापुरास भेट

हर हायनेस श्री. ताराबाईसाहेब महाराणी यांनीं ता. ३१ मार्च १९४७ रोजीं आपले भाचे हि. हा. मेजर श्रीमंत सर विक्रमसिंह पवार, बी.ए., के. सी. एस्. आय्., महाराज, देवास ( सिनियर ), यांना दत्तक घेतलें. त्या समारंभाच्या करतां श्रीमंतांनीं राजेश्री वि. सु. पारखी, सुपरिंटेंडेंट ( हुजूर ऑफिस ), यांना

चित्रांक ५७



श्रीरामनवमी उत्सवांतील मराठे व हरिजन यांच्या भोजनपंक्तींत श्री. राजेसाहेब स्वतः हिंडत आहेत. [ सं. पा. १८६

चित्रांक ५८



श्री. राजेसाहेबांची कन्या श्री. पद्मावती राजे व श्री. चिंतामणराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन, कुरुंदवाड (सी.) यांचा विवाह. [सं. पा. १९३

आपल्या वतीनें आहेर करण्याकरितां पाठविलें होतें. त्यांनीं रु. ५०० पांचशें रुपयांचा आहेर केला; तसेंच, ह्या समारंभानिमित्त भेटी-दाखल ७००० रुपये किंमतीचा (नर) हत्ती त्यांनीं श्री. राजेसाहेबांतर्फे छत्र. श्री. महाराजांना दिला.

श्रीमंत राजेसाहेब यांना डेप्युटेशनबरोबर निमंत्रण आल्यावरून, ते हि. हा. मेजर सर शहाजी महाराज ह्यांच्या कोल्हापुर संस्थानच्या राज्याभिषेकाकरितां कोल्हापुरास गेले.

छत्र. महाराजांचा राज्याभिषेक-समारंभ जुन्या वाड्यांत ता. १ जून १९४७ रोजीं मोठ्या थाटानें झाला. त्या समारंभास श्रीमंतांची स्वारी गेली होती.

श्रीमंतांचा मुक्काम तेथें दोन दिवस होता. श्रीमंतांची सर्व व्यवस्था श्रीमंत महाराज यांच्याकडून ठेवण्यांत आली होती. श्रीमंतांनीं महाराजसाहेब यांस रु. ७००० सात हजार रुपये किंमतीचा ( मादी ) हत्ती नजर म्हणून अर्पण केला. श्रीमंत महाराजांनीं श्रीमंतांस निरोप देतेवेळीं रु. ४०० चारशें रुपयांचा आहेर केला.

## प्रकरण १५ वें

# श्री रामनवमी उत्सव

सन १९४१ इ. सालीं चैत्र शुद्ध ८ ते १२ पर्यंत ( एप्रिलमध्यें ता. ५ ते ९ अखेरपर्यंत ) श्रीरामजन्मोत्सव दरसालप्रमाणें पांच दिवस करण्यांत आला. या सालापासून उत्सवाच्या कार्यक्रमांत खालील नव्या दोन गोष्टींचा समावेश करण्यांत आला.

चैत्र शु. ९ हा जन्मकाळाचा दिवस. या दिवशीं जन्मकाळानिमित्त श्रीरामचंद्राच्या दर्शनासाठीं जे खेडोपाडीचे स्त्री-पुरुष आले, त्या सर्वांना प्रसाद-जेवण मिळावें अशी व्यवस्था करण्यांत आली. हे जेवण **सर्व जातींच्या** (संस्थान-मधील व बाहेरील) **सर्व लोकांना** देण्यांत आलें. या वर्षी अशा लोकांची संख्या एकूण १४,००० चौदा हजार झाली. सरकारी रथखाना आणि स्टेट एंजिनियर खात्याचें मोकळें आवार, या दोन्ही ठिकाणीं विस्तीर्ण मांडव घालून पात्रें मांड-ण्यांत आलीं. या जेवणाचा खर्च, चैत्र शु. एकादशी व द्वादशी या दोन दिवशीं जें ब्राह्मणभोजन घालण्यांत येत असे, तें कमी करून व त्या बचतीच्या रकमेंत आणखी भर घालून, त्या रकमेंतून करण्यांत आला. दुसरी गोष्ट म्हणजे श्रीरामनवमी-उत्सवाच्या शेवटच्या दिवशीं चैत्रगौरीनिमित्त गांवांतील सुवासिनींना हळदीकुंकू देण्यांत येत असे. आजपर्यंत हळदीकुंकू घेण्याकरितां गांवांतील सुवासिनी आपआपल्या सवडीप्रमाणें, जिला जेव्हां वेळ होई तेव्हां, ती येऊन हळदीकुंकू घेऊन जात असे. त्यामुळें या समारंभाचा हेतू, म्हणजे सर्वांनीं एकत्र येऊन एकमेकांच्या गांठीभेटी व नव्या ओळखी करून घेऊन साहचर्य वाढविणें, तो बिलकूल साध्य होत नसे. सबब, या वर्षी सर्व स्त्रिया हळदीकुंकू घेण्याकरितां एकाच वेळीं म्हणजे ४-३० वाजतां येतील व त्या वेळीं श्री. सौ माईसाहेब, युवराज्ञी, ह्या हजर राहून सर्वांच्या भेटी घेतील व सर्वांस एकदम हळदीकुंकू देण्यांत येईल, अशी व्यवस्था करण्यांत आली. हळदकुंकू घेण्यास आलेल्या स्त्रियांना मानाप्रमाणें योग्य जागीं बसविण्याची तजवीज ठेविली होती.

चित्रांक ५९



श्री. चिंतामणराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन व श्री. पद्मावती राजे यांच्या विवाहानिमित्त पानसुपारीचा दरबार. [ सं. पा. १९३

महायुद्धजन्य महर्गता सर्वत्र अतिव्याप्त झाली असतांही, मागील दोन वर्षांची प्रथा चालू ठेवण्याच्या हेतूनें याही वर्षी, म्हणजे स. १९४३ इ. सालीं, चैत्र शु. ९ रोजीं श्रीरामप्रभूच्या दर्शनास आलेल्या सर्व जातींच्या लोकांना प्रसादाचें भोजन देण्यांत आलें. या वर्षी ११६५५ आकरा हजार सहाशें पंचावन पात्रें झालीं.

चैत्र शु. ८ तें १२ अखेर उत्सवांतील धार्मिक विधि, नाच, कीर्तन, गायन, वगैरे पूर्वचालीप्रमाणें सर्व झालें. या वर्षी शु. १२ रोजीं सौ. हिराबाई बडोदेकर या प्रसिद्ध गायिकेच्या गायनाचा कार्यक्रम करण्यांत आला. या सालच्या उत्सवांतील हें वैशिठ्य होय.

## शंकराजी नारायण पुण्यतिथि समारंभ, सन १९३९ इ.

सन १९३९ इ. सालचा ब्रम्हीभूत श्रीशंकराजी नारायण यांचा पुण्यतिथि महोत्सव भोर येथें ता. २३ व २४ माहे नोव्हेंबर सन १९३९ या दोन दिवशीं साजरा करण्यांत आला. कीर्तन, प्रवचन, वगैरे कार्यक्रम दरसालप्रमाणें झाले. या वर्षी श्रीशंकराजी नारायण पारितोपकाकरितां आलेल्या ग्रंथांपैकीं श्री. ग. ह. खरे यांच्या 'मूर्तिविज्ञान' या ग्रंथास १२५ रु, श्री. न. गं. आपटे यांच्या 'महाराष्ट्रांतील पाणी-पुरवठा' या पुस्तकास रु. ७५, कु. कृष्णाबाई कोल्हटकर यांच्या 'उपासमार व बेकारीचा प्रश्न' या व श्री. वाय. एन. देशपांडे यांनीं लिहिलेल्या 'स्मृति-स्थळ' या महानुभावपंथीय पुस्तकांस प्रत्येकीं रु. ५० याप्रमाणें बक्षिसें देण्यांत आलीं.

## शंकराजी नारायण पुण्यतिथिसमारंभ, सन १९४० इ.

सन १९४० इ. सालीं ता. ११ व १२ नोव्हेंबर रोजीं पुण्यतिथि-समारंभ झाला. श्रीमंत राजेसाहेब यांची प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें, ते पुण्याहून या समारंभाकरितां येऊं शकले नाहीत. समारंभांतील सर्व कार्यक्रम युवराज श्रीमंत भाऊसाहेब यांच्या हस्तें पार पाडण्यांत आले. ता. १२ रोजीं दुपारीं दरबारांत श्री. युवराज भाऊसाहेब यांनीं या सालीं आलेल्या ग्रंथांपैकीं श्री. केशव लक्ष्मण दप्तरी यांच्या 'धर्मविवादस्वरूप' या पुस्तकास रु. १२५, प्रो. कृष्णराव गणेश मुळे यांच्या 'भारतीय संगीत' या

ग्रंथास रु. ७५, सौ. कमलाबाई टिळक यांनीं लिहिलेल्या 'स्त्रीजीवनांतील कांहीं प्रश्न' या पुस्तकास रु. ५० आणि 'पाणकळा' या श्री. रघुनाथ वामन दिघे यांच्या कादंबरीस रु. ५० याप्रमाणें रु. ३०० चें पारितोषिक विभागून दिल्याचें जाहीर केलें.

## शंकराजी नारायण पुण्यतिथि समारंभ, सन १९४१ इ.

श्री. शंकराजी नारायण यांचा वार्षिक पुण्यतिथि-महोत्सव ता. ३१ ऑक्टोबर व १ नवंबर सन १९४१ रोजीं साजरा करण्यांत आला. दरसाल-प्रमाणें कीर्तन, प्रवचन, पोवाडे, गायन वगैरे कार्यक्रम झाले. या वर्षी श्रीशंकराजी नारायण पारितोषिकासाठीं आलेल्या पुस्तकांपैकीं श्री. रामचंद्र नारायण नातूकृत 'जगाचा इतिहास', डॉ. सौ. मनोरमाबाई थत्ते कृत 'पाश्चात्य देशांतील स्त्रियांचें जीवन', प्रो. द. के. केळकरकृत 'संस्कृति संगम' व डॉक्टर माधव गोपाळ देशमूखकृत 'मराठी भाषेचें रचनाशास्त्र' या पुस्तकांना अनुक्रमें रु. १००, रु. ५०, रु. ७५ व रु. ७५ असें रु. ३०० चें पारितोषिक विभागून देण्यांत आलें.

## शंकराजी नारायण पुण्यतिथि समारंभ, स. १९४२ इ.

माहे नोव्हेंबर सन १९४२ इ. महिन्यांत ता. १९ व २० रोजीं शंकराजी नारायण यांची पुण्यतिथि भोर व अंबवडें येथें नेहमींप्रमाणें साजरी झाली. सर्व कार्यक्रम यथासांग पार पडले. या वर्षी शंकराजी नारायण-पारितोषिकासाठीं आलेल्या ग्रंथांपैकीं प्रो. के. ना. वाटवे, पुणें, यांच्या 'रसविमर्श' या ग्रंथास रु. १००, श्री. शंकर श्रीकृष्ण देव, रा. धुळें, यांच्या 'श्रीसमर्थ हृदय' यास रु. १२५, व डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या 'श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' यास रु. ७५ याप्रमाणें रु. ३०० चें पारितोषिक विभागून देण्यांत आलें. श्री. स. कृ. काळे यांनीं श्री. राजेसाहेबांचें तैलचित्र तयार करून, त्यांना अर्पण केलें. त्यांना उत्तेजनार्थ रु. २५० श्री. राजेसाहेबांनीं देऊन, त्यांचा गौरव केला.

## शंकराजी नारायण पुण्यतिथि समारंभ, सन १९४३ इ.

ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांची पुण्यतिथि ता. ९ व १० माहे नोव्हेंबर १९४३ रोजीं साजरी करण्यांत आली. या वर्षीच्या समारंभाचें

चित्रांक ६०



श्री. पद्मावती राजे यांच्या लग्नसमारंभांतील पुरुष मंडळी. [सं. पा. १९३

वैशिष्ट्य म्हणजे श्रीशंकराजींचें तैलचित्र तयार करून त्याच्या लहान तसबिरीची, श्रींच्या पादुकांसमवेत, भोर येथें काढण्यांत आलेली मिरवणूक, हें होय. श्री. काळे आर्टिस्ट यांनीं हें तैलचित्र, श्रीशंकराजींच्या शरीरावयव-वैशिष्ट्यासंबंधींच्या इतिहासांतर्गत शब्दचित्रावरून मोठ्या कुशलतेनें तयार केलें आहे. श्रीमंत राजेसाहेबांनी श्री. काळे यांना रु. ८५० आठशें पन्नास रुपये देऊन, त्यांचा साजेसा गुणगौरव केला. या दिवशींच्या दरबारांत भोर येथील पेपर मिलचे मालक श्री. पारखे यांनीं श्रीमंतांना चांदीचा टी सेट नजर केला.

ता. १० रोजीं दुपारीं श्रीशंकराजी नारायण पारितोषिक देण्याकरितां भरविलेल्या दरबारांत प्रो. जोग यांनीं लिहिलेल्या 'सौंदर्यशोध व आनंदबोध' या वाङ्मयीन ग्रंथास रु. १००, डॉ. तुळपुळे यांच्या 'यादवकालीन मराठी भाषा' या ग्रंथास रु. ७५, श्री. टेंबेकृत 'हिंदुस्थानचा सागरविक्रम' या पुस्तकास रु. ७५ आणि श्रीयुत दातेकृत 'पितापुत्रसंबंध' या ग्रंथास रु. ७५ याप्रमाणें श्रीमंतांनीं पारितोषिकें देऊन त्या त्या ग्रंथकारांचा गौरव केला.

## शंकराजी नारायण पुण्यतिथि समारंभ, सन १९४४ इ.

श्रीशंकराजी नारायण पुण्यतिथि-महोत्सव ता. २९ व ३० माहे ऑक्टोबर १९४४ रोजीं आंबवडें व भोर येथें दरसालप्रमाणें झाला. ता. ३० रोजीं तिसऱ्या प्रहरीं भरविलेल्या दरबारांत श्री. राजेसाहेब यांनीं प्रो. वाडेकरकृत 'मानसशास्त्र', प्रो. एन्. एम्. पटवर्धनकृत 'प्रो. वामन मल्हार जोशी यांचें चरित्र' आणि डॉ. कमलाबाई देशपांडेकृत 'स्मरणसाखळी' या पुस्तकांना प्रत्येकीं रु. १०० याप्रमाणें पारितोषिकें दिलीं. प्रो. वाडेकर हे समारंभास उपस्थित होते. त्यांनीं भाषण करून आपल्या 'मानसशास्त्र' या ग्रंथांतील विषयाचा श्रोत्यांना थोडक्यांत परिचय करून दिला. 'सह्याद्रि' मासिकाचे संपादक प्रो. डी. व्ही. काळे, एम.ए. हे निमंत्रित पाहुणे म्हणून या समारंभाकरितां आले होते. त्यांनींही ऐतिहासिक विषयावर व्याख्यान दिलें. रात्रीं श्रीशंकराजी नारायण यांच्याविषयींच्या नाटकाचा प्रयोग करून दाखविण्यांत आला.

## शंकराजी नारायण पुण्यतिथि समारंभ, सन १९४६ इ.

ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांच्या पुण्यतिथीचा स. १९४५ इ. सालांतील महोत्सव ता. ९ माहे एप्रिल १९४६ रोजीं साजरा करण्यांत आला.

दरसालप्रमाणें हा उत्सव कार्तिकांत म्हणजे आक्टोबर-नोव्हेंबरमध्यें १९४५ सालीं व्हावयाचा; पण, त्या वेळीं भोरची हवा प्लेगनें दूषित झाल्यामुळें, त्या वेळीं उत्सव तहकूब करणें भाग पडलें. या समारंभास आलेल्या निमंत्रित पाहुण्यांत साहित्यसम्राट् श्रीयुत नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर हे उपस्थित होते. भोर संस्थानच्या कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षपदावर फेब्रुवारीमध्यें श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांची योजना केली होती; व त्यानंतर प्रथमच ते समारंभाकरितां भोरास आले होते. श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेल्या भाषणांत श्री. तात्यासाहेब यांनीं कार्यकारी मंडळाचें अध्यक्षपद स्वीकारल्याबद्दल धन्योद्गार काढले. त्याचप्रमाणें श्रीयुत तात्यासाहेबांनीं कामास सुरुवात केल्यापासून कामें तांतडीनें निकालांत काढण्याचें व जीं कामें निकालीं काढलीं, त्याबद्दल थोडक्यांत वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्याचें धोरण अनुसरलें, त्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या भाषणांत पसंति दर्शविली. नंतर, श्री. राजेसाहेब यांनीं या वर्षी पारितोषिकांकरितां आलेल्या ग्रंथांपैकीं खालील ग्रंथांचे लेखकांना पारितोषिकें देऊन त्यांचा गौरव केला. ( योग ऑफ सेंट्स ) Yoga of Saints कर्ते प्रो. व्ही. एच्. दाते यांना रु. १५०, 'श्रीसमर्थ सांप्रदाया'चे लेखक श्री. शं. श्री. देव यांना रु. ९० आणि 'हिंदूंच्या अवनतीची मीमांसा' या ग्रंथाचे कर्ते पं. रघुनाथशास्त्री कोकजे यांना रु. ६० याप्रमाणें रु. ३०० चें पारितोषिक विभागून दिलें.

श्री. तात्यासाहेब यांनीं, श्रीमंतांच्या भाषणास उत्तरादाखल, केलेल्या भाषणांत आपण ही कामगिरी कां व कशी पतकरली, वर्तमानपत्रांतील नित्याची भोरचे कारभारावरील टीका आपणांस बोचक कां वाटत होती, श्री. राजेसाहेबां-बद्दल आपली स्नेहभावना किती पूर्वींपासून आहे, जागा स्वीकारतांना श्री. राजेसाहेबांनीं सहकार्याचें दिलेलें आश्वासन, इत्यादि गोष्टी सविस्तर सांगून, आपल्या कामगिरीबद्दल, चांगलें अगर वाईट सुरुवातीस न बोलतां, ज्या एक वर्षाच्या मुदतीपर्यंत काम करण्याचें आपण पतकरलें आहे, ती मुदत पुरी झाल्यावर मगच लोकांनीं आपलें म्हणणें असेल, तें म्हणावें; कारण, युद्धावर जाणाऱ्या योद्ध्याचा, जातांना गौरव न करतां, तो लढाई जिंकून परत आल्यावर त्याच्या शौर्याचें वर्णन करणें हितप्रद असतें असें मोठ्या विनम्र भावानें लोकांना सुचविलें; आणि श्री. राजेसाहेब यांची प्रकृति आजारीपणानंतर पुनः पूर्ववत झाली व ते

चित्रांक ६१



श्री. 'पद्मावतीराजे यांच्या 'लग्नसमारंभांतील स्त्रीजन-समुदाय. [ सं..पा.: १९३

पूर्वीप्रमाणें राज्यकारभाराचीं कामें पाहूं लागले, तसेंच नरेंद्र-मंडळाच्या स्थायी समितीवर दक्षिणेंतील संस्थानिकांनीं त्यांची निवड केली, याबद्दल प्रशंसोद्‌गार काढले.

## शंकराजी नारायण पुण्यतिथि-समारंभ, सन १९४७ इ.

चालीप्रमाणें ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांची पुण्यतिथि ता. २५ व ता. २६ नोव्हेंबर १९४७ रोजीं भोर मुक्कामीं साजरी करण्यांत आली. या उत्सवाचें वैशिष्ट्य म्हणजे राजेश्री कृ. वा. पुरंदरे यांनीं श्रीशंकराजी नारायण यांचें चरित्र लिहिलें, तें श्रीमंतांस त्यांनीं अर्पण केलें. त्यांजबद्दल पारितोषिक म्हणून श्रीमंतांनीं त्यांस रु. ३०० तीनशें रुपयांचें पारितोषिक दिलें.

## प्रकरण १६ वें

# कौटुंबिक गृह्यसंस्कार

---

## श्रीमंत राजेसाहेब यांच्या मुलांबद्दल

## राजकुमारी श्रीमंत पद्मावती राजे यांचा विवाह

श्रीमंत राजेसाहेब यांची कन्या श्री. कुमारी पद्मावती ( ऊर्फ बेबी ) या उपवर झाल्यामुळें त्यांचा विवाह करावा असें श्रीमंत राजेसाहेब यांच्या मनांत आलें. कुरुंदवाड ( थोरली पाती ) संस्थानचे अधिपति श्रीमंत चिंतामणराव भालचंद्रराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन हे अनुरूप वर असून त्यांच्याशीं आपल्या कन्येचा विवाह व्हावा, अशी श्रीमंत राजेसाहेबांची व श्रीमंतांची द्वितीय पत्नी कै. श्री. सौ. लक्ष्मीबाईराणीसाहेबांची फार दिवसांपासून मनीषा होती, व त्यांनीं ती पूर्वींच कुरुंदवाड संस्थानाधिपतींच्या मातोश्रींजवळ व्यक्तही केली होती. त्यांना श्रीमंत पद्मावती राजे पसंत पडल्या होत्या. तेव्हां, उभयपक्षांची इच्छा असल्यावर, लग्न जुळण्यास प्रत्यवाय कशाचा असणार ?

लग्नाकरितां बरीच पाहुणे मंडळी आली. पुराणिक, पळशीकर, बुध्याळकर, राजे शामराज, सद्गुरु श्रीनारायण महाराज इत्यादि प्रमुख मंडळीं आली होती.

ता. १७ जून १९४१ पासून लग्नासंबंधींच्या कार्यक्रमास सुरुवात झाली. व्याहीभोजन, सीमांतपूजन, वाङ्निश्चय, अक्षत वगैरे समारंभ मोठया थाटानें पार पडले. सीमांतपूजन-समारंभ श्री. युवराज भाऊसाहेब व श्री. सौ. माईसाहेब यांच्या हस्तें करण्यांत आला.

लग्नसमारंभास हजर राहण्यासाठीं दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेंट ले. क. गेसफर्ड, त्यांची पत्नी व कन्या आणि त्यांचे सेक्रेटरी मेजर विलोबी व मिसेस विलोबी ही पाहुणे मंडळी सायंकाळीं ७-१५ वाजतां भोरास आली. रात्रीं ८-३० वाजतां त्यांना मेजवानी देण्यांत आली.

चित्रांक ६२



ी. सौ. (पद्मावती राजे) विजयादेवी राणीसाहेब कुरुंदवाड (सी.) यांचें लग्नानंतरचें छायाचित्र [ सं. पा. १९३

ता. १८ रोजीं सकाळीं लग्नासंबंधीं सर्व धार्मिक विधी यथासांग मोठ्या थाटानें करण्यांत आले. नंतर ९-४५ वाजतां सुमुहूर्तावर लग्नविधि साजरा झाला. त्या वेळीं पानसुपारीचा दरबार श्रीराम मंडपांत भरविण्यांत आला होता. या दरबारास श्रीसद्गुरु नारायणमहाराज, केडगांव, यांनीं उपस्थित राहून वधूवरांस शुभाशीर्वाद दिला. पानसुपारीस आलेल्या प्रमुख मंडळींत ले. क. गेसफर्ड रेसिडेंट व त्यांच्या बरोबरची मंडळी, श्री. तात्यासाहेब केळकर, म. म. प्रो. दत्तोपंत पोतदार, श्री. सरदार बापूसाहेब विंचूरकर, रि. हायकोर्ट जज्ज ढवळे, मि. लोकूर, रिटायर्ड डि. व सेशन्स जज्ज, श्री. चांदवडकर, रा. ब. चिमणलाल किसनदास, सरदार बापूसाहेब काळे, इत्यादि मंडळी होती.

श्री. राजेसाहेबांना लग्नानिमित आहेर करण्यांत आले; त्यांचा त्यांनीं प्रेमपूर्वक स्वीकार केला. आहेर करणाऱ्या मंडळींत श्रीमंतांचे स्नेही, आप्त व दक्षिणेंतील बहुतेक सर्व संस्थानांचे प्रतिनिधि होते. संस्थानांच्या प्रतिनिधींना लगेच देणग्या देण्यांत आल्या.

सायंकाळीं लक्ष्मीपूजन झाल्यावर श्री. कु. पद्मावतीबाई यांचें नांव श्री. सौ. विजयादेवी पटवर्धन असें ठेवण्यांत आलें. सर्व समारंभ पार पडल्यानंतर, ता. २१ रोजीं सकाळीं ७ वाजतां चीफसाहेब, कुरुंदवाड, आपल्या नूतन विवाहित पत्नी व मातोश्री यांसह भोराहून निघून कुरुंदवाडला गेले. जातेवेळीं दरबार भरवून त्यांना निरोप देण्यांत आला.

या लग्नसमारंभानिमित सुमारें ७५ अभिनंदनपर विद्युत्संदेश श्री. राजेसाहेबांना आले. पटवर्धन व सचिव यांच्या दरम्यान झालेल्या, म्हणजे कोंकणस्थ व देशस्थ या ब्राह्मण पोट-जातींतील, विवाहाबद्दल ता. २० जून १९४१ च्या केसरीच्या अंकांत एक स्फुट लेख लिहून श्रीमंतांचें अभिनंदन करण्यांत आलें. ( तो लेख परिशिष्टांत नं. ३४ ठिकाणीं दिला आहे. )

श्रीमंत सौ. विजयादेवी, राणीसाहेब कुरुंदवाड, या १९४१ सालच्या मुंबई विद्यापीठाच्या प्रवेशपरीक्षेस ( Matriculation ) बसल्या होत्या. या परीक्षेचा निकाल ता. ३० मे रोजीं लागून, त्या परीक्षेंत उत्तीर्ण झाल्याची बातमी समजल्यावर ता. ३१ मे रोजीं श्रीमंत राजेसाहेब, श्री. सौ. विजयादेवी

यांच्यासह, भोरास आले. भोर येथें दरबार भरविण्यांत येऊन सर्वांना पेढे वांटण्यांत आले व ब्राह्मणांस दक्षिणा देण्यांत आली.

## श्री. सौ. विजयादेवी राणीसाहेब यांना कन्यारत्न-प्राप्ति

श्रीमंत सौ. विजयादेवी राणीसाहेब, कुरुंदवाड (सीनियर), या पुणें येथें लक्ष्मीविलास बंगल्यांत ता. ४-१२-१९४२ रोजीं सुखरूपपणें प्रसूत होऊन त्यांना कन्यारत्न झालें. पुणें येथें ता. १५-१२-१९४२ रोजीं बारशाचा समारंभ मोठ्या थाटाचा झाला. नूतन बालिकेचें नांव उषादेवी ठेवण्यांत आलें.

## श्री. सौ. विजयादेवी यांना द्वितीय कन्यारत्न-प्राप्ति

ता. २३-४-४६ रोजीं लक्ष्मीविलास बंगला, पुणें, येथें श्री. सौ. विजयादेवी राणीसाहेब प्रसूत होऊन कन्यारत्न झालें. त्याचें नांव शोभा असें ठेविलें.

शोभा ह्यांस एक वर्ष झाल्यानंतर पहिला वाढदिवस साजरा करण्यांत आला; त्या वेळेस उभयतां कन्यांचा श्री. राजेसाहेबांसमवेत फोटो घेण्यांत आला.

श्री. सौ. विजयादेवी राणीसाहेब ह्यांनीं आपलें नांव नुकतेंच वाडिया कॉलेजमध्यें घातलें आहे व फर्स्ट इयर आर्टस्च्या क्लासांत त्या सध्यां शिकत आहेत (१९४८).

## श्रीमंत राजकुमार बापूसाहेब यांचा विवाह

राजकुमार श्रीमंत आनंदराव ऊर्फ बापूसाहेब यांचा विवाह पुणें येथें ता. ४ जुलै १९४१ मिती आषाढ शु. १० शके १८६३ रोजीं लक्ष्मीविलास बंगल्यांत झाला. पुणें जिल्ह्यांतील रावेत गांवचे इनामदार श्री. श्रीधर विष्णु पुंडले यांची कन्या कु. लीलाबाई हिची वधू म्हणून निवड करण्यांत आली.

लग्न ठरल्यावर अवधि फारच थोडा असल्यामुळें आप्तेष्ट वगैरे मंडळींना तारेनें निमंत्रणें पाठविण्यांत आलीं. लग्नास श्री. पळशीकर, सरदार श्री. विंचूरकर, राजे शामराज वगैरे आप्त उपस्थित होते.

ता. ४ रोजीं सकाळीं ८ वाजून ३ मिनिटें या सुमुहूर्तावर लग्नविधि साजरा झाला. नंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं आप्तस्वकीयांनीं केलेल्या आहेरांचा

चित्रांक ६३



श्री. सौ. विजयादेवी राणीसाहेब कुरुंदवाड (सी.) यांना द्वितीय कन्यारत्न-प्राप्ति. [सं. पा. १९४

प्रेमपूर्वक स्वीकार केला. श्रीमंत बापूसाहेब यांच्या पत्नीचें नांव श्री. सौ. दुर्गा-देवी ऊर्फ वहिनीसाहेब ठेवण्यांत आलें.

या विवाहाचें वैशिष्ट्य असें कीं, हा विवाह वैदिक पद्धतीस अनुसरून करण्यांत आला. परंतु, धार्मिक विधीखेरीज रूढ आचार-तंत्रास अजीबात फाटा देण्यांत आला.

या विवाहाच्या साध्या स्वरूपाबद्दल सातारा येथील ' ऐक्य ' वर्तमानपत्रांत १३ जुलै १९४१ रोजीं स्फुट लेखद्वारें श्रीमंतांचें अभिनंदन करण्यांत आलें होतें. तो लेख परिशिष्टांत नं. ३५ ठिकाणीं दिला आहे.

श्रीमंत राजकुमार बापूसाहेब हे हल्लीं ( १९४८ ) वाडिया कॉलेजमध्यें सीनियर बी. ए. च्या क्लासांत शिकत आहेत.

श्रीमंत नारायणराव ऊर्फ रावसाहेब हे १९४५ जूनमध्यें एल्एल्. बी. होऊन १९४८ सालीं बॉम्बे बार कौन्सिलची अॅड्व्होकेटची परीक्षा पास झाले आहेत.

---

## युवराज श्रीमंत भाऊसाहेब, बी. ए., यांच्या मुलांबद्दल श्री. आबासाहेब यांचा व्रतबंध

युवराज श्री. भाऊसाहेब यांचे चिरंजीव श्री. चिमणाजीपंत ऊर्फ आबा-साहेब यांचें वय मौंजीबंधनास योग्य झालें, असें पाहून श्री. राजेसाहेब यांनीं त्यांचा व्रतबंध करण्याचें ठरविलें. चैत्र शु. ५ शके १८६५ (ता. ९ एप्रिल १९४३ ) ही तिथि मुक्रर करण्यांत आली. यथावकाश व्रतबंधाच्या निमंत्रण-पत्रिका प्रभू श्रीरामचंद्र व श्रीशंकराजी नारायण यांना अर्पण करण्यांत आल्यावर आप्त, स्नेही, मित्र वगैरे मंडळींना अगत्यपूर्वक निमंत्रणें रवाना करण्यांत आलीं. मुंजीच्या निमित्तानें खालील मंडळी उपस्थित झाली होती. श्री. पुराणिक, श्री. पळशीकर, इंदूर, श्री. राजे शामराज, हैद्राबाद, श्री. सरदार बापूसाहेब विंचूरकर, श्री. राजेसाहेब, कुरुंदवाड, श्री. डॉवेजर राणीसाहेब, कुरुंदवाड, श्री. सौ. विजयादेवी, राणीसाहेब कुरुंदवाड, श्री. न. चिं. केळकर व डॉ. जेजुरीकर. मे. रेसिडेंटसाहेब व त्यांच्या पत्नी आणि त्यांचे सेक्रेटरी वगैरे मंडळी

आली होती. ता. ८ एप्रिलपासून मुंजीच्या कार्यक्रमास सुरुवात झाली. ता. ८ रोजीं गडंगनेराचें जेवण झालें. दुपारीं १ वाजतां कोल्हापुराहून रेसिडेंट ले. क. सी. जी. एन् . एडवर्डस् हे मिसेस एडवर्डस् आणि सेक्रेटरी मि. बी. एम. बेकन व त्यांच्या पत्नी यांच्यासमवेत मुंजीच्या समारंभाकरितां भोर येथें आले. सायंकाळीं मुंजीचा अक्षतसमारंभ मोठ्या थाटानें करण्यांत आला. मिरवणूक सर्व लवाजमा हत्ती, घोडे, स्वार, शिबंदी इत्यादींनीं युक्त अशी होती. रात्रीं साहेब-बहादुरांना व्रतबंधानिमित्त हि. हा. शंकरराव मॅन्शन्समध्यें मेजवानी देण्यांत आली. ता. ९ रोजीं सकाळीं मुंजीसंबंधींचे सर्व धार्मिक विधि मातृभोजन वगैरे झाल्यावर, ११ वाजून ५४ मिनिटें या सुमुहूर्तावर व्रतबंधसमारंभ श्रीराम-मंडपांत झाला. या समारंभाच्या पानसुपारीस सर्व पाहुणेमंडळी, मे. रेसिडेंट-साहेब आणि भोर येथील सर्व प्रतिष्ठित नागरिक हजर होते. मुंज लागल्यावर श्रीमंत आबासाहेब हे श्रीमंत युवराजसाहेब यांच्याबरोबर दरबारांत आल्यानंतर, पानसुपारी वाटण्यांत आली. भोजनोत्तर सायंकाळीं ५ वाजतां आहेराची कचेरी भरवून पाहुणेमंडळी आणि भोर येथील सर्व मंडळी यांनीं अर्पण केलेल्या आहेरांचा श्रीमंत युवराजसाहेब यांनीं स्वीकार केला. रात्रीं ९-३० वाजतां मुंजीसंबंधीं भिक्षावळीची मिरवणूक फारच थाटाची व अपूर्व अशी झाली. मिरवणुकींत संस्थानचा सर्व लवाजमा सामील होता व हत्तीवर अंबारींत श्रीमंत आबासाहेब यांना बसविण्यांत आलें होतें. सर्व खाशा स्वाऱ्या मिरवणुकींत पायीं चालत होत्या.

ता. १० रोजीं मुंजीप्रीत्यर्थ भोर येथील सर्व जातींच्या लोकांना जेवण घालण्यांत आलें; व ब्राह्मणांना देकार देण्यांत आला. पाहुणे मंडळींना ज्याच्या त्याच्या दर्जाप्रमाणें परत आहेर करण्यांत आल्यावर, सर्वजण श्रीमंतांचा निरोप घेऊन परत गेले.

## युवराज कुमारी विमलाराजे यांचा विवाह

मि. माघ व. २ गुरुवार ता. २३-२-४८ रोजीं पुणें येथें युवराजकुमारी श्री. सौ. विमलादेवी यांचें लग्न श्री. लोकूर, जस्टिस, यांचे द्वितीय चिरंजीव श्रीयुत बाळासाहेब, एम्. ए., एल्एल्. बी., यांजबरोबर झालें. लग्नसमारंभास श्री. राजे

चित्रांक ६४



श्री. राजकुमार बापूसाहेब व श्री. सौ. दुर्गादेवी ( बहिनीसाहेब ) यांच्या लग्न समयींचें उभयतांचें छायाचित्र.

[ सं. पा. १९४

शामराज बहादूर, हैद्राबाद, श्री. सौ. जान्हवीताईसाहेब, तसेंच श्रीमत् जगद्गुरू शंकराचार्य, मठ संकेश्वर यांची स्वारी, श्री. राजेबहाद्दर, फलटण, श्री. सौ. राणीसाहेब, फलटण, श्री. राजेसाहेब, कुरुंदवाड ( सिनियर ), श्री. अक्कासाहेब, कोल्हापूर, वगैरे मंडळी आली होती. लग्नसमारंभ झाल्यावर भोजन ( मेजवानी ) समारंभ झाला. नंतर दुपारीं ५ तें ७ वाजेपर्यंत रिसेप्शन ( स्वागतपर पानसुपारी ) वगैरे होतें.

महात्मा गांधींचा दुःखदायक खून लग्नदिनापूर्वी थोडेच दिवस अगोदर झाल्यामुळें, व लग्न तत्पूर्वी ठरलें असून तें तहकूब ठेवणें शक्य नसल्यामुळें, तें मोठ्या प्रमाणांत न करतां, लहान प्रमाणावर उरकून घेतलें.

श्री. सौ. विमलादेवी परशुरामभाऊ कॉलेजमध्यें सीनियर बी. ए. च्या क्लासांत हल्लीं ( स. १९४८ इ. ) शिकत आहेत.

श्री. कमलाराजे ह्या यंदा ( स. १९४८ इ. ) मॅट्रिक पास होऊन परशुरामभाऊ कॉलेजमध्यें फर्स्ट इयरच्या क्लासांत शिकत आहेत.

## प्रकरण १७ वें

# दुःखकारक प्रसंग

### श्रीमंत रेणुकाराजे यांचें निधन

श्री. युवराज यांची चतुर्थ कन्या श्रीमंत रेणुकाराजे, यांचें निधन भोर येथें—हार्टफेलनें—हृदयक्रिया बंद पडून ता. ११-२-१९४५ रोजीं झालें. त्या वेळेस श्रीमंत राजेसाहेब यांचा मुक्काम पुणें येथें होता. निधनाची बातमी कळतांच, श्रीमंत राजेसाहेब यांस फार वाईट वाटलें. श्रीमंत राजेसाहेब भोर येथें श्री. सौ. माईसाहेब यांच्या सांत्वनास लगेंच गेले व प्रेतयात्रेंत मठा ( राजघराण्यांतील मंडळींची दहनभूमि ) पर्यंत स्वतः हजर होते.

### श्री. वासुदेवराव पुराणिक यांचें निधन

श्रीमंत राजेसाहेब यांचे श्वशुर श्री. वासुदेव गोपाळ पुराणिक यांस पुणें येथें वृद्धापकाळीं ता. १७-८-१९४२ रोजीं देवाज्ञा झाली. श्रीमंत राजेसाहेब त्या वेळीं भोर येथें होते. त्यांना ही दुःखकारक बातमी समजतांच, ते लागलींच पुण्यास गेले. त्याच्या दुसऱ्या दिवशीं ता. १८-८-४२ रोजीं भोर येथें श्रीमंतांचा राज्यारोहणदिन समारंभ होणार होता. पण, तो या दुःखद प्रसंगामुळें रद्द करण्यांत आला. श्री. वासुदेवरावजी यांनीं ब्रह्मदेशांत अकौंट्स खात्यांत अकौंटंट म्हणून बरींच वर्षे नोकरी केली. सेवानिवृत्त झाल्यावर पेन्शन घेऊन ते पुण्यास येऊन राहिले. परमेश्वरकृपेनें हें पेन्शन सुमारें २५-३० वर्षे भोगण्याइतकें दीर्घ आयुष्य त्यांना लाभलें; व त्या आयुष्यामध्यें त्यांनीं बरींच लोकोपयोगी कामें केलीं.

### श्री. भागीरथीबाई पुराणिक ऊर्फ अम्मा यांचें निधन

श्री. वासुदेवराव पुराणीक हे वारल्यानंतर सुमारें चार वर्षांनीं ता. १४ सप्टेंबर १९४६ रोजीं उदराच्या विकारानें इंदूर येथें श्रीमती अम्मा यांना देवाज्ञा झाली. त्या वेळीं त्यांचें वय अजमासें ६५ वर्षांचें होतें. निधनापूर्वीं वर्षभर

चित्रांक ६५



श्री. राजकुमार बापूसाहेब ह्यांच्या लग्नातील ग्रुप छायाचित्र.

. पा. १६४

त्यांची प्रकृति ॲनिमियाच्या विकारानें आजारीच होती. त्याजवर औषधोपचार पुष्कळ केले; पण, रोग बळावत जाऊन व त्यांतच उदराचा रोग उत्पन्न झाल्यानें, औषधोपचारासाठीं त्यांना इंदूर येथें नेण्यांत आलें. परंतु, स्थलांतराचा व उपचारांचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

## हि. हा. महाराज, देवास ( ज्यूनियर ), यांचा मृत्यु

हिज हायनेस श्रीमंत सदाशिवराव ऊर्फ खासेसाहेब पवार, महाराज देवास ( ज्यू. ), हे ता. ६-१२-१९४३ रोजीं निवर्तल्याची दुःखकारक बातमी आली. देवास हें संस्थान उत्तर हिंदुस्थानांत असलें, तरी तें मराठा संस्थान असल्यानें त्याचे दक्षिणेशीं निकटचे व दृढ संबंध आहेत. श्री. खासेसाहेबांचा व श्रीमंत राजेसाहेबांचा, नरेंद्रमंडळाच्या बैठकीनिमित्त व संस्थानिकांच्या हितसंरक्षणास्तव विचारविनिमय करण्याच्या उद्देशानें अनेकवेळां गांठी भेटी होऊन, विशेष परिचय झाल्यामुळें, त्यांच्या निधनाची वार्ता ऐकून श्रीमंतांना फार वाईट वाटलें. त्यांच्या निधनानिमित्त भोर संस्थानांतील शाळा व कोर्ट-कचेऱ्यांना एक दिवस सुट्टी देण्यांत आली व गॅझेटचा जादा अंक प्रसिद्ध करण्यांत आला.

## हि. हा. बिकानेरच्या महाराजांचें निधन

हि. हा. महाराज श्रीगंगासिंहजी बहादुर, जी. सी. आय. इ., जी. सी. एस. आय., जी. सी. व्ही. ओ., जी. बी. ई., के. सी. बी., एल्‌एल्‌.डी., बिकानेर संस्थानचे अधिपति हे मुंबई येथें वयाचे त्रेसष्टावे वर्षी ता. २-२-१९४३ रोजीं निधन पावले. त्यांनीं आपल्या अमदानींत प्रजेच्या सुखसोयींकडे विशेष लक्ष दिलें व प्रजेची व संस्थानची सर्वांगीण उन्नति घडवून आणली. चेंबर ऑफ प्रिन्सेस ऊर्फ नरेंद्रमंडळ स्थापन करण्याच्या कामीं त्यांनीं विशेष प्रयत्न केले; व त्या संस्थेचे ते सुरुवातीपासून पांच वर्षे चान्सेलर ऊर्फ अध्यक्ष होते. संयुक्त राज्यघटनेच्या योजनेच्या कामीं राउंडटेबल कॉन्फरन्सच्या ( मंडलाकार परिषदेच्या ) वेळीं संस्थानांतर्फे त्यांनीं महनीय कामगिरी केली. स. १९०१ इ. च्या चिनी युद्धांत, १९१४ तें १९१८ च्या महायुद्धांत—पहिलें जर्मन महायुद्ध— द्रव्य व मनुष्यबळ यांचें साम्राज्यसरकारस मोठेंच साहाय्य त्यांनीं केलें.

व्हसायच्या तहावर हिंदी संस्थानांतर्फे (Indian India) सही करण्याचा अपूर्व मान त्यांना मिळाला होता. त्यांचा व श्रीमंत राजेसाहेबांचा फार स्नेह असे; व भोरच्या भावी अपेक्षित शुगर फॅक्टरीला पाणी मिळण्यासंबंधींच्या कामांत, 'आपल्याला मदतीची जरुरी वाटल्यास, ती देण्यांत येईल,' असें त्यांनीं आपण होऊन श्रीमंतांना सुचविलें होतें. नरेंद्रमंडळावर काम करतांना श्रीमंत राजेसाहेबांना त्यांच्या सल्ल्याचा फार उपयोग होई. त्यांच्या निधनानें संस्थानिकांचा एक कर्तबगार हितचिंतक गेल्यामुळें, श्रीमंत राजेसाहेबांना फार वाईट वाटलें. त्यांच्या निधनानिमित्त भोर येथील व संस्थानमधीलही शाळा व कोर्ट-कचेऱ्यांना एक दिवस सुट्टी देऊन, त्यांच्या स्मृतीबद्दलचा आपला आदर व्यक्त करण्यांत श्रीमंतांनीं उचित व इष्ट तेंच केलें.

## श्रीमंत हि. हा. महाराजा, कोल्हापूर, यांचा मृत्यु

हि. हा. छत्रपति श्रीमंत राजाराममहाराज हे मुंबई येथें एकाएकीं २६ नोव्हेंबर १९४० रोजीं हृदयक्रिया बंद पडून निधन पावले. श्रीमंत राजेसाहेब व श्रीमंत छत्रपतिमहाराज यांचा फार निकट स्नेहसंबंध असल्यामुळें व श्रीमंतांच्या व त्यांच्या कोल्हापूर येथें कामानिमित्त वारंवार भेटी होत असल्यामुळें, त्यांच्या एकाएकीं निधनानें श्रीमंत राजेसाहेब यांना फार दुःख वाटलें. त्यांच्या निधनानिमित्त स्पेशल गॅझेट काढून श्री. राजेसाहेब व दरबार यांनीं आपलें दुःख व आदर प्रदर्शित केला. भोर येथें व संस्थानमध्यें सर्व कोर्ट-कचेऱ्या, शाळा, यांना तीन दिवस सुट्टी देण्यांत येऊन भोर राजवाडा व पुणें बंगला यांवरील निशाणें तीन दिवस खालीं करण्यांत आलीं होतीं.

## हिज हायनेस श्री. सर सयाजीराव महाराज, बडोदें, यांचें निधन

हि. हा. श्री. सयाजीराव महाराजसाहेब ता. ६-२-३९ रोजीं रात्रीं मुंबई येथें जयमहाल प्यालेसमध्यें निधन पावले. ही दुःखद वार्ता समजल्यानंतर भोर संस्थानांतील सर्व कोर्ट-कचेऱ्या व शाळा यांना सुट्टी देण्यांत आली. भोरास व इतर ठिकाणीं शोकप्रदर्शनार्थ व्यापारधंदा बंद ठेवून हरताळ पाडण्यांत आला.

चित्रांक ६६



युवराजकुमार श्री. आबासाहेब हे उपनयन वेळीं बोहल्याजवळ उभे आहेत. [सं. पा. १९६

चित्रांक ६७



युवराजकुमार श्री. आबासाहेब यांच्या उपनयनाच्या वेळचा दरबार.

[ स. पा. १९६

हिज हायनेस सयाजीरावमहाराज युरोपहून ३१ ऑक्टोबरला परत आल्यानंतर, लगेंच त्यांची प्रकृति फार बिघडली. त्या वेळीं हर हायनेस महाराणीसाहेब, बडोदें, व त्यांची कन्या महाराणीसाहेब, कुचबिहार, या विलायतेंत होत्या. महाराज आजारी झाल्याचें कळल्याबरोबर स्पेशल विमानानें त्या मुंबईस आल्या होत्या. महाराजांच्यासाठीं खुद्द लंडनहून डॉक्टर विमानानें आणविण्यांत आला. त्यांच्या विचारें मुंबईचे सर्व नामांकित डॉक्टर औषधोपचार करीत होते. परंतु, तब्बेत एकदम बिघडून ता. ६ रोजीं रात्रीं त्यांचें निधन झालें.

सर सयाजीरावमहाराज यांनीं ६३ वर्षें फार उत्तम रितीनें राज्य केलें. त्या अवधींत त्यांनीं विविध प्रकारच्या अनेक सुधारणा संस्थानांत घडवून आणून, औद्योगिक दृष्ट्या आपलें संस्थान प्रगत केलें. फिरत्या लायब्ररींची योजना, शाळांची वाढ व सक्तीचें प्राथमिक शिक्षण या बाबतींत बडोदें राज्य हें सर्वांत पुढारलेलें असें होतें. त्यांनीं कलाभुवन नांवाची संस्था स्थापन करून औद्योगिक शिक्षणाची सोय केली. त्यांनीं प्रजेच्या उन्नतीसाठीं अनेक योजना करून त्या अंमलांत आणल्या; प्रजेचें जीवन उन्नत व सुखकर कसें करतां येईल, याबाबत त्यांचे सतत विचार व प्रयत्न सुरू असत. कांहीं कांहीं बाबतींत तर ब्रिटिश राज्यांतल्यापेक्षांही बडोदें संस्थानांत जास्त व विविध सुधारणा झाल्या होत्या. अस्पृश्यतानिवारण, अल्पवयी-लग्न-प्रतिबंध, विधवांचें जीवन सुखावह करणें, इत्यादि सामाजिक सुधारणा-क्षेत्रांतही कायदे करून प्रशंसनीय असें त्यांनीं कार्य केलें. त्यांनीं संस्थानांत शेती सुधारणा, धंदेवाढ, व्यापारवृद्धि वगैरे संबंधांतही यशस्वी प्रयत्न केले. ते दोन वेळ राउंडटेबल कॉन्फरन्सचे सभासद होते व ऑल इंडिया फेडरेशन व्हावें अशी त्यांची फार इच्छा होती. त्यांच्या राज्यांत सर टी. माधवरावसारखीं नामांकित माणसें दिवाणपदावर होतीं. महाराज हे हिंदुस्थानांतील संस्थानिकांत फार हुषार व प्रमुख पुढारी होते. श्रीमंत राजेसाहेब, युवराज असतांना, श्री. सयाजीरावमहाराज हे त्यांना भेटण्यास महाबळेश्वरास त्यांच्या बंगल्यांत आले होते; तसेंच, श्रीमंत राजेसाहेब, युवराज असतांना, उत्तर हिंदुस्थानांत प्रवासास गेले होते, त्या वेळेस त्यांनीं बडोद्यास मुक्काम केला होता. महाराजांनीं स्टेट गेस्ट म्हणून नजरबाग प्यालेस-

मध्यें त्यांची उत्तम प्रकारची व्यवस्था ठेविली होती. श्रीमंत सयाजीराव हे श्रीमंत राजेसाहेबांच्या वडिलांच्या कारकीर्दींत स. १९०७ इ. मध्यें एकदां भोरासही आले होते.

## साहित्यसम्राट् श्री. नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांचें निधन

महाराष्ट्रांतील प्रसिद्ध साहित्यसम्राट्, लोकमान्य टिळकांचे पट्टशिष्य, केसरी वर्तमानपत्राचे माजी संपादक व अष्टपैलू राजकीय पुढारी श्री. नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर हे ता. १४ ऑक्टोबर १९४७ रोजीं अकस्मात् निधन पावले. आदले दिवशीं सायंकाळपर्यंत ते नित्याचीं कामें करीत होते. ता. १४ रोजीं उजाडण्यापूर्वींच बिछान्यांत निजलेले असतांना, हृदय-क्रिया बंद पडून त्यांचें देहावसान झाल्याचें त्यांच्या कुटुंबांतील मंडळींस आढळून आलें. ते पूर्वीं यत्किंचित्‌ही आजारी नव्हते. शेवटपर्यंत ते काम करीत होते. ता. १३ च्या रात्रीं ' वाङ्मयशोभा ' नांवाच्या मासिकाकरितां लेख लिहून ते झोंपीं गेले होते. परंतु, त्यांना आपला मृत्यु नजीक आला असल्याची जाणीव मात्र झालेली असावी, अशी त्यांनीं ता. १३ च्या रात्रीं झोंपण्यापूर्वीं लिहिलेल्या खालील कवितेवरूनच खात्री होते :

दिसों लागे मृत्यू परि न भिववूं तो मज शके ।
तयाच्या भेटीचें असत मजला ज्ञानचि निकें ॥
प्रवेशे रानीं जो धरुनिच शतघ्नी निज करिं ।
न भी तो वाघाला परि हसुनि सुस्वागत करी ॥ १ ॥

मला जन्मा येतां तनुभरणकार्या कणकण ।
दिलें पांचां भूतीं परत करणें तें निज ऋण ॥
तदाधारें सौख्यें सतत जगलों तें मज पुरें ।
तनुत्यागाऐसा इतर अनृणा मार्गचि नुरे ॥ २ ॥

त्यांच्या निधनाची वार्ता ताबडतोब सर्व पुणें शहरभर पसरली. त्यांच्या स्नेह्यांसोबत्यांना ही वार्ता खरी न वाटल्यामुळें ते, खरोखरीच काय झालें, हें

चित्रांक ६८



युवराजकुमारी श्री. विमलाराजे व श्रीयुत बाळासाहेब लोकूर.······

[ सं. पा. १९६

पाहण्याकरितां हजारोंनीं त्यांच्या निवासस्थानीं तात्काळ धांवतच गेले. वार्ता अर्थातच त्यांच्या दुर्दैवानें खरी ठरली. तात्यासाहेब त्यांना कायमचे सोडून गेले होते. ता. १४ रोजीं अंत्यविधीसाठीं त्यांच्या शवाची मिरवणूक जात असतां, श्री. राजेसाहेब यांनीं गायकवाडवाडयापाशीं शवास पुष्पहार घालून, त्यांच्याविषयींचा आपला आदरभाव व्यक्त केला. मृत्युसमयीं त्यांचें वय ७५ वर्षांचें होतें.

ता. २१-१०-४७ रोजीं पुणें येथील महाराष्ट्रीय मंडळांत श्री. तात्यासाहेबांच्या निधनानिमित्त झालेल्या दुखवटयाच्या सभेच्या वेळीं उपस्थित राहून श्री. राजेसाहेबांनीं श्रीयुत तात्यासाहेबांच्या कार्याबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त केली.

‘ केसरी ’च्या संपादकाच्या जागेवरून निवृत्त झाल्यावर, ते आपलें आयुष्य लेखन-वाचनांत घालवीत असत. ते राजकारणांतून व सार्वजनिक कार्यांतून जरी निवृत्त झाले होते, तरी लोक त्यांना महाराष्ट्राचे अनिभिषिक्त राजे म्हणून मान देत त्यांचा हरएक कामांत वरचेवर सल्ला घेण्यासाठीं सर्व दिवसभर माणसांची ये-जा त्यांच्याकडे चालूच असे. त्यांच्या निधनानें महाराष्ट्रांतील सर्व लोकांना अत्यंत दुःख झालें. निधनानंतर त्यांच्या सुतकदिवसांत एके दिवशीं श्री. राजेसाहेब त्यांच्या कुटुंबीय मंडळीच्या भेटीस जाऊन सांत्वनपर दोन शब्द बोलून आले. श्री. राजेसाहेबांना आपल्या कुटुंबियांतील एक महत्त्वाची व्यक्ति गेल्याइतकें दुःख झालें. त्यांचा व श्री. राजेसाहेबांचा परिचय ५० वर्षांपूर्वींपासूनचा होता व त्यांचा—त्यांच्या सल्लामसलतींचा—संस्थानच्या राज्यकारभारांत, अत्यंत अडचणीच्या वेळीं, श्रीमंत राजेसाहेबांना जितका उपयोग झाला, तितका दुसऱ्या कोणाही व्यक्तीचा झाला नाहीं. सन १९४६ सालपर्यंत ते सल्लामसलत देत असत; पण, या सालच्या फेब्रुवारीपासून त्यांनीं संस्थानच्या कारभारी मंडळाचें अध्यक्षस्थान स्वीकारून राज्यकारभाराची प्रत्यक्ष जबाबदारी आपल्या शिरावर घेतल्यामुळें, श्रीमंतांना ते केवळ आपल्या कुटुंबियांपैकींच नव्हे, तर बंधूसमान वाटावे, यांत नवल तें काय ? इ. स. १९४६ च्या फेब्रुवारीपासून ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं श्री. राजेसाहेबांनीं जबाबदार राज्यपद्धतीची घोषणा करून संस्थानचा राज्यकारभार लोकप्रतिनिधींकडे सोपवून

देईपर्यंत, श्री. तात्यासाहेबांनीं संस्थानच्या कारभारी मंडळाचे अध्यक्ष असतांना अडचणीचे व अवघड असे उत्पन्न झालेले सर्व प्रश्न मोठया कुशलतेनें सोडवून राज्यकारभार प्रगतिपथावर नेण्यास श्री. राजेसाहेबांना साहाय्य केलें. श्री. राजेसाहेबांनीं संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति त्यांच्याच सल्ल्यानें सुरू केली. त्यांच्या कामगिरीबाबत कारभारीमंडळाच्या संबंधींच्या वर्णनांत उल्लेख इतरत्र आलेला आहेच. ता. १८ ऑगस्ट १९४७ च्या दरबारांत श्री. तात्यासाहेबांना कारभारी मंडळाच्या अध्यक्षाच्या कामाच्या जबाबदारींतून निवृत्त करतांना श्री. राजेसाहेबांनीं त्यांच्याबद्दल प्रशंसेचे उद्गार काढले. या दरबारांत त्यांना मानाचा पोषाख ( पगडी व शाल ) देऊन त्यांचा गौरव केला. श्री. तात्यासाहेबांनीं कारभारीमंडळाचें अध्यक्षपद विनावेतन स्वीकारलें होतें.

श्री. तात्यासाहेब ता. १८ ऑगस्ट १९४७ इ. पासून संस्थानच्या कामांतून निवृत्त झाले. परंतु, संस्थानच्या जबाबदार मंत्र्यांच्या कारकीर्दीत जेव्हां पुन्हां भानगडीचे प्रश्न निर्माण होऊं लागले व पुढेंही उत्पन्न होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं, तेव्हां ते सोडविण्याच्या कामीं श्री. तात्यासाहेबांचा सल्ला मिळावा म्हणून, सन १९४७ च्या संस्थानच्या कायद्यांतील तरतुदीनुसार, श्री. तात्यासाहेबांची ‘ सल्लागार ’ म्हणून, त्यांच्या संमतीनें, श्रीमंतांनीं नेमणूक केली व त्यांनींही शेवटपर्यंत आपला बहुमोल व पोक्त सल्ला त्यांना दिला.

श्री. तात्यासाहेबांना ७५ वर्षें पूर्ण होऊन ता. ८ ऑगस्ट १९४७ रोजीं ७६ वें वर्ष लागलें. त्यानिमित्त श्री. राजेसाहेबांनीं त्यांच्या बहुमानार्थ दिलेल्या देणगीचा स्वीकार केल्याबद्दल त्यांनीं उत्तर पाठविलें, तें खालीं दिलें आहे:

श्री

पुणें, ता. ९-८-४७

श्रीमंत राजे बाबासाहेब पंतसचिव

यांचे सेवेसी कृ. सा. न. वि. वि.

काल रोजीं माझ्या ७६ व्या वाढदिवशीं आपण स्मरणपूर्वक शुभेच्छाप्रदर्शक पत्र व देणगी पाठविली, त्याकरितां मी आपला अत्यंत आभारी आहें.

चित्रांक ६९



श्री. राजेसाहेब, (वय वर्षे त्रेसष्ठ).

[ सं. पा. २०७

आपला व माझा पन्नास वर्षांचा स्नेह अखंडित जन्मभर टिकावा अशी प्रार्थना आहे.

( सही ) **न. चिं. केळकर**

देणगी पोंचल्याबद्दल हें जें पत्र श्री. केळकर यांनीं श्री. राजेसाहेबांना पाठविलें, तें पत्र दोन ओळीचेंच असलें, तरी त्यांत श्री. तात्यासाहेब यांनीं 'आपला व माझा ५० वर्षांचा स्नेह अखंडित जन्मभर टिकावा, अशी प्रार्थना आहे' हें जें वाक्य लिहिलें, त्यावरून श्री. राजेसाहेबांविषयीं श्री. तात्यासाहेबांच्या मनांत किती आदर वसत होता, हें स्पष्ट दिसून येतें. हें पत्र वाचून पाहिल्यावर श्री. तात्यासाहेबांसारख्या निस्पृह साहित्यिक व राजकीय पुढाऱ्यानें आपणास स्नेह टिकण्याबद्दल प्रार्थना करावी, यांत श्रीमंतांना फार धन्यता वाटली.

श्री. तात्यासाहेब हे अष्टपैलु बुद्धीचे विद्वान् गृहस्थ होते. वाङ्मयाकडे त्यांच्या बुद्धीचा जास्त कल असे. वाङ्मयाच्या अनेक दालनांत तिचा अप्रतिहत व यशस्वी संचार असे; व यामुळेंच त्यांना लोकांनीं "साहित्यसम्राट्" ही पदवी बहाल केली होती. ते हिंदुधर्माचे कट्टे अभिमानी असले, तरी तत्संबंधीं अंतर्गत सुधारणावादीही होते. तसेंच, राजकारणांत परिपूर्ण देशाभिमानी असले, तरी प्रतियोगी सहकारितेस ते नेहमीं तयार असत. त्यांचें खासगी जीवन निर्मल, तसेंच सार्वजनिक कार्यसंबंधही चारित्र्यसंपन्न असत. सौजन्य, समयज्ञता, चतुरस्रता व यावच्छक्य सहकार्यतत्परता इत्यादि अनेक सद्गुणांचा समुच्चय त्यांच्या ठिकाणीं झालेला असल्यानें, परस्परविरोधी मतांच्या व भिन्न परिस्थितीच्या मनुष्यांच्याही मनांत त्यांच्याविषयीं आदराची व प्रेमाची भावना असे.

कै. तात्यासाहेब केळकर ह्यांचा पुष्कळ लोकांशीं स्नेहसंबंध येत होता व निरनिराळ्या स्वभावांच्या लोकांबरोबर ते कार्य करीत होते. त्याचें गमक त्यांनींच आपल्या दिनांक ७ ऑक्टोबर १९४७ रोजीं मुंबई येथें रेडिओवर केलेल्या भाषणावरून समजून येणारें आहे; व तसेंच, जर सर्व लोकांनीं वर्तन ठेवलें, तर लोकांचा स्नेह संपादन करून पुष्कळ कार्यें करतां येतील, हें त्यांचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. तें भाषण खालीं दिलें आहे :

"शेवटीं, अवढेंच सांगतों कीं, आज चाळीस पन्नास वर्षांच्या अनुभवानें मीं मनाशीं अेक सिद्धान्त कायम केला आहे. तो असा कीं, प्रत्येक मनुष्याचें मत हें विशिष्ट प्रकारचें असतें. जसें त्याचें रूप व त्याचें नांव, तसें त्याचें मत बुद्धि व संस्कृति यांनीं बनलेलें असतें. तें तो सहसा बदलीत नाहीं. म्हणून, समाजाचें व राष्ट्राचें हित करूं अिच्छिणारांनीं अेक गोष्ट करावी. ती अशी कीं, केवळ मताच्या वेगळेपणामुळें सामाजिक व राष्ट्रीय कार्यांत वेगळेपणा मानूं नये. आपणांत व अितरांत जास्तींत जास्त समान असें जें निघेल, तें ग्राह्य धरावें आणि त्याच्या आधारावर व्यक्तिनिरपेक्ष होअील तितकें कार्य करावें. मनुष्यानें मनांत आणलें तर त्याला जसें तोडतां येतें, तसें जोडतांहि येतें. म्हणून, तोडण्यापेक्षां जोडण्याचा प्रयत्न अधिक करावा. मोठ्या गोष्टींत जुळत असेल, तर न जुळणारी लहान गोष्ट बाजूला ठेवावी. घडयाळांतील चक्रें सर्वच अणकुचीदार असतात. त्यांचीं टोकें एकमेकांवर घासलीं, तर घड्याळाचा नाश होतो. उलट, एका चाकांतील खोल जागा दुसऱ्या चाकाच्या दातांनीं भरली, तर दोन्हीही चाकें एकमेकाला सहाय्यकारी होअून घड्याळ चालूं लागतें. १९१० तें १९२० या कालखंडांतील समृद्ध अशा अनुभवानें आतां सांगितली, हीच गोष्ट मला सर्वांत अधिक पटली आहे."

—न. चिं. केळकर.

चित्रांक ७०



श्री. राजेसाहेब यांना, के. सी. आय्. ई. पदवीप्राप्त्यर्थ, नोकरवर्गानें गार्डन पार्टी दिली.

[सं. पा. २०९

## प्रकरण १८ वें

# संस्थानच्या दर्जांत वाढ

## श्रीमंत राजेसाहेबांना के. सी. आय. ई. पदवीची प्राप्ति

ता. १ जानेवारी सन १९४१ रोजीं नेक नामदार लॉर्ड लिन्‌लिथगो, बादशहांचे हिंदुस्थानांतील प्रतिनिधि, यांनीं श्रीमंत राजे रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब यांना के. सी. आय. ई. ( Knight Commander of the Indian Empire ) ही बहुमानाची पदवी साम्राज्य सरकारानें दिल्याचें जाहीर केलें. ही बातमी याच दिवशींच्या पदवीदानाच्या यादींत वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली. भोरच्या प्रजाजनांना ही बातमी वाचून फार आनंद झाला. या आनंदाप्रीत्यर्थ कुलदैवत, ब्राह्मण वर्ग व इतर सर्वांना मिठाई वांटण्यांत आली. शिवाय, ब्राह्मणांना दक्षिणा देण्यांत आली.

ही बहुमानाची पदवी मिळाल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांचे स्नेही, हितचिंतक, संस्थानिक बंधू आणि परिचित युरोपियन अधिकारी यांच्याकडून अभिनंदनपर संदेशांचा श्री. राजेसाहेबांवर वर्षाव झाला. हिंदुस्थानचे भारतमंत्री यांनीं लंडनहून खालील संदेश पाठविला.

" Warm congratulations on Honour which His Majesty has conferred to-day.........Amery "

दुसरा संदेश नेक नामदार लॉर्ड लिन्‌लिथगो यांचा होता. त्यांनीं लिहिलें:

" Heartiest Congratulations on your K. C. I. E.
Viceroy."

दक्षिणेंतील संस्थानांचे कोल्हापूर येथील रेसिडेंट यांनीं तार केली, ती :

" Please accept my warmest congratulations on conferment of K. C. I. E. in new Year's Honours' List -- Resident, Kolhapur. "

मुंबई प्रांताधिपतीकडून ता. ३ जानेवारी १९४२ चें खालील पत्र आलें :

My dear Rajasaheb,

I was delighted to see the Honour which has been conferred upon you by His Majesty the King-Emperor, and I send you my warmest congratulations.

Yours sincerely,
Roger Lumley

यांखेरीज अभिनंदनपर संदेशांपैकीं हि. हा. महाराजासाहेब, ग्वाल्हेर, हि. हा. महाराजासाहेब, बडोदें, Sir Francis Wylie, Adviser to H. E. the Crown Representative व Dr. Sir Shafaat Ahmed Khan यांचे संदेश उल्लेखनीय होते.

ही पदवी प्राप्त झाल्याबद्दल संस्थानांतील व संस्थानाबाहेरील अनेक संस्थांनीं आणि परिचित प्रतिष्ठित सद्गृहस्थांनीं श्रीमंत राजेसाहेबांना पुष्पहार समर्पण करून त्यांचा गौरव केला व त्यांजविषयीं वाटणारा आदर व प्रेम व्यक्त केलें.

ही पदवी मिळाली, त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांचा मुक्काम पुणें येथील लक्ष्मी विलास बंगल्यांत होता. या आनंदाप्रीत्यर्थ तेथें त्यांनीं आपल्या सुहृज्जनांना ता. २ जानेवारी रोजीं मोठ्या थाटाची मेजवानी दिली.

ता. ४ जानेवारी रोजीं श्रीमंत राजेसाहेब पुण्याहून निघून भोरास आले. वाटेनें संस्थानच्या राजगड तालुक्याचे मामलेदार, तालुका लोकलबोर्डाचे सभासद कार्येकर, इलेक्ट्रिक कॉन्ट्रॅक्टर मेसर्स चिपळूणकर-कार्येकर, शिवगंगा नदी-वरील पुलाचे कॉन्ट्रॅक्टर मेसर्स राजाज्ञा, भिडे आणि सन्स व नसरापूरचे पाटील आणि कुळकर्णी यांनीं नसरापूरजवळ चेलाडी नाक्यावर श्रीमंत राजेसाहेब यांना पुष्पहार समर्पण केले. कापूरव्हाळ येथें तेथील पाटील, कुळकर्णी व शाळा-मास्तर यांनीं हार घातले. भाटघर धरणाच्या दक्षिण बाजूच्या बंगल्यांत श्रीमंत अमृतराव कृष्णराव ऊर्फ आप्पासाहेब गांडेकर यांनीं श्रीमंतांना पानसुपारी केली. भोरनजीक लक्ष्मीबाई पुलाशेजारच्या म्युनिसिपल नाक्याजवळ भोर शहर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व सभासद यांनीं श्रीमंत राजेसाहेबांचें आदरपूर्वक स्वागत केलें. या ठिकाणीं भोलावडें गांवचे रहिवासी यांच्यातर्फे

चित्रांक ७१



दिल्ली येथील हिंदुस्थानचें पार्लमेंट हाउस

[ सं. पा. २१०

आणि श्रीदत्तमंदिर संस्था, टेनिस क्लब, महिला मंडळ, न्यू क्रिकेट क्लब आणि भोरचे नागरिक यांनीं श्रीमंत राजेसाहेबांस हार घालून त्यांचें स्वागत केलें. नंतर, सर्व लवाजम्यानिशीं श्रीमंत राजेसाहेबांची स्वारी चार घोड्यांच्या गाडींत बसून मिरवणुकीनें राजवाड्यांत आली. वाटेंत अनेक नागरिकांनीं त्यांना हार समर्पण केले. राजवाड्यात गेल्यानंतर, श्री. सौ. जान्हवीबाईसाहेब ( श्रीमंतांच्या भाची ) यांनीं त्यांना पुष्पहार घातला. श्रीमंत राजेसाहेबांनीं प्रभु श्री रामचंद्राचें दर्शन घेतलें; आणि वैदिक ब्राह्मण-वर्गास दक्षिणा दिली. नंतर, सर्वांस पेढे वाटण्यांत आले.

ता. ५ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांनीं भोर येथील देवांचें दर्शन घेऊन त्यांना उपायनद्रव्य व पेढे समर्पण केले.

ता. ६ रोजीं सकाळीं श्रीमंत राजेसाहेब आंबवडें येथें श्रीशंकराजी नारायण यांच्या समाधीच्या दर्शनास जाऊन आले. तेथें त्यांनीं समाधीपुढें उपायनद्रव्य व पेढे ठेविले, आणि तेथें अनुष्ठान करणाऱ्या वैदिक ब्राह्मणांस दक्षिणा दिली.

भोर येथील नोकर-वर्गानें श्रीमंत राजेसाहेबांना ता. १० जानेवारी रोजीं या आनंदाप्रीत्यर्थ गार्डन पार्टी दिली. या वेळीं श्री. राजेसाहेब, श्री. युवराज-साहेब यांच्यासह, उपस्थित होते.

श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या खाजगी खात्यांतील नोकरांना सर्वांस मिळून रु. १८५९ बक्षिस दिले.

ता. १२ जानेवारी रोजीं श्रीमंत राजेसाहेबांना पुणें येथें रा. ब. चिमणलाल किसनदास यांनीं पार्टी दिली.

ता. १४ रोजीं पुणें येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण संस्थेतर्फे श्रीमंत राजेसाहेबांना ॲट-होम पार्टी देण्यांत आली.

ता. २१ रोजीं श्रीमंत सरदार बापूसाहेब विंचूरकर यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना मेजवानी दिली.

ता. ९ फेब्रुवारी १९४१ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांनीं भोर येथील सर्व जातींच्या नागरिकांना नरेंद्रमंडळाचें सभासदत्व आणि के. सी. आय. ई. पदवी-

प्राप्ति यांनिमित्त जेवण दिलें. त्यांचा खर्च श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या खाजगी खर्चाच्या रकमेंतून केला.

भोर संस्थानच्या लोकपक्षाची सभा भरून तींत श्रीमंतांच्या अभिनंदनपर ठराव पास करण्यांत आला. हा ठराव श्रीमंतांस त्या पक्षाचे अध्यक्ष व सेक्रेटरी यांनीं समक्ष भेट घेऊन सादर केला. तो ठराव असा:—

"The Loka Paksha of Bhor State offers its hearty congratulations to Raja Shrimant Sir Raghunathrao Pandit Pant Sachiv on the conferment upon him of the title K. C. I. E. by His Majesty's Government."

## पदक-स्वीकारार्थ दिल्लीस प्रयाण

पदवीदानांत जाहीर झालेल्या पदव्यांचीं पदकें अर्पण करण्याचा समारंभ ( Investiture Ceremony ) दिल्ली येथें ता. १७ फेब्रुवारी १९४१ रोजीं झाला. या समारंभाकरितां श्रीमंत राजेसाहेब ता. १० रोजीं पुण्याहून निघाले. मुंबई येथें २ दिवस त्यांनीं मुक्काम केला. या मुक्कामांत सर्व्हंन्टस् ऑफ इंडिया सोसायटीचे सदस्य श्रीयुत श्री. ग. वझे, बी.ए., यांचें नुकतेंच ऑपरेशन झालें होतें, म्हणून त्यांच्या भेटीस श्रीमंत राजेसाहेब गेले होते. शिरवळ येथील मि. रामजीशेट गुजर यांची कन्या सौ. हिराबाई मनसुखलाल यांनीं मुंबईपासून १६ मैलांवर वरसोवा या ठिकाणीं आपल्या बंगल्यांत श्रीमंतांना के. सी. आय. ई. पदवीनिमित्त चहापार्टी दिली.

मुंबईहून श्रीमंत राजेसाहेब ता. १६ रोजीं दिल्लीस गेले. तेथें मेडन्स हॉटेलमध्यें मुक्काम केला. ता. १८ रोजीं सकाळीं १०-३० वाजतां Investiture Ceremony व्हाइसरॉय हाउसमधील दरबार-हॉलमध्यें झाला. त्यास श्रीमंत राजेसाहेब उपस्थित होते.

## समारंभाचा कार्यक्रम

नेक नामदार व्हाइसरॉयसाहेबांच्या आगमनानंतर त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी यांनीं क्रमानें नांवें वाचलीं. श्री. राजेसाहेबांचें नांव पुकारण्यांत आल्यावर, राजेसाहेब आपल्या जागेवरून उठून सोनेरी गालिचाच्या कडेपर्यंत गेले व तेथून ज्या ठिकाणीं नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब उभे होते, त्या उच्चासनावर गेल्या-

चित्रांक ७२



श्री. राजेसाहेब हे नरेंद्र मंडळाचे कायमचे सभासद या नात्यानें पहिल्या प्रथम नरेंद्र मंडळाच्या बैठकीस, इतर राजेलोकांसमवेत, हजर राहिले, त्या वेळचे राजेलोक. ता. १७ मार्च १९४१ इ. [ सं. पा. २२१

नंतर नामदार व्हाइसरॉयसाहेबांनीं श्रीमंत राजेसाहेबांना त्यांचें पदक व बॅज, रेशमी फितीनें बांधून, दिलें. हें देतांना नेक नामदारसाहेब म्हणाले:—

In the name of the King-Emperor of India and by His Majesty's Command, I hereby invest you with the Honourable Insignia of the Order of the Indian Empire, of which most Eminent Order His Majesty has been graciously pleased to appoint you to be a Knight Commander.

नंतर, नेक नामदारसाहेबांनीं श्री. राजेसाहेबांशीं हस्तांदोलन केलें.

ता. १९ रोजीं दी मार्क्विस व मार्चिओनेस ऑफ लिन्लिथगो यांनीं दिलेल्या लंचला ( दुपारचें भोजन ) दुपारीं १२-३० वाजतां श्री. राजेसाहेब, रा. वि. गो. रानडे, स्टाफ ऑफिसर, यांच्यासह, गेले होते. याच दिवशीं दुपारीं Irwin Amphitheatre मध्यें All-India Cattle Show भरविण्यांत आला होता, तो पाहण्यास श्रीमंत राजेसाहेब गेले. या प्रदर्शनाला रु. २०० दोनशेंची देणगी दिली. मि. महंमद याकुब, असिस्टंट सर्जन, लाहोर, यांनीं प्रदर्शन श्रीमंत राजेसाहेबांना दाखविलें. ता. २० रोजीं दिल्लीहून निघून श्री. राजेसाहेब मुंबईस परत आले व दुसऱ्या दिवशीं पुण्यास येऊन पोहोंचले.

मागाहून ह्या के. सी. आय. ई ची सनद आली, ती खालीलप्रमाणें—

His Majesty the King-Emperor of India conferred upon Shrimant Raja Saheb the following grant of the Dignity of a Knight Commander of the Order of the Indian Empire.

( The Seal of the most ) GEORGE R I
( Eminent Order of the )
( Indian Empire )

George the Sixth by the Grace of God of Great Britain and Ireland and the British Dominions beyond the Seas, King Defender of the Faith, Emperor of India and Sovereign of the Most Eminent Order of the Indian Empire, to Our Most trusty and well-beloved Raja Shrimant Raghunathrao Shankarrao, Pandit Pant Sachiv, Raja of Bhor.

GREETING

Whereas we have thought fit to nominate and appoint you to be an Additional Knight Commander of Our said Most Eminent Order of the Indian Empire, We do by these Presents grant unto you the Dignity of an Additional Knight Commander of our said Order and hereby authorise you to have, hold and enjoy the said Dignity and Rank as an Additional Knight Commander of Our aforesaid Order, together with all and singular the privileges thereunto belonging or appertaining.

Given at Our Court at Saint James's under Our Sign Manual and the Seal of Our said Order, this First day of January 1941 in the Fifth year of Our Reign.

By the Sovereign's Command
L. S. Amery

Grant of the Dignity of an
Additional Knight Commander of the
Order of the Indian Empire.
To

Raja Shrimant Raghunathrao Shankarrao Pandit Pant Sachiv, Raja of Bhor.

ले. क. पी. गेमफर्ड यांनीं ता. २६-२-४१ रोजीं दरबारांत केलेल्या भाषणात श्रीमंतांचे के. सी. आय. ई. पदवीप्राप्ति व नरेंद्रमंडळाचें कायमचें सभासदत्व यांबद्दल अभिनंदन केलें. त्याचा उतारा: —

" I would like to say what I said this morning, as some of you at least may not have been present there, how much I feel pleasure in congratulating your beloved Raja Saheb on his being honoured with the Knight Commandership of the Indian Empire by the King-Emperor and also the Permanent Membership of the Chamber of Princes. Raja Saheb, I offer my congratulations to you once again on this occasion ".

## श्रीमंत राजेसाहेबांचा संस्थानांत तालुक्यांतील तपासणी करण्याकरितां दौरा व तेथील रयतेस के. सी. आय. ई. पदवी व नरेंद्रमंडळाचें कायम सभासदत्व यांनिमित्त भोजनें

संस्थानच्या पांचही तालुक्यांतील कांहीं प्रमुख लोक आणि कांहीं

संस्थांचे प्रतिनिधि यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना नरेंद्रमंडळाचें कायमचें सभासदत्व मिळाल्याबद्दल व के. सी. आय. ई. या पदवीच्या प्राप्तीप्रीत्यर्थ मानपत्रें देण्याची इच्छा प्रदर्शित केली. परंतु, मानपत्रें द्यावयाचीं म्हणजे लोकांना वर्गणी करून पैसे खर्च करावे लागणार, व तें करणें तर श्रीमंतांना पसंत नव्हतें. सबब, अशा तऱ्हेनें मानपत्रें ह्या वेळेस स्वीकारण्याचें श्रीमंत राजेसाहेबांनीं साभार नाकारलें. तथापि, श्रीमंत राजेसाहेबांनीं जेव्हां लौकरच संस्थानांत दौरा काढला व सर्व तालुक्यांच्या मुख्य ठिकाणांस भेटी दिल्या, तेव्हां तेथील राजनिष्ठ प्रजाजनांनीं त्यांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन केलें, व त्या अभिनंदनाचा स्वीकार, आपली प्रेमळ रयत निराश होऊं नये याच केवळ हेतूनें, श्री. राजेसाहेबांनीं केला.

## सुधागड तालुक्यास भेट

या दौऱ्याच्या कार्यक्रमांत ता. १० मार्च १९४१ रोजीं प्रथम ते सुधागड तालुक्यांतील पाली गांवास गेले. वाटेंत नाणोसें गांवीं श्री. राजेसाहेबांचे आप्त रा. वीरेश्वर वामन गांडेकर यांची पानसुपारी स्वीकारली. जांभूळपाडा येथें सुधागड तालुका सभेचे अध्यक्ष श्री. एम्. जी. बापट यांनीं राजेसाहेबांचें स्वागत केलें. या ठिकाणीं श्रीमंत राजेसाहेबांना अनेक संस्थांनीं व व्यक्तींनीं पुष्पहार समर्पण केले, आणि ॲट-होम पार्टी दिली. पाली येथें पोंचल्यावर तेथील मामलेदार व त्यांचे इतर सहकारी यांनीं स्वागत केलें.

दुसऱ्या दिवशीं पाली येथील सर्व जातींच्या सुमारें ३००० स्त्रीपुरुषांना जेवण घालण्यांत आलें.

ता. १२ रोजीं भोजनोत्तर पानसुपारीचा समारंभ झाला. त्या वेळीं श्रीमंतांच्या अभिनंदनपर पद्यें व कविता अर्पण करण्यांत आल्या. श्री. बाप्पा-साहेब देशमूख यांनीं अभिनंदनपर भाषण केलें. श्रीमंत राजेसाहेबांनीं समयोचित उत्तर देऊन सर्वांचे आभार मानले. नंतर, अनेक पुष्पहार घालण्यांत येऊन समारंभ आटोपला.

नंतर, श्री. केशवराव लिमये यांच्या घरीं श्रीमंतांना पानसुपारी करण्यांत आली. त्या वेळीं त्यांना मधमाशा बाळगणें, लोकरीचे जिन्नस तयार करणें वगैरे कांहीं अल्प प्रमाणावर तेथें चालू ठेवण्यांत आलेल्या घरगुती छोट्या धंद्यांचे प्रकार दाखविण्यांत आले. पाली महिलामंडळानें श्रीमंतांचें पाली येथील

मराठी शाळेंत स्वागत केलें. महिलामंडळानें केलेल्या कलाकुसरीच्या वस्तूंचें प्रदर्शन श्रीमंत राजेसाहेबांना दाखविण्यांत आलें. महिलामंडळास श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. २५ ची देणगी दिली. पालीहून श्रीमंत राजेसाहेब मुंबईस गेले.

## पवनमावळ तालुक्यास भेट

श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. २६ मार्च सन १९४१ रोजीं पवनमावळ तालुक्यांतील कोळवण गांवास भेट दिली. कोळवणास जातांना वाटेंत पिरंगूट येथें गणपतीच्या देवालयांत तेथील अनेक रहिवाशांकडून श्रीमंतांना पानसुपारी-पूर्वक पुष्पहार समर्पण करण्यांत आले. पुढें, कासार अंबोलीच्या रहिवाशांच्या पानसुपारीचा स्वीकार करून, श्रीमंत राजेसाहेब पौंडला गेले. तेथें त्या वेळचे भोर कायदेमंडळाचे सभासद श्री. विश्वनाथ अनंत करमरकर यांच्या ॲट-होमचा व पानसुपारीचा स्वीकार केला. या वेळीं तेथील कांहीं संस्थांच्यातर्फे श्रीमंतांना पुष्पहार घालण्यांत आले. पौंडाहून पुढें गेल्यावर वाटेंत करंबोळी, मुगवडें, सावरगांव, चालें, दखणें, कुळें, चिखलगांव, नाणेगांव, नांदगांव, साठेसाई, व होतलें इत्यादि गांवच्या लोकांचे हार स्वीकारीत श्रीमंत राजेसाहेब कोळवण येथें पोंचले. तेथें तालुक्यांतील ऑफिसर व कारकून यांनीं व गांवच्या रहिवाशांनीं त्यांचें स्वागत केलें. ता. २७ रोजीं सकाळीं पवनमाळ तालुक्याच्या रयतेतर्फे श्रीमंत राजेसाहेबांचा स्वागत-समारंभ करण्यांत आला. पवनमावळ तालुका सभेचे अध्यक्ष रा. विष्णुपंत आगाशे व रा. म. हे. देव यांचीं भाषणें झालीं. श्रीमंत राजेसाहेबांनीं यथोचित शब्दांत सर्वांचे आभार मानले. कोळवण व त्या सभोंव-तालच्या गांवांच्या सुमारें ३००० रहिवाशांना दुपारीं जेवण घालण्यांत आलें. सायंकाळीं श्रीमंत राजेसाहेब पुण्यास परत आले. जाण्यास निघण्यापूर्वीं तालुक्यां-तील नोकरवर्ग व कांहीं प्रमुख रहिवासी यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना पुष्पहार समर्पण करून निरोप दिला.

## विचित्रगड तालुक्यांतील शिरवळ गांवास भेट

भोर शहर विचित्रगड तालुक्यांत असलें, तरी तालुक्याचें मुख्य ठिकाण शिरवळ समजलें जातें, व तालुक्याच्या मामलेदाराची कचेरी शिरवळ येथें असते. ता. ३ एप्रिल रोजीं श्रीमंत राजेसाहेब सकाळीं ११ वाजतां भोर येथून निघून शिरवळास गेले. या ठिकाणीं तालुक्यांतील सर्व नोकरवर्ग व प्रमुख नागरिक

यांना भोजनास बोलाविलें होतें. नंतर, शिरवळ गांवच्या सर्व जातींच्या सुमारें ४२०० नागरिक स्त्री-पुरुषांना दुपारीं जेवण घातलें. ५ वाजतां श्रीमंत राजेसाहेबांनीं श्री अंबाबाई देवीचें दर्शन घेतलें व मोफत वाचनालयास भेट देऊन त्या संस्थेस रु. २५ ची देणगी दिली. नंतर, शेट चंदनमल रामप्रताप मारवाडी व डॉ. अंतुरकर यांच्या पानसुपाऱ्यांचा व ध्वजमंडळाच्या पुष्पहाराचा स्वीकार केला. श्रीदत्त व श्रीराम या देवांचें दर्शन घेऊन ऐक्यवर्धक क्लबला भेट दिली. तेथील पानसुपारीचा स्वीकार करून क्लबला रु. ४० ची देणगी दिली. राजवाड्यांत परत आल्यावर, सार्वजनिक स्वागत समारंभ झाला. श्रीयुत हरिभाऊ देशपांडे यांनीं स्वागतपर भाषण केलें. हें भाषण परिशिष्टांत नं. ३६ ठिकाणीं दिलें आहे. नोटिफाइड एरियाच्या वतीनें श्रीयुत गो. पा. देशपांडे यांचें भाषण झाल्यावर, श्रीमंत राजेसाहेबांनीं सर्वांचे आभार मानले. नंतर, श्रीमंतांना कांहीं प्रमुख संस्थांतर्फे व व्यक्तिशः नागरिकांचे पुष्पहार अर्पण करण्यांत आले. समारंभ संपल्यावर, श्रीमंत राजेसाहेब सायंकाळीं भोरास परत आले.

## राजगड तालुक्याचें मुख्य ठिकाण नसरापूर येथील समारंभ

राजगड तालुक्यांत नसरापूर गांवाशेजारच्या शिवगंगा नदीवरील नवीन बांधलेल्या पुलाचा उद्घाटनसमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झाला. या समारंभाकरितां श्रीमंत राजेसाहेब भोरहून ता. १६ एप्रिल १९४१ रोजीं सकाळीं ८-३० वाजतां निघून नसरापुरास गेले. वाटेंत कासुर्डी व कापूरवहाळ येथील गांवकऱ्यांनीं त्यांना पुष्पहार घातले. नसरापूर येथें भोर कायदेमंडळाचे सभासद मे. देव व मे. ठकार यांनीं श्रीमंत राजेसाहेबांचें स्वागत केलें. गुंजवणें येथील रा. नरसो वासुदेव पुरोहित यांनीं स्वतः तयार केलेले आशीर्वादपर श्लोक वाचून दाखवून ते श्रीमंतांना समर्पण केल्यावर, रा. ठकार वकील यांनीं भाषण करून पुलाचें उद्घाटन करण्याची श्री. राजेसाहेब यांना विनंति केली. प्रचंडगड तालुक्यातर्फे रा. मोतीरामशेट गुजर यांनीं श्रीयुत ठकारांच्या विनंतीस दुजोरा दिला. नंतर, राजगड तालुक्यातर्फे श्रीमंत राजेसाहेबांना देण्यांत यावयाचें मानपत्र रा. चं. गो. आगाशे वकील यांनीं वाचून दाखविलें. प्रचंडगड तालुक्याचें मानपत्र रा. व्ही. के. आगाशे यांनीं वाचून दाखविलें. नंतर दोन्ही

मानपत्रें श्रीमंत राजेसाहेबांना समर्पण करण्यांत आलीं. त्यानंतर, श्री. राजेसाहेबांनीं भाषण करून सर्वांचे आभार मानले आणि पुलाचें उद्घाटन केलें. रा. विष्णु परशराम कान्हेरे, स्टेट इंजिनियर, यांनीं पुलाची माहिती सांगितली व त्यास एकूण रु. ३३,००० खर्च लागल्याचें सांगितलें. या पुलाच्या योगानें वेल्हें-नसरापूर रस्त्याचा उपयोग वाहतुकीसाठी सर्व वर्षभर होणार असल्याकारणानें, याचें महत्त्व विशेष आहे. नंतर, कांहीं संस्थांतर्फे श्रीमंत राजेसाहेबांना पुष्पहार समर्पण करून त्यांचा गौरव करण्यांत आला. आभाराचें भाषण झाल्यावर, हा समारंभ संपला.

दुपारीं समारंभाकरितां आलेल्या सर्व पाहुण्यांना श्रीमंत राजेसाहेबांनीं भोजनास बोलाविलें होतें. तसेंच, याच दिवशीं नसरापूर व त्या लगतचीं गांवें येथील सुमारें ४७५० लोकांना जेवण घालण्यांत आलें. भोजनोत्तर श्रीराम क्लबातर्फे श्रीमंत राजेसाहेबांना पानसुपारी करण्यांत आली. येथेंही कांहीं संस्थांनीं हार घातले.

## प्रचंडगड तालुक्यांतील वेल्हें गांवास भेट

नसरापूर येथून त्याच दिवशीं सायंकाळीं श्रीमंत राजेसाहेब वेल्ह्यास गेले. वेल्ह्यास जातांना वाटेंतील माळेगांव, वीरवाडी, अंबवणें, करंजवणें, अडवली, मार्गासनी, खांबवली, माळेवाडी, दापोडें, पाबें, हिरपुडी वगैरे गांवच्या लोकांनीं आणि कोळवडी येथील भात सडण्याच्या गिरणीचे मालक व श्री मेंगाई देवीचे पुजारी यांनीं श्रीमंत राजेसाहेबांना हार घालून त्यांच्याविषयींचा आपला आदर व्यक्त केला. ता. १७ रोजीं दुपारीं वेल्हें येथील प्रमुख रहिवाशांना भोजनास बोलाविलें होतें; तसेंच, आसपासच्या गांवांतील सुमारें ३००० लोकांना भोजन घालण्यांत आलें. दुपारीं ४-३० वाजतां कांहीं लोकांनीं पानसुपारी केली. कायदेमंडळाचे सभासद रा. ल. ग. पटवर्धन आणि रा. मोतीरामशेट गुजर यांच्या घरीं जाऊन त्यांची पानसुपारी श्री. राजेसाहेबांनीं स्वीकारली. सायंकाळीं श्री मेंगाई देवीचें व श्रीदत्ताचें दर्शन घेऊन श्रीमंत राजेसाहेब भोरास परत आले.

याप्रमाणें, श्रीमंत राजेसाहेबांनीं सर्व तालुक्यांच्या मुख्य ठिकाणीं जाऊन तेथील लोकांना जेवणें दिलीं. या जेवणांचा सर्व खर्च श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या खाजगी खर्चाच्या रकमेंतूनच केला.

श्रीमंत राजेसाहेब यांना " हिज हायनेस " हा किताब मिळाल्याबद्दल मे. रेसिडेन्ट साहेब, कोल्हापूर, यांच्याकडून खालीलप्रमाणें पत्र ता. ९-८-४७ रोजीं आलें.

D. O. No. C. 2067/47 D The Residency Kolhapur
7th August 1947.

My Dear Rajasaheb,

I am glad to inform you that His Majesty the King has been pleased to approve of the extension of the style "His Highness" to all Rulers with a salute of 9 guns and "Her Highness" to their lawful wives and widows. An announcement to this effect will be made in the Gazette of India on the 9th August 1947 and in the meanwhile I take this opportunity to congratulate you on the conferment of this distinction on the Bhor Ruling House.

Yours Sincerely,
Sd/- B. Woods Ballard.

Raja Shrimant Sir Raghunathrao Shankarrao Pandit Pant Sachiv, K. C. I. E.

Raja of Bhor, **Bhor.**

हिज हायनेस पदवी मिळाल्याबद्दल श्रीमंतांनीं श्रीकुलस्वामीस पेढे वाटले.

## श्री. रानडे व श्री. साने " राव साहेब " झाले

श्री. विनायक गोविंद रानडे, एम्. ए., एल्एल्.बी., कौन्सिलर, संस्थान भोर, यांना बादशहांच्या वाढदिवसानिमित्त झालेल्या पदवीदानांत ता. १-६-१९४३ रोजीं हिंदुस्थान सरकारकडून ' राव साहेब ' ही सन्मान्य पदवी देऊन त्यांचा गौरव करण्यांत आला. या पदवीचें पदक व सनद कोल्हापूरचे रेसिडेन्ट

ले. क. सी. जी. एन्. एडवर्ड्स यांनीं ता. १४-४-१९४४ रोजीं भोर येथें येऊन दरबारांत राव साहेब रानडे यांस दिली. तसेंच श्री. ल. रा. साने, बी.ए., एल्एल्.बी., यांना 'रावसाहेब' ही पदवी दिल्याचें ता. १३ जून १९४६ च्या गॅझेटमध्यें प्रसिद्ध करण्यांत आलें, व त्या पदवीचें पदक व सनद कोल्हापूर येथें रेसिडेंट हार्वेसाहेब यांच्या हस्तें त्यांना देण्यांत आलीं. संस्थानच्या अधिकाऱ्यांचा, त्यांच्या संस्थानच्या नोकरींतील कामगिरीबद्दल, हिंदुस्थान सरकारनें पदव्या देऊन गौरव करणें, म्हणजे पर्यायानें संस्थानाचाच गौरव होय. अशा प्रकारें संस्थानच्या चार अधिकाऱ्यांचा आतांपावेतों गौरव करून साम्राज्य सरकारनें आपली गुणग्राहकता चार वेळ व्यक्त केली, ही गोष्ट श्रीमंत राजेसाहेबांना भूषणावह अशी आहे.

## प्रकरण १९ वें

# श्रीमंत राजेसाहेबांची नरेंद्र मंडळांत कायमचे सभासद म्हणून नेमणूक

( संदर्भ खंड २, प्रकरण १४ वें, पान ६४८।२७५।२८६ )

नरेंद्र मंडळांत कायमच्या सभासदत्वाचा मान मिळविण्याकरितां श्रीमंत राजेसाहेबांनीं केलेल्या दीर्घ प्रयत्नास यश येऊन ता. २ जुलई १९४० रोजीं ले. क. पी. गेसफोर्ड, रेसिडेंट, कोल्हापूर, यांचें डी. ओ. नं. सी. २४-२८ चें पत्र आलें. त्यांत त्यांनीं कळविलें, तें खालीलप्रमाणें:—

" I am glad to inform you that His Excellency the Crown Representative, after giving careful consideration to the recommendation of the Standing Committee, has been pleased to admit you as a member of the Chamber of Princes in your own right under article 2(ii) of the Constitution of the Chamber of Princes."

हें आनंदाचें वृत्त समजल्यावर भोर येथें एक छोटासा दरबार भरविण्यांत आला. श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज यांच्या समवेत, या दरबारास हजर राहिले होते. या दरबारांत दरबारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद मे. वि. गो. रानडे यांनीं नरेंद्र मंडळाच्या सभासदत्वाच्या प्रश्नाची पूर्ण हकीकत, जमलेल्या मंडळींना माहीत व्हावी, म्हणून थोडक्यांत सांगितली; व या सभासदत्वाचें महत्त्व काय आहे, हें निवेदन केलें. ( हें भाषण परिशिष्टांत नं. ३७ ठिकाणीं दिलें आहे. ) त्यांनीं आपल्या भाषणाच्या शेवटीं श्रीमंत राजेसाहेबांची फार दिवसांची मनीषा श्रीरामप्रभूच्या कृपेनें पूर्ण झाली, याबद्दल श्रीमंतांचें स्वत:बद्दल व जमलेल्या मंडळींतर्फे अंत:करणपूर्वक अभिनंदन केलें. जमलेल्या सर्व मंडळींना या आनंदाप्रीत्यर्थ पेढे वाटण्यांत आले.

नरेंद्र मंडळाचें कायमचें सभासदत्व प्राप्त झाल्याबद्दल नरेंद्रमंडळाचे

चान्सेलर हिज हायनेस महाराजा जामसाहेब, नवानगर, यांनीं तारीख ७ जुलई सन १९४० रोजीं मुद्दाम पत्र पाठवून श्रीमंतांचें अभिनंदन केलें. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें कीं,

" I am glad to be able to inform Your Highness that His Excellency the Crown Representative has accepted the recommendation of the Standing Committee of Princes, and has, in exercise of the discretion vested in him by article 2 ( ii ) of the Constitution of the Chamber, admitted Your Highness as a member of the Chamber in your own right. I offer Your Highness my heartiest congratulations and a most cordial welcome as a colleague, and I feel confident that Your Highness' association with the Chamber as a member in your own right will be a source of strength to the Order as well as to Your Highness' State."

श्रीमंत राजेसाहेबांना नरेंद्र मंडळाचें सभासदत्व मिळाल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेब, फलटण, हि. हा. महाराजासाहेब, बिकानेर, श्रीमंत राजेसाहेब, जमखिंडी, हि. हा. छत्रपति महाराजसाहेब, कोल्हापूर, हि. हा. महाराजासाहेब, देवास ( ज्यु. ) व देवास ( सी. ), हि. हा. महाराजासाहेब, पतियाळा, इत्यादि प्रमुख राजेलोकांकडून अभिनंदनाचीं पत्रें आलीं.

## नरेंद्र मंडळाची नवीन घटना

नरेंद्र मंडळांत प्रथमतः कायमचे १०८ सभासद होते. मध्यंतरीं एक जागा वाढविण्यांत येऊन एकूण १०९ सभासद झाले होते. आतां जुलई १९३९ मध्यें मंजूर करण्यांत आलेल्या घटनेप्रमाणें नवीन २६ सभासद कायमचे म्हणून वाढविण्यांत आले. ह्या २६ सभासदांमध्यें अक्कलकोट, भोर, जमखिंडी, जत व मिरज ( सी. ), असे दक्षिणेंतील संस्थानांच्या गटापैकीं ५ पांच नवीन दाखल करण्यांत आले. या गटापैकीं कोल्हापूर, सांगली, सावंतवाडी, जंजिरा आणि मुधोळ हे ५ पूर्वींचे सभासद होते. त्यामुळें, आतां या गटातील कायमचे सभासदांची संख्या १० झाली. ही नवीन घटना सन १९३९ च्या जुलईपासून अंमलांत आली. त्यामुळें नरेंद्रमंडळाच्या स्टँडिंग कमिटीची निवडणूक आतां चेंबरच्या बैठकींत होत नाहीं. पत्रव्यवहारानें मतें घेऊन ही निवडणूक केली जाते.

## नरेंद्र मंडळाचे कायमचे सभासद या नात्यानें श्रीमंत राजेसाहेबांची नरेंद्र मंडळांत उपस्थिति

सन १९४१ च्या मार्च महिन्यांत नरेंद्र मंडळाची बैठक दिल्ली येथें झाली. या बैठकीस श्रीमंत राजेसाहेब नरेंद्र मंडळाचे कायमचे सभासद या नात्यानें हजर राहिले होते. त्याकरितां ते ता. १३ मार्च १९४१ रोजीं मुंबईहून दिल्लीस गेले. दिल्ली स्टेशनवर त्यांचें स्वागत करण्याकरितां हिंदुस्थान सरकारच्या पोलिटिकल खात्यांतील मि. निकलसन या नांवाचे ऑफिसर आले होते. श्रीमंतांनीं आपल्याबरोबर राजकुमार श्री. रावसाहेब व राजकुमारी श्री. पद्मावती राजे यांना दिल्लीस नेलें होतें. ता. १५ पासून सुरू झालेल्या नरेंद्रमंडळाच्या बैठकींना श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले होते. ता. १७ च्या बैठकींत मांडण्यांत आलेल्या ठराव नं. ३ ला दुजोरा देण्याकरितां त्यांनीं आभाराचें भाषण केलें. ता. १८ रोजीं नरेंद्रमंडळाच्या चॅन्सेलरसाहेबांनीं चेंबरच्या पुनर्घटनेसंबंधींच्या योजनेंत कांहीं शाब्दिक फेरफार करण्याकरितां एक ठराव नं. ७ मांडला. त्या ठरावास श्रीमंतांनीं भाषण करून दुजोरा दिला. या मुक्कामांत श्रीमंतांनीं दिल्ली येथील निरनिराळ्या खात्यांतील अधिकाऱ्यांच्या भेटी घेतल्या.

श्रीमंत राजेसाहेब नरेंद्रमंडळाचे कायमचे सभासद असल्यामुळें स. १९४३ इ. च्या आक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यांत नरेंद्रमंडळाच्या बैठकीसाठीं दिल्लीस गेले. ता. १४-१०-४३ रोजीं नरेंद्रमंडळाच्या सभासदांस व्हाइसरॉयसाहेबांनीं व्हाइसरॉय हाउसमध्यें डिनरपार्टी दिली. त्या पार्टीला श्रीमंत राजेसाहेब गेले होते. ता. १५-१०-१९४३ रोजीं नरेंद्रमंडळाची बैठक झाली. त्या बैठकींत श्रीमंत राजेसाहेब यांनीं भाषण केलें; आणि कांहीं संस्थानाधिपतींना नरेंद्रमंडळाचे कायमचे सभासद करून घेऊन नरेंद्रमंडळाची वाढ केल्याबद्दल ने. ना. व्हाइसरॉयसाहेब यांचे आभार मानले. याच दिवशीं कमिटी रूममध्यें नरेंद्रांची बैठक झाली असतां, संस्थानिकांचें ग्रुपिंग (गटवारी) कशा प्रकारचें असावें, हा प्रश्न चर्चेस होता. त्याबाबत श्रीमंतांनीं भाषण करून आपले काय विचार आहेत, ते नरेंद्रमंडळापुढें व्यक्त केले. रात्रीं सर्व संस्थानिकांनीं मिळून नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांना रोपनेरा क्लबमध्यें Banquet ( दरबारी खाना ) दिली. या बँक्वेटला श्रीमंत राजेसाहेब गेले होते.

ता. १९-१०-४३ रोजीं नेक नामदार लॉर्ड लिन्‌लिथगोसाहेब यांना निरोप देण्याचा समारंभ ( Send-off ) आणि ता. २० रोजीं नेक नामदार लॉर्ड वेव्हेल, नूतन व्हाइसरॉय, यांचा अधिकारसूत्रें धारण करण्याचा समारंभ ( Assumption of Powers Ceremony ), असे दोन समारंभ व्हाइसरॉय हाउसमध्यें झाले. या दोन्ही समारंभांस श्रीमंत राजेसाहेब उपस्थित होते.

## श्रीमंत राजेसाहेबांची नरेंद्रमंडळाच्या स्थायी समितीवर निवडणूक व त्यांतील कामगिरी

सन १९२३ पासून श्रीमंत राजेसाहेब नरेंद्रमंडळाच्या वार्षिक बैठकीस जाऊं लागले. वार्षिक बैठकींत फक्त सर्व संस्थानांच्या सामुदायिक महत्त्वाचे प्रश्नांचा विचार होतो व तेवढ्यापुरता त्या कामाशीं त्यांचा संबंध येई. नरेंद्रमंडळ संस्थेचें नित्याचें काम करण्याकरितां, एक राजेलोकांची ( Standing Committee of Princes ) व त्यांना सल्लामसलत देण्याकरितां एक मंत्रिलोकांची ( Standing Committee of Ministers ), अशा दोन स्थायी समित्या नरेंद्रमंडळानें नेमलेल्या आहेत. याबद्दल वर उल्लेख आलेलाच आहे. त्यावरील सभासदांची दर दोन वर्षांनीं निवडणूक होते. नरेंद्रमंडळाचे सभासद असल्यामुळें, या स्थायी समित्यांकडून होणाऱ्या कामकाजाचे कागदपत्र त्यांच्याकडे वेळोवेळीं पाठविण्यांत येत असत. तरी, या समितीवर आपणास प्रत्यक्ष काम करण्यास संधि मिळावी, ही श्रीमंत राजेसाहेबांची महत्त्वाकांक्षा होती, ती १९४५ सालीं पुरी होण्याची वेळ आली. दक्षिणेंतील संस्थानांतर्फे काम करीत असलेल्या प्रतिनिधींची मुदत संपल्यामुळें, डिसेंबर १९४५ मध्यें नव्या निवडणुकी झाल्या. त्यांत दक्षिणेंतील संस्थानिकांनीं श्रीमंत राजेसाहेबांना नरेंद्रमंडळाच्या स्थायी समितीवर निवडून दिलें. निवडणुकीचा निकाल नरेंद्रमंडळाचे चान्सेलर हि. हा. नबाबसाहेब, भोपाळ, यांनीं ता. १९-१२-४५ रोजीं अभिनंदनपर तार करून श्रीमंत राजेसाहेब यांना खालील शब्दांनीं कळविला:—

"My heartiest congratulations on your election to the Standing Committee."

श्रीमंत राजेसाहेब यांची स्थायी समितीवर निवड झाल्यानंतर नरेंद्रमंडळाची बैठक जानेवारी १९४६ मध्यें झाली. या बैठकीस हजर राहण्याचें त्यांनीं निश्चित

चित्रांक ७३



श्री. राजेसाहेब हे नरेंद्र मंडळाच्या राजे लोकांच्या स्थायी समितीवर (स्टँडिंग कमिटी) प्रतिनिधि सभासद म्हणून निवडून आल्यावर त्या सभेस दिल्ली येथें हजर राहिले. ता. १३-१४।३।४६ [सं. पा. २२३

केलें होतें. परंतु, आयत्या वेळीं त्यांची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें, जाणें एकदम रहित करावें लागलें. समितीवर राजेसाहेबांची प्रथमच निवड झाली, याबद्दल व ते त्याकरितांच दिल्लीस जाणार असें कळल्यावरून, त्यांचें अभिनंदन करण्याकरितां भोर संस्थानचे बरेच नागरिक व संस्थांचे प्रतिनिधि ता. १०-१-४६ रोजीं पुणें येथें त्यांना निरोप देण्याकरतां आलेहि होते. परंतु, आयत्या वेळीं जाण्याचा बेत त्यांना रहित करावा लागला; सबब, त्या दिवशीं श्रीमंतांच्या निवासस्थानीं लक्ष्मी विलास बंगल्यावर जाऊन त्यांनीं श्रीमंतांना पुष्पहार समर्पण करून आपला आनंद व्यक्त केला.

नरेंद्रमंडळाच्या स्टॅन्डिंग कमिटीच्या स्थायी समितीची पुढील बैठक मार्च महिन्यांत ता. १२ तें १४ पर्यंत झाली. त्या बैठकीकरितां श्रीमंत राजेसाहेब दिल्लीस गेले होते. त्या वेळीं झालेल्या सर्व बैठकींस हजर राहून त्यांनीं चर्चेंत मोठ्या उत्साहानें भाग घेतला व चर्चेकरितां ठेवण्यांत आलेल्या प्रश्नांवर आपलीं मतें निर्भीडपणें मांडलीं. ता. १४-३-४६ रोजीं राजेलोकांची स्थायी समिति व पोलिटिकल खात्याचे प्रतिनिधि यांच्या एकत्र बैठकीच्या वेळीं घटना ( Constitution-making Body ) समितीवर दक्षिणी संस्थानांतर्फे तीन ३ प्रतिनिधी घ्यावेत हें आपलें मत त्यांनीं जोरदारपणें मांडलें. तसेंच, नरेंद्रमंडळांत ज्या संस्थानिकांना कायमचें सभासदत्व नाहीं, त्यांना तें देण्यांत यावें असेंही प्रतिपादन त्यांनीं केलें; आणि Responsible Government ( जबाबदार राज्यपद्धति ) संस्थानांतून स्थापन करण्याबाबत नरेंद्रमंडळाचा काय अभिप्राय आहे, तो समजून घेतला.

यानंतरची स्थायी समितीची बैठक ता. ९ व १० जून १९४६ रोजीं मुंबई येथें झाली. या दोन्ही दिवशीं झालेल्या सभांना श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले होते.

श्रीमंत राजेसाहेबांना स्थायी समितीच्या बैठकीकरितां दिल्ली येथें जावें, यावें लागे व वरचेवर कराव्या लागलेल्या या प्रवासाच्या दगदगीनें तब्येतीवर बराच परिणाम झाला. त्यांच्या वयोमानानुसार असा प्रवास करणें त्यांना कठीण वाटूं लागलें. स्थायी समितीवर राहून आपल्या गटाकरितां कांहीं भरीव कामगिरी

केली, तरच तेथें राहण्याचा उपयोग. पण, तब्येतीच्या मानानें तशी कामगिरी करतां येईल असें न वाटल्यामुळें, त्यांनीं आपल्या सभासदत्वाचा राजीनामा नरेंद्रमंडळाच्या प्रो. चान्सेलरकडे ता. ४-२-४७ रोजीं पाठविला आणि राजीनामा मंजूर करावा व दक्षिणेंतील गटातर्फे दुसऱ्या प्रतिनिधीची निवड करावी असें सुचविलें.

हा राजीनामा पोंचल्यावर नरेंद्रमंडळाचे चान्सेलर हि. हा. नवाबसाहेब, भोपाळ, श्री. राजासाहेब, मिरज (सी.), श्री. राजासाहेब, जत, व श्री. राजेसाहेब, फलटण, यांनीं श्रीमंतांना पत्रें पाठवून त्यांनीं स्थायी समितीचे सभासद या नात्यानें केलेल्या कामगिरीचा गौरव केला व तत्कालीन राजकीय स्थित्यंतराच्या महत्त्वाच्या वाटाघाटीच्या काळांत श्रीमंत राजेसाहेबांच्या अनुभवपूर्ण ज्ञानाचा संस्थानिकांच्या हितसंरक्षणाच्या कामीं होणाऱ्या बहुमोल साहाय्यास आपणास पारखें व्हावें लागत असल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. हीं पत्रें खालीं दिलीं आहेत:—

Letter of H. H. the Chancellor, Chamber of Princes

Bhopal, 16th Feb. 1947.

Your Highness,

I am in receipt of your letter dated 4th Feb. 1947 tendering your resignation from membership of the Standing Committee of the Chamber of Princes. I am sorry to learn that the present state of your health has compelled you to take this step.

I take this opportunity to convey my sincere thanks to Your Highness for your valuable services as a member of the Standing Committee.

Trusting this finds Your Highness in the enjoyment of excellent health.

Yours sincerely,
Sd/ Hamidullah
Chancellor, Chamber of Princes

चित्रांक ७४



श्री. राजेसाहेबांनी आपल्या कारकीर्दीच्या रौप्यमहोत्सवाच्या वेळी जबाबदार राज्यपद्धतीच्या संपूर्ण अधिकारदानाचा स. १९४७ इ. च्या कायद्याची प्रत मुख्य मंत्री मे. गो. वा. पोतनीस ह्यांना दिल्यानंतर, मुख्य मंत्री दरबारांत भाषण करीत आहेत. ता. १८।८।४७ इ. [ सं.पा. २४५.

Letter of H. H. the Rajasaheb of Phaltan.

Manik Villa, Poona 4
3rd March 1947.

My dear Shrimant Rajasaheb,

Many thanks for your letter of the 4th Feb. 1947. I was very sorry to learn that you have been compelled to tender your resignation of the Standing Committee of the Chamber of Princes owing to indifferent health and I am sincerely sorry for the course which had to be adopted. I can only wish that this may give you the required relief from the strain which this work caused to you.

2, I need not add that I and all Rulers will regret that your ripe experience will not be available to us at such a critical juncture. It was very good of you to ask Rao Saheb Sane also to resign and make room for the minister of the Ruler who will take your place on the Standing Committee.

With best wishes,

Yours sincerely,
Sd/-Malojirao
Raja of Phaltan.

Letter from Rajasaheb of Miraj (Sr.)

Miraj, 7th Feb. 1947

Your Highness

Many thanks for Your Highness' kind letter dated the 4th inst. together with a copy of the resignation addressed to H. H. the Chancellor.

Indeed, I felt extremely sorry to learn of Your Highness' resignation which, but for the indifference of health, would have been absolutely unthought of, especially in view of the present critical times. Your Highness' services as a representative of our group on the Standing Committee of the Chamber of Princes will, I am sure, be long remembered.

With many kind regards,

Yours sincerely,
Sd/ N.T. Patwardhan
Rajasaheb of Miraj (Sr.)

Letter of H. H. the Rajasaheb of Jath.

Jath, 10th Feb.1947.

Your Highness,

Your letter dated the 4th inst. It is a matter of much regret that Your Highness is resigning from the membership of the Standing Committee. I wish Your Highness had continued, as we needed at this most important juncture the great benefit of Your Highness' valued advice and great experience. It is also regrettable that Rao Saheb Sane should also choose to resign.

I am unable to add anything further at the moment; but, would like to discuss further matters with Your Highness as we are meeting very soon.

Kindly do take all care of Your Highness' health.

Your Highness' sincerely,
Sd/ Dafle,
Raja of Jath.

श्रीमंत राजेसाहेबांच्या बरोबर संस्थानचे दिवाण रावसाहेब साने यांचीही नरेंद्रमंडळाच्या मंत्रिसमितीवर निवड झाली होती. श्रीमंत राजेसाहेबांच्याबरोबर त्यांनींही आपल्या सभासदत्वाचा राजीनामा सादर करून श्रीमंतांच्या ऐवजीं जे संस्थानिक स्थायी समितीवर निवडून येतील, त्यांच्या दिवाणांची मंत्रिसमितीवर निवड होण्यास मार्ग मोकळा करून दिला.

ह्यानंतर, जमखिंडीचे माजी श्रीमंत राजेसाहेब हे स्थायी कमिटीवर निवडून आले.

ता. २० माहे फेब्रुवारी १९४७ रोजीं हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड माउंटबॅटन यांनीं, ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिंदुस्थानला वसाहतीचें स्वराज्य देण्याचें जाहीर केल्यानंतर, लवकरच नरेंद्रमंडळ (Chamber of Princes) ही संस्था रद्द केली असल्याचें त्यांनीं घोषित केलें. मूळ संस्थाच रद्द झाल्यामुळें, त्या संस्थेचें कामकाज, सभासदत्व अगर त्या संस्थेच्या स्थायी समितीचें सभासदत्व, यांचें महत्त्व संस्थेबरोबरच नाहींसें झालें. या गोष्टी केवळ ऐतिहासिक महत्त्वाच्या, म्हणूनच आतां राहिल्या आहेत.

## प्रकरण २० वें

# हि. हा. श्रीमंत राजेसाहेबांचा राज्यकारभाराचा रौप्यमहोत्सव

हिज हायनेस राजा श्रीमंत सर रघुनाथराव पंडित पंतसचिव, के. सी. आय. ई., अधिपति, सं. भोर, हे भोरच्या गादीवर आल्यास ता. १८ माहे ऑगस्ट १९४७ रोजीं २५ वर्षें पूर्ण झालीं व त्यांनीं आपल्या कारकीर्दीच्या २६ व्या वर्षांत पदार्पण केलें. श्री. राजेसाहेब सन १९२२ इ. सालीं गादीवर आले. स. १९२५ इ. सालीं त्यांनीं संस्थानांत कार्यकारी मंडळाची स्थापना केली. स. १९२८ इ. सालीं प्रातिनिधिक कायदेमंडळ स्थापन केलें. स. १९३२ इ. सालीं तालुका लोकल बोर्ड्स स्थापून स. १९३६ इ. सालीं कायदेमंडळाच्या व त्यांच्या घटनांत आणखी सुधारणा केल्या. स. १९३८ इ. सालीं आपल्या वयाच्या षष्ठ्यब्दपूर्ति-समारंभाच्या वेळीं कायदेमंडळ व लोकलबोर्डें या स्थानिक स्वराज्य संस्थांना निवडणुकीचें तत्त्व लागू केलें. भोर म्यु. ला हें तत्त्व स. १९२९ सालीं लागू केलेंच होतें. १९४२ सालीं लोकनियुक्त प्रतिनिधींचें पहिलें कायदे-मंडळ अस्तित्वांत आलें. १९४३ सालीं लोकनियुक्तांपैकीं एका प्रतिनिधीस मंत्री म्हणून नेमून, त्यांजकडे राष्ट्रसंवर्धक खातीं सोंपवून जबाबदार राज्यपद्धतीचा पाया घातला. स. १९४६ इ. सालीं कारभारी मंडळ नेमलें व कायदेमंडळ सर्वस्वीं लोकनियुक्तांचें बनविलें. मार्च १९४७ इ. पासून दोन लोकनियुक्त मंत्री नेमून त्यांच्याकडे अधिक खातीं सोपविलीं व जबाबदार राज्यपद्धतीचें आणखी पुढचें पाऊल टाकलें. ही राजकीय सुधारणा झाली. याशिवाय, जंगलच्या प्रश्नाबाबत चौकशी करण्याकरितां एक समिति नेमून त्या समितीच्या शिफारशींप्रमाणें रयतेस अनेक सवलती दिल्या. नवीन रस्ते व पूल बांधले गेले. शाळा वाढविल्या, व त्यांकरतां नव्या इमारती बांधल्या. शिक्षणास उत्तेजन देण्याकरितां शिष्यवृत्त्या ठेवल्या. अनेक संस्थांना देणग्या देऊन त्या त्या संस्थांमार्फत रयतेच्या हिता-करितां सुखसोयी करविल्या. हॉस्पिटल स्थापन केलें. दवाखाने वाढविले व रयतेच्या

आरोग्यवाढीकडे लक्ष दिलें. अनेक कर माफ केले, नोकरवर्गास भरपूर पगारवाढ केली. याप्रकारें सर्वांगीण सुधारणेच्या अनेक व विविध गोष्टींनीं भरगच्च भरलेली अशी ही पंचवीस वर्षांची कारकीर्द झाली. श्री. राजेसाहेबांचा प्रगतिपर राज्यकारभार पाहून या काळांत त्यांना स. १९२७ इ. सालीं ९ तोफांची सलामी, स. १९३५ इ. सालीं 'राजा' हा किताब आणि स. १९४१ सालीं के. सी. आय. इ. ही बहुमानाची वैयक्तिक पदवी देऊन व १९४७ सालीं 'हिज हायनेस' ही पदवी असे तीन कायमचे मान देऊन साम्राज्य सरकारनें त्यांचा गौरव करून त्यांच्या प्रगतिपर राज्यकारभाराबद्दल आपली गुणग्राहकता व्यक्त केली. श्री. राजेसाहेबांनींही १९३९ तें १९४६ या दुसऱ्या महायुद्धाच्या कालांत आर्थिक साहाय्य देऊन व सैन्यभरती करून आपली साम्राज्यनिष्ठा व्यक्त केली.

वर वर्णन केलेल्या प्रगतिपर राज्यकारभारावर ता. १८ माहे ऑगस्ट १९४७ रोजीं संस्थानांत संपूर्ण जबाबदारीची राज्यपद्धति सुरू करून श्री. राजेसाहेबांनीं आपल्या रौप्य राज्याच्या रुपेरी इमारतीवर सुवर्ण कळस बसविला.

ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं श्री. राजेसाहेबांच्या कारकीर्दीचा रौप्यमहोत्सव समारंभ भोर येथें मोठ्या थाटानें साजरा झाला. या समारंभाकरितां साहित्यसम्राट् श्री. नरसिंह चिंतामण केळकर, भोर संस्थान कारभारी मंडळाचे अध्यक्ष, श्री. श्रीधर गणेश वझे, पुणें, भारत सेवक समाजाचे सदस्य, श्री. डी. व्ही. आंबेकर, पुणें, सरदार श्री. बापूसाहेब विंचूरकर, सरदार श्री. बाळासाहेब पुरंदरे, श्री. कोंडो महादेव कुमठेकर, रिटायर्ड डि. व सेशन्स जज्ज, श्री. जी. डी. दळवी, मुंबई, इत्यादि निमंत्रित पाहुणेमंडळी भोरास मुद्दाम आली होती. दुपारीं सर्व निमंत्रित मंडळींना व भोर येथील सर्व प्रतिष्ठित गृहस्थांना व अधिकारी लोकांना राजवाड्यांत मेजवानी देण्यांत आली. भोजनोत्तर दुपारीं ३ वाजतां राजवाड्यांतील श्रीराममंडपांत भव्य दरबार भरला होता. या दरबारास सर्व पाहुणेमंडळी, सर्व सरकारी नोकरवर्ग, भोर येथील श्रीलक्ष्मी टेक्स्टाइल मिल्स, राजा रघुनाथराव मिल्स, भोर इंडस्ट्रीज लि., पारेख पेपर मिल इत्यादि कारखान्यांचे डायरेक्टर्स व मालक, भोर स्टेट बॅंकेचे सर्व डायरेक्टर्स, भोर शहरांतील प्रतिष्ठित शेटसावकार व इतर नागरिक उपस्थित होते. एकंदर

समुदाय सुमारें १००० च्या वर असावा. श्रीमंत राजेसाहेब, श्री. युवराज, राजकुमारद्वय श्री. बापूसाहेब व श्री. रावसाहेब व युवराजकुमार श्री. आबासाहेब यांच्यासह, पोलीस व स्वार-शिबंदीच्या गार्ड ऑफ ऑनरचा व ९ तोफांचे सलामीचा स्वीकार करून, श्रीराम मंडपांत प्रविष्ट झाल्यावर, संस्थानचे दिवाण रा. सा. ल. र. साने यांनीं सामोरे जाऊन द्वारापाशीं त्यांचें स्वागत केलें व उपस्थित मंडळींनीं उत्थापन दिलें. त्यांच्या अभिवादनाचा स्वीकार करून ते आपल्या आसनावर विराजमान झाल्यावर, स्वागतपर पद्यगायनानें दरबारच्या कार्यक्रमास सुरवात झाली. शास्त्रीपंडितांनीं वैदिक आशीर्वाद दिले. रावसाहेब साने, दिवाण, यांनीं सन १९४६-४७ सालांतील राज्यकारभारासंबंधीं घडामोडींचें वृत्त निवेदन केलें; व या समारंभाच्या निमित्तानें आलेले अभिनंदनपर संदेश वाचून दाखविले. त्यांपैकीं मुख्य संदेश खालीं दिले आहेत.

मुंबई प्रांताचे पंतप्रधान ना. बाळ गंगाधर खेर यांच्या सेक्रेटरींनीं कळविलें कीं,

14th Aug. 1947.

Your telegram from Poona, August twelfth, inviting Honourable Mr. Kher, attend your Dardar on eighteenth. He has directed me to convey his hearty congratulations to Your Highness. He deeply regrets inability to attend due to previous engagements.

Restis.

ना. वैकुंठलाल मेहता, अर्थमंत्री, मुंबई, म्हणतात:—

Grateful, your kind invitation stop. Offer congratulations on Jubilee celebrations and grant of full Responsible Government stop. Regret inability to be present at celebrations stop. Wish all prosperity and progress.

मुंबई सरकारचे मंत्री ना. ल. मा. पाटील म्हणतात:—

I congratulate you on your decision to announce the grant of Responsible Government to your people. I regret I shall not be able to attend the Darbar, which you are holding on the 18th instant on the occasion. I wish every success to the ceremony and peace and prosperity to you and your people.

रावबहादुर नरहर सदाशिव जोशी, एक्झिक्यूटिव्ह एंजिनिअर, पुणें, यांनीं आपल्या ता. १५-८-४७ च्या पत्रांत श्रीमंत राजेसाहेब यांचें अभिनंदन केलें आहे. श्री. द. न. बांदेकर, बी.ए., एल्एल्.बी., एम्. एल्. सी., पार्लमेंटरी सेक्रेटरी, मुंबई, यांनीं ता. १४-८-४७ चें पत्र पाठविलें. त्यांत ते लिहितात:—

" येत्या ता. १८ रोजीं राजे सर रघुनाथराव सचिव यांच्या कारकीर्दीस पंचवीस वर्षें पूर्ण होत आहेत; तरी, या मंगल प्रसंगीं मी त्यांचें अंतः करणपूर्वक अभिनंदन करीत आहें. या मंगल प्रसंगानिमित्त राजेसाहेब संपूर्ण जबाबदारीच्या स्वराज्याची घोषणा करणार आहेत, त्याबद्दल त्यांचें अभिनंदन.

" उद्यां हिंदुस्थानच्या इतिहासांत एक अभूतपूर्व क्रांति घडून येणार आहे. जगांतील अत्यंत बलवान अशी ब्रिटिश साम्राज्यशाही हिंदुस्थान देशावरील आपली सत्ता हिंदुस्थानच्या लोकनियुक्त पुढाऱ्यांच्या हातीं सोपवीत आहे. उद्यां म्हणजे आजच्या मध्यरात्रीं हिंदुस्थान स्वतंत्र होत आहे. हा स्वातंत्र्योत्सव तीन चार दिवस चालणार आहे. भोर संस्थानांतही हा उत्सव चालून चौथ्या दिवशीं, म्हणजे ता. १८ तारखेस, त्याचें पर्यवसान जबाबदार राज्यपद्धतीच्या घोषणेंत होईल असें मी गृहित धरून चालतों. स्वातंत्र्याचा हा आनंद भोर संस्थानची प्रजा स्वातंत्र्यदिनाच्या शुभ प्रसंगीं उपभोगणार हें वाचून खूप आनंद झाला. समारंभास इतर कामांमुळें हजर राहतां येणार नाहीं, याबद्दल दिलगीर आहें. "

दक्षिणी संस्थान लोकसभेचे अध्यक्ष श्री. श्रीपाद दामोदर सातवळेकर ता. १३-८-४७ च्या पत्रांत लिहितात :—

"या रजत-महोत्सवाच्या मंगल प्रसंगीं श्रीमंत आपल्या प्रजेस संपूर्ण जबाबदारीचें स्वराज्य दिल्याचें घोषित करणार आहेत, हें अत्यंत योग्य आहे. यामुळें, केवळ त्यांचेंच यश वाढणार नसून, इतर संस्थानिकांनाही हें एक उत्तम उदाहरण होणार आहे; व यामुळें सर्व प्रजेची शक्ति राजगादीच्या मागें उभी राहणें शक्य होणार आहे. राजा व प्रजा यांचें कल्याण, परस्पर विश्वासाच्या व सहकार्याच्या योगानें घडवून आणण्याची परिस्थिति निर्माण करून, राजा व प्रजा यांचें हित परमेश्वर करो अशी या प्रसंगीं माझी इच्छा आहे."

भोर संस्थानांतील वयोवृद्ध नामवंत पुढारी श्री. गणेश भास्कर साने, रा. पाली, हे ता. १४-८-४७ च्या पत्रांत लिहितात:—

" श्रीमंत या प्रसंगीं आपल्या प्रजेस ( अर्थात्, मी त्यांत एक प्रजाजन आहें ) संपूर्ण जबाबदारीचें स्वराज्यदान घोषित करणार, ही गोष्ट अपूर्व आहे; व ती श्रीमंतांच्या आजपर्यंत दिलेल्या वचनांची पूर्तता करणारी असल्यामुळें, श्रीमंतांस अत्यंत भूषणावह आहे. आजपर्यंतची श्रीमंतांची कारकीर्द पूर्ण यशस्वी झाली, तशीच ती पुढेंही होवो ! "

" तसेंच, पुढल्या वर्षीं सप्टेंबरमध्यें श्रीमंतांना सत्तर वर्षें पुरीं होतात. त्या सप्ततिअब्दपूर्ति-समारंभासाठीं व आजच्यासारखे पुढें सुवर्ण-महोत्सव व हीरक महोत्सव साजरे व्हावे, एतदर्थ श्रीराम प्रभूनें त्यांना दीर्घायुरारोग्य द्यावें, अशी प्रार्थना मी त्या प्रभूजवळ करतों. ती तो पूर्ण करो. "

श्री. के. व्ही. जोशी, एम.एजी., रिटायर्ड डायरेक्टर ऑफ रुरल डेव्हलपमेंट, पुणें, व भोर कायदेमंडळाचे सभासद ता. १७-८-४७ च्या पत्रांत लिहितात:——

" ही घोषणा भोर संस्थानच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाची व राजघराणें व प्रजा या दोघांच्याही उत्कर्षाच्या दृष्टीनें फार दूरवर परिणाम करणारी अशी आहे. भोरचें राजघराणें हें प्रभू श्रीरामचंद्राचें उपासक आहे; आणि यापुढें संस्थानांत रामराज्य होणार आहे, हें परंपरेला धरूनच होत आहे. योगायोग असा कीं, अगदीं या वेळेलाच इंग्लंडच्या राजेसाहेबांनींसुद्धां हिंदवासीयांना संपूर्ण स्वराज्य दिलें आहे. या सर्व घटना परमेश्वरनियोजित होत. प्रभू श्री रामचंद्रानें श्रीमंत राजेसाहेबांना दिलेल्या सत्स्फूर्तीप्रमाणें श्रीमंत राजेसाहेबांनीं मनाचा थोरपणा दाखवून प्रजेचें कायमचें प्रेम संपादन केलें आहे. या प्रजाहितदक्षतेबद्दल श्रीमंत राजेसाहेबांचें नांव देशाच्या इतिहासांत अजरामर होणार आहे. प्रजेला मिळालेल्या या स्वातंत्र्यामुळें संस्थानची उन्नति होत राहून भोर संस्थान हें इतर संस्थानांना आदर्श होवो. "

कुरुंदवाड सीनिअर संस्थानच्या अधिपतींनीं खालील विद्युत्संदेश पाठवून श्रीमंत राजेसाहेबांचें अभिनंदन केलें.

" We all heartily congratulate Your Highness on the grand occasion of Silver Jubilee of your reign."

भोर संस्थानचे माजी कौन्सिलर व श्री. राजेसाहेब यांचे स्नेही श्री. न. गो. आंबेकर आपल्या ता. १७-८-४७ च्या पत्रांत म्हणतात:—

" श्रीप्रभुकृपेनें, आपल्या पुण्याईनें, आपल्या वाडवडिलांच्या आशीर्वादानें व संस्थानच्या लोकांच्या सुदैवानें आपल्या वयाच्या सत्तराव्या वर्षाच्या सुमारास ' हिज हायनेस ' ही वंशपरंपरेची पदवी मिळून आपल्या राज्यारोहण-दिनाचा रौप्यमहोत्सव समारंभ साजरा होत आहे, याबद्दल मी प्रभूचे मनोभावें आभार मानतों व आपलें हार्दिक अभिनंदन करतों. "

हिंदी पार्लमेंटचे अध्यक्ष ना. जी. व्ही. मावळंकर यांनीं ता. १८-८-४७ रोजीं विद्युत्संदेश पाठवून श्रीमंतांचें अभिनंदन केलें. त्यांत ते लिहितात:—

" Thanks invitation, regret inability presence. Hearty congratulations grant full Responsible Government. Pray Almighty bless :— Mavalankar.

मुंबई सरकारचे मंत्री ना. ग. दे. तपासे हे आपल्या ता. १४-८-४७ च्या पत्रांत म्हणतात:—

" आपण आपल्या संस्थानमध्यें संपूर्ण जबाबदार राज्यपद्धतीचें स्वराज्य या सुमंगल प्रसंगीं जाहीर करीत आहांत, त्याबद्दल मी आपलें मन:पूर्वक अभिनंदन करतों. आपली कारकीर्द यशस्वी, भरभराटीची व प्रजेस सर्वस्वीं सुखावह होवो."

मुंबई सरकारचे मंत्री ना. गोविंदराव वर्तक ता. १६-८-४७ च्या पत्रांत म्हणतात:—

" I heartily thank you for your invitation to attend the Darbar you are holding for granting full Responsible Government to your people on the 18th inst. and congratulate you on your timely gesture towards your people. But, I very much regret my inability to attend the Darbar owing to other previous engagements. I, however, wish the function every success. "

सातारा येथील रावबहादुर आर. आर. पंडितराव यांचें ता. १७-८-४७ चें पत्र अभिनंदनपर आलें होतें.

मुंबई सरकारचे आरोग्यमंत्री ना. एम्. डी. डी. गिल्डर यांच्या ता. २१-८-४७ च्या पत्रांत त्यांनीं लिहिलें कीं,

" I wish you long life and health to look after the interests of the people of your State and I wish your people peace and prosperity in the new regime of Responsible Government. "

मुंबई सरकारचे मंत्री ना. डी. एन्. देसाई ता. २२-८-४७ च्या पत्रांत लिहितात:—

" I had your kind invitation to attend the Darbar announcing the grant of full Responsible Government to your people. I congratulate you for the recognition of the rights of your subjects on the occasion of the Silver Jubilee of your rule. I wish you a long and happy life and prosperity to your subjects. "

दक्षिणी संस्थानांतर्फे हिंदुस्थानच्या घटना समितीवर निवडलेले प्रतिनिधि, हल्लीं बिहारचे गव्हर्नर म्हणून असलेले, लोकनायक श्री. माधव श्रीहरि अणे, यांचें संस्थानच्या दिवाणांस ता. २१-८-४७ चें पत्र आलें. त्यांत ते म्हणतात:—

" I most sincerely and warmly congratulate His Highness on this immemorable occasion of the Jubilee of his reign, which is acknowledged by all as being enlightened and progressive. What is extremely creditable to His Highness is his sincerity to announce a Scheme to introduce Responsible Government in his State. This transfer of power to the people of the State is in keeping with the high tradition of statemanship acquired by H.H. and His Highness' predecessors, as well as with the spirit of the age in which we are living. This great reform will serve to perpetuate the memory of this unique Jubilee for many more generations to come.

" In conclusion, I like to pray Almighty to grant H. H. long life, happiness, peace of mind and prosperity."

श्री. म. हे. देव, एम्. ए. यांचें पत्र आलें, त्यांनींही श्रीमंतांचें अभिनंदन केलें.

श्री

शिरवळ

ता. २६-२-४७

श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव

राजेसाहेब, सं. भोर,

श्रीमंतांच्या सेवेसी,

कृतानेक शिर साष्टांग नमस्कार वि. वि.

श्रीमंत सरकार राजेसाहेब यांनीं ता. २४-१-४७ च्या जाहीरनाम्याच्या द्वारा संस्थानच्या राज्यकारभाराचीं सर्व खातीं लोकप्रतिनिधींच्या स्वाधीन करून, अशा रीतीनें राज्यकारभारांत लोकांना अधिकाधिक भाग घेण्याची जी संधि दिली गेली आहे, ती महत्त्वाची असल्यामुळें अभिनंदनार्ह होय.

संस्थानविषयक सुधारणा क्रमाक्रमानें करण्याच्या धोरणास अनुसरून व बदलता काल लक्षांत घेऊनच, हें स्वराज्यदान श्रीमंत राजेसाहेब यांच्याकडून झालें, याबद्दल मी श्रीमंतांचें अभिनंदन करतों.

श्रीमंतांचे सेवेसी श्रुत होय हे वि.

**हरि सखाराम देशपांडे,**

शिरवळ

संदेश वाचनानंतर भोर स्टेट बँक लि., सुधागड तालुका लोकलबोर्ड, सुधागड नोटिफाइड एरिया कमिटी, समाजसेवासंघ, पाली, अखिल भोर संस्थान दलित फेडरेशन, राजगड तालुका लोकलबोर्ड, प्रचंडगड तालुका प्रजाजन, प्रचंडगड तालुका लोकलबोर्ड व व्हिलेज कमिटी, वेळें, या संस्थांतर्फे मानपत्रें वाचून दाखवून तीं पुष्पहारासह श्री. राजेसाहेब यांस अर्पण करण्यांत आलीं. तसेंच, पारेख पेपर मिल्स, भोर, महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी, पुणें, डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणें, भोर संस्थान सरकारी नोकर वर्गाची सहकारी संस्था, पाली बार असोसिएशन, सुधागड एज्युकेशन सोसायटी, हरिजन सेवक संघ, पाली, आदिवासी सेवामंडळ, पाली, व्हिलेज कमिटी, नसरापूर, शिरवळ नोटि-फाइड एरिया कमिटी, परांजपे मोटार संघ, भोर संस्थान देशमुखसंघ, सुधागड सहकारी बँक, सार्वजनिक वाचनालय, जांभूळपाडा, मिरज ग्रामसंघटना मंडळ,

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणसंस्था, पुणें, शेतकरी सहकारी सोसायटी, इत्यादि संस्थांच्या प्रतिनिधींनीं श्री. राजेसाहेब यांस पुष्पहार समर्पण करून त्यांचें अभिनंदन केलें. याशिवाय, श्री. अ. कृ. गांडेकर, श्री. पदमसी हरिदास, श्री. गणेश भैरव साठे, मुंबई, श्री. स. र. सरदेसाई, मुंबई, शेट गोविंददास गुजर, भोर, श्री. अ. प. करंदीकर, मुंबई, लेफ्ट. एस. पी. करंदीकर, मुंबई, श्री. वि. व्ही. दुर्वे, पुणें, रा. भास्कर रंगनाथ फडणीस, भोर, रा. रामचंद्र बळवंत शेडगे, पाटील, नसरापूर, रा. गणपति मार्तंड तेली, नसरापूर, रा. बापूराव सावळाराम शेट, नसरापूर, रा. कृष्णा धारु जंगम, नसरापूर, रा. गणपत बाळशेट महाजन, नसरापूर, श्री. चं. गो. आगाशे, अध्यक्ष, भोर संस्थान कायदेमंडळ, इत्यादि व्यक्तींनीं श्री. राजेसाहेब यांना पुष्पहार समर्पण करून त्यांचा गौरव केला. पारेख पेपर मिलचे मालक श्री. चंपकलाल पारेख यांनीं चांदीच्या ताटांत रु. १००० श्रीमंतांना भेट म्हणून दिले. या मंगल प्रसंगीं श्री. राजेसाहेब यांना अर्पण केलेल्या मानपत्रांत खालीं दिलेले उतारे श्री. राजेसाहेबांनीं आपल्या पंचवीस वर्षांच्या कारकीर्दींत केलेल्या महत्त्वाच्या प्रजाहिताच्या गोष्टींचे निदर्शक असल्यामुळें, सर्वांस त्यांच्या कार्याच्या विविधतेची व भव्यतेची पुरेशी कल्पना देण्यास समर्थ आहेत.

## खालील संस्थांनीं श्रीमंत राजेसाहेब यांस मानपत्रें अर्पण केलीं, तीं येणेंप्रमाणें

भोर स्टेट बँक:—" आपल्या पंचवीस वर्षांच्या उज्ज्वल कारकीर्दींत आपल्या हातून अनेक प्रजाहितवर्धक कार्यें घडून आलेलीं आहेत. प्रजेच्या आशा-आकांक्षा आणि आर्थिक गरजा अचूक जाणून त्या सफल करण्याकरितां आपण अहर्निश झटत आलां आहांत. भोर संस्थानांतील विविध संस्था ह्या आपल्या या परिश्रमाचेंच मूर्त स्वरूप होत. अशा अनेक संस्थांपैकींच भोर स्टेट बँक ही एक प्रमुख संस्था होय.

' सर्वारंभास्तण्डुलप्रस्थमूला: ' या न्यायानें, संस्थानची आर्थिक प्रगति व्हावयाची, तर संस्थानास स्वत:ची बँक हवी. या प्रश्नास आपण १९४४ सालीं एक समिति नेमून चालना दिलीत. या समितीनें सुचविलेल्या योजनेंत रक्कम

गुंतविणारास विश्वास वाटावा, या दृष्टीनें दरबारनें बँकेच्या संकल्पित ५ लक्ष रुपये भांडवलापैकीं निम्में भांडवल घालून भागीदारांस सालीना ३ टक्के नफा वाटण्याची हमी द्यावी, असें सुचविलें होतें, तें आपण मान्य केलें. संस्थानांत बँकिंग हा व्यवसाय नव्यानें दिसणार होता; म्हणून, त्याला योग्य मार्गदर्शनाची आवश्यकता होती. आपल्या लोकसंग्राहक वृत्तीमुळें भोर स्टेट बँकेस तज्ज्ञ मंडळीचें उत्तम सहकार्य लाभूं शकलें. आपल्या सक्रिय पाठिंब्यानें केवळ तीनच वर्षांत भोर स्टेट बँकेच्या शिरवळ आणि पाली येथें शाखा निघून, बँकेच्या खेळत्या भांडवलांत स्पृहणीय वाढ होऊन बँकेची गणना इकडील सुस्थिर आणि नामवंत बँकांत होऊं लागली आहे. बँकेच्या या यशाचें श्रेय आपणाकडे देण्यांत संचालक मंडळास विशेष अभिमान वाटत आहे.

" संस्थानांतील बहुसंख्य प्रजा कृषिप्रधान असल्यानें, कृषिवलांचें ऋण-विमोचन होऊन त्यांची सर्वांगीण उन्नति साधण्यास सहकारी संस्थांची अत्यंत गरज आहे. आपण या प्रश्नाकडे आपल्या सहजसुलभ सहानुभूतीनें लक्ष पुरवाल, असा संचालक मंडळास दृढ विश्वास वाटतो. या कार्यास लागणारें सर्व प्रकारचें सहकार्य करण्यास भोर स्टेट बँक आनंदानें तयार आहे. "

## सुधागड तालुका लोकलबोर्डः—

" श्रीमंत सरकार राजेसाहेबांनीं राज्यसूत्रें हातीं घेतांच, आपल्या प्रजा-जनांस समतेनें वागविण्याचें ठरवून, कांहीं विशिष्ट जातींवर असलेले विषमता-दर्शक कर रद्द करून, आपलें धोरण कृतींत आणलें आहे. त्याचप्रमाणें प्रजेच्या गरजा व आकांक्षा समजणें अवश्य असल्यामुळें सभाबंदी कायदा रद्द केला. सुधागड तालुका सभेच्या मागणीप्रमाणें मुख्यत्वेंकरून जंगलचा, मालकी नंबरांतील झाडोऱ्याचा, हक्क प्रजेस देण्यांत आला आहे. कालमानास अनुसरून आपल्या प्रजेस विश्वासांत घेऊन सुधागड तालुका लोकलबोर्ड ही संस्था लोकनियुक्त करून राज्यकारभारांत अंशभागी केली व शिक्षण, आरोग्य, दळणवळणाचीं साधनें, पाणी-पुरवठा वगैरे प्रजेच्या मागण्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार करून सुधारणेचा मार्ग आक्रमिला, याबद्दल आपल्या प्रजेला आनंद वाटत असून, या रौप्यमहोत्सव-प्रसंगीं आम्ही आपलें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहोंत.

" प्रजेच्या वाढत्या गरजा व आकांक्षा लक्षांत घेऊन कालमानाप्रमाणें श्रीमंत सरकार राजेसाहेबांनीं संघराज्यांत सामिल होण्याचें ठरवून व प्रजेच्या हातीं सत्ता देऊन जें सत्तासंक्रमण केलें, यामुळें आतां प्रजेवर फारच मोठी जबाबदारी येऊन पडली आहे; आणि ती श्रीमंतांच्या कृपाछत्राखालीं संस्थानच्या प्रजेस प्रगतिकारक व सुखदायी होऊन श्रीमंतांना सात्विक आनंददायक होईल, असा आम्हांस विश्वास वाटतो. "

## समाजसेवा संघ, पार्लाः—

"श्रीमंत सरकार राजेसाहेब, आपण भोर संस्थानच्या राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेतल्यास आज पंचवीस वर्षें पूर्ण झालीं असल्यामुळें, ईश्वरकृपेनें रजत-महोत्सवाचा समारंभ करण्याचा योग आला आहे; याजबद्दल समाजसेवासंघाच्या सर्व सभासदांना फार आनंद वाटत आहे. या सुमंगल प्रसंगीं आम्ही श्रीमंत राजेसाहेबांचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहोंत.

" श्रीमंत राजेसाहेब, आपण या संस्थेचे आश्रयदाते आहां. आपल्या राज्यारोहण-समयींही आम्हास हजर राहून संघातर्फे आपलें अभिनंदन करण्याची संधि मिळाली होती. त्या वेळीं आपण केलेल्या जाहीर भाषणांत 'समाजसेवा संघ, पार्ली, यासारख्या लोकोपयोगी संस्थांच्या आकांक्षांकडे आमची पूर्ण सहानुभूति राहील ' असें आश्वासन दिलें होतें. त्याप्रमाणें जलप्रलय, अग्निप्रलय, स्वस्त धान्याचीं दुकानें वगैरे संघाच्या जनसेवेच्या कार्यास आपण वेळोवेळीं सहानुभूतिपूर्वक सक्रिय मदत केली आहे, हें जाहीर करण्यास आम्हांस फार आनंद वाटत आहे. "

## भोर संस्थान दलित फेडरेशनः—

" सन १९३२ इ. मध्यें कायदेमंडळाची निवडणूक-तत्त्वावर स्थापना केलीत व जाहीरनामा काढून सार्वजनिक ठिकाणीं अस्पृश्यता मानूं नये असें जाहीर केलेंत. सन १९३८ मध्यें षष्ट्यब्दपूर्ति-समारंभाच्या प्रसंगीं प्रजेला राजकीय हक्कदान करण्याचें घोषित केलेंत. घोषणेनुसार भारत सेवक समाजाचे सदस्य मे. श्री. ग. वझे, बी. ए., यांच्या अध्यक्षतेखालीं सरकारी व बिनसरकारी प्रमुखांची घटनासमिति नेमलीत. त्या समितीच्या रिपोर्टांत रयतेचे मान्यवर सदस्य

अध्यक्ष यांनीं भिन्न मतपत्रिका लिहून अस्पृश्यांना कौन्सिलांत प्रतिनिधित्व देण्याचें प्रतिपादन केलें. आमची मागणी व ती सूचना ग्राह्य मानून आपण आपल्या अधिकारांत लोकनियुक्त प्रतिनिधींमध्यें एक जागा वाढवून अस्पृश्यांना प्रतिनिधित्व दिलेंत व सध्याचे कौन्सिलांत २ राखीव जागा दिल्यात, या बाबी आम्हांस महत्त्वाच्या वाटतात.

" श्रीमंत महाराज, अलीकडे आपण संस्थानांत द्विदल राज्यपद्धतीचा अंमल सुरू करून, लोकनियुक्त मंत्र्यांकडे सोपीव खातीं दिलीं आहेत. तसेंच, जबाबदार राज्यपद्धतीच्या ध्येयास्तव राजा व प्रजा यांचे जे संघर्ष झाले, त्यांचा गोड शेवट, त्या जबाबदार राज्यपद्धतीच्या ध्येयाची पूर्ति आजच्या सुमंगल प्रसंगापासून करण्याचें आपण घोषित करणार आहांत, त्यानें होत आहे. हिंदुस्थानास नुकतेंच वसाहतीचें स्वराज्य प्राप्त झालें आहे; व आपल्या संस्थानांतही संपूर्ण जबाबदारीचें स्वराज्य सुरू होणार आहे. अशा प्रसंगीं सर्व रयतेला आनंदच वाटेल, त्यांस आमची दलित जनताच कशी अपवाद असूं शकेल ? या आनंदप्रसंगीं श्रीमंतांपाशीं अशी विनंति करीत आहोंत कीं, संस्थानी प्रजेची सर्वांगीण उन्नति होण्यासाठीं खालसा व संस्थान हे भेद काढून टाकण्याच्या दृष्टीनें संस्थानचें धोरण व पाऊल प्रगतिपथावर पडावें. तसेंच, आम्हा दलित जनतेस राज्यकारभारांत प्रजेबरोबर सहभागी होण्यास सतत संधि मिळत जावी अशी सदिच्छा व्यक्त करून, आपण करीत असलेल्या सत्तादानाच्या त्यागाबद्दल, आजचें औचित्य जाणून, आपलें मन:पूर्वक अभिनंदन करीत आहोंत. "

## राजगड तालुका लोकलबोर्डः—

" श्रीमंतांनीं गादीवर आल्यापासून लोकोपयोगी व सार्वजनिक अशीं पुष्कळ कामें केलीं. नसरापूरजवळील शिवगंगा नदीवर लोकांच्या सोईसाठीं बरीच मोठी रक्कम खर्च करून पूल बांधून राजगड व प्रचंडगड या दोन्ही तालुक्यांचें अखंड दळणवळण सुरू केलें, याबद्दल आम्ही श्रीमंतांचे ऋणी आहोंत.

" लोकलबोर्ड ही संस्था पूर्वीं अस्तित्वांत नव्हती. श्रीमंतांनीं गादीवर आल्यावर ही संस्था अस्तित्वांत आणून लोकांना राज्यकारभारांत सहभागी करून घेतलें, व उत्तरोत्तर या बोर्डाच्या अधिकारांत सुधारणा करून व पुढें मतदानाचा

हक्क देऊन निवडणुकीनें लोकांचे प्रतिनिधि घेण्याचा हक्क दिला व लोकप्रतिनिधींचें मताधिक्य दिलें, या गोष्टीबद्दलही आम्ही श्रीमंतांचे अत्यंत ऋणी आहोंत."

**प्रचंडगड तालुका प्रजाजनः—**

"या रजत-महोत्सवाच्या सुमंगल प्रसंगीं, आपण पूर्वीं जाहीर केल्याप्रमाणें, आपल्या प्रजेस संपूर्ण जबाबदारीचें स्वराज्य देत आहांत, त्याबद्दल आम्हा प्रजाजनांना अत्यानंद होत आहे.

"ता. ९-८-४७ रोजीं बादशहांकडून आपणांस 'हिज हायनेस' असें नामाभिधान लावण्याचा मान मिळाला, याबद्दल आम्हांस आनंद होत आहे."

**हिंदु सभा, शाखा भोर, यांच्या मानपत्रांतील उताराः—**

"श्रीमंत राजेसाहेब, भोर संस्थानच्या गादीवर अधिष्ठित होऊन आपणांस मि॥ श्रावण शुद्ध प्रतिपदा शके १८६९ दिनांक १८।८।४७ या दिवशीं पंचवीस वर्षे पूर्ण झालीं. त्याच दिवशीं आपला रजतमहोत्सवही मोठ्या थाटानें साजरा झाला. त्या शुभदिनाप्रीत्यर्थ आम्ही हिंदुसभा, शाखा भोर, सं. भोर, या संस्थेच्या वतीनें आज आपलें मनःपूर्वक प्रकट अभिनंदन करीत आहोंत.

"हिंदवी स्वराज्य-संस्थापक श्रीमत् छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांना भूषणभूत झालेल्या राष्ट्रपुरुषांच्या तेजस्वी मालिकेंत आपल्या परमपूज्य पूर्वजांनीं पंतसचिव हें अत्यंत जबाबदारीचें व महत्त्वाचें पद मंडित केलें होतें. महाराजांच्या निधनानंतर मराठेशाहीवर जी आणीबाणीची परिस्थिति ओढवली, त्या बिकट कालांत ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांनीं स्वराज्यासाठीं भोगलेल्या हालअपेष्टा आणि आपल्या वचनासाठीं केलेला ओजस्वी त्याग मराठी इतिहासांत महशूरच आहे. आपण अशा थोर पुरुषांचे वंशज असल्यानें, आपलें अभिनंदन करण्याची ही सुवर्णसंधि आज आम्हांस प्राप्त होत आहे, हें आम्ही आपलें भाग्य समजतों.

"हिंदुसंस्थानें हीं हिंदूंच्या शक्तीचीं महान् प्रभावी अशीं केंद्रें आहेत; आणि याच दृष्टिकोनांतून 'हिंदुमहासभा' आपल्या संस्थानाकडे आशेनें पहात आहे. हीं संस्थानें स्वयंपूर्ण, स्वयंप्रकाशी आणि पूर्ण स्वसंरक्षणक्षम होऊन, हिंदु-

राष्ट्राचीं तीं प्रभावी व कार्यक्षम घटक बनावींत असें प्रतिपादन करणारी एकमेव संस्था हिंदुस्थानांत असेल, तर ती 'हिंदु महासभा' हीच होय. हिंदुत्व-निष्ठांची ही आकांक्षा आपण आपल्या कर्तृत्वानें परिस्थितीला तोंड देऊन पूर्ण कराल असा आम्हांस पूर्ण विश्वास वाटतो.

"लोकांच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें देऊन आपण जो अपूर्व व महत्त्वपूर्ण त्याग केला आहे, तो सर्वस्वीं आपल्या पूर्वपरंपरेस साजेसा असाच आहे. आपल्या या थोर कृतीबद्दल आह्मांस अत्यानंद होत आहे.

"आपण दिलेलें अधिकारदान प्रजेच्या पदरांत पडावें, हीच आपली सदिच्छा आहे हें उघड आहे. परंतु, तें दान सत्यार्थानें प्रजेच्या पदरांत पडण्या-साठीं, निवडून येणारे प्रतिनिधि प्रजेच्या इच्छा व आकांक्षा यांची अवज्ञा करूं शकणार नाहींत, किंबहुना त्या इच्छा व आकांक्षांप्रमाणें वागणें प्रतिनिधींस कायद्यानें भाग होईल, अशी योग्य ती योजना घटना-कायद्यांत होणें आवश्यक आहे. ही आमची मनीषा लवकरच आपणांकडून फलद्रूप होईल अशी आम्हांस खात्री वाटते."

मानपत्रें, पुष्पहार व नजराणे यांचा अत्यादरपूर्वक स्वीकार केल्यानंतर श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपलें भाषण वाचून दाखवून, भोर संस्थानांत जबाब-दारीची राज्यपद्धति त्या दिवसापासून सुरू केल्याचें व तत्संबंधि स. १९४७ इ. चा कायदा नं. १ संस्थानास लागू केल्याचें जाहीर केलें. श्रीमंतांचें समग्र भाषण खालीं दिलें आहे.

## राज्यारोहणाच्या रजत-महोत्सवाच्या सुमंगल समयीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेलें भाषण, ता. १८-८-१९४७ इ.

"आमचे प्रिय प्रजाजन व उपस्थित सद्गृहस्थहो,

"आमच्या राज्यारोहणाच्या २६ व्या दिनसमारंभास आपण सर्वजण अगत्य-पूर्वक उपस्थित आहांत, हें पाहून आम्हास परम संतोष झाला असून, आम्ही त्याबद्दल आपणां सर्वांचे स्वागतपूर्वक आभार मानतों.

"आमच्या दिवाणांनीं आपणांस आतांच वाचून दाखविलेल्या गतसालच्या अहवालावरून गेल्या वर्षांत आम्हीं केलेल्या दूरगामी सुधारणांची व राज्यकारभार-

चित्रांक ७५



रौप्य महोत्सवाच्या दिवशीं रात्रीं विजेची रोषणाई केलेला राजवाड्याचा दरवाजा. [सं. पा. २४५

विषयक महत्त्वाच्या गोष्टींची आपणांस माहिती झालीच आहे. त्याबाबत वेगळें असें आम्हास कांहींच सांगावयाचें नाहीं.

"व्हाइसरॉय लॉर्ड लुई माउंटबॅटन यांनीं ता. ३ जून १९४७ ची घोषणा, इंग्लंडच्या मजूर-सरकारच्या संमतीनें, करून हिंदुस्थानची पाकिस्तान व हिंदुस्थान अशी दोन विभागांत फाळणी करून, हीं दोन स्वतंत्र Dominions केल्याचें व ही योजना ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं अंमलांत आणण्याचें जाहीर केलें. ही घोषणा काँग्रेस व मुस्लीम लीग या उभय राजकीय पक्षांनीं मान्य केल्यामुळें, फाळणीचीं कामें जारीनें सुरू झालीं असून, देशाची व त्याचबरोबर सर्व खात्यांची फाळणी करण्यांत आली आहे. दोन घटना समित्या, दोन विभागांकरितां, स्वतंत्रपणें कामें करूं लागल्या आहेत. ता. १५ ऑगस्टपासून हिंदुस्थानला वसाहतीचा दर्जा, त्यासंबंधींचा Indian Independence Act नांवाचा कायदा ता. १८ जुलै १९४७ रोजीं ब्रिटिश पार्लमेंटनें मंजूर करून, दिला आहे. आतां नवीन वसाहत सरकारें अस्तित्वांत आलींच आहेत. ता. १६ मे १९४६ च्या घोषणेंत संस्थानांबाबत जें कांहीं ठरविण्यांत आलें, त्यांत कांहींही फेरबदल झालेला नाहीं. ब्रिटिश राज्य हिंदुस्थानांत स्थापन झाल्यानंतर हिंदी संस्थानिकांवर जी Paramountcy ( अधिराज्य सत्ता ) चालत आली होती, तीही आपोआप रद्द झालेली आहे. तथापि, नेक नामदार लॉर्ड लुई माउंटबॅटन यांनीं गेल्या २५ जुलईला संस्थानिकांच्या सभेंत जें भाषण केलें, त्यांत संस्थानांनीं कोणत्यातरी वसाहतीशीं ( Dominions ) संबंध जोडणें किती अगत्याचें आहे, हें स्पष्ट केलें व त्यास अनुसरून बहुतेक सर्व संस्थानें या ना त्या वसाहतीला निगडित झालीं आहेत. आम्हीही Instrument of Accession अन्वयें हिंदुस्थान-वसाहतीशीं संबंध जोडला आहे. तसेंच, जुने करार रद्द होण्यापूर्वीं, हिंदुस्थान वसाहतीबरोबर नवीन Stand-still Agreement केलेलें आहे. हिंदुस्थानच्या घटना समितींत दक्षिणेंतील संस्थानांनीं भाग घेतला असून, संस्थानाधिपतींनीं नियुक्त केलेले लोकनायक मा. श्री. अणे आणि प्रजाजनांनीं निवडलेले श्री. मुनवळ्ळी हे त्या समितीवर संस्थानांचे प्रतिनिधि म्हणून काम करीत आहेत.

"सद्‌गृहस्थहो, भोर संस्थानांतील राजकीय प्रगतीकडे आम्ही आतां वळतों. संस्थानच्या प्रजाजनांच्या संमतीनें भोर कायदेमंडळाची घटना आम्हीं ता. २ सप्टेंबर १९४६ रोजीं जाहीर केल्यावर, कायदेमंडळाच्या नवीन निवडणुकी नोव्हेंबर अखेर झाल्या. ता. २४ जानेवारी १९४७ रोजीं जाहीरनामा प्रसिद्ध करून लोकनियुक्त मंत्र्यांकडे कोणकोणतीं खातीं सोपवावयाचीं, हें आम्हीं प्रसिद्ध केलें; व त्यांत ब्रिटिश हद्दींतील स. १९१९ इ. च्या मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा-नुसार द्विदल राज्यपद्धतींत दिल्याप्रमाणें अधिकार मंत्र्यांना देण्याचें ठरविलें. ता. २४ फेब्रुवारी १९४७ रोजीं आम्ही लोकनियुक्त मंत्र्यांच्या नेमणुका करून राज्यकारभाराचीं बरींचशीं खातीं विभागून त्यांच्याकडे सोपविलीं असून, ता. १ मार्च १९४७ पासून मंत्र्यांनीं आपल्या कामाचा चार्ज घेतला व ते आपआपल्या खात्यांचा कारभार पाहूं लागले. आम्हास या ठिकाणीं जाहीरपणें सांगण्यास आनंद वाटतो कीं, त्यांचा कारभार एकंदरीनें समाधानकारक चालला आहे.

"भोर संस्थानची धान्यव्यवस्था, इतर ठिकाणच्या मानानें, बऱ्यापैकीं आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ना. मंत्री यांनीं मंत्रिपद स्वीकारल्यापासून धान्य-व्यवस्थेकडेच आपलें सर्व लक्ष केंद्रित केलेलें आहे.

"सद्‌गृहस्थहो, दिवाणसाहेबांनीं आतांच वाचलेल्या अहवालांत कारभारी मंडळाच्या कामगिरीचा उल्लेख केलाच आहे. त्याबाबत आम्हास विशेष रीतीनें सांगावयाचें तें हें कीं, कारभारी मंडळाच्या अध्यक्षाच्या जागीं आम्हीं श्री. तात्या-साहेब केळकर यांची प्रथम एक वर्षपर्यंत नेमणूक केली होती. ती मुदत फेब्रुवारी १९४७ इ. अखेर संपल्यावर, त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा आमच्याकडे पाठवून, या कामांतून मुक्त करावें अशी आम्हास विनंति केली. त्यांची नेमणूक करतांनाच एक वर्षपर्यंत काम करण्याचें त्यांनीं कबूल केलें होतें. त्याप्रमाणें मुदत संपल्याबरोबर राजीनामा पाठविला, हें बरोबरच होतें. आम्ही नवीन सुधारणांचा जाहीरनामा प्रसिद्ध करतांना संपूर्ण जबाबदारीची राज्यपद्धति ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं देण्याचें ठरविलें होतें; व तोंपर्यंत कारभारी मंडळाचें काम गेल्या सालप्रमाणेंच श्री. तात्यासाहेब यांनींच तें केल्यास, बरें होईल असें वाटल्यामुळें, त्यांना विनंति केली; व आम्हांस सांगण्यास आनंद

आनंद वाटतो कीं, त्यांनींही आमच्या विनंतीस मान देऊन आज तारखेपर्यंत कारभारी मंडळाचे अध्यक्ष म्हणून काम करण्याचें कबूल केलें व त्याप्रमाणें ते आजपर्यंत वरील काम पहात आहेत. आम्हीं केलेल्या विनंतीस मान देऊन कारभारी मंडळाचें अध्यक्षपद स्वीकारून आम्हावर व संस्थानवर त्यांनीं फार उपकार केले आहेत. त्यांच्या बहुमोल अनुभवाच्या सल्ल्याचा आम्हास गेल्या दीड वर्षांच्या कालांत फारच उपयोग झाला. त्यांनीं घेतलेल्या परिश्रमांबद्दल आम्हीं त्यांचे फार आभारी आहोंत. आम्ही आमच्या व त्यांच्या दरम्यानच्या पूर्वीच्या ऋणानुबंधाचा फायदा घेऊन ही कामगिरी वास्तविक त्यांच्यावर लादली व त्यांनींही ती आपलेपणानें स्वीकारून पार पाडली, याबद्दल आम्ही कृतज्ञ आहोंत. आम्ही आजपासून त्यांना त्यांच्या जबाबदारींतून मोकळे केलें आहे.

"सद्गृहस्थहो, नरेंद्र मंडळाच्या स्थायी समितीवर आमची सन १९४६–४८ या दोन सालांकरितां दक्षिणेंतील संस्थानांतर्फे निवडणूक झाली होती. गेल्या सालांत दोन तीन वेळां मुंबई व दिल्ली येथें सदर समितीच्या बैठकीसाठीं आम्ही गेलों होतों. गेल्या जानेवारीअखेर आम्ही दिल्लीहून परत आल्यावर, आमची तब्येत नादुरुस्त झाली व डॉक्टरांनीं दूरच्या प्रवासाची दगदग यापुढें वरचेवर आम्हीं घेऊं नये, असा सल्ला दिला. त्यास अनुसरून आम्ही स्थायी समितीवरील आपल्या सभासदत्वाचा राजीनामा नरेंद्र मंडळाच्या चान्सेलरकडे पाठविला. आमच्याबरोबर आमच्या दिवाणांनींही मिनिस्टर्स कमिटीवरील आपल्या सभासदत्वाचा राजीनामा दिला आहे. नरेंद्र मंडळाच्या स्थायी समितीचे सभासद या नात्यानें वरील अवधींत जी आम्हीं अल्पस्वल्प कामगिरी केली आहे, ती आमच्या संस्थानिक बंधूंना पसंत पडली. त्यांनीं त्याबद्दल आपली नुसतीच पसंति व्यक्त केली असें नसून, आम्हीं राजीनामा दिल्याचें समजल्याबरोबर त्यांनीं त्याबद्दल, आम्ही राजीनामा परत घेऊन, निदान सभासदत्वाची मुदत पुरी होईपर्यंत, स्थायी समितीवर सभासद म्हणून राहून संस्थानिकांच्या हितसंरक्षणाची कामगिरी करावी अशी आम्हास आग्रहाची विनंति केली. आम्हाविषयीं आमच्या संस्थानिक बंधूंनीं स्थायी समितीवरील कामगिरीबद्दल जी गुणग्राहकता व्यक्त केली, त्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों, हें येथें जाहीरपणें व्यक्त करण्यास आम्हास आनंद वाटत आहे.

आतां हिंदुस्थानला वसाहतींचें स्वराज्य Dominion Status प्राप्त झाल्यामुळें, व्हाइसरॉय हें पदच कमी होत आहे. व्हाइसरॉय हे नरेंद्र मंडळाचे कायमचे अध्यक्ष होते. ते जात असल्यामुळें नरेंद्रमंडळ बरखास्त करण्यांत आलें आहे. एक काळ असा होता कीं, त्या वेळीं या संस्थेनें संस्थानांच्या हिताकरितां बरीच महत्त्वाची कामगिरी केली व संस्थेमार्फत अनेक महत्त्वाच्या प्रश्नांची दादही संस्थानिकांना लावून घेतां आली. आम्ही या संस्थेचे प्रथम प्रातिनिधिक सभासद होतों. नंतर कायमचे सभासदत्वाकरितां आम्ही प्रयत्न केले. त्या आमच्या प्रयत्नांना यश येऊन सन १९४१ सालीं आमचें सभासदत्व मान्य करण्यांत आलें व तेव्हांपासून आम्ही आपल्या हक्कानें या संस्थेवर गेलीं ७-८ वर्षें काम केलें व गेलीं दोन वर्षें स्थायी समितीवर काम करण्याची संधि, वर उल्लेख केलेप्रमाणें, आम्हास मिळाली.

"सद्गृहस्थहो, मुंबई सरकारनें वीर येथील धरण वाढविण्याचें काम हातीं घेण्याचें ठरविलें आहे. त्या कामांत मुंबई सरकार व दरबार यांच्या दरम्यान गेल्या वर्षभर वाटाघाटी चालू होत्या. त्या वाटाघाटींचा निर्णय होऊन भोर संस्थानमध्यें साखरेचा कारखाना उभारण्याकरितां ३००० तीन हजार एकर क्षेत्रास पुरेल इतकें पाणी दरबारला देण्याचें मुंबई सरकारनें कबूल केलें आहे, व वीजहि ज्यास्त देण्याचें कबूल केलें आहे. इतरहि बऱ्याच सवलती संस्थानला मिळणार आहेत. त्याबाबत संस्थान दरबार व मुंबई सरकार यांच्या दरम्यान व्हावयाच्या कराराचा मसुदा दरबारकडे आलेला आहे. त्याचा विचार चालू आहे. हें काम झालें, तर त्यापासून प्रजाजनांचा निरनिराळ्या रीतींनीं बराच फायदा होईल; व एक मोठा उद्योगधंदा सुरू झाल्यानें संस्थानांतील लोकांची आर्थिक उन्नति होईल, असा आम्हास भरंवसा वाटतो. आमची फार दिवसांची इच्छा सफल झाल्याबद्दल आम्हांस आनंद वाटणार आहे. हल्लीं चालू असलेल्या वाटाघाटी पूर्णत्वास जाऊन वीर येथील नवीन होणाऱ्या धरणाचें काम पूर्ण झाल्यावर, संस्थानमधील कांहीं लोकांच्या जमिनी त्या धरणाच्या पाण्याखालीं जाणार आहेत, ही गोष्ट खरी आहे. तथापि, ज्यांच्या ज्यांच्या जमिनी जातील, त्यांना त्यांना त्यांच्या जमिनीचा मोबदला, दुसरीकडे, शक्य तर, जमीन देऊन अगर नियमाप्रमाणें भरपूर कॉंपेन्सेशन देऊन मिळणार आहे. त्यांचें कोणत्याहि प्रकारें नुकसान होणार

चित्रांक ७६



दक्षिणी संस्थान संघराज्याच्या घटनाकायद्यावर भोर येथें श्री. राजेसाहेब औंध हे 'राजप्रमुख' म्हणून सही करीत आहेत. ता. १७।१०।४७ इ.

[ सं. पा. २६२

नाहीं, अशी खबरदारी घेण्यांत येणार आहे. सबब, संस्थानच्या रयतेनें व त्यांच्या पुढाऱ्यांनीं तडजोडीचें धोरण स्वीकारावें, असें आम्हांस वाटतें. तसें केल्यानें उद्योगधंदे जास्त विजेच्या साह्यानें उभारले जाऊन, संस्थानचा व संस्थानच्या रयतेचा आर्थिकदृष्ट्या विशेष फायदा होणार आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन आमच्या मंत्र्यांनीं धरण वाढविण्यास संमति देण्याच्या प्रश्नाचा विचार करण्याचा आहे. धरण वाढल्यामुळें संस्थानचा व रयतेचा फायदा होण्याची आलेली ही संधि घालविली, तर पुन्हा अशी संधि येण्याचा संभव नाहीं, असें आमचें स्पष्ट मत आहे.

"सद्‌गृहस्थहो, एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करणें, या ठिकाणीं अप्रस्तुत होणार नाहीं असें आम्हांस वाटतें. हिंदुस्थान सरकारनें लोकांना मान-मरातबादाखल पदव्या अगर तत्सम कांहींहि न करण्याचें धोरण जाहीर केलें; पण, अशा स्थितींत ता. ८ ऑगस्ट १९४७ रोजीं हिज इंपीरियल मॅजेस्टी राजेसाहेब जॉर्ज यांनीं ९ तोफांची सलामी असलेल्या संस्थानिकांना "हिज हायनेस" हा वंशपरंपरेचा मान दिल्याचें कोल्हापूरचे मे. रेसिडेंटसाहेब यांनीं आम्हांस अकल्पितरीत्या कळविलें. आमच्या पंचवीस वर्षांच्या कारकीर्दीच्या रजत–महोत्सवाच्या निमित्तानें आम्हीं आमच्या संस्थानच्या प्रजाजनांस जबाब-दारीची राज्यपद्धति दिल्याचें जाहीर करण्याच्या सुमंगल प्रसंगीं साम्राज्य सरकार-कडून आम्हास 'हिज हायनेस' हा किताब मिळणें, हा एक सुयोगच समजला पाहिजे. हा किताब देऊन गौरव केल्याबद्दल, आम्ही साम्राज्य सरकारचे कृतज्ञता-पूर्वक आभार मानतों.

"सद्‌गृहस्थहो, आजच्या या सुमंगल प्रसंगीं आम्हास जाहीर रीतीनें सांगण्यास आनंद वाटतो कीं, आम्हीं पूर्वीं जाहीर केल्याप्रमाणें, आजपासून भोर संस्थानचा सर्व राज्यकारभार लोकप्रतिनिधींच्या ताब्यांत देत आहों.

( १ ) संरक्षण खातें, ( २ ) परकीय संबंध व हिंदुस्थान सरकार व अन्य प्रांतिक सरकारें व संस्थानिक यांच्याबरोबरचे राजकीय संबंध, (३) इनाम, तैनात, सरंजाम, श्रीराम संस्थान व आंबवडें संस्थान व ( ४ ) खाजगी.

वर उल्लेख केलेल्या बाबींखेरीज संस्थानच्या राज्यकारभारासंबंधींचीं सर्व खातीं लोकनियुक्त मंत्र्यांकडे संपूर्ण जबाबदारीनें सुपूर्त करण्यांत येत आहेत.

यासंबंधींची सविस्तर योजना आज रोजीं प्रसिद्ध करण्यांत आलेल्या नव्या कायद्यांत आहे. याप्रमाणें आम्हीं सन १९३२ इ. सालीं ठरविलेल्या आमच्या संस्थानच्या राज्यकारभाराच्या ध्येयाची-जबाबदार राज्यपद्धतीची-पूर्तता आज करीत आहों. भोर संस्थानचा राज्यकारभारासंबंधीं सन १९४७ इ. चा कायदा नं. १ आजपासून संस्थानला लागू करण्यांत आला आहे. त्यासंबंधींचें गॅझेट आज प्रसिद्ध केलें आहे. नवीन कायद्याच्या प्रती डुप्लिकेटरच्या साह्यानें आज तयार आहेत. कायद्याच्या छापील प्रती तयार करण्याची तजवीज केली असून, त्या छापील प्रती लवकरच सर्वांस पाहण्यास मिळतील.

"सद्‌गृहस्थहो, आजच्या या आनंददायक समारंभानिमित्त आम्हीं खालील गोष्टी करण्याचें योजिलें आहे.

( १ ) सारा सूट.

( अ ) रु. २० पर्यंत सरकारधारा भरणारास दर रुपयास चार आणेप्रमाणें,

( ब ) रु. ५० पर्यंत धारा भरणारास दर रुपयास दोन आणेप्रमाणें, आणि

( क ) रु. ५० वरील धारा भरणारास दर रुपयास एक आणाप्रमाणें,

याप्रमाणें सर्व संस्थानमधील मिळून रु. ४०,००० साऱ्याची सूट देण्यांत येत आहे. या सुटीमुळें आमच्या सर्व शेतकरी प्रजेस संतोष होईल अशी आम्हांस आशा आहे.

( २ ) संस्थानच्या तुरुंगांत असलेले कैदी ११ मुक्त करण्यांत आले आहेत.

( ३ ) संस्थानमध्यें फार पुरातनकालपासून चालत आलेला म्हशी व मेंढरें यांवर असलेला 'धनगरमहाल' नांवाचा कर रद्द करण्यांत येत आहे. या करामुळें म्हशींवरील सुमारें रु. १३५० व मेंढ्यांवरील रु. १४२५ एकूण रु. २७७५ उत्पन्न दरसाल कमी पडणार आहे.

( ४ ) संस्थानमध्यें शेती हा महत्त्वाचा व्यवसाय आहे. शेतीला आवश्यक अशा नांगराच्या साधनावर नांगरखुंट, लुमणी, इसाड, इत्यादींवर फीरूपानें वसूल करण्यांत येत असलेला कर यापुढें रद्द करण्यांत येत आहे.

( ५ ) सुधागड तालुक्यांतील जंगलमधील हिरडयाचा लिलाव करून विक्रि करण्याची पद्धत आहे, ती यापुढें बंद करून संस्थानच्या घाटावरील तालुक्यांत असलेली रॉयल्टी घेण्याची पद्धत सुधागड तालुक्यांत सुरू करण्याचें ठरविलें आहे, आणि

( ६ ) आजच्या या मंगळ प्रसंगाची आठवण सर्व नोकरवर्गांस कायम राहावी, म्हणून त्यांना एक महिन्याचा पगार बोनस म्हणून देण्याचें मंजूर करण्यांत येत आहे. संस्थानच्या नोकरींतून सेवानिवृत्त झालेल्या,

( ७ ) संस्थानच्या पेन्शनर लोकांनाहि आजच्या शुभ दिनीं एक महिन्याचें पेन्शन बोनस देण्याचें आम्हीं जाहीर करीत आहों. बोनसची ही रक्कम सुमारें रु. ३०,००० होत आहे.

( ८ ) संस्थानमधील ग्रेझिंग फी करहि कमी करण्यांत येत आहे.

"सद्‌गृहस्थहो, प्रभू श्रीरामचंद्राच्या कृपेनें आमच्या कारकीर्दीस २५ वर्षें पूर्ण होऊन, आजचा रजत-महोत्सव होण्याचें भाग्य आम्हास लाभलें, या आनंदाप्रीत्यर्थ आम्ही आमचे बालपणापासूनचे स्नेही श्री. दादासाहेब कुमठेकर यांना बहुमानाचा पोपाक देऊन त्यांचा गौरव करीत आहों. श्री. दादासाहेब हे आमचे स्नेही आहेत, हें आपणा सर्वांस माहीत आहेच. त्यांनीं राज्यकारभाराच्या कामांत आम्हास वेळोवेळीं दिलेल्या बहुमोल सल्लामसलतीचा आम्हास फार उपयोग झाला.

"भारत सेवक समाजाच्या पुणें शाखेचे प्रमुख सदस्य श्री. श्रीधर गणेश वझे यांचा व भोर संस्थानचा संबंध सन १९३९ सालापासून आला. सन १९३८ सालीं आम्हीं नेमलेल्या घटना व जंगल कमिट्यांचें काम श्री. वझे यांनीं करून संस्थानला अनेक प्रकारें ऋणी करून ठेवलें आहे. त्यांच्या सल्लयाचा आम्हांस संस्थानच्या राजकीय प्रगतीच्या कामीं फारच उपयोग होत आहे. त्यांना आजच्या मंगल प्रसंगीं पोपाख देऊन त्यांचाही आम्ही गौरव करीत आहों.

"आमचे स्नेही व कारभारी मंडळाचे अध्यक्ष श्री. दे. भ. तात्यासाहेब केळकर यांनाही आम्ही आजच्या सुप्रसंगीं बहुमानाचा पोपाख देत आहों.

"आज आम्ही लागू केलेल्या भोर संस्थानच्या कायद्याचें काम घटनाशास्त्रज्ञ श्री. दळवी यांजकडे आम्हीं सोपविलें होतें. त्यांचा आमचा परिचयही फार जुना

आहे. त्यांचाही गौरव आम्ही पोषाख देऊन करीत आहोंत. त्यांच्या कामाबद्दल त्यांना आम्ही रु. १०००० दहा हजार देण्याचें ठरविलें आहे.

"भोर स्टेट बँकेचे उपाध्यक्ष श्री. वा. पुं. वर्दे यांनीं, बँकेच्या डायरेक्टर बोर्डांत प्रथमपासून काम करून, बँकेच्या प्रगतीस फार महत्त्वाची मदत केली. त्यांच्या कामाचा व्याप फार मोठा आहे. तो संभाळून भोर स्टेट बँकेंतही ते मन:पूर्वक सहकार्य करीत आहेत. त्यांचा बहुमान या प्रसंगीं करणें फार अगत्याचें असल्यामुळें, त्यांस आम्ही मानाचा पोषाख देत आहों.

"सद्गृहस्थहो, आमचे लहानपणापासूनचे स्नेही श्री. नरहरपंत आंबेकर यांनीं आमच्याकडे प्रायव्हेट सेक्रेटरी व कौन्सिलर या नात्यानें बरींच वर्षें नोकरी केली. प्रकृतीच्या अस्वास्थ्याकरितां त्यांच्या विनंतीवरून आम्ही त्यास सुमारें दीड वर्षापूर्वींच सेवानिवृत्त केलें व त्या वेळेपासून त्यांस पेन्शनही देण्यांत आलेलें आहे. तसेंच, रावसाहेब विनायक गोविंद रानडे हेही संस्थानचे नोकरींत सबजज्जाचे जागेपासून कौन्सिलर व ॲक्टिंग दिवाण ह्या हुद्यांचें काम करून सेवानिवृत्त झाले आहेत. श्री. आंबेकर व रावसाहेब रानडे यांनीं संस्थानची जी महत्त्वाची कामगिरी केली, त्याचा अल्पस्वल्प मोबदला म्हणून, या उभयतांचा आजच्या सुमंगल प्रसंगाच्या निमित्तानें गौरव करावा या हेतूनें, त्यांस यापुढें दरमहा रु. १५० एकशेंपन्नास निवृत्ति-वेतन ( पेन्शन ) देण्याचें आम्हीं ठरविलें आहे.

"सद्गृहस्थहो, गेल्या जानेवारी महिन्यांत माजी दिवाण रा. ब. शितूत यांची मुदत संपल्यामुळें, ते संस्थानची नोकरी सोडून गेले. त्यांच्या जागीं आम्ही आमचे प्रायव्हेट सेक्रेटरी व कौन्सिलर रा. सा. साने यांची प्रथम ॲक्टिंग दिवाण म्हणून नेमणूक केली व गेल्या ४-५ महिन्यांतील त्यांचें काम लक्षांत घेऊन नुकतेंच त्यांना ' दिवाण ' म्हणून आम्हीं कायम केलें आहे.

"आमचे चिरंजीव राजकुमार रावसाहेब हे बॅरिस्टरीच्या परीक्षेस दोन विषयांकरितां बसले होते. त्यांत ते यशस्वी झाले असून, बाकीच्या विषयांची त्यांची परीक्षा नुकतीच झाली आहे. त्याचप्रमाणें आमची नात चि. विमलाराजे यंदा मुंबई युनिव्हर्सिटीच्या इंटरमीजिएटच्या परीक्षेस बसली होती. ती सेकंड-क्लासमध्यें चांगल्याप्रकारें उत्तीर्ण झाली आहे. केवळ २-३ मार्कांनीं तिला फर्स्ट क्लास मिळाला नाहीं.

"याप्रमाणें गेल्या सालीं घडलेल्या महत्त्वाच्या गोष्टींबद्दल संक्षिप्त विवेचन आम्हीं आतांपर्यंत केलें आहे. पुनः एकदा आपणा सर्वांचे आभार मानून व श्रीरामप्रभूचरणीं आपण सर्वांस आयुरारोग्य देऊन शांततेचे व सुबत्तेचे दिवस दाखवावेत अशी विनम्र भावानें प्रार्थना करून आम्ही आपलें भाषण पुरें करतों."

---

श्रीमंत राजेसाहेबांनीं भाषण संपविल्यानंतर, त्या दिवशीं लागू केलेल्या भोर संस्थानच्या राज्यकारभाराबाबतच्या १९४७ इ. च्या कायद्याची एक प्रत संस्थानचे मुख्य मंत्री ना. गोपिनाथ बाळकृष्ण पोतनीस यांस दिली व त्यामुळें जणूं काय राज्यकारभाराची धुरा लोकांच्या प्रतिनिधीकडे स्वखुषीनें सोपविली, असें सर्व जमलेल्या लोकांच्या निदर्शनास आणलें. नंतर, श्री. न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर, श्री. चं. गो. आगाशे, श्री. श्री. ग. वझे, श्री. कों. म. कुमठेकर, श्री. डी. जी. दळवी, श्री. वा. पुं. वर्दे व श्री. म. हे. देव यांना या मंगल प्रसंगीं पोषाख देऊन त्यांचा गौरव केला.

भोर संस्थानच्या नव्या कायद्याचा अत्यादरपूर्वक स्वीकार केल्यावर, ना. पोतनीस यांनीं समयोचित भाषण केलें व आपणावर व तदनुषंगानें प्रजाजनांवर टाकलेल्या जबाबदारीची जाणीव ठेवून संस्थानचा कारभार राजा व प्रजा या उभयतांस सुखावह होईल अशा प्रकारें चालविण्याचें जाहीर रीतीनें आश्वासन दिलें.

यानंतर श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं श्रीमंतांनीं जबाबदारीची राज्य-पद्धति देऊन केलेल्या त्यागाबद्दल त्यांचें अभिनंदन केलें. ते म्हणाले:—

" मी दहा मिनिटांपूर्वीं या संस्थानांतील एक अधिकारी होतों; पण, आतां नाहीं ! म्हणून, मला प्रांजलपणें बोलतां येईल, तें बोलतों. मला राजेसाहेबांचें अभिनंदन दोन गोष्टींकरितां करावयाचें आहे. एक, त्यांना झालेला लाभ व दोन, त्यांनीं केलेला त्याग. वरिष्ठ सरकारनें त्यांना 'हिज हायनेस' ही पदवी दिली, त्याअर्थीं देणाराचा व घेणाराचा तरी हेतु हें राज्य वंशपरंपरा चालावें असा असावा; पण, लाभापेक्षां त्यागाला महत्त्व अधिक; म्हणून, त्याकरितां माझें अभिनंदनहि अधिक हार्दिक आहे. आज राजेसाहेबांनीं प्रजेला स्वराज्य-दान दिलें, तें सर्वच दृष्टींनीं योग्य आहे. "

पुणें येथील दे. ऋ. ब्रा. संस्थेचे प्रतिनिधि श्री. वि. के. खासनीस यांनीं श्रीमंत राजेसाहेबांचें जबाबदारीची राज्यपद्धति संस्थानला लागू केल्याबद्दल अभिनंदन केल्यानंतर, पानसुपारी व अत्तरगुलाब वाटल्यावर हा संस्मरणीय समारंभ समाप्त झाला.

याच दिवशीं रात्रीं भोर स्टेट बँकेतर्फे श्री. राजेसाहेब यांना मेजवानी देण्यांत आली.

ता. २० रोजीं भोर येथील सर्व ब्राह्मण रयतेस व ता. २१ रोजीं बाकीच्या सर्व जातींच्या लोकांना ( स्त्रियांना व पुरुषांना ) या मंगल समारंभानिमित्त भोजन देण्यांत आलें. ता. १९ रोजीं भोर येथील पुणें-भोर मोटार युनियन व श्री लक्ष्मी टेक्स्टाइल मिल्स, भोर, या संस्थांनीं श्रीमंत राजेसाहेबांचा खास सत्कार केला. ता. २० रोजीं पारेख पेपर मिलच्या चालकांनीं श्रीमंतांना पार्टी दिली व श्री. किरपेकर, भाटघर येथील ओव्हरसिअर, यांनीं श्री. राजेसाहेब यांस पानसुपारी केली. याच दिवशीं भोर येथील मुसलमान जमातीतर्फे दिलेल्या मानपत्राचा श्रीमंतांनीं स्वीकार केला.

ता. २१ रोजीं भोर येथील महिला मंडळानें श्रीमंतांचा सत्कार केला. भोरच्या हिंदुमहासभेतर्फे श्रीमंतांना मानपत्र अर्पण करण्यांत आलें; तसेंच, भोर येथील वार्ड नं. २ मधील नागरिकांनीं श्रीमंतांना पानसुपारी केली.

ता. २०-९-४७ रोजीं पुणें येथील दे. ऋ. ब्रा. संस्थेमध्यें श्री. राजेसाहेबांचा सत्कार करण्यांत आला. संस्थेस या वेळी श्रीमंतांनीं रु. ५०० पांचशेंची देणगी दिली.

विश्राममंडळ, पुणें, गणेश मोफत वाचनालय व ग्रंथालय, पुणें, व विद्याप्रसारिणी सभा, पुणें, या संस्थांनीं श्रीमंतांना पुष्पहार समर्पण केले.

अखिल देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण मध्यवर्ती मंडळ, मुंबई, या संस्थेतर्फे ता. ११-१०-४७ रोजीं श्रीमंत राजेसाहेबांचा सत्कार करण्यांत आला. त्या संस्थेस श्री. राजेसाहेब यांनीं रौप्यमहोत्सव-समारंभाच्या स्मरणार्थ रु. १००० एक हजाराची देणगी दिली.

## प्रकरण २१ वें

# भोर संस्थान कार्यकारी-मंडळांतील प्रमुख व्यक्ति

श्री. न. चिं. केळकर ह्यांच्या कार्यकारी मंडळाच्या प्रशंसनीय कामाबद्दल पूर्वी उल्लेख आलेलाच आहे.

रा. रा. कोंडो म. ऊर्फ दादासाहेब कुमठेकर, बी. ए. एल्एल्. बी., रावसाहेब नाईक, रावसाहेब रानडे, रा. मुंडकूर, रावबहादूर शितूत व राव-सा. साने ह्यांची थोडक्यांत हकीगत व केव्हांपासून कोठपर्यंत दिवाणपदावर ते होते, ह्याची व कौन्सिलर यांची माहिती खालीलप्रमाणें आहे.

### श्रीयुत कों. म. कुमठेकर यांची दिवाणगिरी

रा. ब. हुल्याळ यांनीं संस्थानच्या दिवाणपदाचा राजीनामा दिल्यावर, दिवाणपदावर श्रीमंत राजेसाहेब यांनीं रा. कों. म. कुमठेकर बी.ए., एल्एल्.बी., यांची नेमणूक केली. रा. कुमठेकर यांनीं ब्रिटिश हद्दींत डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज या मोठ्या हुद्याच्या जागेवर काम केलें असल्यामुळें, त्यांची दिवाणपदीं केलेली योजना प्रजेच्या दृष्टीनेंही स्वागतार्ह अशीच झाली. रा. कुमठेकर यांनीं १५ नोव्हेंबर १९३८ पासून जून १९४० पर्यंत दिवाण म्हणून काम करून राजीनामा दिला.

रा. कुमठेकर गेल्यावर अगदीं थोड्याच दिवसांत त्यांच्या नसण्यामुळें राज्य-कारभारांतील अनेक गोष्टी सुरळीतपणें घडवून आणणें कठीण होत असल्याची जाणीव फार तीव्रतेनें श्री. राजेसाहेबांना होऊं लागली; व पुढें राजेसाहेबांना बऱ्याच त्रासदायक गोष्टी झाल्या, त्या, ते असते तर, झाल्या नसत्या असें अजूनही राजेसाहेबांना वाटतें. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट एवढीच कीं, कुमठेकर व राजेसाहेब यांचे संबंध पूर्ववत् असून, ते आपली सल्लामसलत राजेसाहेबांना महत्त्वाच्या कामांत देत असतात; व म्हणून, श्रीमंतांनींही त्यांचा आपल्या कारकीर्दीच्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं त्यांना पोषाख देऊन गौरव केला.

## रा. सा. नाईक दिवाण

रा. कुमठेकर यांच्यानंतर ता. २० सप्टेंबर १९४० पासून ब्रिटिश हद्दींत डि. डे. कलेक्टरच्या दर्जाचें काम करून रिटायर झालेले रा. सा. कृष्णाजी व्यंकटेश नाईक, बी. ए., यांना संस्थानचे दिवाण म्हणून, नेमण्यांत आलें. यांच्या कामाबाबत विशेष उल्लेख करण्यासारखी गोष्ट कांहीं नाहीं.

## रावसाहेब रानडे यांची दिवाणपदावर नेमणूक

रावसाहेब नाईक यांच्यानंतर संस्थानचे कौन्सिलर रा. सा. विनायक गोविंद रानडे, एम्.ए., एल्एल्.बी., यांची श्रीमंत राजेसाहेब यांनीं संस्थानच्या दिवाणाच्या जागीं ता. १ डिसेंबर १९४३ पासून ॲक्टिंग दिवाण म्हणून नेमणूक केली. त्यांनीं ॲक्टिंग दिवाण म्हणून सुमारें १० महिने काम केलें. रावसाहेब रानडे यांनीं संस्थानमध्यें सन १९०९ पासून निरनिराळ्या जागीं काम केलें असल्यामुळें त्यांना सर्व खात्यांचे कामाची चांगली माहिती होती. पुढें वयोमान व प्रकृति या दोन्ही कारणांस्तव त्यांनीं राजीनामा दिल्यावर, ता. १४ जानेवारी १९४५ रोजीं संक्रांतीच्या दरबारमध्यें श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेल्या भाषणांत रा. सा. रानडे यांनीं संस्थानमध्यें केलेल्या नोकरीबद्दल त्यांचा गौरव करून त्यांना पोषाख देऊन आपली गुणग्राहकता व्यक्त केली. त्यानंतर श्रीमंतांनीं पुढें रौप्यमहोत्सवाच्या वेळीं त्यांना पगाराइतकें पेन्शन करून दिलें.

## रा. आ. शे. मुंडकूर

रा. सा. रानडे यांच्यानंतर रा. आनंदराव शेषगिरी मुंडकूर, बी.ए., यांना स. १९४४ च्या सप्टेंबरमध्यें संस्थानचे दिवाण नेमण्यांत आलें. हेही ब्रिटिश हद्दींत डि. डे. कलेक्टरच्या दर्जाचें काम केलेले इसम होते. हे दिवाणपदावर आल्यावेळीं संस्थानमध्यें लोकनियुक्त मंत्र्याच्या जागीं रा. म. व्यं. शिंगरे होते. संस्थानमध्यें कंट्रोलचें धान्य पुरविण्याची एजन्सी रा. शिंगरे यांच्या पुतण्याकडे होती. कंट्रोलची एजन्सी रद्द करून धान्य पुरवठयाची व्यवस्था दरबारनें आपल्याकडे घ्यावी असें कोल्हापूरचे रेसिडेन्सीकडून नुकतेंच लिहून आलें होतें. हें लिहून आल्याप्रमाणें दरबारकडे धान्यव्यवस्था घ्यावी असा श्री. राजेसाहेब

चित्रांक ७७



मिरज (सी.) येथें संघराज्य-स्थापना.

[ . पा. २६८

यांचा हेतु होता. दरम्यान मुंडकूर हे रक्तदाबाच्या विकारानें बरेच आजारी झाले व त्यांना डॉक्टरच्या सल्ल्यानुसार प्रकृतीच्या कारणास्तव राजीनामा देऊन संस्थानची नोकरी सोडून जावें लागलें. यामुळें दरबारनें धान्यपुरवठयाची योजना आपल्याकडे घेतली.

## रा. ब. कृ. रा. शितूत

रा. मुंडकूर दिवाण यांचा राजीनामा मंजूर झाल्यावर, तीन महिन्यांनंतर रा. ब. कृष्णराव रामराव शितूत, बी. ए., रि. डि. डे. कलेक्टर, यांची दिवाण म्हणून नेमणूक झाली. यांच्या वेळीं महायुद्धाचें शेवटचें पर्व सुरू झालें होतें. परंतु, धान्य-नियंत्रण मात्र पराकोटीला पोचलें होतें. रा. ब. शितूत यांनीं एजन्सी व कार्पोरेशन्स ताबडतोब रद्द केल्या व धान्यव्यवस्था आपल्या ताब्यांत घेतली. रा. ब. शितूत यांनीं प्रकृतीच्या कारणास्तव ता. १८ जानेवारी १९४६ च्या सुमारास राजीनामा दिला व त्यांना संस्थानच्या नोकरींतून मुक्त करण्यांत आलें. रा. ब. शितूत यांच्यानंतर श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपले प्रायव्हेट सेक्रेटरी व कौन्सिलर रावसाहेब लक्ष्मण रघुनाथ साने, बी. ए., एल्एल्. बी., यांची संस्थानचे ॲक्टिंग दिवाण म्हणून ता. १९ जानेवारी १९४६ पासून नेमणूक केली.

## रा. सा. ल. र. साने

रा. सा. ल. र. साने, बी. ए., एल्एल्. बी., यांनीं हि. हा. श्रीमंत राजेसाहेब याचे प्रायव्हेट सेक्रेटरी व हुजूर-शिरस्तेदार म्हणून १ जून १९४१ सालीं संस्थानचे नोकरींत प्रवेश केला व पुढें रा. ब. शितूतच्या दिवाणगिरींत त्यांची ऍक्झिक्युटिव्ह कौन्सिलर म्हणून नेमणूक करण्यांत आली. पुढें, त्यांना दिवाण नेमलें व त्यांची कामगिरी लक्षांत घेऊन त्यांना रु. ४०० पेन्शन मिळावें असा २९ सप्टेंबर १९४७ रोजीं ठराव केला. ते १ डिसेंबर १९४७ पासून पेन्शन घेऊं लागले आहेत.

श्रीयुत रा. न. गो. आंबेकर, कौन्सिलर, ह्यांच्यासंबंधानें खालीलप्रमाणें थोडक्यांत त्यांच्या कामकाजाबाबतची माहिती आहे.

रा. नरहर गोपाळ आंबेकर, बी. ए., यांनीं प्रायव्हेट सेक्रेटरी व एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर या महत्त्वाच्या जागांवर संस्थानची नोकरी सुमारें ३०-३५ वर्षें केली. रा. नरहरपंत यांचा व श्रीमंतांचा, ते युवराज असतांना, स्नेह जमला व उत्तरोत्तर तो वाढत गेला. रा. नरहरपंत हे श्रीमंतांचे सेवक म्हणण्यापेक्षां, त्यांचे स्नेही म्हटल्यास अधिक योग्य होईल, इतका परस्परांचा एकमेकांवर विश्वास आहे. त्यांनींही प्रकृतीच्या कारणास्तव आपणांस सेवानिवृत्त करावें अशी श्रीमंत राजेसाहेबांना विनंति केली. ती मान्य करून त्यांना श्रीमंतांनीं ता. १ जुलई १९४४ पासून सेवानिवृत्त केलें. त्यांचाही एका संक्रांतीच्या दरबारांत गौरव करून व पोषाख देऊन श्रीमंतांनीं बहुमान केला. रा. आंबेकर यांना श्रीमंतांनीं पगारापेक्षां जास्त रु. २५ पेन्शन दिलें आहे व शिवाय, सुधागड तालुक्यांत भातजमिनीपैकीं एकर २५७–३२ गुंठे जमीन बक्षीस दिली आहे.

## लोकनियुक्त मंत्री

लोकनियुक्त मंत्री यांच्या कारभारासंबंधानें मागें हकीगत देण्यांत आलेलीच आहे.

## प्रकरण २२ वें

# संस्थानांचें संघराज्य

ब्रिटिश हिंदुस्थानांतील राजकीय घडामोडींचा हिंदी संस्थानांवरही परिणाम होणें, साहजिकच नव्हे तर, अपरिहार्य होतें. संस्थानांतील प्रजेंत झालेल्या जागृतीमुळें संस्थानांचा राज्यकारभार लोकशाही पद्धतीवर सुरू व्हावा अशी चळवळ प्रजेनें सुरू केली होती. संस्थानाधिपतींनीं जगाच्या स्थित्यंतराकडे लक्ष देऊन, नव्या लोकशाहीच्या युगांत हिंदुस्थानांतील लहानमोठ्या संस्थानांना स्वतंत्रपणें वेगळे घटक म्हणून आपलें अस्तित्व टिकविणें अशक्य होणार असें वाटूं लागल्यामुळें, ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांतांप्रमाणें निरनिराळ्या अनेक संस्थानांचा एक संघ तयार करून, त्यांचीं संघराज्यें तयार करावीं व तींही जबाबदार राज्यपद्धति स्थापून चालवावीं असें ठरविलें. नरेंद्रमंडळाचे चान्सेलर, हि. हा. नबाबसाहेब ऑफ भोपाळ, यांनींही सर्व संस्थानांच्या वतीनें स्वतंत्र हिंदुस्थानच्या प्रगतीच्या आड संस्थानें येणार नाहींत, अशी ग्वाही दिली.

हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यासंबंधीं, गेलें महायुद्ध समाप्त होऊन, वाटाघाटी सुरू झाल्यावर, दक्षिणेंतील संस्थानांचे रेसिडेन्ट ले. क. हार्वे यांनीं दक्षिणेंतील संस्थानाधिपतींना असा सल्ला दिला कीं, "संस्थानांना नवीन जमान्यांत आपलें अस्तित्व टिकवावयाचें असेल, तर त्यांनीं एकएकटें राहून राज्य करणें कठीण होईल. हिंदुस्थानांत प्रजासत्तानुवर्ती राज्यपद्धति सुरू होणार. त्या काळांत राजा म्हणून कोणी मानला जाणें अशक्य आहे; सबब, राजे लोकांनीं प्रजेला विश्वासांत घेऊन राज्यकारभारांत अधिकाधिक हक्क देणें योग्य होणार आहे. लोकशाही राज्यपद्धति फार खर्चाची आहे. थोड्या थोड्या उत्पन्नाच्या छोट्या संस्थानांना ती पद्धति अंमलांत आणणें जमणार नाहीं. संस्थानांचें अस्तित्व टिकावें व लोकमतानुवर्ती राज्यपद्धति तर सुरू व्हावी, यास उपाय म्हणून त्यांनीं संस्थानांचा संघ स्थापन करून त्या संघराज्याचा राज्यकारभार जबाबदार पद्धति अंमलांत आणून सुरू करावी."

हा सल्ला दक्षिणेंतील संस्थानांपैकीं बऱ्याच संस्थानांच्या अधिपतींना पसंत पडला; व त्याप्रमाणें रेसिडेन्ट हार्वे यांनीं संस्थानाधिपतींची कोल्हापूर येथें बैठक भरविली व त्या वेळीं या प्रश्नाची चर्चा केली. या बैठकीस श्री. राजेसाहेब हजर होते. हिंदुस्थानांत इतरत्रही अशाच मार्गाचा अवलंब होईल, असें चिन्ह दिसूं लागलें.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील संस्थानांचे संघ स्थापन करण्याच्या योजना तयार होऊं लागल्या होत्या. दक्षिणेंतील संस्थानिकांनीं आपल्या संघराज्याची योजना तयार करण्याचें काम श्री. शंकर दत्तात्रय देव, दे. भ. डॉ. पट्टाभिसितारामअय्या व दे. भ. दिवाकर यांच्या सल्ल्यानुसार सुरू केलें. संघराज्याची संपूर्ण योजना तयार होत होती. ब्रिटिश हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या हंगामी राज्याचे धुरीण पंडित नेहरु व कॉंग्रेसचे कर्णधार महात्मा गांधी व सरदार वल्लभभाई पटेल यांचा महाराष्ट्रीय संस्थानिकांनीं सल्ला घेतला. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब, श्री. तात्यासाहेब केळकर व रा. सा. साने यांच्यासह, त्या बैठकीस उपस्थित राहिले होते. महात्मा गांधींनीं 'संघराज्य स्थापन न करतां प्रत्यके सस्थाननें स्वतंत्र घटक म्हणून राहावें, पण राज्यकारभार प्रजेशीं पूर्णपणें समरस होऊन प्रजासत्तानुवर्ती करावा, व संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू करावी ' असा सल्ला दिला; तर, पडित नेहरू यांनीं 'संघराज्य स्थापन केल्यास हरकत नाहीं, पण अंतिम निर्णय लोकांवर सोपवावा व सर्व सत्ता लोकांच्या हातीं द्यावी' असें सांगितलें. संघराज्यांत सामिल होणाऱ्या संस्थानिकांनीं आपआपल्या संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति अंमलांत आणली पाहिजे, व यास कबुली देणाऱ्याच संस्थानांचा हिंद संघराज्यांत समावेश होईल असें ठरविण्यांत आलें असल्यामुळें, जबाबदारीची राज्यपद्धति स्थापन करण्यास महाराष्ट्रांतील संस्थानाधिपतींनीं मान्यता दिली. अर्थात्, भोर संस्थानच्या अधिपतींनीं मान्यता दिली, हें वेगळें नमूद करण्याची जरूर नाहीं. संघराज्य-योजनेच्या वाटाघाटी जोरानें चालू असतांना, घटना-समिति जी हिंदुस्थानची राज्यघटना तयार करणार, तींत भाषावार प्रांतरचना करण्याच्या तत्त्वास प्राधान्य देणार असल्याचें प्रसिद्ध झालें. भाषावार प्रांतरचना केल्यास, मराठी भाषिक

संस्थानें मराठी मुलुखांत व कानडी भाषिक संस्थानें कानडी मुलुखांत, याप्रमाणें संस्थानें सामील होण्याची शक्यता निर्माण झाल्यामुळें, संस्थानांचें संघराज्य होण्यास अडचण येण्याचा संभव दिसूं लागला.

भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व हिंदुस्थानच्या घटनासमितीनें मान्य केलें, तरी त्याप्रमाणें प्रत्यक्ष घटना घडण्यास बराच कालावधि लागणार, हें उघड होतें. त्यामुळें, दक्षिणेंतील संस्थानाधिपतींना, संघराज्य जर चांगलें चाललें तर भाषावार प्रांतरचना करण्याबद्दल संस्थानची प्रजा आग्रह धरणार नाहीं असें वाटल्यावरून, संघराज्याची योजना तयार करण्याचें काम नेटानें पुढें चालविलें. सुप्रसिद्ध घटनातज्ज्ञ श्री. कन्हय्यालाल मुनशी यांना त्या कामाकरितां नियुक्त करून, संघराज्याची योजना त्यांजकडून तयार करून घेतली.

दक्षिणी संयुक्त संस्थानची श्री. मुनशी यांनीं तयार केलेली योजना सारांशरूपानें खालीलप्रमाणें होती:—

या संस्थानला ‘ दक्षिणी संयुक्त संस्थान ’ म्हणून संबोधणें. तें लोकशाहीप्रधान राहाणें. या संस्थानांत सामिल होणाऱ्या सर्व संस्थानांच्या पूर्वीच्या भौगोलिक मर्यादा नाहींशा करून नव्या मर्यादा ठरविणें. हें संस्थान अस्तित्वांत आल्यावर, पुढें सामिल होणाऱ्या संस्थानांस सामिल होतां येणें; पण, कोणाही संस्थानला काढून टाकतां न येणें अगर बाहेर पडतां न येणें. सामिल होणाऱ्या संस्थानांच्या अधिपतींनीं या करारनाम्यावर ( Covenant ) सह्या केल्या तारखेपासून, त्या अधिपतीचे अधिकार व हक्कसंबंध राजमंडळाच्या प्रमुखास सुपूर्त होणें व त्यानें त्यांचा वापर करणें. विधिमंडळ हें लोकसभा व राजप्रमुख यांचें मिळून होणें; व राजमंडळ व विधिमंडळ यांचा श्रेष्ठाधिकार समजणें. राज्यकारभार राजप्रमुखाच्या नांवानें चालणें. सामिल होणाऱ्या संस्थानांचें राजमंडळ नेमणें. राजमंडळाचे मुख्यास “ राजप्रमुख ” म्हणून संबोधणें. राजमंडळानें राजप्रमुखाची व उपराजप्रमुखाची आपणां सदस्यांतून वयोमानानें निवड दरवर्षी करणें. राजप्रमुखाच्या गैरहजेरींत उपराजप्रमुखानें काम चालविणें. निवडलेला राजप्रमुख संयुक्त राज्याचा एक वर्षापुरता श्रेष्ठ व राजमंडळाचा अध्यक्ष म्हणून राहणें.

## राजप्रमुखाचे अधिकार

( अ ) मंत्रिमंडळ स्थापणें व बरखास्त करणें. ( ब ) हिंदी संघराज्यांत अगर त्याच्या एकाद्या विभागासाठीं पाठवावयाच्या सभासदाची निवड करणें. ( क ) राजमंडळाच्या विचारविनिमयासाठीं अथवा मतासाठीं लोकसभेचें एकादें बिल थोपवून धरणें. ( ड ) घटनेला बाधक, अथवा अधिकाराबाहेरचा असा लोकसभेचा एकादा ठराव हायकोर्टाच्या निर्णयासाठीं अगर पुनर्विचारविनिमयासाठीं स्थगित करणें. ( इ ) घटनेबाबत किंवा नागरिकहक्कांबाबत वादग्रस्त प्रश्न उपस्थित झाल्यास, त्याचा हिंदी संघराज्याच्या सर्वश्रेष्ठ न्यायालयांत निकाल करून घेणें. ( फ ) लोकसभेच्या बिलांना मंजूरी देणें, लोकसभेचें अधिवेशन बोलविणें व बरखास्त करणें ( ग ) हिंदी संघराज्य अगर त्याचा एखादा घटक यांशीं तह अगर करारमदार करणें. ( ज ) संयुक्त संस्थानच्या हायकोर्टानें अगर हिंदी संघराज्याच्या सुप्रीम कोर्टानें बेकायदेशीर ठरविलेला लोकसभेचा एकादा कायदा अगर कारभारमंडळाची एकादी कृति नामंजूर करणें. ( ह ) लोकसभेचे ठराव अथवा उपसूचना फेरविचारासाठीं तिजकडे परत पाठविणें. ( ल ) राज्ययंत्राला विघातक होऊं पाहणाऱ्या गोष्टींत अंमलबजावणी न करणें. ( म ) ज्युडिशिअरी कमिशननें शिफारस केलेल्या सर न्यायाधीशाची व न्यायाधीशांच्या नेमणुका करणें. ( न ) ज्युडिशिअरी व पब्लिक सर्व्हिसेस कमिशनच्या सभासदांच्या नेमणुका करणें. ( इ ) राजमंडळाच्या व राजप्रमुखाच्या व्यवहारास लागणाऱ्या खर्चाच्या मर्यादा आंखून त्यांची तरतूद करणें. ( प ) आपला सल्लागार, कार्यवाह व आपल्या कचेरीचे नोकर नेमणें.

राजप्रमुखाच्या या अधिकाराच्या अंमलबजावणीस लागणारा खर्च राजमंडळानें ठरविणें. या खर्चावर लोकसभेनें चर्चा न करणें.

या बाबींखेरीजचा सर्व कारभार राजप्रमुखानें मंत्रिमंडळाच्या संमतीनें चालविणें. शांततेला व राज्यकारभाराला धोका निर्माण करणाऱ्या परिस्थितींत घटनेच्या मर्यादेंत व प्रसंगीं मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें, राजप्रमुखानें जादा अधिकारांची अंमलबजावणी करणें.

संस्थानांच्या संघराज्याचा करार पूर्ण होतांच घटना-समिती स्थापन करणें. या घटना-समितीनें आपल्या प्रमुखाची ( अध्यक्षाची ) निवड करून, हिंदी संघराज्याच्या सर्वाधिकाराला सुसंगत व लोकशाहीच्या तत्त्वानुसार अशी, घटना करण्याच्या मर्यादा व पद्धति सदर घटना-समितीनें निश्चित करणें. तयार झालेल्या घटनेला राजमंडळाची संमति मिळाली म्हणजे तिला संयुक्त राज्याचा मूलभूत कायदा समजणें.

संयुक्त संस्थानचा करारनामा प्रसिद्ध झाल्याबरोबर, राजमंडळ स्थापण्यांत येऊन औंधचे राजेसाहेब हे पहिले राजप्रमुख नेमणें. समाविष्ट होणाऱ्या संस्थानांतील विधिमंडळें, संयुक्त राज्याच्या घटना-समितीवर पाठवावयाच्या आपआपल्या सभासदांच्या त्यांनीं निवडणुकी केल्यावर, बरखास्त करणें. घटना-समिति व मध्यंतर सरकार प्रस्थापित होईतों, समाविष्ट संस्थानांतील राज्यकारभार पूर्ववत् चालू राहाणें. करारनामा सह्या होऊन तो प्रसिद्ध झाल्यापासून, तीन आठवडयांत सामिल संस्थानांच्या सभासदांची विधिमंडळाकडून निवड करावी. करारनाम्याच्या प्रसिद्धीपासून २५ दिवसांच्या आंत निवडलेल्या सभासदांचीं नांवें राजप्रमुखाकडे कळविणें. त्यानंतर १५ दिवसांच्या आंत घटना-समितीचा अध्यक्ष, व उपप्रमुख यांची निवड करण्यासाठीं घटना-समितीचीं बैठक भरविणें. पक्षप्रमुखाच्या मदतीनें राजप्रमुखानें मध्यंतर सरकार बनविणें. मध्यंतर सरकारच्या मंत्र्यांची संख्या गरजेनुसार राजप्रमुखानें ठरविणें. घटना-समितीच्यां सदस्यांतून निवडलेल्या मंत्र्यांचें मंत्रिमंडळ अस्तित्वांत आणणें. याखेरीज अनुभवी व तज्ज्ञ अशा कांहीं गृहस्थांचा कार्यकारी मंडळांत राजप्रमुखानें समावेश करणें.

घटनासमितीकडून घटना तयार झाल्यावर, तिच्या आनुषंगानें झालेल्या निवडणुकीनंतर, नवें सरकार अस्तित्वांत येईपर्यंत, मध्यंतर सरकारनें राजप्रमुखाच्या देखरेखीखालीं राज्यकारभार चालविणें.

संयुक्त राज्याच्या कायदेमंडळानें व तत्पूर्वी मध्यंतर सरकारनें फेरफारानें अथवा अगदीं नवीन असे कांहीं कायदेकानू अस्तित्वांत आणीपर्यंत, संस्थानांत जे जे कायदेकानू अंमलांत आहेत, तेच चालू राहणें.

सामिल संस्थानांच्या प्रत्येक अधिपतीला आपल्यासाठीं कमाल ३६ इतके हत्यारी संरक्षक संयुक्त राज्याकडून मागून घेतां येणें. त्यांचा खर्च संयुक्त राज्यानें सोसणें व तो विधिमंडळाच्या चर्चेत न येणें.

सरन्यायाधीश व न्यायाधीश यांचें संयुक्त राज्यांत एक हायकोर्ट स्थापन करणें. हिंदी संघराज्याचा एक घटक, म्हणून या दक्षिणी संयुक्त संस्थाननें समाविष्ट होणें.

घटनात्मक अधिकाराप्रमाणें व या करारनाम्याला बाधक होणार नाहीं, अशा रीतीनें लोकसभेला कांहीं अवश्य बाबतींत आपली सत्ता हिंदी संघ-राज्याकडे अगर त्याच्या एखाद्या विभागाकडे सोपवितां येणें.

समाविष्ट होणाऱ्या संस्थानांच्या अधिपतींनीं व त्यांच्या दरबारांनीं पूर्वी जे करार केले असतील किंवा अभिवचनें दिलेलीं असतील, तीं सर्व संयुक्त राज्यानें पाळणें. तसेंच, संस्थानासंस्थानांतून पूर्वापार चालत आलेले धार्मिक विधि व समारंभ संयुक्त राज्यानें आपल्या खर्चानें पुढें चालविणें.

समाविष्ट होणाऱ्या संस्थानांतील प्रत्येक एक लाख लोकसंख्येस १ या-प्रमाणें, प्रत्येक संस्थाननें घटनासमितीवर प्रतिनिधी पाठविणें. मात्र, प्रत्येक सामिल संस्थानास किमान १ प्रतिनिधि पाठवितां येणें.

या पद्धतीनें औंध १, भोर ४, कुरुंदवाड ( धा. पा. ) १, मिरज ( धा. पा. ) १, फलटण १, रामदुर्ग १, सांगली ६, असे एकूण २० प्रतिनिधि समाविष्ट संस्थानांचे राहतील. याखेरीज सर्व सामिल संस्थानांचे मिळून हरिजनांसाठीं १, मुसलमानांसाठीं १, व स्त्रियांसाठीं १, असे ३ स्वतंत्र प्रतिनिधि मिळून घटनासमितीवर २३ नियुक्त सभासद असणें.

समाविष्ट संस्थानांतील विधिमंडळाच्या सभासदांतून प्रत्येक संस्थाननें आपआपले प्रतिनिधि निवडणें. संस्थानांतील विधिमंडळ बरखास्त झालेलें असेल अथवा मुळांतच प्रस्थापित झालेलें नसेल, तेथें त्या संस्थानच्या प्रजापरिषदेनें प्रतिनिधि निवडणें. कायदेमंडळ नाहीं व प्रजापरिषदही नाहीं, अशा संस्थानां-तील प्रतिनिधि रीजनल कौन्सिलनें निवडणें. समाविष्ट संस्थानांच्या सर्व विधि-

मंडळांत जे हरिजन सभासद असतील, त्यांनीं हरिजन सभासद निवडणें. याच पद्धतीनें मुसलमान व स्त्रिया यांच्या स्वतंत्र प्रतिनिधींची निवड करणें; शिवाय, अनुभवी व मार्गदर्शक होतील अशा ४ बाहेरच्या जादा सभासदांना घटना-समितींत आवश्यक तर समाविष्ट करून घेतां येणें. यांखेरीज योग्य व आवश्यक वाटतील, अशा ४ आणखी सभासदांना राजप्रमुखानें घटनासमितीवर नेमणें.

सामील संस्थानांच्या अधिपतींच्या खाजगी खर्चाकरितां, सन १९४६-४७ सालअखेर मागील तीन वर्षांच्या उत्पन्नाच्या सरासरीनें, रकम ठरविणें. त्याचें प्रमाण : पहिल्या पांच लाखांस १५ पंधरा टक्के, दुसऱ्या पांच लाखांस १० टक्के आणि १० लाखांच्या पुढील उत्पन्नास ७।। साडेसात टक्के असें ठेवणें. ( याप्रमाणें श्रीमंत राजेसाहेब, यांना प्रिव्ही पर्स म्हणून १ लक्ष २० हजार रुपये ठरविण्यांत आले होते. )

ही योजना संस्थानांतील लोकपुढाऱ्यांस दाखवून त्यांनीं सुचविलेल्या दुरुस्त्याही मान्य केल्या. याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर दक्षिणेंतील संस्थानां-पैकीं औंध, भोर, फलटण, सांगली, मिरज ( ज्यू. ), कुरुंदवाड ( सी. ) आणि रामदुर्ग या संस्थानांच्या अधिपतींनीं भोर येथें ता. १७ माहे आक्टोबर १९४७ रोजीं एकत्र जमून संघराज्याच्या करारावर ( Covenant ) मोठा समारंभ करून सह्या करून त्यास कायद्याचें स्वरूप दिलें. त्या वेळीं, श्रीयुत श्रीकृष्ण शंकर दिघे, वकील, व संपादक, 'समशेर,' यांनीं खालीलप्रमाणें भाषण केलें :—

" श्रीमंत राजप्रमुख, राजमंडळाचे सभासद, राजे महाराज,

" आजच्या या ऐतिहासिक महत्त्वपूर्ण प्रसंगीं मी या जमलेल्या मंडळीतर्फे आपणां सर्वांचें मनःपूर्वक स्वागत करतों. आजचा दिवस खरोखरीच दक्षिणी संस्थानी प्रजाजनांच्या मोठया भाग्याचा दिवस आहे. आज प्रस्थापित होऊं घातलेलें हें संयुक्त दक्षिणी संस्थान श्री छत्रपति शिवाजीमहाराजांच्या महा-राष्ट्राच्या पुनःस्थापनेची पहिली पायरी आहे; आणि त्या कार्याचा पाया आज आपण घालीत आहांत. अर्वाचीन महाराष्ट्राच्या प्रथमच्या सर्व घडामोडी याच भोर संस्थानच्या मावळखोऱ्यांत घडलेल्या आहेत; व याच संस्थानांत हें संघ-राज्य जन्मास येतें, हें औचित्यपूर्णच होत आहे. ( श्रीमंत औंधकर—हिअर,

हिअर ) यामुळें संस्थानच्या बहुसंख्य जनतेस अत्यानंद होत आहे. संयुक्त दक्षिणी संस्थान-निर्मितीस भोरच्या प्रजाजनांचा पाठिंबा नाहीं, असें कांहीं उपद्व्यापी मंडळीकडून भासविलें जातें; पण, तो खोटा व खोडसाळ प्रचार आहे. संघराज्य-संस्थापनेची माहिती या जमलेल्या मंडळीस अवघ्या २०-२२ तासांपूर्वी मिळाली, व इतक्याच वेळांत १२-१५ मैलांच्या ठिकठिकाणांहून हीं जमलेलीं सुमारें १२-१५ शें माणसें स्वयंस्फूर्तीनें या ठिकाणीं आगामी संयुक्त संस्थानचें व आपणां सर्वांचें स्वागत करण्यासाठीं आलेलीं आहेत. यावरून भोरची बहुसंख्य जनता संघराज्य झालेंच पाहिजे असेंच म्हणणारी आहे, असें स्पष्टच होतें. आजच्या प्रसंगीं भोरचे प्रजाजन संघराज्य ज्या महाराष्ट्र संस्थापनेच्या ध्येयानें जन्मास येत आहे, तें ध्येय गांठण्यासाठीं व पूर्णपणें यशस्वी करण्यासाठीं सदैव झटतील असें मी खात्रीपूर्वक सांगूं शकतों. शेवटीं, संयुक्त दक्षिणी संस्थानांस संपूर्ण यश व भरभराट चिंतून, आपणां सर्वांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों.''

याचप्रमाणें श्रीयुत गोपिनाथपंत पोतनीस वगैरे पुढाऱ्यांनीं या संघराज्यास दुजोरा दिला.

संघराज्याचे राजप्रमुख म्हणून श्री. राजेसाहेब, सं. औंध, व उपराजप्रमुख म्हणून हि. हा. राजेसाहेब, भोर, यांनीं करारावर सह्या केल्या; नंतर, इतरही जमलेल्या अधिपतींनीं त्या करारावर सह्या केल्या.

हा समारंभ करण्याकरितां भोर ही जागा मुक्रर करण्यांत फारच औचित्य होतें. दक्षिणेंतील सर्व संस्थानांत भोर संस्थानला विशेष ऐतिहासिक महत्त्व आहे. शिवछत्रपतींनीं हिंदवी स्वराज्य स्थापनेची मुहूर्तमेढ भोर संस्थानमधील तोरणा किल्ल्यावर रोविली. भोर संस्थानमधील राजगड किल्ल्यावर त्यांचें राजधानीचें ठिकाण कित्येक दिवस होतें. हिंदवी स्वराज्यस्थापनेपूर्वीच्या शिवछत्रपतींच्या सर्व हालचाली विशेषत्वानें भोर संस्थानच्या भूमीवरच झाल्या. शिवछत्रपतींचे दुसरे चिरंजीव श्री. राजाराम छत्रपति यांच्या कारकीर्दींत उदयास आलेल्या श्रीशंकराजी नारायणांनीं आपल्या पराक्रमानें व स्वामिनिष्ठेनें मराठी राज्याचें रक्षण करून राजारामांकडून संस्थान संपादन केलें. आतां, कालमानास अनुस-

चित्रांक ७८



हिंदी प्रांतांत दक्षिणी संस्थानांच्या विलिनीकरणाच्या कराराच्या वेळीं मुंबई प्रांताचे पंतप्रधान ना. बाळासाहेब खेर भाषण करीत आहेत. ता. १९।२।४८ इ.

[सं. पा. २७७

रून संघराज्य स्थापन करावें लागलें. हाही एक क्रांतीचा ऐतिहासिक व संस्मरणीय प्रसंग आहे. अशा प्रसंगीं ऐतिहासिक महत्त्वाच्या घडामोडींचें मंगल स्थान बनलेला भोर संस्थानचा भूभाग संघराज्याची मुहूर्तमेढ रोवण्यास निवडण्यांत मराठी साम्राज्याचे अवशेष म्हणून आजपावेतों अस्तित्व पावलेल्या दक्षिणेंतील संस्थानांच्या अधिपतींनीं हिंदवी स्वराज्याबद्दलचा अभिमान प्रकटपणें व्यक्त केला, यांत आश्चर्य तें कसलें ? योग्य जागेला योग्य मान दिला गेला. या समारंभाचें छायाचित्र घेतलें, तें दिलेलें आहे. करारनाम्यावर सह्या झाल्यावर सर्व संस्थानाधिपति पुणें येथें परत आले. पुणें येथें आल्यावर मिरज ( सी. ) संस्थानच्या अधिपतींनीं संघराज्याच्या करारावर सही केली; व अशा रीतीनें आठ संस्थानें संघराज्यांत सामिल झालीं. रात्रीं ९-३० वाजतां संस्थानाधिपति व रीजनल कौन्सिलचे कांहीं सभासद यांना हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, सं. भोर, यांनीं कोहिनूर हॉटेलमध्यें डिनरपार्टी दिली. पार्टीनंतर हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांनीं खालीलप्रमाणें भाषण केलें :

संघो हि बलवान् राजन् संहतिः कार्यसाधिका—भारत.

( Union is strength. United we stand. )

" मान्यवर राजमंडळबंधूंनो, व रीजनल कौन्सिलचे सन्मान्य सभासदहो,

" आमच्या संस्थानच्या राजधानींत एका पवित्र व उच्च अशा ध्येयाच्या परिपूर्तीसाठीं आपण आज दुपारीं भोर येथें जमलांत व आमच्या निमंत्रणास मान देऊन पुन्हां या ठिकाणीं आलांत, याबद्दल आम्ही आपले सानंद आभारी आहोंत. संयुक्त दक्षिणी संस्थान स्थापन करण्याविषयीं जो करारनामा लोकांच्या सदिच्छेनें व सहकार्यानें व विशेषतः कालमान परिस्थिति ध्यानांत घेऊन स्वयंस्फूर्तीनें तयार केला आहे, त्यावर मान्यतेचें शिक्कामोर्तब करून आजपासून तें संस्थान अस्तित्वांत आल्याचें आपण जाहीर केलें आहे. प्रजेचें हित हेंच आपणां सर्वांचें उद्दिष्ट व सुखसर्वस्व असल्यानें व तें साध्य करण्याच्या मार्गांतील आजची ही महत्त्वाची गोष्ट असल्यानें, आपणां सर्वांस आज मोठा आनंद वाटणें स्वाभाविक आहे. तथापि, हा आनंद पूर्णपणें निर्दोष नाहीं. तो थोडा दुःखमिश्र आहे असें आम्हांला तरी वाटत आहे. हें आम्ही

स्पष्टपणें व प्रांजलपणें सांगूं इच्छितों. या आनंदांत किंचित् दुःखाची छटा आहे असें वाटण्याचें कारण हें कीं, आजपर्यंत आपला व आपल्या प्रजेचा प्रत्यक्ष संबंध येत असे व त्यामुळें त्यांच्या सुखदुःखांत जातीनें समरस होण्याची जी अनेक वेळां संधि मिळत असे, तसले समय यापुढें फारसे येणार नाहींत, हें आपण मान्य कराल व तितक्यापुरताच व त्या अर्थानेंच आजचा हा आनंद दुःखमिश्रित आहे असें आम्ही म्हणतों. त्याचबरोबर आम्ही हेंही मान्य करतों कीं, परंपरागत आलेल्या आपुलकीच्या भावनेनें आम्हांस असें वाटत असलें, तरी संयुक्त दक्षिणी संस्थानच्या नव्या योजनेनें प्रजेचें हित साधण्यांत जो विशेष व मोठ्या प्रमाणांत आपणांस आनंदाचा लाभ यापुढें मिळणार आहे, त्यानें तुलनात्मक दृष्ट्या वरील दुःखाची पुष्कळच भरपाई होत आहे. प्राचीन काळचीं राजकर्तव्यें अनेकविध व गुंतागुंतीचीं नसत; इतकेंच नव्हे, तर पृथ्वी-वरील बहुतेक देशांत एकुणिसाव्े शतकापर्यंत जवळजवळ अशीच स्थिति होती. पण, त्यानंतर मात्र सर्वत्र परिस्थिति पालटत गेली, व अगदीं अलीकडे, तर त्यांत मोठीच क्रांति झाली आहे. अर्थात्, प्रजेची उन्नति व सुखस्वास्थ्य हें साध्य कायम असलें, तरी त्यांचें बाह्यांग बदललें असल्याप्रमाणें, इतरत्र राज्ययंत्राच्या साधनांत तसा फेरफारही केला जात होता. आपणास स्वस्थ बसून राहाणें शक्यच नव्हतें. नव्या मनूस अनुसरून असे साधनाचे दोन मार्ग दिसून आले. त्यांपैकीं पहिला मार्ग असा कीं, नवीं राजकर्तव्यें पार पाडणें व प्रजेच्या वाढत्या व बदलत्या आशाआकांक्षा आर्थिक दृष्ट्या तृप्त करणें. या गोष्टी पृथक्रीत्या कोणत्याही–विशेषतः, लहान–संस्थानांना अशक्य असल्याचें दिसून आल्यामुळें, अशा संस्थानांनीं संघटित होऊन आपआपली साधनसामुग्री एकत्रित करणें व त्यायोगें उदयास आलेलीं नवीं व विविध स्वरूपाचीं कर्तव्यें बजावण्याची शक्य तेवढी जास्तींत जास्त तजवीज करणें; व दुसरा मार्ग हा कीं, या कामीं राजसभेंत प्रजेला, चालू परिस्थितींत, शक्य तेवढें कमाल मर्यादेपर्यंत अंशभागी करणें. हे दोन्ही मार्ग आपण यांत स्वीकारले आहेत. विशेष परिस्थिति उत्पन्न झाल्यास, संघटित होणें हाच बलसंपन्न होण्याचा व शाश्वत टिकण्याचा उपाय आहे असें महाभारतकारांचें वचन सुरुवातीसच आम्हीं सांगितलें आहे. आपल्या देशांत पूर्वी संघ ऊर्फ

गणराज्येंही होतीं व त्यांच्या स्थितीविषयीं, सुप्रसिद्ध आर्य चाणक्य यांचेही शिफारसवजा " अधृष्याः हि संघाः संहतत्वात् " म्हणजे संघराज्य हें ऐक्य-मूलक असल्यानेंच तें सामर्थ्यवान् व अविचल असतें, असें एक वचन असल्याचें आपणां सर्वांस परिचित असेलच. अर्थात्, संयुक्त दक्षिणी संस्थानची स्थापना करण्यांत आपण आपल्या समयज्ञ पूर्वजांनीं हितकर म्हणून ठरविलेल्या व अनुभविलेल्या मार्गानेंच जात आहोंत, असें आम्हांस वाटत आहे.

" सन्मान्य राजबंधूंनो, या समयीं आम्हास ग्रीसच्या इतिहासांतील डेलॉस कॉन्फिडरसी व आपल्या महाराष्ट्राच्या इतिहासांतील मराठा कॉन्फिडरसी या दोन संयुक्त राज्यपद्धतींची आठवण होत आहे. तथापि, आपण जी संयुक्त दक्षिणी संस्थानची योजना आंखली आहे, ती कॉन्फि-डरसी नसून संघराज्य स्वरूपाची आहे. पाश्चिमात्य देशांत फ्रान्स, युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिका, स्वित्झरलंड, वगैरेंच्या राज्यकारभाराच्या पद्धति, थोडया फार फरकानें, पण फेडरेशन ऊर्फ संघ या धर्तीच्या आहेत. आपल्याकडे मात्र ही योजना अगदीं नवी आहे; व ती नवी आहे, म्हणूनच कोणत्याही नव्या गोष्टीच्या सुफलदायीपणाविषयीं मनुष्याचें मन प्रथम तरी जसें कांहींसें साशंक असतें, त्याप्रमाणें या योजनेसंबंधि प्रजा-जनांपैकींच कित्येक लोकांचें मन तिच्या इष्टप्रदतेविषयीं शंकित झालें आहे असें दिसतें. सुरुवातीस असें वाटणें स्वाभाविक आहे अशी कल्पना केली, तरी निर्विकार मनानें, तसेंच व्यापक आणि दूरदृष्टि चालवून, शांत चित्तानें व मुख्यतः कालाचा व इतिहासाचा प्रचलित ओघ संघराज्याकडेच आहे हें लक्षांत घेऊन, या प्रश्नाकडे व योजनेकडे ते लोक पाहातील, तर आमची अशी खात्री आहे कीं, ह्या योजनेबाबतच्या त्यांच्या सर्व शंका आपोआप दूर होतील व ही योजना अंतीं प्रजाजनांच्याच हिताची आहे, हे त्यांना सहजीं पटेल. कारण, संघयोजनेंतच प्रजाजनांचें हित आहे, हें जाणूनच इंडियन डोमिनियन ऊर्फ हिंदुस्थान सरकारच्या संस्थानी खात्यां-तील अत्युच्च दर्जाच्या अधिकाऱ्यांनीं व तसेंच स्टेट पीपल्स कॉन्फरन्सच्या

वरिष्ठ पदाधिकाऱ्यांनींही व या विषयासंबंधीं आस्था बाळगणाऱ्या इतरही श्रेष्ठ व्यक्तींनीं या योजनेस आपली पसंति दर्शविली आहे.

" आपण संघयोजनेस औपचारिक मान्यता देण्यास आमची राजधानी पसंत केलीत, याबद्दल आम्हास त्यांतल्या त्यांत जास्त आनंद व एक प्रकारें अभिमानही वाटत आहे. आपणास विदित आहेच कीं, भोर संस्थानचा व त्याच्या सभोंवारचा प्रांत हा श्रीशिवछत्रपतींनीं हिंदवी स्वराज्य स्थापन करण्याच्या कामीं केलेल्या यशस्वी कार्यांतील त्यांच्या प्रारंभींच्या पराक्रमाचें क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांनीं स्वराज्य स्थापन करण्याविषयीं ज्या श्रीरायरेश्वरासमोर शपथ घेतली, तो मुऱ्हा रायरेश्वराचा डोंगर, तसेंच श्रीशिवछत्रपतींनीं आपल्या प्रथमच्या राजधानीचा मान ज्या किल्ल्यास दिला, तो राजगड किल्ला, इत्यादि किल्ले व प्रांत आमच्या संस्थानांत आहेत. तात्पर्य, श्रीशिवछत्रपतींच्या चरणरजांनीं पुनीत झालेला व त्यांच्या पराक्रमांचें पुण्यस्मारक अशा या प्रांताशीं भोरच्या गादीचे संस्थापक व आमच्या घराण्याचे मूळ पुरुष श्रीशंकराजी नारायण यांचा अतिनिकट संबंध आला असल्यानें, आम्हांस या प्रांताविषयीं विशेष आपलेपणा व अभिमान वाटत आहे असें आम्हीं म्हटल्यास, आपण तें स्वाभाविकच आहे असें म्हणाल, असें आमचें मन आम्हांस ग्वाही देत आहे. श्रीशिवाजीमहाराज निवर्तल्यानंतरच्या १०-१५ वर्षांच्या अंदाधुंदीच्या काळांत हा सर्व प्रांत व त्यांतील किल्ले पुन्हा मोगलांच्या ताब्यांत गेले होते. ते त्यांच्याकडून पुन्हा हिसकून घेण्याच्या कामीं छत्रपति श्रीराजाराममहाराजांच्या काळीं आमचे पूर्वज श्रीशंकराजी यांनीं प्रकट केलेलें धैर्य, साहस, शौर्य, युद्धकुशलता, इत्यादि वीरोचित सद्गुण इतिहासज्ञांस परिचित आहेतच. पंचवीस वर्षांच्या स्वातंत्र्ययुद्धांतील तो काळ त्यांच्या राज्यनिष्ठेच्या, धर्माभिमानाच्या, स्वातंत्र्यप्रियतेच्या व सत्यव्रताच्या कसोटीचाच होता; व त्यांत ते यशस्वीरीत्या उत्तीर्ण झाले, म्हणूनच आज आम्हांस आपल्यापुढें उभें राहण्याचा आनंद मिळाला आहे, हें आम्ही कृतज्ञतापूर्वक कबूल करतों.

" प्रिय राजबंधूंनो, भोर हें ठिकाण सह्या करण्यास निवडलें, त्यास अनुसरून आम्ही आपल्या आद्य पूर्वजांचें पुण्यस्मरण केलें असलें, तरी येथें

चित्रांक ७९



विलिनीकरणाच्या ठरावाच्या वेळी (१९।२।४८) हजर असलेल्या राजे लोकांचा (Group) फोटो. ता. १९।२।४८ । स. पा. २७७

आलेल्या आपणां सर्वांच्या ज्या पुण्यश्लोक पूर्वजांनीं श्रीशिवछत्रपतींच्या काळीं, किंवा छत्र. श्रीराजारामांच्या वेळीं किंवा तदनंतरच्या मराठा साम्राज्याच्या उभारणीच्या व विस्ताराच्या काळीं, प्रसंगीं आपल्या जीवाची तमा न बाळगतां, अतुलनीय पराक्रमाचीं व मुत्सद्देगिरीचीं कामें केलीं व आपलीं नांवें इतिहासांत अजरामर केलीं, त्या सर्वांचें पुण्यस्मरण करून मोठया विनम्र भावानें आम्ही त्या पुण्यकीर्ति महात्म्यांना अनेकशः प्रणाम करीत आहोंत.

" स्नेहांकित व सहकारी राजबंधूंनो, आणखी फक्त एकाच गोष्टीचा उल्लेख करून आम्ही आपलें भाषण पुरें करणार आहोंत. आजचा दिवस आणखी एका दृष्टीनेंही आपणां सर्वांस आनंदाचा आहे. सुमारें सव्वाशें वर्षांपूर्वी आपणां सर्वांचे पूर्वज स्वातंत्र्यसुखाचा अनुभव घेत होते. इतकेंच नव्हे, तर त्या कालास उचित असलेल्या प्रकारें आपआपल्या ताब्यांतील प्रदेशाची काळजी वाहून त्यांतील प्रजेच्या सुखसोयींकडे व उत्कर्षाकडे स्वेच्छेनें लक्ष देणें त्यांना शक्य होतें, व तें काम अनिर्बन्ध रीतीनें ते करीत असत. दुर्दैवानें त्यानंतर तो काळ पालटला. पण, ईश्वरकृपेनें ते पारतंत्र्याचे दिवस संपून, ब्रिटिशांची सार्वभौम सत्ता या देशांतून लुप्त झाली असल्यानें, आपणांस आतां स्वातंत्र्य प्राप्त झालें आहे; व म्हणूनच, आपणांस ही दक्षिणी संस्थानची योजना घडवून आणतां आली. याबद्दल त्या जगन्नियंत्या प्रभूचे कोणत्याही प्रकारें उतराई होणें शक्य नसल्यानें, आपण सर्व त्यास वंदन करूं या.

" शेवटीं, ज्या सद्भावनेनें आपण ही संयुक्त दक्षिणी संस्थानची योजना केली आहे, तशाच सद्भावनेनें प्रजेचें सहकार्य आपणांस लाभावें, व ' प्रजेचें हित ' हें जें आपलें ध्येय आहे, तें चढत्या वाढत्या प्रकारें सुफलित होवो, अशी श्रीरामचंद्रचरणीं प्रार्थना करून आणि आजच्या मुख्य कामाकरितां आमची राजधानी पसंत केलीत व शिवाय येथें येऊन आमच्या अल्प आदरातिथ्याचा प्रेमानें स्वीकार केलात, याबद्दल पुन्हा एक वार आनंद प्रदर्शित करून आम्ही आपले हार्दिक आभार मानतों; व सर्वांचें अभीष्ट चिंतून आपलें भाषण पुरें करतों."

यानंतर, हि. हा. श्रीयुत राजेसाहेब, सांगली, यांनीं भोर येथील समारंभाची व्यवस्था चांगली ठेवल्याबद्दल व ही मेजवानी दिल्याबद्दल भोरच्या राजेसाहेबांचे आभार मानले. नंतर श्री. शिखरे, श्री. गानू व श्री. गो. वा. पोतनीस यांनीं संघराज्याच्या उपयुक्ततेबद्दल भाषणें करून, आपले अभिप्राय व्यक्त केले.

याप्रमाणें ता. १७ आक्टोबर १९४७ रोजीं समारंभ झाला. संघराज्याच्या करारावर सह्या झाल्या. या दिवसापासून संघराज्य अस्तित्वांत आलें. संघराज्याच्या कराराप्रमाणें संघराज्याच्या घटनासमितीकरतां आठही संस्थानांच्या प्रतिनिधींच्या निवडणुकी मुदतीप्रमाणें झाल्या. ता. २० डिसेंबर १९४७ ही घटनासमितीच्या उद्घाटनाची व हंगामी मंत्रिमंडळ स्थापन करण्याची तारीख मुक्रर झाली.

ठरल्याप्रमाणें संघराज्याचा उद्घाटन-समारंभ ता. २०-१२-१९४७ रोजीं मिरज येथें अखिल संस्थानी प्रजापरिषदेचे प्रतिनिधि श्री. कमलनयन बजाज यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. त्या वेळचीं श्री. राजेसाहेब, औंध, व श्री. कमलनयन बजाज यांचीं भाषणें खालीं दिल्याप्रमाणें झालीं.

## श्रीमंत राजेसाहेब औंध राजप्रमुखांचें भाषण

राजप्रमुख श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि हे आपल्या भाषणांत घटनासमितीच्या सर्व सभासदांचें स्वागत करून म्हणाले कीं,

" गेल्या तारीख १५ ऑगस्ट रोजीं भारतभूच्या दास्य-शृंखला तुटून तिला स्वातंत्र्याची प्राप्ति झाली. ह्या ध्येयप्राप्तीसाठीं देशांतील थोर पुढाऱ्यांना जो झगडा करावा लागला, त्याचें या प्रसंगीं स्मरण झाल्यावांचून राहात नाहीं. या प्रदीर्घ झगडयांत दक्षिणी संस्थानी रियासतींची भूमिका, त्यांच्या अधिकारमर्यादा व त्यांजवरील बंधनें लक्षांत घेतां, सदैव सहानुभूतीची होती. पहिल्या गोलमेज परिषदेंत हिंदी संघराज्याच्या कल्पनेला विवाद्य क्षेत्रांतून उचलून एकदम स्थिर पायावर प्रस्थापित करण्यास त्या वेळीं जे संस्थानिकांचे प्रतिनिधि परिषदेस उपस्थित होते, त्यांच्या नेत्यांच्या निःसंदिग्ध पुरस्कारानेंच बहुमूल्य मदत झाली. हा इतिहास अद्याप फारसा जुना झालेला नाहीं.

" त्यानंतरच्या काळांतही काळाचा ओघ ध्यानीं घेऊन आम्हीं संस्थानिकांनीं स्वयंस्फूर्तीनें आपल्या प्रजेला राज्यकारभारांत भागीदारी देण्याचे आपआपल्यापरी उपक्रम केले आहेत. गेल्या महायुद्धानंतर देशाला स्वातंत्र्य देण्याच्या दृष्टीनें ज्या निरनिराळ्या वाटाघाटी झाल्या, त्या सर्वांच्या वेळीं स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गांत आपली अडचण कोणत्याहि प्रकारें येऊं द्यावयाची नाहीं, अशीच भूमिका जवळजवळ सर्व संस्थानिकांनीं प्रारंभापासूनच घेतली होती, हें सर्वश्रुतच आहे. अखिल हिंदुस्थानच्या हितांतच आम्हां संस्थानिकांचें हित सामावलेलें आहे. त्याच्या सुखदुःखाशीं आमचें सुखदुःख निगडित आहे व त्याच्या उत्कर्षांतच आमचे उत्कर्ष असल्यामुळें, आमचें धोरण अगर कृति हिंदी संघराज्याच्या अभ्युदयास व उत्कर्षास सर्वस्वीं पोषक व पूरक होईल, अशीच असली पाहिजे अशीच आमची सदैव वृत्ति व कृति राहील, असें आजच्या प्रसंगानें मी राजमंडळाच्या वतीनें नम्र आश्वासन देतों. या दृढ भावनेनें उद्युक्त होऊनच आम्हीं संयुक्त दक्षिणी संस्थानच्या प्रस्थापनेचा उपक्रम केला आहे. या उपक्रमामुळें इतर प्रांतांतील आमच्यासारख्या छोट्या संस्थानांना योग्य तें मार्गदर्शन होईल, असा आम्हांस भरंवसा आहे.

"संयुक्त दक्षिणी राज्याच्या प्रस्थापनेचा आम्हीं राजमंडळाच्या सदस्यांनीं, मनसुबा करून त्याकरितां गेल्या तारीख १७ ऑक्टोबर रोजीं एक आपसांतील करारनामा केला. ही घटना आकस्मिक बाह्य दडपणामुळें अपरिहार्य झालेली अगर क्षणिक भावनावशतेच्या आहारीं जाऊन घाईनें घडवून आणलेली नाहीं.

" संस्थानी रियासतीचें भवितव्य संपूर्ण लोकशाही राज्यव्यवस्थेंत आहे व अशा लोकशाहींतील सत्तेचें अंतिम स्थान जनतेंतच असून संस्थानिक हे प्रजेचे केवळ विश्वस्त व सेवक आहेत. याची मनोमय प्रचीति आम्हां राजमंडळांतील सदस्यांना काळानें केव्हांच आणून दिलेली आहे. तिचा प्रगट उच्चार करण्याची अपेक्षित वेळ येतांच, तिला आपापसांतील करारनाम्याच्या रूपानें आम्हीं फक्त ठरीव स्वरूप देऊन, त्या दृष्टीनें नव्या राज्यव्यवस्थेच्या घडीचा उपक्रम केला, इतकेंच !

" या उपक्रमाबद्दल आमच्या आपसांतील चर्चेस सुरुवात होतांच, त्याला अधिष्ठान म्हणून जीं दहा मूलभूत तत्त्वें देशांतील वंदनीय काँग्रेस पुढाऱ्यांनीं आम्हांस सुचविलीं व ज्यांना पुढें अखिल भारतीय प्रजापरिषदेच्या स्थायी समितीनें दुजोरा दिला, तीच अधिष्ठान मानून व सुप्रसिद्ध घटना-तज्ज्ञांचा सल्ला घेऊन आम्हीं आमच्या करारपत्राचा मसुदा तयार केला !

" आमच्या सर्व संस्थानांत लोकमताचे अधिकृत प्रतिनिधि या नांवानें उपलब्ध असल्यामुळें या मसुद्यास आम्हीं त्यांची मान्यता मिळविली. त्यांच्या समितीनें व प्रजापरिषदेच्या स्थायी समितीनें केलेल्या सूचनांचा व दुरुस्त्यांचा घटनातज्ज्ञांच्या सल्ल्यानुसार त्यांत दुरुस्त्या केल्या.

" हा करारनामा आमच्या संस्थानांतील प्रातिनिधिक सभांपुढें औपचारिक-रीत्या ठेवण्यांत आला नाहीं, अगर त्यावर औपचारिकरीत्या सार्वमत घेण्यांत आलें नाहीं, असा एक आक्षेप कोठें कोठें घेण्यांत येत असतो. परंतु, त्याच प्रातिनिधिक सभांनीं संयुक्त संस्थानांची घटना करण्यासाठीं आपणांस यथाविधि नियुक्त करून पाठविल्यानंतर, या औपचारिक दोषांचें औचित्य कोणत्या प्रकारें राहतें, हें आम्हांस तरी समजत नाहीं. यासंबंधींची भूमिका तारीख २९ सप्टेंबर रोजीं आम्हीं काढलेल्या जाहीर निवेदनांत स्पष्ट करण्यांत आली असल्यानें, तिच्याबद्दल अधिक विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं. पण, आम्हांस या आक्षेपाला इतकेंच सुचवावयाचें आहे कीं, आम्हीं केलेल्या करारनाम्यांतील योजनेच्या औपचारिक बाह्य वर्णावर भर न देतां आपण तिच्यांतील गुणदोषांकडे पाहून, या करारनाम्यानें आम्हीं स्वयंप्रेरणेनें व संपूर्ण सदिच्छेनें खरेंखुरें सत्तासंक्रमण केलें आहे कीं नाहीं, याची पारख करा.

" अन्नवस्त्र–स्वावलंबन व सुरक्षित निर्भय जीवन, या मानवी व्यक्तिमत्वाच्या विकासासाठीं आद्य व आवश्यक बाबी आहेत. म्हणून, आपण संयुक्त दक्षिणी संस्थानांकरितां राज्यघटना बनवितांना आपलीं घटनात्मक ध्येयें या मूलगामी दृष्टीनें प्रथम निश्चित केलीं पाहिजेत. हिंदी घटना-समितीनें एकमतानें स्वीकारलेल्या ध्येयासंबंधींचा ठराव आपणांस या दृष्टीनें खचित मार्गदर्शक

होईल. हीं ध्येयें निश्चित करतांना आपणांस प्रजेच्या मूलभूत हक्कांच्या निःसंदिग्ध निर्देशास अग्रस्थान दिलें पाहिजे.

" आपण दक्षिणी संस्थानांकरितां जी राज्यव्यवस्था मुक्रर कराल, ती करतांना आपणांस त्यांची भौगोलिक व्याप्ति, लोकसंख्या, सध्यांचें उत्पन्न व तें वाढविण्याची शक्यता, आवश्यक खर्चाच्या मर्यादा, औद्योगिक प्रगतीची शक्याशक्यता, सांस्कृतिक भेद व अंतर्गत स्वास्थ्य राखून अखिल हिंदुस्थानच्या एकजिनसी उत्कर्षाला पूरक होण्याची आवश्यकता, इत्यादि अनेकविध गोष्टी आपणांस लक्षांत घ्याव्या लागतील. संयुक्त दक्षिणी संस्थानांत आज जवळजवळ पंधराशें खेडीं व ७० मोठीं अगर मध्यम लोकवस्तीचीं गांवें असून, एकंदर लोकसंख्या सुमारें आठ लक्ष इतकी आहे. संयुक्त संस्थानांचें उत्पन्न सरासरी ८६ लक्ष असून त्यांपैकीं जमीनबाबीचें १८ लक्ष, अबकारी २३ लक्ष व प्राप्तीवरील कराचें १३ लक्ष या मुख्य बाबी आहेत.

" आपल्या अपेक्षेप्रमाणें आज आपणामध्यें नसलेलीं इतर दक्षिणी संस्थानें जर आपणांत आलीं, तर हे आंकडे अर्थात् जुजबी ठरतील. पण, आज घटनारचनेच्या कार्यास सुरुवात करतांना आपण हेच ठोकळ आंकडे जमेस घ्यावे लागतील. या आंकडयांवरून सहज लक्षांत येणाऱ्या गोष्टी ह्या कीं, भौगोलिक दृष्टया आज या आठ संस्थानांत २०० कारखाने व त्यांत २०,००० कामगार काम करतात व जवळजवळ पांच कोटी रुपयांचें भांडवल या कारखान्यांत गुंतलेलें आहे. आम्हांस असा भरंवसा वाटतो कीं, दोनचार वर्षांत कारखान्यांची संख्या एक हजारावर जाऊन २५ कोटी रुपयांचें भांडवल या प्रदेशांत गुंतवलें जाईल. दोन लक्ष कामगार या संघराज्याचें वैभव वाढविण्यास झटूं शकतील.

" परंतु, सर्व आर्थिक सुव्यवस्थेचा पाया किफायतशीर शेतीवर आहे. आपण आपल्या प्रयत्नांत शिकस्त करून संघराज्यांतील आमचा अन्नदाता शेतकरी सुखी होऊन, शास्त्रशुद्ध पद्धतीनें उत्तम शेती करूं लागेल, अशी परिस्थिति निर्माण केली पाहिजे. नवीन सुधारणा करण्याकरितां सहकारी तत्त्वावर सामुदायिक शेती व सहकारी क्रयविक्रय संस्था निर्माण करून शेतकऱ्यांच्या मालास स्थिर भाव येऊं शकेल अशी योजनाही आपणांस करावी

लागेल. दर माणशीं निदान एक एकर बागायत म्हणजे ८ लक्ष एकर बागायत या संघराज्यांत निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा आपण बाळगली पाहिजे.

" लोकशाही सुसूत्र चालवावयाची असेल, तर शिक्षणाचें महत्त्व आपण जाणून पुढील पांच वर्षांत संघराज्यांत एकही निरक्षर माणूस राहाणार नाहीं, अशी खबरदारी घेतली पाहिजे. त्याकरितां प्रत्येक खेडयांत ट्रेन्ड शिक्षकांमार्फत राष्ट्रोपयोगी शिक्षण देण्याच्या संस्था आपणांस काढाव्या लागतील.

" लोकशाही राबती होण्याकरितां जबाबदारीची जाणीव आधीं निर्माण करावी लागेल. ही जबाबदारीची जाणीव जितक्या अधिक नागरिकांच्या मनांत दृढ होईल, तितक्या प्रमाणांत लोकशाही यशस्वी होईल. घटनेमध्येंच याबाबत आपणाला राज्यकारभारांत समरस होण्याच्या दृष्टीनें ही जबाबदारी गांवागांवावर व गांवांतील निष्ठावंत, नीतिमान् व निर्भीड व्यक्तीव्यक्तीवर टाकावी लागेल, व त्याकरितां गांव या पायापासून आपणांस सर्व राज्ययंत्र उभारावें लागेल.

" संयुक्त संस्थानांच्या राज्ययंत्राची रचना बरीचशी विकेंद्रित करणेंच इष्ट होईल, असें आमचें प्रामाणिक मत आहे. इतकेंच नव्हे, तर आपल्या संस्थानांत मराठी व कानडी भागांचे जे दोन घटक आहेत, त्यांचा योग्य समन्वय घालण्याचा हा एकच व्यवहार्य मार्ग आहे. विकेंद्रित लोकशाहींत प्रत्येक लहान मोठया स्थानिक घटकांना व्यक्तिमत्वाच्या वैयक्तिक विकासास, संस्कृतीस, वैचारिक व भाषिक प्रगतीस पूर्ण वाव मिळणार असल्यामुळें, राज्यकारभारांतील अनेक अडचणींचा आपोआप निरास होणार असून, अंतर्गत संघर्षांची शक्यताहि आपोआपच मिटून जाणार आहे.

" अंतर्गत संरक्षणाच्या तरतुदीवांचून संयुक्त संस्थानांची ग्रामीण व औद्योगिक प्रगति होणें कठीण पडेल. पगारी पोलिस-संघटनेच्या द्वारें हा प्रश्न पूर्णांशानें सुटणार नाहीं. म्हणून, त्यासाठीं ग्रामसंरक्षक दलांच्यासारख्या एकाद्या योजनेचा घटनेंतच समावेश युक्त होईल असें आमचें मत आहे. अशा दलांना आवश्यक तेवढें लष्करी शिक्षण सक्तीनें देणें हें जरूर होईल, व त्यासाठीं आपणांस हिंदुस्थान सरकारचें साहाय्यही घ्यावें लागेल.

" आपल्या इच्छित कार्यांत सुयश चिंतून, जबाबदारीनें कालाचीं पावलें ओळखून आपल्या गत इतिहासास शोभेल असें भरीव लोकोपयोगी कार्य करीत करीत आपण आपली सर्वांगीण उन्नति करून घेण्यास परमेश्वरानें आपणांस सुबुद्धि द्यावी, अशी आमची त्या जगन्नियंत्यापाशीं प्रार्थना आहे."

## श्री. बजाज यांचें भाषण

शेवटीं, अध्यक्षांनीं समारोपाचें भाषण हिंदींत केलें. ते म्हणाले :—
" दक्षिणेंतील आठ संस्थानिकांनीं संघराज्य स्थापून अभिनव प्रयोग सुरू केला आहे. त्यांनीं आपल्या संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू केली व आतां संघराज्य स्थापून सर्व सत्ता प्रजेच्या हवालीं केली आहे.

" घटनेच्या बाबतींत अनेक अडचणी आल्या व बंधनें घालून घ्यावीं लागलीं, तरी प्रत्येक बाबतींत नमतें घेऊन राजेसाहेबांनीं संघराज्य निर्माण केलें.

" त्यांत प्रजेच्या कल्याणाची इच्छा व्यक्त झाली आहे. यावरून संघराज्य यशस्वी होईल, अशी मला खात्री आहे."

संघराज्याच्या योजनेंत सामिल झालेल्या संस्थानांपैकीं कुरुंदवाड (सी.) च्या अधिपतीखेरीज बाकीचे अधिपति या समारंभास हजर होते. उद्घाटनाचा समारंभ पार पडला. त्या वेळीं व नंतर याचें छायाचित्र घेण्यांत आलें. संघराज्याच्या घटनासमितीनें अध्यक्ष म्हणून श्री. आप्पासाहेब यांची व सांगलीचे ना. कोरे यांची हंगामी सरकारचे पंतप्रधान म्हणून निवड केली.

प्रकरण २३ वें

# हिंदी प्रांतांत संस्थानांच्या विलीनीकरणाचा ठराव

संघराज्य स्थापन होण्याच्या सुमारास बऱ्याच अनपेक्षित घटना घडल्या. दक्षिणेंतील संस्थानांपैकीं जमखिंडीचे अधिपति हे संघराज्यस्थापनेस अनुकूल नव्हते. ता. १७ आक्टोबरनंतर लवकरच त्यांनीं प्रजेची इच्छा असल्यास, जमखिंडी संस्थान हें मुंबई प्रांतांत विलीन करण्यास आपण तयार आहों असें जाहीर केलें व तसा ठराव त्यांच्या प्रजेनें नंतर लवकरच केला. त्याचा तात्कालिक परिणाम संघराज्यांत सामिल झालेल्या संस्थानांच्या प्रजाजनांवर झाला. त्यांच्याकडूनहि ' संघराज्य नको, विलीनीकरण व्हावें ' असे सूर निघूं लागले. हिंदुस्थान सरकारनें हिंदी संस्थानांबाबतचें आपलें धोरण वरवर प्रसिद्ध केलें होतें. त्यांनीं कोणत्याही संस्थानावर कसल्याच प्रकारची सक्ति केली नव्हती. पण, ज्या घटना घडत होत्या, त्या कालचक्रानुसार घडल्या असें म्हणावें लागतें. ता. १५ ऑगस्टनंतर सर्व परिस्थितींत एकदम झपाट्यानें बदल होत असल्याचें दिसून आलें. वास्तविक, ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानास स्वातंत्र्य देतांना हिंदुस्थानांतील सर्व संस्थानें स्वयमेव सार्वभौम आहेत असें जाहीर केलें होतें; पण, या जाहीर सार्वभौमत्वाच्या घोषणेचा परिणाम प्रत्यक्षांत मात्र फार वेगवेगळ्यापणानें अनुभवास आला. हिंदुस्थान सरकारशीं परराष्ट्रसंबंध, दळणवळण व संरक्षण या तीन बाबींपुरताच संस्थानांचा संबंध यावयाचा. या तीन बाबींच्या धोरणास संस्थानांनीं मान्यता दिल्यास, त्यांच्या अंतर्गत कारभारांत कोणत्याही प्रकारें हात घालण्याचें हिंदुस्थान सरकारला कारण नव्हतें व तसें त्यांचें धोरणही नव्हतें. तसें जाहीरही करण्यांत आलें होतें. परंतु, लोकशाहीचे वारे सर्वत्र वाहात होते. सर्व संस्थानांतून लोकजागृति झाली होती. सर्वांना प्रजामतानुवर्ती राज्यपद्धति हवी होती. हिंदी सरकारचें संस्थानांतील हालचालींकडे पूर्ण लक्ष होतें. कांहीं संस्थानांच्या विलीनीकरणाच्या योजना आल्या, त्या त्यांच्याकडून मान्य केल्या गेल्या. कांहींनीं संघराज्याची योजना केली, तिलाही त्यांची संमति मिळाली. संस्थानांबाबत हिंद सरकारचें एकत्र व ठराविक धोरण नव्हतें. ज्यांकडून जी योजना मांडली, ती

त्यांनीं स्वीकारली. वर दर्शित केल्याप्रमाणें व तेथील प्रजाजन यांनीं जाहीर केलेल्या धोरणास हिंदुस्थान सरकारनें मान्यता दिली.

दक्षिणेंतील संस्थानी संघराज्याचें हंगामी मंत्रिमंडळ बनवावयाचें; पण, येथें पेचप्रसंग निर्माण झाला. पांच जणांचें मंत्रिमंडळ कीं आठ सामिल संस्थानांकरितां आठ जणांचें मंत्रिमंडळ, असा प्रश्न पडला. यावर तडजोड होऊं शकली नाहीं. संस्थानाधिपतींनींही तडजोड करण्याचे प्रयत्न केले. पण, ते सफळ झाले नाहीत. प्रजाप्रतिनिधींच्या हट्टास कंटाळून दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. २१-१२-४७ रोजीं रात्रीं उपस्थित राजांनीं ( संघराज्य स्थापन न करतां ) प्रजेचें मत असल्यास, आपलीं संस्थानें हिंदी राज्यांत विलीन करावयास आपली मान्यता आहे असा ठराव केला. तो ठराव येणेंप्रमाणें:—

"In view of the trend of public opinion and recent events and the general feeling among the people of the United Deccan State, the Rajamandal resolve that, if the people of the State and the Constitution-making Body desire that, instead of procceding with the framing of the Constitution, steps may be taken to merge the State into the Bombay Province, the Rajamandal will not stand in their way."

Miraj
21 st December 1947

भोरचे अधिपति घटना-समितीचा उद्घाटन-समारंभ झाल्याबरोबर, त्यानंतर दुसरा कांहीं एक कार्यक्रम नाहीं असें समजल्यामुळें, मिरजहून निघून पुण्यास परत आले होते. मागें संस्थानिकांनीं विलीनीकरणास संमति देणारा ठराव केल्याचें दुसऱ्या दिवशीं वर्तमानपत्रावरून त्यांस समजलें. तेव्हां, त्यांना कमालीचें आश्चर्य वाटलें व वाईटही वाटलें. तथापि, श्री. राजेसाहेब, भोर, यांनीं त्या ठरावावर पुढें सही केली.

संघराज्य अस्तित्वांत आलें असतें, तर तें अनेक दृष्टींनीं फायदेशीर झालें असतें. सर्व संस्थानांतील एकंदर पंधराशें खेडीं व ७० मोठीं अगर मध्यम लोकवस्तीचीं गावें यांचा समावेश त्यांत होऊन, लोकसंख्या सुमारें ८० लक्ष झाली असती. संयुक्त संस्थानचें एकंदर उत्पन्न सरासरी ८६ लक्ष होत होतें. या

आठ संस्थानांत २०० कारखाने व २०,००० कामगार काम करीत होते. या कारखान्यांची वाढ झाली असती व संस्थानचा पैसा संस्थानांतच खर्च होणारा असल्यामुळें, संस्थानची सर्वांगीण उन्नति झपाट्यानें होऊं शकली असती. या संयुक्त संस्थानांत मराठी व कानडीचा वाद तीव्र स्वरूप धारण करीत होता, तोही त्या त्या भाषिकांना घटनेमध्यें योग्य स्थान देण्यानें विराम पावण्याची शक्यता होती. हिंदी संघराज्याच्या घटनेंत भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व मान्य केलें असलें, तरी ती घटना तयार होऊन त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी होण्यास सहज ३।४ वर्षांचा अवधि लागणार होता. तोंपर्यंत संघराज्याचा कारभार जोरदारपणें लोकशाहीच्या तत्त्वावर सुरू झाला असता, तर भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न मागें पडण्याची शक्यता सहज निर्माण होऊं शकली असती. परंतु, संघराज्याचें भवितव्य विधीनें वेगळेंच ठरविलें होतें; त्यांत मानवी प्रयत्न कसा बदल करूं शकणार ?

नंतर, लवकरच संस्थानिकांच्या ठरावाप्रमाणें सामिल संस्थानांतील प्रजापरिषदांनीं निरनिराळ्या सभा भरवून विलिनीकरणास अनुकूल असे ठराव पास केले. घटना-समितीचे अध्यक्ष श्री. कमलनयन बजाज यांनीं घटना-समितीची बैठक ता. २६ जानेवारी १९४८ रोजीं मिरज येथें भरवून समितींत विलिनीकरण करण्याचा ठराव एकमतानें पास केला. दरम्यान ता. १८ माहे जानेवारी १९४८ रोजीं हिंदी सरकारचे संस्थानी खात्याचे मंत्री सरदार वल्लभभाई पटेल यांनीं मुंबई येथें संघराज्यांत सामिल झालेल्या संस्थानाधिपतींची भेट घेऊन विलिनीकरणाच्या प्रश्नावर त्यांच्याशीं वाटाघाट केली. भोरचे राजेसाहेब हे या भेटीच्या वेळीं उपराजप्रमुख म्हणून उपस्थित राहिले होते व त्यांनीं दक्षिणी-संस्थान-संघराज्याचें म्हणणें त्यांना वाचून दाखविलें. ता. २६ जानेवारी १९४८ रोजीं घटना-समितीनें पास केलेल्या ठरावाचा दक्षिणी संस्थान-संघराज्याच्या राजमंडळानें ता. ३० जानेवारी १९४८ रोजीं बैठक भरवून विचार केला; व विलिनीकरणाबाबत घटना-समितीचा ठराव मान्य केला. घटना-समितीनें दुसरा ठराव करून विलिनीकरणाबाबत हिंदुस्थान सरकारशीं वाटाघाट करण्याकरितां श्री. कमलनयन बजाज यांना नियुक्त केलें होतें. ही गोष्ट राजमंडळास मान्य नव्हती; सबब, त्यांनीं 'प्रत्येक संस्थानच्या

चित्रांक:८०



[illegible] याच्या स्मारकाचा कोनशिला एलकें येथें श्री. राजेसाहेब भोर यांच्या हस्तें स्थापन केली. ता. २८।१२।४७ इ.

[ सं. पा. २८७

प्रतिनिधीनें स्वतंत्रपणें हिंद सरकारबरोबर वाटाघाट करावी' असा ठराव केला व दोन्ही ठराव संस्थानी खात्याचे मंत्री सरदार वल्लभभाई पटेल यांजकडे उपराज-प्रमुख या नात्यानें श्री. राजेसाहेब यांनीं पाठविले; व त्यांमध्यें कांहीं संस्थानिकांचें म्हणणें आतां विलिनीकरण होऊं नये असें धरसोडीचें आहे, तें बरोबर नाहीं असेंही स्पष्टपणें नजरेस आणलें. यानंतर लवकरच हिंदुस्थान सरकारच्या संस्थानी खात्याकडून आलेल्या सूचनेनुसार मुंबई सरकारचे मुख्य प्रधान ना. बा. गं. खेर यांच्या अध्यक्षतेखालीं विलिनीकरणास मान्यता असलेल्या दक्षिणी संस्थानाधिपतींची बैठक मुंबई येथें कौन्सिल चेंबरमध्यें ता. १९-२-४८ रोजीं भरविण्यांत आली. या बैठकींत श्री. राजेसाहेब उपस्थित राहिले होते. हिंदुस्थान सरकारच्या संस्थानी खात्याचे प्रतिनिधि मि. सी. सी. देसाई मुद्दाम मुंबईस या बैठकीकरितां आले होते. या बैठकींत विलिनीकरणाच्या मसुद्यावर व त्यांतील कलमांसंबंधींच्या खुलासापत्रावर चर्चा होऊन, अक्कलकोट, औंध, भोर, जमखिंडी, जत, कुरुंदवाड, ( सी. ), मुधोळ, मिरज ( सी. ), मिरज ( ज्यू. ), फलटण, रामदुर्ग, सांगली, सावनूर व वाडी या पंधरा संस्थानांच्या अधिपतींनीं विलिनीकरणाच्या करारावर मान्यतेच्या सह्या केल्या. हिंद सरकारतर्फें संस्थानी खात्याचे सेक्रेटरी मि. व्ही. पी. मेनन यांनीं करारावर सही केली. त्या वेळेस नामदार पंतप्रधान खेर यांनीं केलेल्या भाषणांतील उतारा व उभयपक्षीं मान्य झालेला करार व त्यावरील खुलासा खालीं दिला आहे.

नंतर, मुंबईचे मुख्य प्रधान नामदार बाळासाहेब खेर यांनीं सर्व राजे लोकांस पार्टी दिली. त्या वेळीं गव्हर्नरसाहेबही आले होते, व नंतर ग्रुप-फोटो काढण्यांत आला; व अशा रीतीनें मोठी दुःखद गोष्ट म्हणजे संस्थानें नष्ट झालीं.

ना. बाळासाहेब खेर यांच्या भाषणांतील उतारा:—

The Prime Minister opened the proceedings with a reference to the death of Mahatma Gandhi, all standing in silence for two minutes as a mark of respect to his memory.

## "Act of Sacrifice"

Mr. Kher said that the interests of the States had been dear to the Mahatma's heart and the steps they were about

to take would have gladdened him immeasurably. It was not an occasion for pomp or splendour, but one that marked the commission by the Rulers of an act of sacrifice in the larger interests of their States—an act worthy of their venerable ancestors.

It had been realised by the Rulers some time ago, Mr. Kher added, that because of the small size of their territories, little could be accomplished by way of schemes for the amelioration of the conditions of their subjects. Some of them had, therefore, initiated the scheme for a United Deccan State. But, after the attainment of independence by India, it had become apparent that even such a step would not meet the requirements of the situation and that the proper thing to do was to merge the States with the adjoining province.

### Ties With Province

The Premier congratulated the Rulers on their wisdom and statesmanship in agreeing to the merger. He referred to the historical, cultural, economic and social ties which bound their States with Bombay Province and assured the Rulers that it was the firm intention of his Government to consolidate those ties while maintaining the dignities and privileges of the Rulers, in recognition of whose sacrifices the Central Government had offered them generous terms.

The Bombay Government would do everything in their power to maintain just rule in the territory merged with the province and to protect its social, educational and economic needs.

The agreement which they were about to sign provided a guarantee of their privy purse, their personal rights and privileges, Mr. Kher pointed out. "It is needless for me," he added, "to say that these guarantees will be honoured. Government will implement the terms fully and in their true spirit."

चित्रांक ८१



पाली येथें सुधागड तालुका प्रजेनें श्री.स मानपत्र अर्पण केलें. ता. ७।३।४८ इ.

[ सं. पा. २९२

# विलिनीकरणाबाबतचा करार

Agreement made this Nineteenth day of February 1948 between the GOVERNOR-GENERAL of INDIA and His Highness the Raja Shrimant Sir Raghunathrao Shankarrao alias Babasaheb Pandit Pant Sadhiv, K. C. I. E.

WHEREAS, in the immediate interests of the State and its people, His Highness the RAJA of Bhor State is desirous that the administration of the State should be integrated as early as possible with that of the Province of Bombay in such manner as the Government of the Dominion of India may think fit;

It is hereby agreed as follows:—

## ARTICLE 1

His Highness the RAJA of Bhor State hereby cedes to the Dominion Government full and exclusive authority, jurisdiction and powers for and in relation to the governance of the State and agrees to transfer the administration of the State to the Dominion Government on the Eighth day of March 1948 ( hereinafter referred to as "the said day" ).

And, from the said day, the Dominion Government will be competent to exercise the said powers, authority and jurisdiction in such manner and through such agency as it may think fit.

## ARTICLE 2

His Highness the RAJA shall, with effect from the said day, be entitled to receive from the revenues of the State annually for his privy purse the sum of Rs. 89,042/- rupees eightynine thousand and forty two only free of taxes. This amount is intended to cover all the expenses of the Ruler and his family, including expenses on account of his personal staff, maintenance of his residences, marriages and other ceremonies, etc., and will neither be increased nor reduced for any reason whatsoever.

The said sum may be drawn by the RAJA in four equal instalments in advance at the beginning of each quarter by presenting bills at the State Treasury or at such other Treasury as may be specified by the Dominion Government.

ARTICLE 3

His Highness the RAJA shall be entitled to the full ownership, use and enjoyment of all private properties ( as distinct from State properties ) belonging to him on the date of this agreement.

The RAJA will furnish to the Dominion Government before the 1st Day of............1948 an inventory of all the immovable property, securities and cash balances held by him as such private property.

If any dispute arises as to whether any item of property is the private property of the RAJA or State property, it shall be referred to such officer with judicial experience as the Dominion Government may nominate and the decision of that officer shall be final and binding on both parties.

ARTICLE 4

The Raja, the Rani, the Rajamata, the Yuwaraja and the Yuwaradni shall be entitled to all personal privileges enjoyed by them whether within or outside the territories of the State, immediately before the 15th day of August 1947.

ARTICLE 5

The Dominion Government guarantees the succession, according to law and custom, to the Gadi of the State and to the RAJA'S personal rights, privileges, dignities and titles.

In confirmation whereof Mr. Vapal Pangunni Menon, Secretary to the Government of India in the Ministry of States, has appended his signature on behalf and with the authority of the Governor-General of India and H. H. the

RAJA of Bhor State has appended his signature on behalf of himself, his heirs and successors.

Sd/- R. S. Pant Sachiv.
H. H. the RAJA of Bhor State.

Sd/- V. P. Menon,
Secretary to the Government of India, Ministry of States.
Dated, 19-2-1948

## विलिनीकरणाच्या ठरावाचा खुलासा

Government of India, Ministry of States, New Delhi,

D. O. No. F. 38-P/48 The 19th February 1948

My dear Raja Saheb,

In connection with the merger agreement discussed and signed this morning, certain points were raised for clarification which is given below. This letter will, therefore, be treated as a part of the merger agreement having the same effect as the agreement itself.

2. References to the Ruler in Articles II, III and IV include the heirs and successors on the Gadi of the State. This is indeed the significance of the guarantee in Article V which expressly extends to the succession your personal rights, besides privileges, dignities and titles.

3. The Rulers and their successors on the Gadi will continue to retain their hereditary designations, titles and honours to which they were entitled prior to August 15, 1947,

4. The privilege of exemption from the provisions of the Arms Act and Rules will extend to the Raja and the Rani of the State.

5. With reference to Article No. II, the Government of India trusts that the Ruler will continue to respect his customary and legal obligations to the members of his family in a manner befitting their dignity and status.

6. The accumulated balances, which will be transferred along with the State, shall, as far as may, be spent for the benefit of the territory comprised in the State. The Government of the Bombay Province, in which your State will merge, is agreeable to this arrangement.

7. It is intended that Permanent members of the public services of each of the merging States will be continued in service, on considerations similar to what they were entitled to before the 1st of December 1947, as changed circumstances may permit. Pensions and leave salaries, sanctioned by competent authorities in any of the merging States to members of the Public services of that State who have retired or proceeded on leave preparatory to retirement prior to the date of the agreement, will also be continued.

8. The other points which were raised at the meeting will be considered by the Government of India and the orders passed thereon will be communicated to you as soon as possible. It is necessary that these points should be considered from an all-India point of view, so that uniformity is maintained in respect of the treatment given to all merging States. You will doubtless appreciate the reasonableness of this view. The proposed examination will be expedited and will be as sympathetic as possible, regard being had to the great sacrifice which you will be making in merging the State in the adjoining Province of Bombay.

With kind regards,

Yours sincerely,
V. P. Menon.

To

His Highness Raja Shrimant Sir Raghunathrao Shankarrao Pandit Pant Sachiv, K. C. I. E., Raja of Bhor.

चित्रांक ८२ अ




मे. बर्वे, पुण्याचे कलेक्टर, यांनीं भोर संस्थानचा ताबा सकाळीं घेतल्यावर दुपारीं राजवाड्यांतील खजिन्याची तपासणी करण्यास जातांना आर्मरी पाहिली, ता. ८।३।४८ इ. [सं. पा. ३२०

चित्रांक ८२ ब



मे. बर्वे, पुण्याचे कलेक्टर, यांनीं भोर संस्थानचा ताबा सकाळीं घेतल्यावर दुपारीं राजवाड्यांतील खजिन्याची तपासणी करण्यास जातांना आर्मरी पाहिली, ता. ८।३।४८ इ. [सं. पा. ३२०

## या विलिनीकरणाबाबत नामदार मावळणकर यांनीं श्रीमंतांस पत्र पाठविलें, तें खालीलप्रमाणें

N. D. 593/48
20 Akbar Road,
New Delhi, the 27th Feb. 1948,

Dear Rajasaheb,

I am happy to note from the Press that yourself and 14 other Princes of the Deccan have agreed to merge in the neighbouring province of Bombay. This is what it should be in the present set-up of things and the present concept of society, Government and State.

I am happy because, by this action of yours, you have given a lead to all vested interests in merging personal interests in the larger interests of the nation. It is only this way, by willing sacrifice and surrender that we can achieve, in a bloodless manner, the revolution that is coming and bound to come, and do our best in not only maintaining the independence of India but in her attaining her rightful place among the nations of the world.

Mrs. Mavalankar and myself are both here and doing well. We expect to be here till the Assembly session is over by about the end of the first week of April and then we shall be going to Ahmedabad.

Hoping to have the pleasure of meeting you sometime when we are on Poona side.

With kind regards,

Yours sincerely,
Sd/-G. V. Mavalankar.

To

Shrimant Rajasaheb of Bhor, Bhor State ( S. M. C. )

या कराराप्रमाणें दक्षिणेंतील या १५ संस्थानांचा राज्यकारभार मुंबई सरकारनें मार्च ता. ८, १९४८ पासून आपल्या हातीं घेतला. इतिहासप्रसिद्ध

अशीं हीं सर्व संस्थानें या तारखेपासून नष्ट झालीं. ‘ भवितव्यता बलीयसी ’.

या करारान्वयें श्रीमंत राजेसाहेब यांना खासगी खर्चाकरतां रु. ८९०४२ ची रक्कम प्रीव्हि पर्स म्हणून सालदरसाल चार हप्त्यांनीं मिळावी असें ठरलें. या रकमेंतून त्यांनीं आपल्या सर्व कुटुंबियांचा खर्च, लग्नकार्यें, प्रवास इत्यादींकडे लागणारा खर्च भागवावयाचा आहे. त्यांना आजपावेतों असलेले हक्क, सवलती व पदव्या, किताब इत्यादि यापुढेंही उपभोगितां येतील. त्यांची खासगी मालमत्ता असेल, तीही, इतर संस्थानांच्या अधिपतींप्रमाणें, त्यांजकडे राहील.

## विलिनीकरणास श्रीमंत राजेसाहेब यांनीं मान्यता दिल्याबद्दल त्यांना मानपत्र व ह. भ. प. धोंडो अमृत शेटे यांच्या स्मारकाची श्रीमंतांच्या हस्तें कोनशिला बसविणेचा समारंभ

## ता. १८-१२-४७

श्रीमंत राजेसाहेब हे येळकें गांवास वरील समारंभाकरितां गेले होते. त्या वेळेस श्रीयुत गोपिनाथपंत पोतनीस, मुख्य मंत्री, यांनीं कै. ह. भ. प. शेटे ह्यांच्यासंबंधीं माहिती सांगितली व श्रीमंतांस कोनशिला बसविण्याबद्दल विनंति केली. तसेंच, श्रीमंतांच्या आजपर्यंतच्या कारभारासंबंधानें व श्रीमंतांनीं संस्थानच्या विलिनीकरणास संमति दिली, त्याजबद्दल मानपत्र वाचून तें श्रीमंतांस समर्पण केलें. तें मानपत्र खालीं दिलें आहे.

श्रीमंतांनीं मानपत्र व कोनशिला बसविणें या दोन्हींबद्दल समयोचित भाषण केलें व सर्व पक्षांच्या लोकांनीं मानपत्रास व शेटे स्मारकास संमति दिली, याजबद्दल आनंद व्यक्त करून, शेटे स्मारकास एक हजार १००० रुपये देणगी जाहीर केली व येळकें गांवास ‘ शिवाजी नगर ’ असें त्या दिवसापासून म्हणण्यांत येईल असें प्रसिद्ध केलें. हें भाषण खालीं दिलें आहे. ह्या समारंभाकरितां रा. बाळूकाका कानिटकर, मि. दांडेकर, श्री. बाबुराव गोखले, श्री. भुस्कुटे वगैरे उपस्थित असून ह्यांनीं भाषणें केलीं.

तेथून श्रीमंतांची स्वारी शिरवळ येथें गेली व शेट चंदनमल राठी यांच्या विनंतीवरून श्रीमंतांनीं इलेक्ट्रिक पावरनें चालणारा त्यांचा उसाचा चरक चालू केला.

चित्रांक.८३



श्री. राजेसाहेब यांचें ७१ वें. वर्षी घेतलेले छायाचित्र, ता. २८।१।४८ इ.

॥ श्रीरामसमर्थ ॥

## मानपत्र

हिज हायनेस राजा श्रीमंत सर रघुनाथराव शंकरराव तथा बाबासाहेब पंडित पंतसचिव, K.C.I.E. अधिपति, संस्थान भोर.

आजच्या शुभ दिवशीं वैकुंठवासी ह. भ. प. धोंडो अनंत शेटे ऊर्फ शेटे-महाराज यांच्या स्मारकपुतळ्याची कोनशिला स्थापनेचा समारंभ आपल्या हस्तें साजरा होत आहे, या अर्थपूर्ण घटनेबद्दल शेटे स्मारक समितीस अत्यन्त आनंद होत आहे.

निःसीम स्वामिभक्त ब्रह्मीभूत श्री. शंकराजी नारायण यांच्या पुण्यवंशांतील आपण आकरावे पुरुष आहांत. स्वातंत्र्यसूर्य शिवछत्रपति यांच्या स्वराज्याचे निष्ठावंत सेवक या नात्यानें सचिवांचा मान फार मोठा आहे. या गादीचे वारस आपण आहांत, याची जाणीव असल्याचा पुरावा आपण नुकताच जगापुढें ठेवला आहे.

गेल्या तीनशें वर्षांत स्वराज्य-स्थापना, स्वराज्य-संरक्षण, स्वराज्य-विस्तार व अखेरीस यदृच्छेनें आलेलें पारतंत्र्य अशा विविध अवस्थांतून आपला महाराष्ट्र देश गेला. या आंदोलनामध्यें महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राबाहेरील स्वराज्याचीं जणूं स्मारकेंच म्हणून कोल्हापूर, औंध, भोर, ग्वाल्हेर, इंदूर, बडोदें वगैरे जीं संस्थानें टिकून राहिलीं, त्यांपैकींच भोर हें एक होय.

प्राप्त पारतंत्र्यांतून पार पडण्यासाठीं अखिल हिंदुस्थानभर गेलीं साठ वर्षे चाललेल्या स्वातंत्र्यलढ्यांतून निर्माण झालेल्या लोकजागृतीमुळें व दुसऱ्या जागतिक महायुद्धाचा एक परिणाम म्हणून, हिंदुस्थानचें पारतंत्र्यग्रहण ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं सुटलें. त्या दिवसापासून नवीन निर्माण झालेलें हें हिंदी संघराज्य बलशाली व एकजिनसी होऊन जगांतील आपला अग्रतेचा मान पुनः कसा मिळवील, याचा एकच ध्यास हिंदी पुढाऱ्यांस लागून राहिलेला आहे.

पारतंत्र्य-मुक्ततेच्या चळवळीमध्यें भोर संस्थानांतील प्रजेच्या जागृतीच्या कार्याची मुहूर्तमेढ ज्या महान् देशभक्तांनीं रोवली, त्यांपैकीं कै. शेटे महाराज हे पहिले होत.

भोर संस्थानचे अधिपति या नात्यानें या चळवळीच्या प्रखरतेची जाणीव आपणांस आहेच. जुन्या राजवटींतील एकतंत्री सत्ता, एकांतिक धार्मिकता व संकुचित मतें यांच्या खोल चाकोरींतून नव विचारांच्या सपाटीवर राजा व प्रजा दोघांनाही आणावयाचें कार्य मोठें अवघड होतें. त्या कार्यासाठीं जे झगडे लोक-पुढाऱ्यांनीं केले, त्या प्रत्येक झगड्याच्या अखेरीस रयतेच्या आकांक्षांची जाणीव आपल्या ठिकाणीं झाली. एकीकडे जुन्या वळणाचे सल्लागार व दुसऱ्या बाजूस पुरोगामी मतांचे पुढारी, या दोघांच्या रस्सीखेचींतून काळाचा ओघ व परिस्थिति यांची जाणीव ठेवून, आपण मध्यम मार्ग काढण्याचें धोरण ठेवलें.

प्रजेच्या वाढत्या आकांक्षानुरूप राज्यकारभारांत प्रजेस आपण भाग देत गेलांत व अखेरीस १८ ऑगस्ट १९४७ रोजीं आपल्या राज्यारोहणाच्या पंचविसाव्या वाढदिवशीं समारंभपूर्वक प्रजेस भरीव हक्कदान करून लोकनियुक्त मंत्र्याच्या हातीं संस्थानचा कारभार आपण सोंपविला.

हिंदी संघराज्य प्रस्थापनेनंतर ज्या वेगवान घडामोडी होत गेल्या, त्यांच्या समवेत जाण्याचें धोरण आपण स्वीकारलेंत.

दक्षिणी संस्थानांचें संघराज्य निर्माण करून, तें हिंदी संघराज्यास जोडण्याची कल्पना पुढें आली. त्यास आपली मान्यता देऊन ' संयुक्त दक्षिणी संस्थान ' निर्माण करण्यांत आपण पुढाकार घेतलात व ता. १७ ऑक्टोबर १९४७ रोजीं भोर येथें संघराज्याच्या करारावर आठ संस्थानांच्या अधिपतींनीं सह्या केल्या.

हिंदी संघराज्याचे संपूर्ण बळकटीकरतां एवढा त्याग पुरेसा नाहीं; संस्थानांनीं संघराज्यांत विलीन होणें इष्ट आहे; याची जाणीव हिंदवी राज्याचे धुरीणांनीं देतांच—" प्रजेची इच्छा असल्यास, विलिनीकरणाच्या आड आपण येणार नाहीं. " असा ठराव दूरदर्शीपणानें व समय जाणून आपण केलात. यामुळें आपल्या स्वामिभक्त आद्य पुण्यपुरुषाची पूर्वपरंपरा आपण कायम ठेवली आहे; व त्यांच्या त्यागाची, स्वामिभक्तीची व स्वाभिमानाची ज्योत आपल्या ठिकाणीं तेवत आहे, याची जाणीव आपण आम्हांस पुनः एकदां करून दिली आहे.

या अखेरच्या घटनेमुळें भोरचे अधिपति या नात्यानें प्रजेस वाटत असलेल्या अभिमानामध्यें आपण फार मोठी भर घातली आहे. "राजा प्रकृति-रंजनात्" ही पुराणकाळांतील राजाची व्याख्या आपण सार्थ केली आहे, याबद्दल प्रजा या नात्यानें आम्हांस आपल्याबद्दल अभिमान वाटत राहील.

वेल्हें येथें ता. ६-११-४७ रोजीं भोर संस्थान प्रजासभेचें जें प्रातिनिधिक स्वरूपाचें अधिवेशन झालें, त्यांत शेटे महाराजांचें स्मारक करण्याचा ठराव होऊन "शेटे स्मारक समिति" सर्वानुमतें नेमली गेली. या शेटे स्मारक-समितीच्या तर्फे हें मानपत्र आपणांस देण्यास आम्हांस अत्यंत आनंद होत आहे.

| | |
|---|---|
| येलकें,<br>रविवार, ता. २८-१२-४७<br>मार्गशीर्ष वद्य प्रतिपदा. | आपले<br>**शेटे स्मारक-समितीचे<br>सभासद.** |

ह. भ. प. शेटे महाराज यांच्या स्मारकाची कोनशिला येलकें येथें
हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, सं. भोर, यांच्या हस्तें बसविली,
त्या समयीं

## हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेलें भाषण

ता. २८ डिसेंबर १९४७ वेळ दुपारीं ३ वाजतां

**उपस्थित सद्गृहस्थ, तसेंच प्रिय प्रजाजनहो,**

वैकुंठवासी देशभक्त ह. भ. प. धोंडो अमृत शेटे ऊर्फ शेटे महाराज यांच्या स्मारकाची कोनशिला आमच्याकडून बसवावी अशी इच्छा प्रदर्शित करून आपण आम्हाला जी विनंति केली, त्याबद्दल आम्ही आपले मन:पूर्वक आभार मानतों. वास्तविक, त्यांचें खरें स्मारक आपणां सर्वांच्या हृदयांतच स्थापन झालेलें आहे, याची प्रचीति आपण सर्वजण ज्या उत्साहानें आणि संख्येनें आज उपस्थित झालां आहांत, त्यावरूनच लक्षांत येण्यासारखी आहे. पण, पुढील पिढीस मार्गदर्शक व स्फूर्तिकारक असावें, या हेतूनें त्या स्मारकाचें साकार स्वरूप, म्हणून आपण आज हा उपक्रम करीत आहांत व त्यास अनुसरून आपल्या हृदयांतील भावनांनाही या कोनशिलासमारंभाच्या प्रसंगीं मूर्त स्वरूप

द्यावें, ही अत्यंत गोड कामगिरी आपण आमच्यावर सोपवीत आहांत. दिसावयास या समारंभाचें स्वरूप जरी लहान दिसलें, तरी सुद्धां त्यामागें वसत असणाऱ्या भावनेमुळें त्याचें महत्त्व फार व्यापक आहे, यांत शंका नाहीं.

वै. ह. भ. प. शेटे महाराज यांच्या चरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टी बहुतेक आपणां सर्वांच्या देखतच घडलेल्या असल्यामुळें, त्यांबद्दल विस्तारानें सांगण्याची जरूरी नाहीं व आजची ही वेळही नाहीं. त्यांचा व आमचा कारण-परत्वें बराच संबंध आला, तरी त्यांची खरी कामगिरी आपणांमध्येंच प्रत्यक्ष झाली असल्यामुळें, त्यांच्या गुणावगुणांची चिकित्सा करण्याचा अधिकारही आपणाला आमच्यापेक्षां केव्हांही जास्त आहे; तेव्हां, त्याबद्दलही आम्ही आज कांहीं फारसें बोलणार नाहीं. प्रत्येक व्यक्तींत कांहीं गुण व कांहीं दोष यांचा संगम झालेला असतो. पण, त्यांतही गुणांचें आधिक्य व प्राबल्य दिसून आल्यास, त्या व्यक्तीला योग्य तो मान मिळतो. कै. शेटे यांच्यामध्यें वसत असलेल्या गुणांचा प्रभाव जास्त होता, हें स्पष्टच आहे. तरी पण, त्यांतही त्यांच्या-आमच्या संबंधांत त्यांच्यामध्यें जो एक गुणविशेष आम्हाला आढळून आला, त्याचेंच फक्त दिग्दर्शन आम्ही आजच्या प्रसंगीं करणार आहोंत.

वै. ह. भ. प. शेटे महाराज यांचा व आमचा संबंध एका वेळेस विरोधी नात्यानें आला, तरीही तेवढ्यामुळें आमच्या मनांत त्यांच्याविषयीं कोणताही किंतु नव्हता, ही गोष्ट या प्रसंगीं आम्हांस अवश्य सांगावीशी वाटते. राजकारणांत प्रामाणिक मतभेद असणें, ही गोष्ट अपरिहार्य व पुष्कळ अंशीं उपकारक असते. एकाच विशिष्ट दृष्टीनें प्रेरित झालेला पक्ष, प्रसंगीं, साध्या-सुध्या गोष्टींकडे दुर्लक्ष करूं शकतो; यामुळें, अधिकारारूढ पक्षाला योग्य त्या मार्गानें जाण्याकरितां संघटित अशा विरोधी पक्षाचा लगाम आवश्यक असतो. मात्र, या विरोधाचें क्षेत्र राजकारणापुरतेंच मर्यादित राहिलें, तर राजकारणांतील विरोधामुळें परस्परांचीं मनें कलुषित होण्याचें कांहीं कारण नाहीं, असें आम्हांस वाटतें. राजकारणांत प्रामाणिक मतभेदाला वाव असतो, ही गोष्ट योग्य रीतीनें आकलन करून त्याप्रमाणें वागल्यास, राजकीय विरोधाची परिणति ध्येय-प्राप्तींतच होते. कै. शेटे महाराज यांच्यामध्यें ही व्यवहारकुशलता होती, म्हणूनच विरोध असूनही आमचे व त्यांचे वैयक्तिक संबंध कधींही दुरावले

नाहींत अगर कडवट झाले नाहींत; व यामुळेंच, आम्ही पहिल्या प्रथम सांगितल्याप्रमाणें, मनांत कोणतीही शंका न घेतां अगर ठेवतां आजच्या या समारंभाचें आमंत्रण आम्हीं आनंदानें स्वीकारलें.

कै. शेटे व भोर संस्थानचे आजचे प्रथम मंत्री श्री. गोपिनाथपंत पोतनीस यांची भोर संस्थानांतील चळवळींत अग्रभागीं अशी जोडी होती, व त्याकरितां आमच्यामध्यें व त्यांच्यामध्यें विरोध उत्पन्न होऊन चळवळीस अनिष्ट वळण लागल्याचें दिसल्यावर, आम्हीं त्याचा प्रतिकारही आमच्या कर्तव्यास स्मरून केला. वेळप्रसंगीं त्यांना शिक्षाही देण्याचें कटु कर्तव्य आम्हांस करावें लागलें. पण, असें असूनही या दोनही व्यक्तींबद्दल आमचा प्रेमभाव कायम होता व आहे, ही खरी गोष्ट आपणांपुढें सांगण्यास आम्हांस बिलकुल शंका वाटत नाहीं. श्री. गोपिनाथपंत पोतनीस यांनींही आजपर्यन्तच्या आमच्या व त्यांच्या दरम्यानच्या विरोधास अवास्तव महत्त्व न देतां, आजच्या या समारंभास निमंत्रण दिलें व ज्या व्यक्तीला राजकर्तव्य म्हणून शिक्षा आम्हीं दिली होती, त्याच व्यक्तीच्या स्मारकाची कोनशिला आमच्या हातून बसवावी अशी इच्छा प्रदर्शित केली. यावरून त्यांच्या मनाचा मोठेपणा व्यक्त होत आहे, व त्याबद्दल आम्हास त्यांच्याबद्दल सकौतुक अभिमान वाटत आहे.

या समारंभांतील दुसरें वैशिष्ट्य म्हणजे कै. ह. भ. प. शेटे महाराज यांच्या स्मारकाकरितां जें विनंतिपत्रक काढण्यांत आलें आहे, त्या पत्रकावर सर्व पक्षांच्या व मतांच्या लोकांच्या सह्या आहेत. त्यावरून, कै. शेटे यांचे गुणविशेष सर्व लोकांना मान्य होते, ही गोष्ट निःसंशयरीत्या दिसून येते. त्याचप्रमाणें आजच्या या समारंभांतही सर्वांनीं खेळीमेळीनें भाग घेऊन आम्हांस निमंत्रण केलें, याजवरून सर्व पक्षांची आमच्यासंबंधानें अनुकूलता आहे, हें पाहून आम्हास फार समाधान वाटतें.

भोर संस्थानचे प्रथम मंत्री श्री. गोपिनाथपंत पोतनीस हे मार्च सन १९४७ मध्यें अधिकारारूढ झाले व तेव्हांपासून त्यांनीं सूत्रें चालविलीं आहेत. हीं सूत्रें त्यांनीं, मागील हेवादावा विसरून व गत गोष्टी पडद्याआड करून, सदिच्छेनें व निर्मळ अंतःकरणानें चालविलीं आहेत; व म्हणूनच, त्यांना आज हा यशस्वी दिवस पाहण्याचें भाग्य लागत आहे. ते व त्यांचे हल्लींचे सहकारी

यांनीं सर्वांनीं एकोप्यानें व सलोख्यानें कारभार करण्याचें मनावर घेतलें आहे, हे त्यांना भूषणावह आहेच; तसेंच, त्याचबरोबर आम्हालाही त्यापासून समाधान होत आहे.

आजच्या प्रसंगांतील आणखी महत्त्वाची वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट, म्हणजे आज आपण मोठ्या प्रेमानें अर्पण केलेलें मानपत्र. ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं आम्हीं आमच्याकडील अधिकारदानाचें उदक सोडल्यावर, आपण आमच्यावरील निरपेक्ष प्रेम कायम ठेवून, हें मानपत्र अर्पण करीत आहांत, यांत आम्हाला या मानपत्राचें खरें स्वारस्य दिसतें; व म्हणून, त्याचा स्वीकार करण्यांत आम्हाला विशेष समाधान वाटत आहे. संयुक्त दक्षिणी संस्थान हें संघराज्य केल्यानें आपल्या प्रजेला राज्यकारभारांतील विविध अंगोपांगांचा व कार्यपद्धतीचा जास्त व व्यापक अनुभव घेतां येऊन प्रजाहितार्चीं कामें मोठ्या प्रमाणांत व तातडीनें पार पाडतां येतील, व त्यामुळें सर्व प्रजाजनांच्या सुखसोयींत वाढ होऊन हें संयुक्त संस्थान समृद्ध अशा हिंदुस्थानचा एक घटक होईल, या इच्छेनें व आशेनें आम्ही संघराज्याचा पुरस्कार करून त्याच्या स्थापनेंत भागही घेतला; व भोर येथें ता. १७ ऑक्टोबर सन १९४७ रोजीं करारनाम्यावर ( Covenant ) बाकीच्या सहा अधिपतींबरोबर सहीही केली. पण, प्रचलित लोकमताचे वारे पाहतां, संघराज्यापेक्षां विलिनीकरणाचा मार्ग श्रेयस्कर आहे असें प्रजेला वाटल्यास, त्याप्रमाणें ‘ विलिनीकरणाच्या मार्गाला राजमंडळाकडून विरोध होणार नाहीं ’ असाही संयुक्त दक्षिण संस्थानच्या राजमंडळानें ता. २१-१२-४७ रोजीं ठराव केला. त्यास आमची मान्यता आहे, हें आम्ही आजच्या या प्रसंगानें मुद्दाम आपल्यापुढें मांडीत आहोंत. राजमंडळानें केलेल्या ठरावासंबंधीं हिंदुस्थानचे उपपंतप्रधान आणि संस्थानी खात्याचे मंत्री सरदार वल्लभभाई पटेल यांनीं त्यांचें अभिनंदन करून असें म्हटलें आहे कीं “ दक्षिणी संस्थानिकांनीं बदलत्या कालमानास अनुसरून वागण्याची तत्परता दाखवून आपला प्रगतिप्रिय दृष्टिकोन व्यक्त केला आहे, याबद्दल आम्हास आनंद वाटतो. ‘ प्रजेची इच्छा, हीच प्रजेचा भविष्यकाळ ठरविण्यास समर्थ आहे ’ या तत्त्वावर संघराज्याची योजना उभारली होती व तेंच तत्त्व आतांही अंगीकारण्यापासून राजाला व प्रजेला सुख व शांति निश्चितपणें लाभणारी आहे.”

विलिनीकरण हें श्रेयस्कर आहे किंवा नाहीं, याचा निर्णय कालानेंच होणारा आहे. तथापि, त्यापासून आम्हाला संमिश्र अशा सुखदुःखाच्या भावना वाटतात. दुःखद भावना म्हणजे आमच्या प्रजेचा व नोकरवर्गाचा आणि आमचा संबंध सुटणार आहे व त्यामुळें प्रजेचें आणि नोकरवर्गाचें हित आणि कल्याण करण्याची जी संधि आम्हास मिळाली होती, ती कायमची दुरावणार ही आहे. दुसरी गोष्ट म्हणजे आज सुमारें अडीचशें वर्षें आमचें भोर संस्थान सर्व आपत्तींतून व झगड्यांतून शिरसलामत वांचून कायम राहिलें असतां, त्याचें स्वतंत्र अस्तित्व नष्ट होणार, या कल्पनेनेंही आम्हांस वाईट वाटतें. पण, एक महत्त्वाची व चांगली गोष्ट म्हणजे आमच्या या निर्णयानें हिंदुस्तान अखंड व एकजिनसी होण्यास मदत होणार आहे; आणि त्यामुळें, अखंड हिंदुस्थानच्या व पर्यायानें भोर संस्थानच्या समृद्धीस व प्रगतीस हातभार लागणार आहे, ही आमची सुख-भावना आहे. त्याप्रमाणें या संस्थानचा उत्कर्ष व्हावा अशी श्रीप्रभुरामचंद्रचरणीं आम्ही प्रार्थना करतों व जें कांहीं उर्वरित आयुष्य आम्हाला लाभेल, त्यांत संस्थानच्या प्रगतीला जो कांहीं हातभार लावतां येईल, तो अवश्य लावण्याचें आम्ही आश्वासन देतों.

आजच्या या समारंभाच्या निमित्तानें एक दोन गोष्टी सांगितल्यावांचून राहवत नाहीं. आम्हास कळूं लागल्यापासून भोरमधील प्रजाहिताच्या गोष्टी करण्याकडे आमचें सर्वस्वीं लक्ष होतें व त्याप्रमाणें आम्ही युवराज असतांना जें कांहीं थोडें करतां येण्यासारखें होतें, तें केलें; व पुढें, आम्ही गादीवर बसल्या-नंतर, परिस्थितीस अनुसरून ज्या ज्या गोष्टी करतां येण्यासारख्या होत्या, त्या गोष्टी केल्या आहेत. त्या करतांना कांहीं वेळां नाइलाजानें, कांहीं वेळां चुकीनें अशा कांहीं अनिष्ट गोष्टी आमच्याकडून घडल्या असल्यास, त्या आम्ही कोणा-बद्दलही द्वेष न धरतां केल्या आहेत याची खात्री बाळगून, त्याबद्दल कोणत्याही प्रकारचा किंतु मनांत कोणींही बाळगूं नये, अशी आमची आग्रहाची विनंति आहे.

एवढें सांगून, आज ज्या स्मारकाची कोनशिला आम्हीं बसविली आहे, त्या स्मारकाचें मूर्त स्वरूपांत दर्शन लवकरच घडो अशी इच्छा प्रदर्शित करून, एक हजार १००० रुपयांची देणगी या स्मारकाकरितां देण्याचें जाहीर करतों;

व श्री. गोपिनाथपंत यांनीं विनंति केल्याप्रमाणें येलकें ह्या गांवास आजपासून " श्री शिवाजी नगर " असें नामाभिधान दिल्याचें जाहीर करून व पुन्हा एकवार मन:पूर्वक आपले आभार मानून, आम्ही आपली रजा घेतों.

श्रीमंतांनीं विलिनीकरणास मान्यता दिल्याबद्दल व त्यांच्या आजपर्यंतच्या राज्य-कारभाराच्या धोरणाबद्दल

## सुधागड येथील मानपत्र-समारंभ व इतर समारंभ

ता. ६ व ७ मार्च १९४८

वरील समारंभास श्रीमंतांची स्वारी सुधागडास गेली. ता. ६ रोजीं श्रीमंतांनीं लोकांनीं चालविलेलें ' वडेर हायस्कूल ' ह्यास भेट दिली. प्रथम रा. बापूसाहेब लिमये यांनीं भाषण केलें व श्रीमंतांस श्री. दादासाहेब साने यांच्या फोटोचें अनावरण करण्यास विनंति करून, हायस्कूलच्या प्रगतीसंबंधाची हकीगत निवेदन केली. श्रीमंतांनीं फोटोचें अनावरण करून, शाळेच्या प्रगती-संबंधानें आपली पसंति व्यक्त केली, व दरबारच्या कॅश बॅलन्स् रिझर्व्ह Cash Balance Reserve मधून वरील संस्थेस १०,००० दहा हजार रुपये द्यावेत, असा ठराव यापूर्वींच केल्याचें त्यांनीं जाहीर केलें.

त्यानंतर, श्रीमंतांची स्वारी सिद्धेश्वरास जातांना पाली-सिद्धेश्वर रस्ता जो नुकताच तयार करण्यांत आला होता, त्याचें उद्घाटन करून, सिद्धेश्वरास गेली.

श्रीमंतांची स्वारी ता. ७-३-४८ रोजीं समाजसेवासंघाच्या राजा रघुनाथराव क्रीडांगणावर गेली. तेथें श्रीमंतांनीं पहिल्या प्रथम महात्मा गांधींच्या वधाबद्दल सर्वांनीं दोन मिनिटें स्तब्ध उभें राहून श्रद्धांजलि द्यावी, अशी विनंति केली. त्याप्रमाणें सर्व दोन मिनिटें स्तब्ध उभे राहिले. नंतर रा. चिमणराव कुलकर्णी, वकील, यांनीं समाजसेवासंघाच्या रौप्य-महोत्सवाचा अहवाल वाचून दाखविला व रा. चं. गो. आगाशे, रा. आबासाहेब आठवले व रावसाहेब रानडे, माजी दिवाण, भोर स्टेट, यांच्या फोटोचें अनावरण करण्यासंबंधानें श्रीमंतांस विनंति केली. त्याप्रमाणें वरील फोटोचें श्रीमंतांनीं अनावरण केलें व Cash Balance Reserve मधून संघाला एक हजार १००० रुपये देण्याबद्दल ठराव केला आहे, असें जाहीर केलें.

नंतर, श्रीमंतांना मानपत्र देण्याच्या समारंभास सुरवात झाली. रा. गजाननराव धारप, वकील, यांनीं केलेल्या कवितांचें गायन झालें. त्या कविता मार्मिक असल्यामुळें खालीं दिल्या आहेत. नंतर, श्री. बाप्पासाहेब देशमुख यांनीं सुधागड तालुका प्रजेच्या अनेकविध उन्नतीबाबतच्या श्रीमंतांच्या राज्य-कारभाराच्या प्रशंसनीय धोरणाबद्दल व स्वार्थत्याग करून विलिनीकरणास मान्यता दिल्याबद्दल मानपत्र वाचून दाखविलें व तें श्रीमंतांस अर्पण केलें. ( मानपत्र खालीं दिलें आहे. ) नंतर, रा. सितारामपंत टिळक, बी. एजी., रा. आबासाहेब आठवले, प्रि. व्ही. के. जोशी, रा. केशवराव लिमये, रा. गोपाळराव भाटे, वकील, रोहें, ह्यांचीं वरील गोष्टीस पुष्टि देणारीं भाषणें झालीं.

नंतर, श्रीमंतांनीं उत्तरादाखल हृदयस्पर्शी भाषण केलें, त्यांमध्यें दुसऱ्याच दिवसापासून विलिनीकरण होणार, म्हणून दुःख वाटनें, तसेंच अखिल हिंदुस्थानांत संस्थान विलीन होऊन आपणांस मोठें कार्यक्षेत्र लाभणार म्हणून आनंदही वाटतो, असें सांगून संस्थानची विशेष भरभराट यापुढें होवो, अशी आशा प्रदर्शित करून, श्रीमंतांनीं आपलें भाषण संपविलें. त्या भाषणांतील कांहीं उतारे खालीं दिले आहेत.

श्री

## श्रीसचिवाभिनन्दन

( वृत्त—वसंततिलका )

श्रीमंत पंतनृपती तव दर्शनाला ।
हा नागरीकजन सर्व मिळूनि आला ।
जे राजनिष्ठहि सुधागडप्रांतवासी ।
ते सर्व लोक जमले नृपदर्शनासी ॥ १ ॥

( वृत्त—शार्दूलविक्रीडित )

शंकाजीपरि थोर पूर्वज तुझे स्वातंत्र्यसंरक्षणा ।
या प्रांतीं लढले कितीक असती साक्षात् तयांच्या खुणा ।
किल्ले कोट, तसेंच तक्तहि, तुझें दे साक्ष कीं आजला ।
तद्वंशीं रघुनाथ धन्य अससी भूपाल तूं आजला ॥ २ ॥

अठ्राशें अठराहि साल उगवे स्वातंत्र्य-अस्ताप्रती ।
जाये, त्या समयींहि दक्ष असती त्वद्वंशिचे भूपती ।
काला ओळखुनी तहास करुनी संस्थान हें राखिलें ।
बुद्धीच्याहि बळें पुरातन असें स्वातंत्र्य संरक्षिलें ॥ ३ ॥
केलें आजवरी रघूपतिपरी त्वां राज्य आम्हांवरी ।
नाहीं दीनदशाहि दुःख दिसलें, तें युद्धकालांतरीं ।
अन्नाची परिपूर्णता करुनियां केलें प्रजारक्षण ।
ऐशा पूज्य नृपाप्रती करितसों आम्ही प्रजा वंदन ॥ ४ ॥
झाला आज स्वतंत्र भारत पहा स्वातंत्र्य हिंदी जना ।
लाभे, तेंहि बलिष्ठ, पूर्ण नच हो केव्हांहि त्यागाविना ।
व्हावा खास अखंड भारत अशी बुद्धी धरोनी भली ।
सत्ता सोडुनियां विलीनकरणा त्वां मान्यता दीधली ॥ ५ ॥

( वृत्त—दिंडी )

प्रजावत्सल तूं भूप रघूनाथा ।
मानपत्रातें अर्पितसों आतां ।
दर्शनानें ही प्रजा धन्य होई ।
करी पूजा ती मान्य करुनि घेई ॥ ६ ॥

पाली,
ता. ७-३-४८

**गजानन लक्ष्मण धारप,**
रा. पाली.

श्री

सुधागड तालुका प्रजाजनांतर्फे हिज हायनेस राजा श्रीमंत सर रघुनाथराव बाबासाहेब पंडित, पंतसचिव, K.C.I.E., संस्थान भोर, यांना

## मानपत्र

श्रीमंत सरकार राजेसाहेब, आम्ही सुधागड तालुक्याचे ( संस्थान भोर ) प्रजाजन आपणांस अत्यंत आदरानें हें मानपत्र समर्पण करीत आहोंत.

ता. ८ मार्च १९४८ इ. रोजीं भोर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन करण्याचा जो निर्णय आपण घेतलात, तो अत्यंत प्रगतिपर व लोकशाही संस्थे-

वरील आपल्या विश्वासाचा द्योतक आहे. राजसत्तेचें लोकसत्तेंत रूपांतर होणें ही गोष्ट क्रांतिकारक असली, तरी क्रमप्राप्त आहे. आजच्या जगांत प्रजा हीच राज्याची प्रतिनिधि व शासनकर्ती आहे. हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर व हिंदुस्थान हें सार्वभौम-प्रजासत्ताक-संघराज्य बनल्यानंतर, हिंदी संस्थानी प्रजेच्या आकांक्षाही वाढल्या. त्या वाढत्या आकांक्षा लक्षांत घेऊन प्रथम आपण जबाबदार राज्यपद्धति आणि आतां विलिनीकरण करावयास तयार झालां, याबद्दल आपणांस द्यावेत तेवढे धन्यवाद थोडेच आहेत.

आम्ही आतां स्वतंत्र हिंदुस्थानचे नागरिक होत आहों, ही आनंदाची गोष्ट आहे. आपणच आम्हाला हा दर्जा प्राप्त करून दिलात, याबद्दल आम्ही कृतज्ञ आहों. स्वतंत्र राज्याचे नागरिक म्हणून नांदतांना, आम्ही संस्थानच्या परंपरेला व इभ्रतीला कोणताही कमीपणा येऊं देणार नाहीं, याबद्दल खात्री असावी.

आपला व आमचा, शास्ते व शासित हा, संबंध संपत असला, तरी भावी काळांत आपण आमचे नेते व मार्गदर्शक म्हणून आम्हांस साहाय्य करावें. भोर संस्थानचा इतिहास व परंपरा फार उज्ज्वल आहे. त्या परपरेची स्मृति आम्हांस साहाय्यभूत व अभिमानास्पद वाटेल. आपल्या अमदानींत आपण सुधागड तालुका सभा, समाज सेवासंघ, हरिजन सेवकसंघ, आदिवासी सेवा मंडळ, शेतकी संघ, सुधागड एज्युकेशन सोसायटी, वगैरे अनेक संस्थांतर्फे राजकीय, सामाजिक व शैक्षणिक लोकसेवा करण्याची उत्कृष्ट संधि आम्हांला दिलीत, त्यामुळें आपल्या संस्थानांत बऱ्याच प्रमाणांत समता स्थापन झाली. या समतेमुळें आम्ही सलोख्याचे संबंध स्थापूं व वाढवूं शकलों. म. गांधीप्रणित अनेक विधायक प्रवृत्तींचा प्रचार आमच्या या तालुक्यांत होण्यास आपली वृत्ति व दृष्टि कारणीभूत झाली, त्यामुळेंच गुदस्त सालीं कुलाबा जिल्ह्यांत हिंदु-मुसलमानांचे दंगे झाले व गेल्या महिन्यांत म. गांधींच्या अमानुप वधानें दुःखाचा डोंगर देशावर कोसळला, तरी आम्ही महात्माजींच्या अहिंसा तत्त्वानुसार या भागांत शांति राखूं शकलों. जातीय वाद नष्ट करणें व समता स्थापन करणें, हें आम्ही आपलें कर्तव्य समजतों. तें कर्तव्य पार पाडण्यास आपलें साहाय्य असावें.

आज आपला व आमचा राजकीय संबंध तुटत आहे, याबद्दल खेद वाटतो. पण, आम्ही आपलेच आहों व आपण आमचेच आहां, ही भावना

आमच्या अंतःकरणांत सतत राहील. राजा हा प्रजेचा सेवक असतो, ही महात्मा गांधींची शिकवण आज प्रत्यक्ष कृतींत येण्याची वेळ आली आहे, ही भाग्याचीच गोष्ट आहे.

पुनः एकदां आपल्या प्रजानिष्ठ वृत्तीबद्दल व समयज्ञतेबद्दल आपणांस धन्यवाद देतों. आपणांस दीर्घायुरारोग्य लाभो व आपलें साहाय्य आम्हांस मिळो, अशी आम्ही परमेश्वराची प्रार्थना करतों.

मक्काम पाली. रविवार ता. ७ मार्च १९४८ इ.

आपले नम्र,
सुधागड तालुक्याचे प्रजाजन
**गोविंद रामचंद्र लिमये,** ( अध्यक्ष )
स्वागत-समिती व सभासद.

श्री

समाजसेवा संघ, पाली, या संस्थेच्या रौप्यमहोत्सव-समयीं अध्यक्ष या नात्यानें व सुधागड प्रजाजनांनीं दिलेल्या मानपत्रास उत्तरादाखल

## श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेल्या भाषणांतील उतारा

रविवार, ता. ७-३-१९४८ वेळ दुपारीं ४ वाजतां

" पाली समाज सेवा संघाचे माननीय सदस्य व उपस्थित बंधू-भगिनींनो,

" मुंबईसारख्या प्रमुख शहरांत सोशल सर्व्हिस लीगसारखी संस्था चालविण्यांत किती अडचणी येतात, याची कल्पना केल्यावर, पालीसारख्या लहानशा गांवांत त्या धर्तीवर संस्था चालविण्याचें काम किती अवघड आहे, याची सहज कल्पना येण्यासारखी आहे. लहान गांवांत जातिनिरपेक्ष समाजसेवेचें व्रत अंगीकारून अशी पुढारलेली संस्था यशस्वितेनें चालविण्यांत अतिशय चिकाटीची, स्वार्थत्यागाची आणि सर्वसंग्राहकत्वाची जरूरी असते. समाजसेवा व देशसेवा या दोनही प्रकारच्या उच्च सेवाधर्मांमध्यें विशेष प्रकारचा जिव्हाळा व कळकळ ओतल्याशिवाय त्यांची खरी पूर्तता होणें अशक्य आहे; म्हणून, संघासारखी पवित्र कार्य करणारी संस्था स्थापन करणें व त्यानंतर पंचवीस वर्षें सतत

चालवून दाखविणें याकरितां काय प्रयत्न करावे लागत असतील, त्याची कल्पना त्या कामांत प्रत्यक्ष पडल्याखेरीज येणार नाहीं.

" आमच्या संस्थानांत पालीयेवढीं किंवा त्यापेक्षां मोठीं गांवें असतांही, सामाजिक सेवेचें व्रत चालविणारी संस्था पालींतच निघूं शकते, या गोष्टीकडे मात्र वरील सूचना करतांना आमचें दुर्लक्ष होत नाहीं, हें नमूद करावेंसें वाटतें. पाली हें पुढारलेलें गांव असून त्याचा हरघडी पुणें व मुंबई या दोनही मोठ्या शहरांशीं संबंध येत असल्यामुळें, समाजसेवा-संघाची कल्पना पालींत उत्पन्न झाली, ही गोष्ट खरी; पण, त्याचबरोबर संघाचे निरलस कार्यकर्ते श्री. चिमणराव कुलकर्णी व बापूसाहेब लिमये यांचे परिश्रम व एकाग्रतेनें आणि विशेष गाजा-वाजा न करतां सामाजिक सेवा पवित्र कर्तव्य म्हणून करण्याचें व्रत, याही गोष्टींनीं संघाच्या कार्यास चालना मिळाली आहे, याबद्दल त्यांचें या प्रसंगीं अभिनंदन करण्याची आम्ही संधि घेतों. 'प्रयत्नांतीं परमेश्वर' याप्रमाणें संघाच्या कार्याला हळूहळू, पण निश्चित, यशःप्राप्ति होत आहे. याची प्रचीति अहवालांतील देणग्यांच्या उल्लेखावरून दिसते.

" आज या संस्थानांतील तीन मान्यवर व्यक्तींचे फोटो संघाच्या इमारतींत आमच्या हस्तें अनावरण करण्यांत आले आहेत. त्यांच्याबद्दल गौरवोद्गार व्यक्त केल्याशिवाय आम्हांस राहावत नाहीं. या तीनही व्यक्ति निरनिराळ्या कार्य-क्षेत्रांत चमकून त्यांनीं आपल्याबरोबरच संस्थानचा नांवलौकिक संस्थानाबाहेर वाढवला, याबद्दल आम्हांस त्यांच्याविषयीं धन्यता वाटते. रावसाहेब विनायक गोविंद रानडे यांची संस्थाननिष्ठा व सुमारें तीन तपेंपर्यंतची संस्थानची अहोरात्र सेवा, या गोष्टी सर्वविश्रुत आहेत. अजूनही त्यांच्या वयोमानास अनुसरून संस्थानबद्दलची त्यांची आस्था आम्हांस परोपरी दिसून येते; व त्यांच्यांत प्रकर्षत्वें-करून दिसणाऱ्या गुणांचें आणि गाढ विद्वत्ता, अभ्यासू वृत्ति वगैरे गुणांचें चीज संघातर्फे जनतेकडून होत आहे, अशी आमची खात्री आहे. श्रीयुत चंद्रशेखर गोविंद आगाशे हे हल्लींच्या महाराष्ट्रांतील एक उद्योगपति असून, त्यांनीं आपल्या कर्तबगारीनें व व्यापार-धंद्यांतील हातोटीनें आपलें नांव सर्वतो-मुखीं केलें आहे. ते संस्थानचे रहिवासी आहेत. उद्योग-धंद्यांत होणाऱ्या लाभाचा विनियोग त्यांनीं निरनिराळ्या शिक्षणसंस्था वगैरेंची अभिवृद्धि व्हावी, याप्रीत्यर्थ

केला आहे. त्यांत आपल्या संस्थानांतील संस्थांकडेही त्यांचें पूर्णत्वानें लक्ष असल्याचें दिसून येतें. संस्थानचे रहिवासी स्वतःकरितां कार्यक्षेत्र कसें निर्माण करूं शकतात, याचें एक नमुनेदार उदाहरण त्यांनीं घालून दिलें आहे. श्रीयुत पुरुषोत्तम सदाशिव आठवले यांचें क्षेत्र या दोघांपेक्षां अगदीं भिन्न असूनही, त्यामध्यें त्यांनीं आपलें नांव संस्थानांत आणि संस्थानाबाहेरही कमावलें आहे. रायगड धर्मशाळा फंड, प्रतापगड देवालय जीर्णोद्धार फंड वगैरे संस्थांचें काम ज्या निःस्वार्थीपणानें व हिरीरीनें त्यांनीं केलें आहे, त्यावरून त्यांच्या सचोटीची व अविश्रांत खटपटीची कल्पना येते.

" समाज सेवासंघाबद्दल आम्हांस जी आपुलकी वाटते व त्या संस्थेच्या उपयुक्ततेबद्दल आमची जी खात्री झाली आहे, त्यावरून या संस्थेला देणगी-दाखल म्हणून रु. १००० एक हजार रुपये संस्थानच्या कॅश बॅलन्स रिझर्व्ह-मधून देण्याबद्दल आम्हीं ठराव केला आहे. त्याप्रमाणें त्या रकमेचा विनियोग निरनिराळ्या लोकोपयोगी कामांकडे केला जाईल अशी आमची खात्री आहे.

" आजच्या प्रसंगीं आणखी एक महत्त्वाची माहिती जाहीर करण्यांत आम्हांस विशेष आनंद वाटतो. आपल्या तालुक्यांतील लोकांच्या अडचणी लक्षांत घेऊन, आम्ही या तालुक्यांतील धान्याच्या निर्गतीवरील बंदीहुकूम काल तारीख ६ मार्च १९४८ पासून उठवले आहेत. त्याबद्दलचा दप्तरी हुकूम अलाहिदा कालच आम्हीं काढलेला आहे.

" आज आपण सुधागडनिवासी लोकांनीं आम्हांला मानपत्र अर्पण केलें आहे, त्याबद्दल प्रथमतः आम्ही आपले आभार मानतों. या मानपत्रांत आमच्या विषयींच्या आपल्या ज्या आदरपूर्ण व प्रेमयुक्त भावना व्यक्त झालेल्या आहेत, त्यांवरून आम्हांस सुमारें तीस ३० वर्षांपूर्वीं आम्ही युवराज या नात्यानें या तालुक्यास प्रथम भेट दिली, त्या दिवसाची आठवण होते. त्या वेळीं आपण आम्हांला जें मानपत्र समर्पण केलें, त्यांतीलच भावना, पण वृद्धिंगत स्वरूपांत, आज आमच्या प्रत्ययास येत आहेत. स्वार्थत्यागपूर्वक लोकोपयोगी आणि विधायक कार्य करण्याची हातोटी, त्याकरितां परिस्थितीस अनुसरून मार्गांत फेरबदल करण्याची मनाची तयारी व परस्पर जिव्हाळ्याचे संबंध न तुटतां कार्य फलदायी करण्याकडे असणारा मनाचा कल, या आपल्यामध्यें वसत असणाऱ्या विशिष्ट

गुणांची ओळख आम्हांस त्याच वेळीं पटली होती. त्यानंतरच्या आपल्या वाढत्या आणि निकट संबंधानें आपल्या या गुणांचें महत्त्व राज्यकारभारामध्यें किती आहे, याची आम्हांला प्रत्यक्षच खात्री पटल्यामुळें आमचें या तालुक्यासंबंधींचें प्रेम शेवटपर्यंत अविचलित राहिलें; व त्यामुळेंच, इतर तालुक्यांपेक्षां या तालुक्याला आमच्या भेटी जास्त देण्याचा योग आला. याच आपल्या गुणांनीं आपण आतां उगवणाऱ्या या नव्या मन्वंतरांत उच्च स्थान मिळवाल अशी आमची खात्री आहे; असो. मानपत्रांत आपण आमचा सर्व तऱ्हेनें गौरवच केला आहे. पण, आमच्यांत असणाऱ्या गुणदोषांची कल्पना आम्हांस पूर्णपणें असल्यामुळें, कांहीं वेळां आमच्याकडून चुका झाल्या असल्यास, त्यामुळें कोणासही दुखविण्याचा आमचा मानस नव्हता, ही आपण श्रद्धा बाळगावी.

"भोर संस्थानच्या इतिहासांतील आजचा हा शेवटचाच आणि अपूर्व असा प्रसंग आहे. उद्यांपासून भोर संस्थान मुंबई प्रांतांत सामिल होणार असून त्याचें स्वतंत्र अस्तित्व उरणार नाहीं. अशा या प्रसंगीं आमच्या भावना स्पष्टपणें उलगडून दाखविण्याचें काम फार बिकट आहे. आजच्या सुखदुःखाच्या परस्पर विरोधी भावना एकमेकांशीं इतक्या संलग्न झाल्या आहेत कीं, त्यांत आम्हांस तरी कोणत्याही प्रकारचा फरक करतां येत नाहीं. आज अडीचशें वर्षें संस्थानच्या अस्तित्वामुळें राजा व प्रजा यांच्या परस्पर सहकार्याचा जो निकट संबंध येत होता, त्या संबंधास उद्यांपासून आम्ही दुरावणार, या घटनेचें जसें आम्हांस दुःख वाटतें, त्याचप्रमाणें आमच्या प्रिय प्रजाजनांच्या वाढत्या आकांक्षांना विस्तीर्ण क्षेत्र मिळून त्यांना आपला उत्कर्ष करून घेण्याचें साधन आम्हांला त्यांना मिळवून देतां आलें, याबद्दल आम्हांस आनंदही वाटत आहे. संस्थानच्या स्थापनेच्या वेळीं आमचे परमपूज्य आद्यपुरुष ब्रह्मीभूत श्री शंकराजी नारायण यांनीं महाराष्ट्रांतील हिंदूंची प्रबळ संघटना करून महाराष्ट्र स्वतंत्र राखण्याचें श्रेय घेतलें, त्याप्रमाणें बदलत्या परिस्थितींत व कालमानास अनुसरून हल्लींच्या स्वतंत्र भारतामध्यें सर्व प्रांतांची जितकी प्रबळ संघटना होईल, तेवढी श्रेयस्कर आहे असें लक्षांत घेऊन, आम्ही संस्थानांचा वगैरे कोणताही प्रश्न त्याच्या आड येऊं नये, म्हणून भोर संस्थान बाकीच्या दक्षिणेंतील सात संस्थानांच्या बरोबर मुंबई प्रांतांत विलीन करण्याचा स्वयंस्फूर्त निर्णय घेतला आहे; व त्याची अंमल-

बजावणी उद्यापासून प्रत्यक्ष सुरू होणारी आहे. या निर्णयामुळें आज आम्हांस फार मोठा त्याग करावा लागत असला, तरी अखंड भारताच्या ध्येयांतील एक महत्त्वाचा टप्पा या दृष्टीनें, त्या त्यागांतही आम्हांस अत्यंत समाधान व आनंद वाटत आहे. आतां यापुढें प्रत्यक्ष राज्यकारभाराशीं आमचा संबंध येणार नसला, तथापि आमच्या प्रजेनें यापुढें त्यांना प्राप्त होणाऱ्या संधीचा जास्तींत जास्त उपयोग करून घेऊन आपल्या, व पर्यायानें सर्व हिंदुस्थानच्या, उत्कर्षास मदत करावी, अशी आमची उत्कट इच्छा आहे; व त्या दृष्टीनें होणाऱ्या प्रत्येक प्रयत्नास आमचा सतत हार्दिक पाठिंबा राहील, अशी आपण खात्री बाळगावी. प्रेमाचे पाश हे नाजुक पण फार बळकट असतात. त्याप्रमाणें तुमचे संबंध असल्यामुळें, ते परिस्थित्यनुसार जरी थोडे फार दुरावत असले, तरी तुटणार नाहींत हें निश्चित. तुम्ही आतां उद्यांपासून स्वतंत्र अखंड भारताच्या मालिकेंतील एक महत्त्वाचा दुवा बनणार आहांत, ही गोष्ट लक्षांत ठेवून भारताच्या उत्कर्षास तुम्ही बहुमोल हातभार लावाल अशी आम्हांस खात्री आहे. आपले पिढ्यानुपिढ्या असणारे संबंध आज सुटत आहेत. पण, आतां तुम्हांस स्वतंत्र भारतांत विशिष्ट स्थान मिळून हिंदुस्थानांतील सर्व जनता एकसमयावच्छेदेंकरून ज्या उच्च दर्जाच्या सुराज्याच्या ध्येयाप्रत जाऊं इच्छीत आहे, त्यांत तुम्हीही अंशभागी होणार आहांत.

" आज यापेक्षां जास्त आम्हांला कांहीं सांगावयाचें नाहीं. पण, एवढें विशेषत: स्पष्ट करणें जरूर वाटतें कीं, आमचे संस्थानी प्रजाजन एका मोठ्या राष्ट्राचे घटक म्हणून होणार असले, तरी त्यांच्या प्रामाणिक उत्कर्षाकडे केव्हांही आमचें लक्ष केंद्रित होऊन राहील, व त्या बाबतींत त्यांना आमची जरूरी जेव्हां जेव्हां लागेल, तेव्हां तेव्हां आम्ही नि:शंकपणानें व मोठ्या आनंदानें त्यांना सर्वतोपरी मदत करण्यास केव्हांही तयार आहोंत.

" सुधागड तालुक्याला आमची संस्थानचे अधिपति या नात्यानें ही अखेरचीच भेट आहे. यापुढें तालुक्याचें भवितव्य काय आहे, हें आज निश्चित नाहीं. पण, या भेटीच्या प्रसंगीं आपण सर्वांनीं आम्हांला अगत्यपूर्वक पाचारण करून, आमचा जो निरनिराळ्या तऱ्हेनें सन्मान केला, त्याबद्दल आम्ही आपणा सर्वांचे मन:पूर्वक आभार मानून निरोप घेतों."

वरील समारंभ संपल्यावर श्रीमंतांची स्वारी नंतर ताबडतोब पुण्यास निघून गेली.

श्रीमंतांच्या या सत्काराच्या व निरोपाच्या समारंभाबद्दलचें वर्तमानपत्रांतील स्फुट खालीं दिलें आहे.

## श्रीमंत भोरकरांच्या सत्कार-निरोपाचे समारंभ

ता. ८ मार्च सन १९४८ ही तारीख मुंबई प्रांतांतील दक्षिणी संस्थानांची हिंद संघराज्यांत विलीन होण्याची अखेरची होय ! हें समजून भोर संस्थानाधिपतींनीं सुधागड तालुक्याला प्रजेच्या इच्छेनें ता. ६ व ७ मार्च अशी दोन दिवस धावती भेट दिली. ह्या भेटींत समाजसेवासंघाचा रजत-महोत्सव, हायस्कूल-भेट, महिला मंडळ भेट, तालुक्यातर्फे त्यांना प्रेमपूर्वक मानपत्र-समर्पण इत्यादि पाली येथील भरगच्च कार्यक्रम व सिद्धेश्वर येथें पाली-सिद्धेश्वर तयार झालेल्या सडकेचा रस्ता रहदारीला खुला करण्याचा समारंभ, असे अनेकविध सुखदु:खमिश्रित कार्यक्रम झाले. लोकांच्या राजनिष्ठेच्या आनंदोर्मींचा खळखळाट व ८ मार्च रोजींची अपरिहार्य विलीनतेची अस्पष्ट दु:खद लाट सर्व कार्यक्रमांत दिसत होती.

ता. ६ मार्च रोजीं पाली-सिद्धेश्वर रस्ता श्रीमंतांच्या हस्तें खुला करण्याचें जाहीर झालें. तीनच दिवस अगोदर ही बातमी गांवचे पुढारी श्रीयुत बाबुराव दामले यांस कळविण्यांत आली. वेळ थोडा असतांनाहि शामियाना उभारून, उत्कृष्ट सजावट कुशलतेनें करण्याचें काम अक्षरश: रात्रीचा दिवस करून सिद्धेश्वर गांवच्या नागरिकांनीं केलें. सभेस सर्व समाज सुमारें ६०० तें ७०० पर्यंत उपस्थित होता.

## प्रकरण २४ वें

# महात्मा गांधींचा वध

ता. ३० जानेवारी १९४८ हा दिवस हिंदुस्थानांतच नव्हे, तर सर्व पृथ्वीतलावर दुर्दिन समजला गेला आहे, दुर्दिन समजला जात आहे व जगाच्या अंतापर्यंत तो दुर्दिनच समजला जाईल. प्रखर तेजानें सूर्य तळपत असतांना त्या दिवशीं जें अमानुष कृत्य घडलें, त्यानें या दिवसाला काळिमा आगली. हें अमानुष कृत्य म्हणजे हिंदुस्थानला राजकीय स्वतंत्रता प्राप्त करून देणारी दिव्य विभूति, अखिल राष्ट्रानें केवळ पित्याच्या ठिकाणीं नव्हे तर प्रत्यक्ष देवासमान मानलेले, परमपूज्य महात्मा गांधीजी यांचा त्या दिवशीं सूर्य-प्रकाशांत भरदिवसां खून झाला, हें होय. या दिवशीं ५ वाजतां दिल्ली येथें बिर्ला हाउसपुढील प्रार्थना-मैदानांत नित्याच्या प्रार्थनेकरितां पूज्य गांधीजी उपस्थित झाल्याबरोबर, एका पिसाटानें बेहोषपणें त्यांच्यावर पिस्तुलानें चार गोळ्या झाडल्या व महात्माजी भूमितलावर कोसळले. त्यांच्या शिष्यगणांनीं ताबडतोब उचलून त्यांना बिर्ला-भवनांत नेलें. तेथें सुमारें ३५ मिनिटांनीं म्हणजे सायंकाळीं ५ वाजून ३५ मिनिटांनीं महात्माजींचा आत्मा त्यांच्या नश्वर देहाचा त्याग करून पंचमहाभूतांत—परमात्मा स्वरूपांत—विलीन झाला. महात्माजींवर गोळ्या झाडल्यामुळें त्यांचें प्राणोत्क्रमण झाल्याची वार्ता दिल्ली येथील नभोवाणी केंद्रानें प्रक्षेपित केली व पांच मिनिटांच्या अवधींत पृथ्वीच्या कानाकोपऱ्यापर्यंत ती जाऊन पोहोंचली. महात्माजींच्या वधाची भयंकर वार्ता एकाएकीं कर्णीं आल्यामुळें सर्व जनता स्तंभित होऊन दुःखसागरांत बुडून गेली. सर्वत्र हलकल्लोळ उडाला. महात्माजींच्याविषयीं सर्व जगांतील लोकांच्या मनांत अलोट आदर व प्रेम वसत होतें. त्यामुळें ही वार्ता सहन करणें सर्वांना अत्यंत कठिण होऊन गेलें. वार्तेवर विश्वास न बसल्यानें, ती खरी कीं खोटी हें समजावें, म्हणून कित्येकांनीं तारा केल्या व खुलासे विचारले. पण, सर्वांच्या दुर्दैवानें वार्ता सत्य, त्रिवार सत्य, हेंच उत्तर मिळालें. ' वाईट वार्ता ही असत्य ठरत नाहीं, '

या म्हणीचा सर्वांस अनुभव आला. संध्याकाळीं सहा वाजतां दिल्ली नभोवाणी-केंद्रानें महात्माजींच्या हत्येचें दुःखद वृत्त जाहीर केलें. दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांत हत्या करणाराचें नांवही प्रसिद्ध झालें. पुणें येथील ‘दैनिक हिंदुराष्ट्र’ वर्तमानपत्राचा संपादक नथुराम विनायक गोडसे या ब्राह्मणानें महात्माजींवर गोळ्या झाडल्या असें प्रसिद्ध झालें.

वरील दुःखद हकीगत श्रीमंतांस समजतांच त्यांनीं खालीलप्रमाणें सरदार वल्लभभाई पटेल Minister for States यांना तार केली,

Express
31-1-48

Sardar Vallabhabhai Patel,
Minister for States
NEW DELHI

Extremely grieved to hear the death of Mahatma Gandhi. Prayers for the departed soul and Hartal was observed and offices closed in Bhor and procession of his Photo was taken out through Bhor town. Please convey my deepest condolences to the family of Mahatma Gandhi.

RAJA OF BHOR.

व खालील मजकुराचें स्पेशल जादा गॅझेट काढलें:

## भोर स्टेट जादा गॅझेट

महात्मा मोहनदास करमचंद गांधी हे दिल्लीमध्यें ता. ३० जानेवारी १९४८ रोजीं त्यांच्या नित्य नियमास अनुसरून संध्याकाळीं ५ वाजतां प्रार्थना-स्थळीं जात असतां त्यांच्यावर चार गोळ्या झाडण्यांत आल्या; व त्यामुळें नंतर पसतीस मिनिटांनींच त्यांचें प्राणोत्क्रमण झालें, ही भारताच्या इतिहासांतील अत्यंत शोकदायक घटना नमूद करण्यास भोर दरबारास अत्यंत दुःख होत आहे. त्यांचा मारेकरी एक महाराष्ट्रीय ब्राह्मण निघावा, ही अखिल हिंदु समाजास काळिमा आणणारी गोष्ट आहे, असें नमूद करण्यास भोर दरबारला फार खेद होत आहे.

महात्मा गांधींचें नांव घेतल्याबरोबर सर्व आयुष्य त्यांनीं ज्या तत्त्वां-करितां खर्च केलें, तीं दोन तत्त्वें—सत्य व अहिंसा—सर्वांच्या डोळ्यांपुढें उभीं राहतात. या तत्त्वांवरची त्यांची अढळ श्रद्धा कोणत्याही परिस्थितींत विचलित झाली नाहीं, याची खात्री त्यांनीं नुकतेंच कांहीं दिवसांपूर्वीं दिल्लींत प्राणांतिक उपोषण सुरू केलें, त्या वेळीं पटली. ही श्रद्धा हिंदुस्थान देशाच्या अंतिम हिताच्या दृष्टीनें योग्य होती किंवा अयोग्य होती, याचा निर्णय कालांतरानें लागणार आहे; पण, हिंदुस्थानला आज जो दर्जा लाभला आहे, त्याचें श्रेय सर्वस्वीं महात्माजींकडेच जातें, यांत शंका नाहीं. त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्वामुळें व मार्गदर्शनामुळें हिंदुस्थानचा स्वातंत्र्याचा मार्ग सुकर होऊन कल्पनेपेक्षां अगोदर म्हणजे १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिंदुस्थानचें भवितव्य ठरवण्याची जबाबदारी हिंदी लोकांवरच सोपविली गेली. यामुळें अकल्पित अशा कांहीं कांहीं भीषण घटना घडल्या व अद्यापिही त्या घडत आहेत. या घटनांतून सुखरूपपणें बाहेर पडून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य अबाधित राहावें व हिंदुस्थानचा राजकीय दर्जा परराष्ट्रांत वाढत्या प्रमाणावर उच्च असावा, या दोन्ही कार्यांमध्यें महात्माजींचें मार्गदर्शन यापुढेंही उपकारक ठरलें असतें. उच्च पातळीवरून मिळविलेलें स्वातंत्र्य, त्याच उच्च रीतीनें टिकविणें ही अतिशय अवघड भूमिका आहे; व अशा आणीबाणीच्या वेळीं महात्माजींसारखी 'युगप्रवर्तक' व्यक्ति आपणांमधून कायमची जावी, याबद्दल मनास अतिशय हळहळ वाटते.

महात्मा गांधींच्या शोकजनक मृत्यूमुळें हिंदुस्थान देशाचाच नेता गमावला असें नाहीं, तर जगांतील सर्व राष्ट्रांतील एकमेव नेता गेला असें म्हणावयास हरकत नाहीं. अशा या राष्ट्रपुरुषास योग्य तिलांजली देण्याचें कार्य, म्हणजे त्याच्या तत्त्वांचा प्रसार करणें हेंच होय. त्यामुळेंच जगांतील वैमनस्य नष्ट होऊन, परस्पर बंधुता वाढेल व युद्धासारख्या मानवनिर्मित आपत्ति पुन्हा उद्भवणार नाहींत.

महात्मा गांधींच्या मृत्यूमुळें भारतावर दुःखाचा डोंगरच कोसळला आहे. पण, त्यांतल्या त्यांत त्यांचें अर्धवट राहिलेलें कार्य पूर्ण करण्याची जबाबदारी पंडित जवाहरलाल नेहरू, सरदार वल्लभभाई पटेल वगैरे ज्या विश्वासू सेनानींवर

पडली आहे, त्यांच्या दुःखास तर पारावार राहिला नाही. त्यांच्या व महात्मा गांधींच्या नातलगांच्या दुःखांत भोर दरबार सहभागी आहे.

महात्मा गांधी यांचें ता. ३० जानेवारी १९४८ रोजीं दिल्ली येथें त्यांच्यावर केलेल्या भीषण अत्याचाराच्या हल्ल्यानंतर देहावसान झालें, ही अत्यंत शोचनीय गोष्ट नमूद करण्यास भोर दरबारांस अतिशय दुःख होत आहे. त्यांच्या शोकदिनाप्रीत्यर्थ भोर संस्थानांतील सर्व शाळा, व सरकारी कोर्टकचेऱ्या यांना गुरुवार ता. १२ फेब्रुवारी १९४८ रोजीं सुट्टी देण्याचें ठरविण्यांत येत आहे.

---

महात्मा गांधींच्या निधनानंतर चौदाव्या दिवशीं भोर मुक्कामीं नीरा नदीच्या वाळवंटावर त्यांच्या आत्म्यास श्रद्धांजली अर्पण करण्यांत आली. त्या वेळची हकीगत, तसेंच श्रीमंतांनीं अर्पण केलेल्या श्रद्धांजलीसंबंधाचें पत्र खालीलप्रमाणें आहे :

## कै. महात्मा गांधींना श्रद्धांजली

जगद्वंद्य कै. महात्मा गांधी व भरतभूमीस स्वातंत्र्याप्रत नेणारा राष्ट्रपिता, यांच्या अमानुष वधाच्या चौदाव्या दिवशीं, ता. १२ फेब्रुवारी १९४८ रोजीं, त्यांना श्रद्धांजली अर्पण करण्याकरितां भोर येथील सर्व नागरिकांची सभा पवित्र नीरा नदीच्या कांठीं वाळवंटांत भरली होती. सभेस अदमासें दोन-अडीच हजार समुदाय हजर होता. सभेचें काम पुण्याचे ॲडिशनल डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट रा. सोनटक्के यांच्या अध्यक्षतेखालीं 'वैष्णव जन तो' या महात्माजींच्या आवडत्या गीतगायनानें रा. वाकणकर गवयी यांनीं सुरू केलें. या गीताप्रमाणें ( किंबहुना यापेक्षांही जास्त प्रमाणावर ) महात्मा गांधींचें आचरण असल्यामुळें, तें सबंध गीत खालीं देण्यांत येत आहे :

कै. महात्मा गांधीजींचें नरसी मेहताकृत आवडतें गीत ( गुजराथी )

वैष्णव जन तो तेने कहिये। जे पीड पराई जाने रे ॥
परदुःखे उपकार करे तोये। मन अभिमान न आणे रे ॥ १ ॥

सकल लोकमा सहु वंदे । निंदा न करे केनी रे ।।
वाच काछ मन निश्चल राखे । धन धन जननी तेनी रे ।। २ ।।

समदृष्टीने तृष्णा त्यागी । परस्त्री जेने मात रे ।।
जिव्हा थकी असत्य न बोले । परधन नव झाल हाथ रे ।। ३ ।।

मोह माया व्यापे नहिं जेने । दृढ वैराग्य जेना मनमां रे ।।
रामनाम शुं ताळी लागी । सकल तीरथ तेना तनमां रे ।। ४ ।।

वण लोभीने कपटरहित छे । कामक्रोध निवार्या रे ।।
भणे नरसैंय्या तेनु दरसन करता । कुळ एकोतेर तार्या रे ।। ५ ।।

महात्माजींच्या ध्येयास अनुलक्षून रा. फडणीस मास्तर यांनीं गीतेंतील अध्याय, श्री. गुप्ते वकील यांनीं बायबलांतील उतारे व रा. मह्रू काजी यांनीं कुराणांतील प्रार्थना वाचल्या. सभेसाठीं हिज हायनेस श्रीमंत बाबासाहेब पंत-सचिव यांनीं पुढील संदेश पाठविला होता, तो वाचून दाखविण्यांत आला.

## हिज हायनेस श्रीमंत राजेसाहेब यांची श्रद्धांजली

" आजच्या दिवसाचें गांभीर्य व महत्त्व किती आहे, हें विशद करून सांगण्याची जरूरी नाहीं. पूज्य, माननीय, महात्माजी यांनीं इहलोकीची आपली लोककल्याणाची यात्रा एकदम थांबविली, त्याला आज १४ दिवस झाले. महात्मा गांधींचा वध करणें व एकाद्या कोवळ्या बालकाचा वध करणें हें सारखेंच, असें एकानें म्हटलें, तें अगदीं अक्षरश: खरें आहे. महात्माजींच्या आयुष्यांतील ठळक गोष्टींचा चित्रपट आपणां सर्वांना माहीत आहे. त्यांनीं आपलें सर्व आयुष्य मानवी उद्धारासाठीं व लोककल्याणासाठीं खर्च केलें, यांत अतिशयोक्ति बिलकूल नाहीं.

" सत्य, अहिंसा, सहिष्णुता व समता या चार मंत्रांनीं त्यांनीं हिंदुस्थानच काय, पण सगळें जग भारून टाकलें होतें. भगवद्गीतेंतील शिकवण पुरी पुरी त्यांनीं आचरणांत आणून लोकांना मार्गदर्शन केलें. गीतेंतील स्थितप्रज्ञांच्या अंगांतील सर्व गुण महात्माजींच्या अंगांत वसत होते. कसलाही प्रसंग येवो, त्यांची वृत्ति अचल राही. गीतेंत म्हटल्याप्रमाणें ' हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम् । '

हें वचन महात्माजींच्या बाबतींत तंतोतंत लागू पडतें. योद्ध्यावर समरांगणीं, तसेंच लोकहिताचें कंकण बांधलेल्या व्यक्तीला लोककल्याणाचें कार्य करीत असतांना, जर मृत्यूनें गांठलें, तर निःसंशय त्याचा आत्मा स्वर्गस्थ होतो. स्वधर्मावर अढळ श्रद्धा, पण परधर्मसहिष्णुता ही त्यांच्या ठिकाणीं परम कोटीला गेलेली होती. पूज्य महात्माजींचें जीवन म्हणजे कोहिनूर हिऱ्यासारखें होतें. त्याचें जितकें वर्णन करावें, तितकें केव्हांहि अपुरेंच पडणार. श्रीराम व रावण यांचें युद्ध कसें झालें, असें कोणीं विचारलें, तर त्याचें सरळ उत्तर म्हणजे राम-रावण यांच्या युद्धासारखेंच असेंच येतें. त्याप्रमाणें गांधीजींचें जीवन म्हणजे गांधीजींच्याचसारखें असेंच म्हणावें लागतें.

"या वेळीं जास्त वर्णन करण्याची जरूरीच नाहीं. शेवटीं, एका गोष्टीचा उल्लेख प्रामुख्यानें करणें, हें आम्ही आपलें कर्तव्य समजतों. महात्माजींच्या आकस्मिक निधनानें जनता दिङ्मूढ होणें अगदीं साहजिक होतें. पण, त्या-नंतर इतरत्र, त्याचप्रमाणें आपल्या संस्थानच्या हद्दींत, क्रूर अमानुष असे जे जाळपोळीचे प्रकार झाले, ते मात्र मानवतेला कालिमा लावणारे घडले, असें कोण म्हणणार नाहीं? महात्माजींची अहिंसा व सहिष्णुता यांची शिकवण प्रत्येकानें, म्हणजे तो कोठल्याही जातीचा असो, आपल्या अंगांत बाणून दाखविली पाहिजे; तरच, महात्माजींच्या आत्म्याला शांतिसुख लाभेल; नाहीं तर, त्यांचा आत्मा व्यथित होऊन दुःखी होईल. पुढचा काळ उज्ज्वल व्हावा अशी जर इच्छा असेल, तर सर्व जमातींनीं एकत्र येऊन मनोभावानें देशहिताकडे लक्ष देऊन, सत्य-अहिंसेचें व्रत तंतोतंत पाळलें पाहिजे. आज आम्ही स्वतःच येणार होतों, पण प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें येतां आलें नाहीं. शरीरानें नसलों, तरी मनानें आम्ही तेथेंच हजर आहोंत. आम्हांस वाटणाऱ्या भावनांचें थोडक्यांत संकलन आम्ही या द्वारां आपणांपुढें ठेविलें आहे. अखेर, पूज्य माननीय महात्माजी यांच्या आत्म्यास प्रभु श्रीरामचंद्र चिरशांति व सद्गति देवो, अशी प्रार्थना करून आमचे शतशः प्रणाम महात्माजींना अर्पण करतों."

(सही) **आर. एम्. पंतसचिव,**

राजेसाहेब, सं. भोर.

संदेशवाचनानंतर निरनिराळ्या वक्त्यांचीं महात्माजींच्या गुणवर्णनपर व कार्यदर्शक अशीं भाषणें झालीं. त्यांत, प्रथम मंत्री ना. गोपिनाथपंत पोतनीस यांनीं महात्माजींच्या कार्याची माहिती सांगून त्यांनीं प्रतिपादलेल्या सत्य व अहिंसा या व्रताचें सक्रिय आचरण करण्याबद्दल कळकळीचा उपदेश केला. श्री. लिमये वकील यांनीं, महात्माजींनीं आमरण केलेल्या लढ्याबद्दल माहिती सांगून, त्यांच्या विशिष्ट व अभिनव तत्त्वप्रणालीमुळें त्यांना जगद्वंद्यता मिळवतां आली, असें सांगितलें. ना. साळुंखे यांनीं सत्य व अहिंसा यांच्या प्रतिपालनांतच महात्माजींच्या आत्म्यास खरी शांति लाभेल, असें प्रतिपादिलें. ना. वाळिंबे यांनीं महात्माजींचा नश्वर देह नष्ट झाला, तरी त्यांचा अमर आत्मा हिंदी जनतेवर लक्ष ठेवील हें लक्षांत ठेवून, त्यांची विश्वबंधुत्वाची शिकवणूक पाळावी असें सांगितलें. रा. भोसले यांनींही सत्य-अहिंसेचा उपदेश केल्यावर, अध्यक्ष श्री. सोनटक्के यांनीं महात्माजींच्या तत्त्वाचें थोडक्यांत विवरण करून, तीं तत्त्वें प्रत्यक्ष आचरणांत आणल्यास, महात्माजींच्या आत्म्यास शांतीचा लाभ होईल, असें सांगून जमलेल्या नागरिकांना नीरा नदीवर जाऊन महात्माजींना श्रद्धांजली अर्पण करण्याबद्दल विनंति केली. त्याप्रमाणें सर्व नागरिकांनीं नीरेच्या पावन तीर्थानें व स्वतःच्या अश्रुजलानें श्रद्धांजली अर्पण करून, कै. महात्माजींच्या चरणीं आपला शेवटचा प्रणाम सादर समर्पण केला, आणि जड अंतःकरणानें मंडळी घरोघर परतली.

## श्री. राजेसाहेब यांची महात्मा गांधींच्या स्मारकास देणगी

महात्मा गांधींचें स्मारक करण्याकरितां उभारलेल्या अखिल भारतीय स्मारक निधीस रु. १५००० पंधरा हजार व भोर संस्थानमध्यें उभारावयाच्या स्मारकासाठीं रु. ५००० पांच हजार श्रीमंत राजेसाहेब यांनीं देणगी दिली.

पहिल्या देणगीसंबंधीं श्रीमंत राजेसाहेबांना पुढीलप्रमाणें पत्र आलें.

Dear Sir,

The Congress President, who is unwell and is not at Pilani, has received your letter of the 25th July 1948 and desires me to convey his grateful thanks to you for your kind donation of Rs. 15,000- to the Gandhi National Memorial Fund,

Yours sincerely,
Sd./ P. B. CHANDAWANI
Office Secretary

Shri Raja Sahib of Bhor,
Laxmi Vilas, Nathan Road,
POONA.

ज्या महात्माजींनीं अखिल हिंदुस्थानाकरतां, म्हणजेच त्यांतील अखिल लोकांकरतां, धर्म-जाति-मत-पंथादींचा भेदभाव लक्षांत न घेतां, आपल्या ह्यातीच्या जवळजवळ सर्व कालांत अत्यंत कष्ट सोसून देशाला स्वातंत्र्य मिळवून दिलें, त्या महापुरुषाचा हिंदुसमाजांतीलच एकानें, व तोही ब्राह्मणानें, वध केला ही केव्हांही निःसंशय अत्यंत लाजिरवाणी व शोचनीय गोष्ट आहे. ही गोष्ट घडून आल्याचें समजल्यावर, एका ब्राह्मणानें वध केला म्हणजे सर्व ब्राह्मण समाजास तें त्याचें माथेफिरूपणाचें दुष्कृत्य संमत होतें असें समजतां येत नाहीं व तो समाज त्याबद्दल जबाबदारही होऊं शकत नाहीं, ही साधी, समंजसपणाची व विवेकाची गोष्ट दुर्लक्षित करून, महाराष्ट्रांतील गुंडांनीं तिचा फायदा घेऊन, ब्राह्मणांचीं घरें व इतर मालमत्ता जाळण्याचा सपाटा सुरू केला, ती गोष्टही तितकीच कोणाही प्रतिष्ठित गृहस्थास, मग तो कोणत्याही जातीचा वा मताचा असो, शरमेनें मान खालीं करावयास लावणारी व दुःखदायक अशीच आहे. गुन्हेगारास कायद्यानुसार त्याच्या दुष्कृत्याबद्दल प्रायश्चित्त द्यावयास शासन-संस्था समर्थ असतां, एका व्यक्तीनें अथवा विशिष्ट मताच्या व्यक्तिसमूहानें कायदा आपल्या हातीं घेणें हीच अगोदर गर्हणीय गोष्ट आहे, व त्यांतही

निरपराधी लोकांविरुद्ध जाळपोळीच्या स्वरूपानें त्याची बजावणी करण्यास प्रवृत्त होणें, ही गोष्ट तर माणुसकीला सोडून व म्हणूनच त्यापेक्षां जास्त तिरस्करणीय आहे. पण, दुर्दैव हें कीं, ती गोष्ट घडून आली. गुंडाला महात्मा गांधी काय व सामान्य माणुस (Man in the street) काय, दोघे सारखेच असतात. समाजांत असे गुंड, कांहीं उघडपणें व कांहीं प्रच्छन्नपणें–म्हणजे एखादें सुसंस्कृत नांव धारण करून–वावरणारे असतातच. आपला नीच स्वार्थ साधण्यास व खाजगी सूड उगवून घेण्यास योग्य संधीचीच ते नेहमीं वाट पहात असतात. त्यांतही मोठ्यांच्या नांवाखालीं अथवा त्या नांवाचा बाह्यतः फायदा घेऊन आपल्या अंतस्थांतील द्वेषास वाट मोकळी करून दुष्ट कृत्य करतां येण्यासारखी एखादी संधि अनायासें प्राप्त झाली आहे असें त्यांना वाटल्यास, ती महापर्वणी समजून, ती साधण्यास व तिचा दुरुपयोग करण्यास ते कसे चुकतील व कचरतील? अर्थात्, परिस्थितीचा गैरफायदा घेऊन पुणें, सातारा, विजापूर, बेळगांव इत्यादि जिल्ह्यांतील व तसेंच सांगली, मिरज, कोल्हापूर, कुरुंदवाड, भोर, वगैरे संस्थानांतील गुंड लोकांनीं ब्राह्मणांचीं घरें, कारखाने, वगैरे लुटून व जाळून फस्त केलीं. त्यांत लाखों रुपयांची मालामत्ता नष्ट झाली व सुमारें दहा हजार ब्राह्मण मंडळी–स्त्री, पुरुष व मुलें मिळून–निराश्रित व निर्वासित झालीं. कित्येक ठिकाणीं तर, हाणमार व खून करण्यापर्यंत गुंडांची राक्षसी वृत्ति पोंचली. गांधीवधानंतर सुमारें एक आठवडा हा धुमाकूळ चालू होता. त्याची उठावणी सर्वत्र इतकी एकसमयावच्छेदेंकरून व एकाच साच्याची दिसून आली कीं, त्यास वावटळ न म्हणतां, ती बुद्धिपुरःसर आखलेली व अंमलांत आणलेली मोहीमच होती असें म्हणणें भाग पडतें. सर्व ठिकाणच्या गुंडांच्या जाळ्यांनीं या वेळीं आपली हातमिळवणी केल्यासारखें उघड दिसून आलें. मुंबई सरकारनें ठिकठिकाणीं सैन्य व हत्यारी पोलीस पाठविणें, कर्फ्यू पुकारणें, क्रि. प्रो. को. कायद्याचें क. १४४ लागू करणें, वगैरे उपाय योजून गुंडगिरीचे हे प्रकार कह्यांत आणले.

भोरासही या वणव्याची झळ लागण्याचें राहिलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर ती कमी लागली नाहीं. संस्थानांतील–विशेषतः, विचित्रगड, राजगड व प्रचंडगड या तालुक्यांतील–सुमारें तीस गांवांतील ब्राह्मणांचीं बहुतेक सर्व घरें

आंतील सामान-सुमानासह जाळलीं गेलीं. भोर, शिरवळ, नसरापूर व वेल्हें या गांवांनाही या दंगलीची थोडी फार आंच पोंचली. भोरजवळील कापडाच्या गिरणीचा कांहीं भाग व मालही आगीच्या भक्षस्थानीं पडला. शिरवळनजीकचें हॉस्पिटल जाळून टाकण्यांत आलें. या गुंडगिरींत सुमारें ४ लक्ष रुपयांपर्यंत मालमत्तेचें व ८०० तें १००० खंडीपर्यंत धान्याचें नुकसान भोर संस्थानचें झालें आहे, असा अंदाज आहे. खुद्द भोर ह्या राजधानीच्या गांवावर ही धाड येण्याची भयप्रद स्थिति उत्पन्न होऊन, ब्राह्मण जनता हवालदिल झाली होती. कारण, तेथेंही ' अग्नी तो चेतवावा रे । चेतवितांचि चेततो ॥' या समर्थोक्ती-प्रमाणें, प्रच्छन्न गुंड आपल्या अनुयायांना चेतविण्याच्या प्रयत्नांत आहेत अशा दाट वदंता पसरल्या होत्या व गांवांतील ब्राह्मणांचीं घरें केव्हां भस्मसात् होतील याचा नेम नव्हता. अशी गंभीर परिस्थिति ता. ६ फेब्रुवारी १९४८ इ. रोजीं उत्पन्न झाली होती. संस्थानचा पोलीस फोर्स ही दंगल शमविण्यास अपुरा होता; सबब, पुणें सब-एरिया कमांडकडे हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यानीं विनंति केल्यावरून, ताबडतोब एक प्लाटून रातोरात भोरला रवाना झालें. पण, तेवढयानेंही परिस्थिति आटोक्यांत येईल असें चिन्ह न दिसल्यानें, श्रीमंत राजेसाहेब यांनीं संस्थानचीं, कायदा व सुव्यवस्था हीं, खातीं ताब्यांत घेऊन दंगलीपासून संस्थानचें संरक्षण करावें, अशी मुंबई सरकारचे गृहमंत्री व दक्षिणेंतील संस्थानचे कोल्हापूर येथील रीजनल कमिशनर यांना तारेनें विनंति केली.

या तारेवरून गृहमंत्री ना. मुरारजी देसाई यांजकडून पुण्याचे डि. मॅ. यांस या दिवशींच हुकूम आला, व पुण्याच्या कलेक्टरचे पर्सनल असिस्टंट रा. डी. ए. सोनटक्के, बी. ए., यांची ॲडिशनल डि. मॅ., सं. भोर, म्हणून नेमणूक झाली. ता. ६ रोजीं रात्रीं पुणें येथील मि. नानावटी, ॲ. डी. एस्. पीं. व आणखी मिलिटरीचें एक प्लॅटून ( २५ लोक ) भोरास गेलें. रात्रीं ३ वाजतां ते सर्व लोक भोरास पोचले. अगदीं योग्य वेळीं ही मिलिटरी आल्या-मुळें खुद्द भोर शहर या दंगलीपासून बचावलें. ता. ७ रोजीं सकाळीं ॲ. डि. मॅ. मि. सोनटक्के यांनीं भोर संस्थानच्या, कायदा व सुव्यवस्था, या खात्यांचा ताबा भोरचे डि. मॅ. रा. वामन गणेश रानडे यांजकडून घेतला; व ताबडतोब

विचित्रगड व राजगड भागांत ज्या ज्या गांवीं दंगल व जाळपोळ झाली होती, तेथें मिलिटरीच्या व पोलिसच्या तुकडया पाठवून शांतता प्रस्थापित केली. जळीत झालेल्या गांवच्या दंगलींत भाग घेतल्याच्या संशयावरून निरनिराळ्या गांवांच्या सुमारें ५०० लोकांना क्रमाक्रमानें अटक केली. एक शांतता कमिटी स्थापून त्या कमिटीनें तालुक्याच्या मुख्य ठिकाणास भेटी दिल्या व लोकांना शांतता राखण्याची विनंति केली. दंगेखोरांना दहशत बसावी, म्हणून ज्या ज्या गांवीं दंगल होईल, त्या त्या गांवावर सामुदायिक दंड बसविला जाईल असा जाहीरनामा सर्व गांवांतून प्रसिद्ध केला.

महात्मा गांधींचा वध करण्याकरितां एक कट केल्याचा सुगावा हिंदुस्थान सरकारला लागला. पुढें राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, मुस्लीम नॅशनल गार्ड्स, मुस्लीम गार्ड्स, खाकसार लीग इत्यादि जातीय भूमिकेवर चाललेल्या संस्था हिंदुस्थान सरकारनें बेकायदेशीर ठरविल्या. त्याप्रमाणें श्रीमंत राजेसाहेब यांच्या हुकुमानें संस्थानांतील या वरील संस्थांच्या शाखा बेकायदेशीर ठरविण्यांत आल्या व त्यांच्या ऑफिसांची झडती घेण्यांत आली.

या दंगलींत निर्वासित झालेल्या लोकांना कपडे व धान्य दरबारकडून पुरविण्यांत आलें. याशिवाय, त्यांना मदत देण्यासाठीं श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. ८००० आठ हजार मंजूर केले.

भोर संस्थानांत झालेल्या दंगलीची हकीगत, 'ज्ञानप्रकाश' ता. ४ एप्रिल १९४८ च्या अंकांत छापलेली आहे. त्याचा उतारा खालीं दिलेला आहे.

ज्ञानप्रकाश, ता. ४ एप्रिल १९४८

## भोर संस्थानांत झालेली दंगल

### चार लाख रुपयांवर नुकसान

### ५०० लोकांना अटक : १२५ लोकांवर खटले

पुणें, दि. ३:—म. गांधींच्या वधानंतर महाराष्ट्रांत जी दंगल झाली, त्याचे पडसाद भोर संस्थानामध्येंही बऱ्याच प्रमाणावर उमटले. दि. ३-२-४८

पासून भोरच्या हद्दींत जाळपोळीस व लुटालुटीस सुरुवात झाली. भोर, नसरापूर, शिरवळ, विंझर वगैरे प्रमुख गांवीं दंगल झाल्यावर, सुमारें २५ खेडयांतून हें दंगलीचें लोण पोंचलें. या जाळपोळीमुळें व लुटालुटीमुळें सुमारें चार लाख रुपयांवर नुकसान झालें आहे.

या दंगलीच्या वार्ता कळतांच भोर संस्थानांतील कायदा व सुव्यवस्था ठेवण्याचा अधिकार दि. ७-२-४८ ला मुंबई सरकारकडे देण्यांत आला व ताबडतोब तिकडे लष्कर पाठविण्यांत आलें होतें; परंतु, दंगेखोरांनीं झाडें तोडून तीं सडकेवर आडवीं टाकून लष्कराचा मार्ग रोखला व लष्कर येऊं नये, म्हणून प्रतिकार केला. परंतु, लष्करानें अखेरीस गोळीबार करून दंगेखोरांना पिटाळून लावलें व थोडयाच काळांत शांतता स्थापन केली.

परंतु, त्यापूर्वी ठिकठिकाणीं आगी लावून लुटालूट मोठ्या प्रमाणावर झाली होती. अेका गांवीं असलेलें भव्य राममंदिरही दंगेखोरांनीं जाळून टाकून हजारों रुपयांचें नुकसान केलें. पुण्याचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट श्री. बर्वे व जिल्हा पोलीस अधिकारी यांनीं वेळोवेळीं जाऊन तेथील परिस्थितीची पाहणी केली व श्री. आर. डी. राजे या पोलीस अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यांत आली.

आतांपर्यंत सुमारें ५०० लोकांना पकडण्यांत आलें असून, १२५ लोकांवर प्रत्यक्ष खटले पाठविण्यांत आले आहेत.

आणखी कांहीं खटले लौकरच पाठविण्यांत येणार आहेत. ज्यांच्या-विरुद्ध भरपूर पुरावा नाहीं, अशा लोकांना सोडून देण्यांत आलें आहे. सुमारें ४२ हजार रुपयांच्या मालाची लूट झाली होती. त्यापैकीं १० हजार रुपये किंमतीचा लुटीचा माल परत मिळाला आहे. आतां, सर्वत्र शांतता असून, गुन्हयांचा अधिक तपास चालू आहे.

---

## प्रकरण २५ वें

# प्रत्यक्ष विलिनीकरणासंबंधानें भोरचा व पालीचा कार्यक्रम

पुण्याचे कलेक्टर मे. बर्वे I. C. S. ता. ४-३-४८ रोजीं श्रीमंतांच्याकडे चहास आले असतां, विलीनीकरणाच्या कार्यक्रमास श्रीमंत आले असतां बरें होईल, असें त्यांनीं मुंबई इलाख्याचे पंत प्रधान ना. खेर यांचें म्हणणें असल्याचें, त्यांच्याच सूचनेवरून, श्रीमंतांस कळविल्यावरून श्रीमंतांची स्वारी ता. ८ रोजीं सकाळीं ७-३० च्या सुमारास भोरास गेली. त्या वेळीं त्यांच्या सन्मानार्थ नऊ तोफांची सलामी देण्यांत आली.

मे. बर्वेसाहेब यांच्याबरोबर श्रीमंतांची स्वारी, वाड्यापुढें स्वार व शिबंदी यांची परेड होणार होती, त्यास हजर राहून सलामी घेतली व राष्ट्रीय निशाण मे. बर्वे यांनीं उभारल्यानंतर, मे. बर्वे यांनीं नामदार पंतप्रधान खेर यांचा संदेश वाचून दाखविला. तो येणेप्रमाणें:—

### नामदार पंतप्रधान यांचें पत्रक

भोर संस्थानच्या अधिपतींनीं एकत्रीकरणाच्या करारनाम्यावर सही करून संस्थानच्या विलीनीकरणास मान्यता दिल्यामुळें स. १९४७ इ. च्या एक्स्ट्रा-प्रॉव्हिन्शिअल जुरिसडिक्शन ॲक्टच्या ४ थ्या कलमानुसार हिंदुस्थान सरकारनें, दि. २५ फेब्रुवारी १९४८ रोजीं काढलेल्या क्रमांक १५०—१ ब या पत्रकान्वयें प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, मुंबई सरकार आजपासून या संस्थानचा एकंदर राज्यकारभार आपल्या हातीं घेत आहे. पिढ्यानुपिढ्या ज्या लोकांचे देवघेव, व्यापार व उद्योगधंदे यांविषयींचे हितसंबंध परस्परांशीं संलग्न असून सांस्कृतिक, सामाजिक व ऐतिहासिक ऋणानुबंध एकमेकांशीं निगडित आहेत, अशा लोकांचा मुलुख एकत्र जोडून एकसूत्री कारभार करण्याची संधि देण्यासाठीं या एकीकरणास दक्षिणेंतील संस्थानांच्या अधिपतींनीं मान्यता देऊन जें धैर्य, जो मुत्सद्दीपणा व जो स्वार्थत्याग व्यक्त केला आहे, त्याबद्दल दि. १९-२-४८ रोजीं मुंबई येथें भरलेल्या संस्थानिकांच्या सभेंत मी त्यांचें अभिनंदन केलेंच आहे.

आज पुन्हां या ऐतिहासिक प्रसंगीं भोर संस्थानच्या अधिपतींनीं जी दूरदृष्टी व जी एक विशेष त्यागबुद्धि व्यक्त केली आहे, त्याबद्दल त्यांचें पुन्हां एकदां मी अभिनंदन करतों. भोर संस्थानचे सर्व प्रजानन आजपासून हिंदी संघराज्याचे नागरिक झाले असून, हिंदी संघराज्याच्या इतर सर्व नागरिकांचे हक्क त्यांना प्राप्त झाले आहेत. त्याचबरोबर हिंदी नागरिकांची जबाबदारी व कर्तव्यें त्यांनाही पार पाडावीं लागतील. यापुढें लोकसत्ताक जबाबदार राज्यपद्धतीचे सर्व फायदे हिंदी नागरिकांप्रमाणेंच या संस्थानच्या नागरिकांना मिळतील, व हिंदी लष्कराच्या आणि मुलकीखात्याच्या सर्व नोकऱ्या करण्यास ते पात्र ठरतील. शिक्षण, लायकी व चारित्र्य यांच्या जोरावर इतर हिंदी नागरिकांप्रमाणें या संस्थानच्या नागरिकांनाही हिंदी संघराज्यांतील सर्वोच्च स्थान यापुढें मिळविणें शक्य होईल.

२. हिंदुस्थानसरकारच्या वतीनें मुंबई सरकारकडून भोर संस्थानच्या अधिपतींना असें आश्वासन देण्यांत येतें कीं, त्यांनीं केलेल्या करारनाम्यांतील सर्व शर्ती पूर्णपणें पाळल्या जातील.

३. संस्थानच्या कायम नोकरींत असणाऱ्या सर्व संस्थानी नोकरवर्गास असें आश्वासन देण्यांत येतें कीं, त्यांना शक्य तोंवर मुंबई सरकारच्या नोकरींत समाविष्ट करून घेतलें जाईल.

४. नमुनेदार राज्यकारभार करण्याच्या कामीं या संस्थानच्या प्रजाजनांनीं व अधिपतींनीं आमच्या अधिकाऱ्यांशीं पूर्ण सहकार्य करावें, असें मी मुंबई सरकारचा पंतप्रधान त्यांना पाचारण करतों. प्रत्येक क्षेत्रांत नैतिक शुद्धता ठेवून जनतेची सर्वांगीण वाढ करणें, हा मुंबई सरकारचा प्रमुख उद्देश आहे. त्याचबरोबर ज्यावर देशाची प्रगति अवलंबून आहे, तो कायदा व सुव्यवस्था कायम ठेवण्याच्या कामीं मात्र कोणाचीही गय केली जाणार नाहीं. कायद्याची अंमलबजावणी कसोशीनें करण्यांत येईल, आणि त्या कामीं जातीय, पंथविषयक किंवा धार्मिक कारणाकरितां कोणताही भेदाभेद करण्यांत येणार नाहीं. कायदा व न्याय या बाबतींत सर्व सारखेच लेखले जाऊन, त्यांची अंमलबजावणी करतांना कोणाचीही भीड अगर भीति बाळगण्यांत येणार नाहीं. आपल्या संपूर्ण व हार्दिक सहकार्याच्या जोरावर आपणास, आपल्या सर्व शक्तींचा व साधनांचा उपयोग करून, आपल्या एकंदर लोकांचें जीवन सुधारून तें उच्च पातळीवर

नेतां येईल अशी मुंबई सरकारास खात्री वाटते. अत्यंत खडतर अशा झगड्या-नंतर आपणास स्वातंत्र्य लाभलें आहे. तें इतमामानें व सन्मानपूर्वक टिकविणें असेल, तर आपण सत्प्रवृत्तीनें, एकोप्यानें व आत्मविश्वासानें वागलें पाहिजे. हें सर्व लक्षांत घेऊन, अखिल हिंदुस्थान संपूर्ण सुखमय व वैभवशाली करण्याची प्रतिज्ञा करून, आतां आपण आपलें पुढचें पाऊल टाकूं या !

त्यानंतर श्रीमंत राजेसाहेब यांनीं हृदयस्पर्शी भाषण करून, संस्थानचा व आपला संबंध सुटतो आहे, याजबद्दल दुःख प्रदर्शित केलें. तथापि, संस्थान अखिल हिंदुस्थानांत सामिल होत असल्यामुळें, त्याची भरभराट विशेष जोरानें होईल अशी आशा प्रदर्शित केली. तें भाषण खालीं दिलें आहे:—

## श्रीमंतांचें भाषण

मि. बर्वे, कलेक्टरसाहेब, इतर अधिकारी व उपस्थित असलेले आमचे प्रिय प्रजाजनहो,

आज आपण सर्वजण येथें जमून आतांच जो कार्यक्रम पार पाडला, त्या-नंतर आम्ही या प्रसंगीं चार शब्द बोलूं अिच्छितों. प्रथमारंभीं कांहीं दिवसांपूर्वीं आपल्या कल्पनेंतही जी गोष्ट अशक्यप्राय वाटत होती, ती गोष्ट ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं प्रत्यक्षांत उतरवून दाखविण्याचें, भारताच्या स्वातंत्र्याचें, महत्कार्य ज्या एका व्यक्तीच्या अलौकिक मार्गदर्शनामुळें व स्वार्थत्यागामुळें घडून आलें, त्या परमपूज्य कै. महात्मा गांधींचा, त्या संस्मरणीय दिवसानंतर थोडक्याच काळांत, अमानुष तऱ्हेनें वध करण्यांत आला, या गोष्टीनें हिंदवासीयांची असीम अशी हानीच झालेली आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अनेक विपरीत घटना घडून आल्या. त्यांतून सुरक्षितपणानें मार्ग काढून भारताला उच्च दर्जा प्राप्त व्हावा, या एकाच तळमळीनें त्यांचा आत्मा अहर्निश व्यथित होत होता. अतर्क्य अशा विधिघटनेस अनुसरून ता. ३० जानेवारी १९४८चा भारताच्या इतिहासांतील अत्यंत अमंगळ दिवस उजाडून, आपण या महाभागांस कायमचे गमावून बसलों. आजच्या क्रांतिकालांतील या युगपुरुषाचें मार्गदर्शन खरोखरीच भारताला भूषणा-स्पद झालें असतें; म्हणून, अशा या आणीबाणीच्या प्रसंगांत त्यांच्या बहुमोल सल्ल्याला आपण आंचवलों, या गोष्टीची मनाला खंत वाटते. पण, त्यांच्या उदात्त

तत्त्वांच्या आचरणानें त्यांची हानि न भासतां, उलट त्यामध्येंच आपला उत्कर्षच होईल अशी आम्हांस खात्री वाटते. आजच्या या प्रसंगाच्या निमित्तानें त्यांच्याबद्दल आमच्या मनांत वसत असणारी पूज्यबुद्धि आम्हीं व्यक्त केली आहे.

भोर संस्थानच्या इतिहासांतील आजचा हा शेवटचाच आणि अपूर्व असा प्रसंग आहे. आजपासून भोर संस्थान मुंबई प्रांतांत सामिल होऊन त्याचें स्वतंत्र अस्तित्व उरणार नाहीं. अशा या प्रसंगीं आमच्या भावना स्पष्टपणें उलगडून दाखविण्याचें काम फार बिकट आहे. आजच्या सुखदुःखाच्या परस्परविरोधी भावना एकमेकांशीं इतक्या संलग्न झाल्या आहेत कीं, त्यांत आम्हांस तरी कोणत्याही प्रकारचा फरक करतां येत नाहीं. आज जवळजवळ अडीचशें वर्षें संस्थानच्या अस्तित्वामुळें राजा व प्रजा यांचा परस्पर सहकार्याचा जो निकट संबंध येत होता, त्या संबंधास आजपासून आम्ही दुरावणार, या घटनेचें जसें आम्हांस दुःख वाटतें, त्याचप्रमाणें आमच्या प्रिय प्रजाजनांच्या वाढत्या आकांक्षांना विस्तीर्ण क्षेत्र मिळून त्यांना आपला उत्कर्ष करून घेण्याचें नवें साधन आम्हांला त्यांना मिळवून देतां आलें, याबद्दल आम्हांस आनंदही वाटत आहे. संस्थानच्या स्थापनेच्या वेळीं आमचे परमपूज्य आद्य पुरुष ब्रह्मीभूत श्री. शंकराजी नारायण यांनीं महाराष्ट्रांतील हिंदूंची प्रबळ संघटना करून महाराष्ट्र स्वतंत्र राखण्याचें श्रेय घेतलें, त्याप्रमाणें चालू बदलत्या परिस्थितीस व कालमानास अनुसरून हल्लींच्या स्वतंत्र भारतामध्यें सर्व प्रांतांची जितकी प्रबळ संघटना होईल, तेवढी श्रेयस्कर आहे असें लक्षांत घेऊन, आम्ही आमच्या संस्थानाचा वगैरे कोणताही प्रश्न त्याच्या आड येऊं नये, म्हणून भोर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन करण्याचा स्वयंस्फूर्त निर्णय घेतला; व त्याची अंमलबजावणी आजपासून प्रत्यक्ष सुरू होणारी आहे. या निर्णयामुळें आम्हांस आज फार मोठा त्याग करावा लागत असला, तरी अखंड भारताच्या ध्येयांतील एक महत्त्वाचा टप्पा या दृष्टीनें त्या त्यागांतही आम्हांस अत्यंत समाधान व आनंद वाटत आहे. आतां, यापुढें प्रत्यक्ष राज्यकारभाराशीं आमचा जरी संबंध येणारा नसला, तथापि, आमच्या प्रजेनें आतां आलेल्या संधीचा जास्तींत जास्त उपयोग करून घेऊन आपल्या व पर्यायानें सर्व हिंदुस्थानच्या उत्कर्षास मदत करावी अशी आमची उत्कट इच्छा आहे; व त्या दृष्टीनें होणाऱ्या प्रत्येक प्रयत्नास आमचा सतत व हार्दिक पाठिंबा राहील,

अशी आपण खात्री बाळगावी. प्रेमाचे पाश हे नाजूक पण फार बळकट असतात. त्याप्रमाणें तुमचे व आमचे संबंध असल्यामुळें, ते परिस्थित्यनुसार जरी थोडेफार दुरावले, तरी तुटणार नाहींत, हें निश्चित. आतां आपण आजपासून स्वतंत्र भारताच्या मालिकेंतील एक महत्त्वाचा दुवा बनलां आहांत, ही गोष्ट लक्षांत ठेवून भारताच्या उत्कर्षास आपण बहुमोल हातभार लावाल अशी आम्हांस खात्री आहे. आपले पिढ्यानुपिढ्या असणारे संबंध आज सुटत आहेत. पण, आतां आपल्याला स्वतंत्र भारतांत विशिष्ट स्थान मिळून, हिंदुस्थानांतील सर्व जनता एकसमयावच्छेदें-करून ज्या उच्च दर्जाच्या सुराज्याच्या ध्येयाप्रत जाऊं इच्छीत आहे, त्यांत आपणही अंशभागी होणार आहोंत.

आज यापेक्षां जास्त आम्हांला कांहीं सांगावयाचें नाहीं; पण, एवढेंच कीं, आमचे संस्थानी प्रजाजन एका मोठ्या राष्ट्राचे घटक म्हणून होणार असले, तरी त्यांच्या सामाजिक वगैरे उत्कर्षाकडे केव्हांही आमचें लक्ष केंद्रित होऊन राहील; व त्या बाबतींत त्यांना आमची जरूरी जेव्हां जेव्हां लागेल, तेव्हां तेव्हां आम्ही निःशंकपणानें व मोठ्या आनंदानें त्यांना जरूर ती मदत करण्यास केव्हांही तयार आहोंत.

संस्थानांतील नोकरवर्गाचाही आम्हांस आज निरोप घ्यावा लागत आहे. त्यांच्या भविष्यकालाविषयींची चिंता आम्हांस जाणवते. पण, मुंबई सरकार आमच्या नोकरवर्गाबद्दल सहानुभूतिपूर्वक व उदारपणाचें धोरण ठेवील, अशी आम्हांस खात्री वाटते.

प्रजेचें अंतिम कल्याण लक्षांत घेऊन आम्हीं जो निर्णय घेतला आहे, त्यास अनुसरून हिंदी संघराज्यातर्फे मुंबई सरकारचे प्रतिनिधि, पुणें जिल्हाधि-पति, श्री. एस. जी. बर्वे, आय. सी. एस., हे आज येथें उपस्थित झाले आहेत. त्यांच्या तोंडून मुंबई प्रांताचे पंतप्रधान नामदार बाळ गंगाधर खेर यांच्याकडून आलेला आश्वासनपर संदेश आपण सर्वांनीं ऐकलाच आहे. संस्थानी प्रजाजनांना व नोकरवर्गाला त्यांनीं उत्साहपूर्ण आश्वासन दिलें आहे. त्याप्रमाणें, संघराज्याचे नवीन होणारे नागरिकही आपल्या एकनिष्ठ कर्तव्यांत चुकणार नाहींत, याबद्दल आम्हांस कोणतीही शंका नाहीं.

**जय हिंद**

---

याप्रमाणें सकाळचा कार्यक्रम संपल्यावर, दुपारीं १ वाजतां श्रीमंतांनीं हिज ह्यायनेस शंकरराव मॅन्शन्समध्यें मे. बर्वे व त्यांच्या पत्नी ह्यांस मेजवानी दिली, व श्रीमंत राजेसाहेब नंतर लगेच पुण्यास गेले.

सायंकाळीं भोर येथें मे. बर्वे ह्यांनीं भोरच्या नागरिकांची सभा बोलाविली होती. त्या सभेंत पुढाऱ्यांचीं भाषणें होऊन, खालील दोन ठराव संमत झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. भाषणें व ठराव खालीं दिले आहेत.

## विलिनीकरणाबाबत ता. ८।३।४८ रोजीं सायंकाळीं ५-३० वाजतां भोर येथें झालेल्या सभेची हकीकत

भोर येथील राजवाड्यापुढें पुण्याचे कलेक्टर मे. एस्. जी. बर्वे, आय्. सी. एस्. यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ८।३।४८ रोजीं सायंकाळीं ५-३० वाजतां भोर संस्थान हिंदी संघराज्यांत सामिल झाल्याबद्दल अभिनंदन करण्याकरितां जाहीर सभा झाली. बरोबर ५-३० वाजतां मे. कलेक्टरसाहेब सपत्नीक सभा-स्थानीं आले. सभेस लोकसमुदाय स्त्रिया, पुरुष व मुलें मिळून सुमारें एक हजाराच्या वर होता.

प्रथम, श्री. ल. मा. देवी, वकील, भोर, यांनीं भोर संस्थान हिंदी संघ-राज्यांत आजपासून विलीन झाल्यामुळें भोरच्या सर्व प्रजाजनांनीं हिंदी संघराज्याशीं राजनिष्ठ असण्याबद्दलचा पहिला, व भोर संस्थान हिंदी संघराज्यांत विलीन करण्यास मान्यता देऊन केलेल्या स्वार्थत्यागाबद्दल हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, सं. भोर, यांचें हार्दिक अभिनंदन व्यक्त करणारा दुसरा, असे दोन ठराव मांडले.

या ठरावांस अनुमोदन देणारीं व हि.हा. श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वार्थत्याग करून संस्थान हिंदी संघराज्यांत सामिल करण्यास मान्यता दिल्याबद्दल हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांचें अभिनंदन करणारीं श्री. देवी, वकील, श्री. चंद्र-शेखर गोविंद आगाशे, श्री. शं. ल. लिमये, वकील, न. भू. नानाजी पांडुरंग थोपटे व श्री. क. अ. गुप्ते, वकील, यांचीं भाषणें झालीं. सर्वांनींच श्रीमंत राजे-साहेबांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन केलें. श्री. लिमये यांनीं अभिनंदन करतांना संस्थानच्या नोकरवर्गाबद्दल सहानुभूतिपूर्वक विचार मुंबई सरकार करील अशी आशा प्रगट केली. सर्वांच्या शेवटीं अध्यक्ष श्री. बर्वे यांनीं हिंदी संघराज्य

सामर्थ्यवान होण्याकरितां सर्व रयतेनें राजनिष्ठेनें वागावें, कायद्याविरुद्ध वर्तन करणाराचें सरकार योग्य पारिपत्य करील, इत्यादि सांगून टाळ्यांच्या गजरांत दोन्ही ठराव पास झाल्याचें जाहीर केलें. शेवटीं, श्री. रा. भा. फडणीस, वकील, यांनीं सर्वांचे व अध्यक्षांचे आभार मानले व हार व गुच्छ वाटल्यावर समारंभ समाप्त झाला.

**ठराव—१**

हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर थोडक्याच अवधींत हिंदी सरकारच्या संस्थानी खात्यानें संस्थानांचा प्रश्न हातीं घेऊन आपला देश संघटित व बलशाली करण्याच्या दृष्टीनें भोर संस्थान मुंबई इलाख्यांत विलीन करण्याचें ठरविलें. या बाबत ही सभा हिंदी सरकारचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे. स्वतंत्र हिंदी सरकारशीं भोरचे प्रजानन सदैव राजनिष्ठ राहतील, असें ही सभा जाहीर करीत आहे.

**ठराव—२**

भोर संस्थानचे अधिपति हिज हायनेस श्रीमंत सर बाबासाहेब पंडित पंतसचिव K. C. I. E. यांनीं, काळाचा ओघ लक्षांत घेऊन, प्रजेच्या अंतिम हिताकरितां आपल्या संस्थानच्या विलीनीकरणास मान्यता देण्यांत जें धैर्य, मुत्सद्दीपणा व राष्ट्रप्रेम व्यक्त केलें, त्याबद्दल ही सभा त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे.

दुपारीं मे. बर्वे यांनीं राजवाड्यांत जाऊन Armoury पाहिली व खजिन्याची तपासणी केली. खजिन्यांत खालीलप्रमाणें संस्थानच्या शिल्लका होत्या.

संस्थानच्या प्रॉमिसरी नोटा जवळजवळ १४ लाख रुपये किंमतीच्या खजिन्यांत होत्या. तसेंच, भोर स्टेट बँकेमध्यें त्यादिवशीं दरबारची रु. ४,२०,८६२८८६ इतकी शिल्लक होती. रिझर्व्ह लॉकमध्यें त्या दिवशीं रु. २,३०,०५२ इतकी शिल्लक होती. डबल लॉकमध्यें रु. २८,८२५ शिल्लक असून, सिंगल लॉकमध्यें ८८,४६५८२ इतकी शिल्लक होती. एकूण, सदर दिवशीं, भोर स्टेटच्या दौलतीकडील खजिन्यांत रक्कम रुपये ६,८०,६२३८२८६ इतकी रोख शिल्लक होती. प्रॉमिसरी नोटा १४ लाखांच्या अजमासें मिळून, एकंदर २१ लाख रुपयांपर्यंत दौलतीच्या खजिन्यांतील शिल्लक होती. याप्रमाणें खजिन्यांतील वरीलप्रमाणें मोठी शिल्लक पाहून संस्थानच्या उत्तम सांपत्तिक स्थितीबद्दल त्यांनीं विशेष रीतीनें समाधान व्यक्त केलें.

हिंदुस्थानांतील अखिल संस्थानांसंबंधानें इंडिया गव्हर्नमेंटनें ता. ५ जुलै १९४८ रोजीं व्हाइट पेपर म्हणून एक संकलित हकीगत प्रसिद्ध केली त्यामध्यें शेवटीं राजेलोकांनीं विलिनीकरणासंबंधानें जो स्वार्थत्याग केला, तो खालील-प्रमाणें नमूद केला आहे. हा मजकूर ता. ८ जुलै १९४८ च्या टाइम्स ऑफ इंडियामध्यें प्रसिद्ध झाला आहे. तो—

Tribute to Princes

"The consummation of the new set up of the Indian States" concludes the White Paper, "has involved protracted negotiations, perseverance and hard labour. The results that have been achieved will leave an imprint on India's history. But for the patriotic co-operation of the Princes, the tremendous change that has come over India, to the mutual benefit of the people and the Rulers, could not have been possible. By their ready appreciation of the aspirations of the people, they made the integration of States in larger units, and transfer of power to the people smooth and peaceful. They may well claim to be co-architects in building a free and democratic India in which the people of the Provinces and the people of the States will enjoy alike the full measure of freedom and march together as citizens of free India."

भोर संस्थानच्या शिलकीचा सार्वजनिक कामाकडे कसा विनियोग करावयाचा, त्याबद्दल भोर संस्थानच्या कौन्सिल ऑफ मिनिस्टर्स यांनीं दिनांक १२ डिसेंबर १९४७ इ. रोजीं ठराव पास केला. व त्यास श्रीमंत राजेसाहेब यांनीं संमती दिली होती त्यासंबंधीं फर्स्ट मिनिस्टर रा. गो. बा. पोतनीस यांनीं ता. ९ मार्च १९४८ रोजीं केसरी पत्रांत लेख प्रसिद्ध केलेला आहे. विलिनीकरण झाल्यानंतर सदर शिल्लक कशा प्रकारें खर्च करावी, याजबद्दल तो लेख मार्गदर्शक असल्यामुळें खालीं दिलेला आहे.

## भोरच्या विलिनीकरणानंतर शिलकी रकमेचा विनियोग

दि. २० माहे जानेवारी सन १९४८ इ. रोजीं मिरजेस दक्षिणी संस्थानांच्या घटनासमितीनें विलिनीकरणाचा ठराव पास झाला व याच समितीनें ज्या त्या संस्थानची शिल्लक त्या त्या संस्थानाकरितां उपयोगांत आणावी असाही ठराव एकमतानें पास केला. ता. १९-२-४८ इ. रोजीं मुंबईस दक्षिणी

संस्थानांतील १५ संस्थानांच्या विलिनीकरणाबाबत करार झाले. त्यांतही त्या त्या संस्थानची शिल्लक त्या त्या संस्थानाकरितां उपयोगांत आणण्याची शर्त त्या करारांत घालण्यांत आली आहे. तसेंच, भोर संस्थानाच्या कौन्सिल ऑफ मिनिस्टर्सनीं दि. १२-१२-१९४७ रोजीं या शिलकेचा विनियोग कसा करावा, याबद्दल ठराव पास केला आहे; व त्यास राजेसाहेबांची मंजुरीही मिळाली आहे. हा ठराव संस्थानच्या गॅझेटमध्यें प्रसिद्ध करण्यांत आला आहे. या ठरावांत खालीं नमूद केल्याप्रमाणें कामें करण्याचें ठरलें आहे.

| अ. नं. | कामाचें नांव | रस्ते ( मैल ) | रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | कानसळ-आतोणें रस्ता | १२ | १,२५,००० |
| २ | सिद्धेश्वर-आतोणें रस्ता | ८ | ८०,००० |
| ३ | पिरंगुट तें उरवडें व मुठें खिंड | ४ | २५,००० |
| ४ | भोर तें भाबवडी तें अंबाडखिंड | ४ | १५,००० |
| ५ | कोळवण तें बास | ७ | २०,००० |
| ६ | मार्गासनी तें वाजेघर | ५ | १०,००० |
| ७ | वेळें तें कानद-खिंड | १० | ५०,००० |
| ८ | वेळें तें धिसर | ६ | ३०,००० |
| ९ | रूळें तें खानचादर | १६ | १,६०,००० |
| १० | डावजें तें कुरण, तें धामणवहाळ पूल व रस्ते | २० | २००००० |
| ११ | जांभुळपाडा नदीवरील पूल | .... .... | ९०,००० |
| १२ | मुठानदीवरील पूल | .... .... | १,००,००० |
| | साकू | | |
| १३ | पौडजवळील नदी | .... .... | १,००,००० |

चित्रांक ८४



ना. बाळासाहेब खेर, प्रधान मंत्री, मुंबई, यांनी पतसचिव बालवीर मंदिरास भेट देऊन क्रीडांगणावर बॉयस्काऊटचे खेळ पाहिले.

| | | |
|---|---|---|
| १४ गुंजवणी नदीवर | | |
| १४ कागदी नदीवर<br>मोसेंखोरें ५ | एकूण ७ साकू | ७०,००० |

इरिगेशन व वॉटर सप्लाय

| | | | |
|---|---|---|---|
| भोर येथील पाण्याची योजना | .... | .... | २,३०,००० |
| हायड्रॉलिक रॅम्स, उरवडें | .... | .... | २५,००० |
| नसरापूर धरण २ ठिकाणीं | .... | .... | ४०,००० |
| आंबवणें धरण दुरुस्ती | .... | .... | २०,००० |
| नसरापूर वॉटर सप्लाय | .... | .... | १५,००० |
| शिरवळ वॉटर सप्लाय | .... | .... | २५,००० |

रस्ते, पूल व इमारत-दुरुस्ती

| | |
|---|---|
| १ नसरापूर--मार्गासनी रस्ता | २८,००० |
| २ पेडली पूल दुरुस्ती | ४५,००० |
| ३ इमारत दुरुस्त्या | ७५,००० |

या कामांपैकीं भोर शहराच्या पाणी-पुरवठयाकरितां व शहराच्या आसपासच्या ४-५ गांवच्या शेतीस उपयोग व्हावा, म्हणून गेल्या वर्षीं इअरमार्क करून ठेवलेले ६०,००० व चालू सालच्या बजेटमध्यें धरलेले ८०,००० आणि शिलकेपैकीं ९०,०००, एकूण २,३०,००० रक्कम होत आहे. या रकमेचा विनियोग भोर शहराच्या दक्षिणेस भाबवडी येथें ओढ्यास धरण धरून भोर जवळच्या शंकर हिल टेकडीवर पाण्याचें तळें करणें; तसेंच, शहरांतील पाण्याची डिस्ट्रिब्यूशनची नवीन योजना करणें, याबाबत पाहणी होऊन १०-१५ वर्षांपूर्वी तज्ज्ञाकडून योजना करण्यांत आली आहे. त्या योजनांचा मुंबई सरकारचे पी. डब्ल्यू डी. खात्याकडून ताबडतोब अंमल होऊन भोर शहराचा बऱ्याच वर्षांचा पिण्याच्या पाण्याचा प्रश्न ताबडतोब सोडवावा, अशी विनंति आहे. ही व भोर येथील प्राथमिक शाळेची इमारत, हरिजन वसतिगृह व हायस्कूलचा जिमखाना, या कामास ताबडतोब सुरुवात करावी म्हणजे जनतेची सोय होऊन संस्थानांतील बऱ्याच नोकरवर्गांना यांत कामधंदा मिळेल.

## भोर जिल्हा व्हावा

तसेंच, भोर संस्थानची ऐतिहासिक परंपरा लक्षांत घेऊन, ज्या भागांत ३०० वर्षांपूर्वी शिवछत्रपतींनीं भोरपासून ४-५ मैलांवरील रोहिडा किल्ल्यावरील रोहिडमल्हारापुढें व रायरेश्वरापुढें स्वातंत्र्याची शपथ वाहिली व तोरण्यास स्वातंत्र्याचें तोरण बांधून राजगडास राजधानी केली, हा सर्व भाग भोर संस्थानांतच आहे. ज्या मावळ्यांनीं हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेकरितां आपलें रक्त धारातीर्थीं सांडलें, त्यांचेच वंशज याच भागांत राहत आहेत. तेव्हां, ही ऐतिहासिक परंपरा कायम राहावी, म्हणून भोर शहर मध्यबिंदु धरून जिल्हा होण्यास जेवढा भाग [ क्षेत्र ] व लोकसंख्या असणें जरूर आहे, तेवढा प्रदेश एकत्र करून भोर जिल्हा करावा. या जिल्ह्याच्या प्रदेशाची आम्ही ढोबळ कल्पना देतों तीः— सुधागड तालुका तें नागोठणें बंदराचा समावेश होईल असा प्रदेश. तेथून तळेगांव स्टेशन, मावळ तालुका, पुरंदर तालुका, संस्थानपैकीं पवनमाळ, प्रचंडगड, राजगड, विचित्रगड, फलटण संस्थानांतील सर्व गांवें, लोणंद स्टेशन, वांई तालुका व महाड तालुका, या भागांचा भोर जिल्ह्यांत समावेश करण्यांत यावा. याप्रमाणें जिल्हा करण्याचें ठरल्यास, भोर शहराच्या म्युनिसिपल एरियामध्यें भोरच्या आसपासच्या २ मैलांतील भोलावडें, येवली, भाटघर, उत्रवली, भाबवडी, वेनवडी, वगैरे खेडयांचा समावेश करून, भोर शहराची म्युनिसिपल एरिआ जाहीर करण्यांत यावी. याकरितां भोर शहराची पिण्याच्या पाण्याची फार दिवसांची गैरसोय वरील २,३०,००० रकमेचा विनियोग करून सत्वर दूर करावी.

संस्थानाच्या बऱ्याचशा भागांत दळणवळणाचीं साधनें नसल्याने पाव-साळ्यांत पुष्कळसे भाग बेटासारखे होतात. तेव्हां, वर नमूद केलेले रस्ते व पुलांचीं कामें ताबडतोब हातीं घ्यावीं; रस्त्याच्या अभावीं जनतेची बरीचशी कुचंबणा होत आहे. तसेंच, संस्थानांत सावरीचीं झाडें, उढा व हिरडा वगैरे-सारखी निसर्गसंपत्ति पुष्कळच आहे, व आणखी लागवड करून ती पुष्कळ वाढविनांही येईल. भाटघर येथें इलेक्ट्रिक पावर हाउस असल्यानें, काडयाच्या पेट्या, कागद व हिरडयापासून टॅनिन ॲसिड तयार करण्याचे कारखाने काढतां येणें शक्य आहे. तें झाल्यास, संस्थानांतील पुष्कळ लोकांचा उदरनिर्वाहाचा प्रश्न सुटेल. याशिवाय, संस्थानच्या नैसर्गिक संपत्तीची तज्ज्ञांकडून पाहणी होऊन आणखी पुष्कळ उद्योगधंदे निघणें शक्य आहे.

अखेर एवढीच विनंति आहे कीं, संस्थानच्या शिल्केंतून कौन्सिल ऑफ मिनिस्टर्सच्या ठरावाप्रमाणें भोर, शिरवळ वगैरे ठिकाणच्या पाण्याची सोय, रस्ते, पूल वगैरे दळणवळणाच्या साधनांबाबतचीं कामें मुंबई सरकाराच्या पी. डब्ल्यु. डी. खात्यानें ताबडतोब सुरू करावीं व भोर हें जिल्ह्याचें ठिकाण करावें, अशी विनंति आहे.

सुधागडमध्यें प्रत्यक्ष विलिनीकरणासंबंधानें खालीलप्रमाणें कार्यक्रम करण्यांत आला.

## सुधागडचें विलिनीकरण, ता. ८ मार्च १९४८

प्रजेतर्फे राष्ट्रनिष्ठा

दुपारीं ५॥ वाजतां जाहीर सभा झाली. हिंद सरकारचे प्रतिनिधि कॅ. माळवी यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. वावळोली शाळेंतील कातकरी मुलांनीं स्वागतपर पद्य म्हटलें. श्री. रामजीशेट यांनीं गेल्या संस्थानच्या राजवटीबद्दल आभार व कृतज्ञता, व हिंदी संघराज्याशीं एकनिष्ठा व्यक्त करणारा ठराव मांडला. या ठरावाला श्री. गणपतराव धारप, वकील, यांनीं स्वतः केलेल्या काव्यांत दुजोरा दिला. या ठरावाला पुष्टिदायक भाषणें रा. सखाराम लखिमळे, आबासाहेब आठवले, रघुनाथराव कुलकर्णी यांचीं झालीं.

विलिनीकरणाबाबत अभिनंदनपर पत्र श्री. सी. के. देसाई, कोल्हापूर रेसिडेन्सी आणि डेक्कन स्टेट्स् एजन्सी यांचें, व पार्लमेंटरी सेक्रेटरी श्री. द. न. वांद्रेकर यांचें, अशीं दोन पत्रें सोबत जोडलीं आहेत.

D. O. No. C. 13/48.　　　　Kolhapur Residency<br>Deccan<br>6th March 1948.

My dear Raja Saheb,

On the eve of the severance of our political relations, as a result of merger of Your Highness' State in the Bombay Province, I take this opportunity to bid you good-bye. Your Highness has indeed shown great statesmanship and foresight in not having lagged behind the time, and posterity will always feel grateful to you for the wise decision you have taken. A new vista has now been opened for Your Highness and your people to make direct contribution for the progress of free India in the comity of nations.

I sincerely wish Your Highness and the members of your family long life, health and prosperity in the years to come.

With all good wishes.

Yours sincerely,
S. S.. C. K. Desai.

His Highness Raja Shrimant
Sir Raghunathrao Shankarrao Pandit Pant Sachiv,
Raja of Bhor, Bhor.

फोन नं. ८९९११

**द. न. वांद्रेकर,** १० वा रस्ता, खार
बी.ए.,एल्‌एल्‌.बी.,एम्‌.एल्‌.ए. मुंबई, ता. १३ जानेवारी १९४८

**सर रघुनाथराव शंकरराव पंडित, पंतसचिव, भोर**

सा. न. वि. वि. यांस

आपणांकडून उद्यांच्या मकरसंक्रांतीनिमित्त तिळगूळ व नूतन वर्षाबद्दलच्या सदिच्छा पोहोंचल्या. त्याबद्दल आभारी आहें. मीही आपणांस नूतन वर्षानिमित्त आपल्या सदिच्छा प्रविष्ट करीत आहें.

१८ ऑगस्ट रोजीं भोर संस्थानांत पूर्ण जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्याबाबत आपण आपल्या कारकीर्दीच्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं घोषणा केली होती. त्या वेळीं मीं आपलें अभिनंदन केलें होतें. परंतु, त्यानंतर अगदी परवां त्यापेक्षांही जास्त अभिनंदनपर घटना घडत असल्याचें वर्तमानपत्रांवरून समजलें. आपला हिंदुस्थान देश अखंड असावा, त्यांत अनेक राजांच्या अंमलाखालीं अनेक तुकडे असूं नयेत, राज्यकारभाराच्या दृष्टीनें सोईची अशी प्रांतरचना असावी, तसेंच, देशांत व प्रांतांत खरी लोकशाही सत्ता असावी व जनतेंत सर्व प्रकारची समता नांदावी, ह्या दृष्टीनें ठिकठिकाणचे संस्थानिक आपलें राज्यपद सोडून संस्थानचें क्षेत्र जवळच्या प्रांतास जोडण्यास तयार होत आहेत व त्यांत महाराष्ट्रांतील व कर्नाटकांतील कांहीं संस्थानिक सामिल झाले आहेत, ही अत्यंत आनंदाची गोष्ट होय. महाराष्ट्रांतील ह्या संस्थानिकांत आपण आहां, ह्याबद्दल मी आपणांस पुन्हां एकदां धन्यवाद देत आहें. आपणांस दीर्घ आयुरारोग्य लाभो व तें देशसेवेंत जावो, हीच इच्छा. कळावें. आ.

**द. न. वांद्रेकर**

संस्थानचें विलिनीकरण नक्की ठरल्यानंतर, कांहीं सार्वजनिक संस्थांनीं श्रीमंतांकडे देणगी मिळण्याबद्दल विनंति केली व श्रीमंतांनींही त्या संस्था उत्तम प्रकारें चालत आहेत, देणगी देण्यास योग्य आहेत व विलिनीकरण झाल्यानंतर देणगी देतां येणार नाहीं, असा सर्व बाजूंनीं विचार करून पुणें शहर बालवीर संस्थेस रु.५००० पांच हजार रुपये व नानल क्षय-आरोग्यभवन यास रु.५०,००० पन्नास हजार रुपये देण्याबद्दल दप्तरी हुकूम केले व गव्हर्मेंट ऑफ इंडियाला ह्या हुकुमांची अंम्मलबजावणी करण्याबद्दल शिफारस केली.

श्रीमंतांच्या या देणग्यांबद्दल वरील संस्थांचे अनुक्रमें चिटणीस व अध्यक्ष यांच्याकडून श्रीमंतांस आलेलीं आभारप्रदर्शक पत्रें खालीं दिलीं आहेत.

## पुणें शहर बालवीर संस्था

( मुंबई प्रांत हिंदुस्थान स्काउट संस्थेस जोडलेली )

श्रीमंत राजेसाहेब,
संस्थान भोर,
यांच्या सेवेसी

पंत सचिव बालवीरमंदिर
सदाशिव, पुणें २
दिनांक ९ मार्च १९४८

साष्टांग नमस्कार विनंति विशेष

तारीख २८ फेब्रुवारी १९४८ चा भोर दरबारचा हु. मु. कि. जा. नं. १५४ दि. २८-२-४८ चा संस्थानचा दप्तरी हुकूम मे. कलेक्टरसाहेब ऑफ भोर यांच्याकडून आला, तो पोहोंचला. डॉ. नातू यांनीं केलेल्या विनंतीस श्रीमंत राजेसाहेब यांनीं उदार अंतःकरणानें मान्यता दिली व पुणें बॉयस्काउट संस्थेचें गेल्या २५ वर्षांचें कार्य व श्रीमंत राजेसाहेबांचा संस्थेशीं असलेला निकट संबंध ध्यानांत घेऊन, ही उदार देणगी श्रीमंत राजेसाहेबांनीं संस्थेस दिली, त्याबद्दल संस्था श्रीमंत राजेसाहेबांची सदैव ऋणीच राहील.

स्वतंत्र भारताच्या भावी नागरिकांना आवश्यक असें शिक्षण देण्याच्या कार्यांत पुणेंशहर बालवीर संस्था शक्य तों प्रयत्न करीत राहील व श्रीमंत राजेसाहेबांचें नांव धारण करणारें आमचें पंतसचिव बालवीर मंदिर ह्या कार्याकरितां सदैव उपयोगांत आणलें जाईल व अशा तऱ्हेनें श्रीमंत राजेसाहेबांचा व संस्थेचा ऋणानुबंध कायम राहील. असाच कृपालोभ श्रीमंत राजेसाहेबांनीं संस्थेवर ठेवावा, ही विनंति.

आपला

**रा. द. देशपांडे,** चिटणीस
पुणें शहर बालवीर संस्था, पुणें २

नानल क्षय-आरोग्य भवन, पुणें, यांस देणगी जाहीर केल्याबद्दल डॉ. आर्. एच्. भडकमकर, एम् ए ,एम्.डी. यांनीं श्रीमंतांचे खालीलप्रमाणें आभार मानले.

श्री

श्रीमंत सरकार बाबासाहेब पंत सचिव, राजेसाहेब, **संस्थान भोर**
सा. न. वि. वि.

माझ्या विनंतीस मान देऊन आपण नानल क्षय-आरोग्य भवनास पन्नास हजार रुपये देणगी मंजूर केली, याबद्दल मी आपले अंत:करणपूर्वक आभार मानतों. आपल्या देणगीनें संस्थेच्या कार्यास उत्तेजन मिळालें असून, त्याबद्दल संस्था आपली कायमची ऋणी आहे. कळावें लोभ असावा ही विनंति.

आपला नम्र

**रा. ह. भडकमकर**, अध्यक्ष,
नानल क्षय-आरोग्य निधि समिति, पुणें शहर.

तसेंच, नानल क्षय-आरोग्य भवन, पुणें, यांच्याकडील ना. व्यं. जोशी, व भा. वि. गोखले, चिटणीस, यांनीं खालीलप्रमाणें आभार मानले.

**नानल क्षय-आरोग्य भवन, पुणें**

॥ श्री ॥ २२ नागेश, पेठ पुणें २
ता. २९-९-१९४८

श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव, यांना:—
साष्टांग नमस्कार वि. वि.

आपण आमच्या विनंतीस मान देऊन नानल क्षय-आरोग्य भवनास पन्नास हजार रुपये देणगी मंजूर केली. त्यानंतर, भोर संस्थान मुंबई प्रांतामध्यें विलीन झाल्यावर, मुंबई सरकारनें या देणगीस मान्यता देऊन देणगीचे पन्नास हजार रुपये निधि-समितीच्या ताब्यांत दिले, हें आपणांस कळविण्यास आनंद वाटतो.

आपण उदार अंत:करणानें आमच्या क्षय-आरोग्य भवनास ही मोठी देणगी देऊन आमच्या कार्यास उत्तेजन दिलें, याबद्दल संस्थेतर्फे मी आपले अंत:करणपूर्वक आभार मानतों. कळावें, लोभ असावा ही विनंति.

आपला नम्र,

**रा. ह. भडकमकर**, अध्यक्ष, निधि-समिति
नानल क्षय-आरोग्य भवन, पुणें.

विलिनीकरणाचा ठराव झाल्यानंतर, त्या गोष्टीसंबंधीं आपली नाराजी व्यक्त करण्यास प्रजाजनांपैकीं अनेक मंडळी श्रीमंतांकडे आली; इतकेंच नव्हे, तर कित्येकांकडून त्या अर्थाचीं पत्रेंही त्यांना आलीं. समक्ष येणाऱ्या व पत्रें पाठविणाऱ्या मंडळींत बहुतेक सर्व दर्जांचे, पेशांचे व मतांचे, तसेंच समाजांतील खालपासून वरपर्यंतच्या अनेक थरांतील, लोक होते. राजकारणांत सहसा भाग न घेणाऱ्या, ' आपण बरे व आपला कामधंदा बरा ' या विचारसरणीनें वागणाऱ्या व संस्थानबद्दल व संस्थानच्या गादीवर अधिष्ठित असलेल्या व्यक्तीबद्दल मनांत आदर व प्रेम बाळगणाऱ्या समाजांतील व्यक्तींना घडलेल्या गोष्टीमुळें आपलें अंतीं हित होईल का अहित होईल, तें समजण्याइतपत त्यांची बुद्धि तयार झालेली नसल्यानें, ते केवळ हतबुद्ध व स्तंभित झाल्याचें दिसून आलें. अशा लोकांच्या वरच्या बुद्धीच्या पातळींत असलेल्या व राजकारणांत प्रत्यक्ष भाग न घेणाऱ्या, पण त्याकडे लक्ष असणाऱ्या अशा लोकांना ही गोष्ट घडवून आणण्यांत फार घाई झाली व त्याची आगाऊ कल्पना आपणास यत्किंचितही देण्यांत न आल्याबद्दल आश्चर्य व खेद वाटत असल्याचें कळून आलें. त्यांचें मुख्य म्हणणें असें दिसलें कीं, राजे लोकांनीं आपल्या भोंवतालची परिस्थिति लक्षांत घेऊन आपलीं संस्थानें विलीन करण्यास मान्यता देण्यांत मनाचा मोठेपणा प्रदर्शित केला असला, तरी ती त्यांची मान्यता ' प्रजेची तशी इच्छा असल्यास ' अशा रास्त शर्तीनें युक्त होती. पण, या शर्तीकडे कोणाही पुढाऱ्यानें लक्ष पुरविलें नाहीं. घटना-कमिटींतल्या लोकप्रतिनिधींनीं विलिनीकरणास मान्यता देण्यापूर्वीं तो प्रश्न लोकांपुढें मांडून लोकमत त्याबाबत अजमावून तसा आदेश त्यांनीं घेतला नाहीं, ही कॉन्स्टिट्यूशनदृष्ट्या त्यांत मोठीच चूक झाली आहे असें त्यांचें म्हणणें पडलें. शिवाय, लोकप्रतिनिधि मिरज येथील सभेला जे गेले होते, ते घटना-कायद्याचा विचार करण्यास गेले असतां, सभेंत विलिनीकरणाचा प्रश्न उत्पन्न झाला कसा व लागलीच, प्रजेकडून त्याबाबत अधिकार ( Mandate ) न घेतां, पुढाऱ्यांनीं तो संमत केला कसा, हें कोडें त्यांच्या बुद्धीस उलगडेना. पुढाऱ्यांची ही मोठी चूक झालेली आहे असें या लोकांच्या म्हणण्यांत आलें. त्यांच्या वरच्या वातावरणांत असणाऱ्या व राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेणाऱ्या पुढाऱ्यांपैकीं कित्येकांचीं मनें

या गोष्टीनें फारच अस्वस्थ झालीं असल्याचें दिसून आलें. कारण, संस्थानच्या छोट्याशाच क्षेत्रांत कां असेना, पण स्वतंत्र रीतीनें आपली थोडी फार कर्तबगारी दाखवून लोकहित, अल्प प्रमाणांत कां होईना, पण साधण्यास जो त्यांना वाव होता व जो पुढें विस्तृत होण्याची खात्री होती--नव्हे, झालाही होता--तो या ठरावानें एकाएकीं नष्ट होऊन, त्या बाबतींत केवळ सामान्य मनुष्याप्रमाणें अगतिक व दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहून, काय मिळतें व कांहीं इष्ट घडतें कां नाहीं याचे आतां आपण फक्त बघे झालों, याचा त्यांना पश्चात्ताप होत असल्याचें स्पष्ट दिसून येत होतें. ‘ इन्द्रपद मागण्यास गेलों, व निद्रापद घेऊन आलों ’ असें त्यांना मनांत वाटूं लागत असल्याचें त्यांच्या उद्गारांवरून दिसलें. चवथ्या प्रकारचे आणखी असे कांहीं लोक होते कीं, संस्थानांत हुल्लड उठवून व राजे लोकांना भीति दाखवून व त्यांच्यापासून मीं हें मिळविलें, मीं तें मिळविलें, वगैरे सांगून लोकांत आपलें आसन स्थिर करण्यास व प्रतिष्ठा वाढविण्यास जी संधि त्यांना मिळत होती, ती विलिनीकरणानें गेली याबद्दल त्यांना वाईट वाटत होतें; व या अर्थानें त्यांचें वाईट वाटणें खरें असलें, तरी ‘राज्य नष्ट झालें, म्हणून वाईट वाटतें’ असा जो सफेता त्यावर त्यांनीं चढविला होता, त्यानें त्यांचें अंतरंग झाकत नव्हतें. ‘ सासूसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न । ’ अशांतलाच तो प्रकार होता. तथापि, श्रीमंत राजेसाहेबांनीं, ज्यांच्या त्यांच्या प्रकारें त्यांची समजूत केली. संघराज्यांत लोकपुढाऱ्यांच्या कर्तबगारीस वाव मिळून अनेक संस्थानांचा पैसा एकत्र मिळाल्यानें व त्यांतील बुद्धिवंतांच्या व तज्ज्ञांच्या विचारें संघराज्याचें काम चालणार असल्यानें, मोठ्या योजना हातीं घेतां आल्या असत्या; सहकार्यानें सलोखा उत्पन्न होऊन भाषिक वादही मिटले असते, निदान त्यांची तीव्रता कमी झाली असती; पूर्वपरंपरा त्रुटित न होतां वैशिष्ट्य कायम राहिलें असतें; हे व यांसारखे अनेक फायदे संघराज्यांत मिळणारे असल्यानें व जनतेचें हित त्यानेंच साधणार आहे अशी आपली भावना व खात्री असल्यानेंच संघराज्य आपण बनविलें होतें. पण, लोकपुढाऱ्यांपैकींच कित्येकांना, नव्हे बऱ्याच जणांना, ही गोष्ट न पटल्यानें राजमंडळास, संस्थानाची परिस्थिति व कालाचा ओघ लक्षांत घेऊन, तसा ठराव करावा लागला; व आपल्या देशाचें संघटन व

अंतिम व व्यापक हित हीच प्रामुख्यानें नजरेसमोर ठेवून आपण त्या ठरावास व विलिनीकरणास पूर्ण विचाराअंतीं स्वेच्छेनें व संतोषानें मान्यता दिली, असें श्रीमंत राजेसाहेबांनीं त्यांना सांगितलें. कोणतीही नवी गोष्ट घडून आली, म्हणजे तिच्याविषयीं मनें साशंक असणें व भिन्न भिन्न विचार मनांत उत्पन्न होणें स्वाभाविकच आहे. या प्रकारच्या निरनिराळ्या विचारप्रवाहांचा केवळ एक नमुना म्हणून श्रीयुत ज. स. करंदीकर यांचा सह्याद्री मासिकांतील लेख परिशिष्टांत नं. ३८ ठिकाणीं दिला आहे.

## प्रकरण २६ वें

# विलिनीकरणानंतरच्या महत्त्वाच्या गोष्टी

महाबळेश्वर येथें ता. १६-५-४८ रोजीं मि. एस्. जी. बर्वे, आय. सी. एस्. पुण्याचे कलेक्टर व त्यांची पत्नी यांना श्रीमंतांनीं भोजनास बोलाविलें होतें.

ता. २९-५-४८ रोजीं भोर स्टेट बँकेच्या पुणें येथील शाखेचा उद्घाटन-समारंभ झाला. श्री. म. व्यं. शिंगरे यांनीं श्रीमंतांचें स्वागत केलें. नंतर बँकचे एक डायरेक्टर श्रीयुत वि. वि. बावडेकर यांच्या विनंतीप्रमाणें श्रीमंतांनीं शाखा उघडल्याचें जाहीर केलें, व रु. १००० एक हजार बँकेंत ठेवून आपलें खातें सुरू केलें.

पुणें येथें श्रीमंत राजेसाहेब हे जत व श्रीमंत कागलकर ( सीनिअर ) यांच्या लग्न-समारंभास ता. १२-७-४८ इ. रोजीं उपस्थित होते.

श्रीयुत एन्. व्ही. गाडगीळ यांनीं पुणें काँग्रेस भुवन येथें स्टँडिंग कमिटीच्या सभासदांस भेटण्याचा ता. २४-७-४८ रोजीं समारंभ केला. त्यास श्रीमंत गेले होते.

ता. २५-७-४८ रोजीं श्रीमंत राजेसाहेब हे पुणें गव्हर्नमेंट हाउसमध्यें ने. ना. गव्हर्नरसाहेब सर महाराजासिंग व त्यांच्या पत्नी यांच्याबरोबर लंच ( दुपारचें भोजन ) ला होते.

श्रीयुत आप्पासाहेब पंत बॅरिस्टर यांना हिंद सरकारनें आपले आफ्रिकेंतील हाय कमिशनर नेमलें. म्हणून, श्रीमंतांनीं त्यांना व श्रीमंत राजेसाहेब, औंध, यांना ता. २८-७-४८ इ. रोजीं आपल्या बंगल्यांत चहास बोलाविलें होतें.

ने. ना. हि. ए. लोकमान्य अणे, बिहारचे गव्हर्नरसाहेब, यांनीं महाराष्ट्र व्यायाम मंडळ, पुणें, या संस्थेस ता. २-८-४८ इ. रोजीं भेट दिली. त्या समारंभास श्रीमंत गेले होते.

हर एक्सलन्सी राणी महाराजसिंग व कुनवार रणवीरसिंग यांना ता. १०-८-४८ इ. रोजीं श्रीमंतांनीं बंगल्यावर चहापार्टी दिली. त्या वेळीं त्यांना Twentyone Weeks in Europe of Royal Coronation and My

Second Trip to Europe हीं दोन पुस्तकें, आपल्या यूरोपच्या प्रवासवृत्ताचीं, गव्हर्नरसाहेब व त्यांच्या पत्नी यांस अर्पण केलीं.

स्वातंत्र्यदिनानिमित्त पुणें रेसकोर्सवर सेरिमोनिअल परेड ता. १५-८-१९४८ रोजीं सकाळीं झाली. त्याच दिवशीं दुपारीं मि. चैनानी, कमिशनर, यांनीं आपल्या बंगल्यांत At Home पार्टी दिली. त्या दोन्ही समारंभांस श्रीमंत गेले होते.

महाराष्ट्र व्यायाम मंडळ, पुणें, या संस्थेस ने. ना. जयकर, बार-अॅट-लॉ यांनीं ता. २४-८-४८ रोजीं भेट दिली, त्या समारंभास श्रीमंत गेले होते.

सर परशुरामभाऊ कॉलेजचे माजी प्रिन्सिपाल श्रीयुत करमरकर यांचा सत्कार-समारंभ ता. ३१-८-४८ रोजीं झाला. त्यास मदतीदाखल रु. १०० शंभर श्रीमंत राजेसाहेब यांनीं दिले.

भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिटयूट, पुणें, या संस्थेस ने. ना. गव्हर्नर सर महाराजसिंग यांनीं ता. ६-९-४८ रोजीं भेट दिली. त्या समारंभास श्रीमंत उपस्थित होते.

भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणें, या संस्थेस ने. ना. सर महाराजसिंग, गव्हर्नरसाहेब, यांनीं ता. ८-९-४८ रोजीं भेट दिली. त्या समारंभास श्रीमंत राजेसाहेब गेले होते.

महाराष्ट्र व्यायाम मंडळास सरदार श्रीमंत बिवलकर यांनीं अॅम्ब्युलन्स कार दिली. तन्निमित्त श्रीयुत काकासाहेब गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखालीं ता. १९-९-४८ रोजीं झालेल्या समारंभास श्रीमंत गेले होते.

पुणें सेवासदन रेड क्रॉस समारंभ ता. २५-९-४८ रोजीं झाला. त्यास श्रीमंत राजेसाहेब उपस्थित होते. सदर संस्थेच्या कार्यास रु. २०० दोनशें देणगी दिली.

ता. २८-९-४८ रोजीं सकाळीं श्रीमंत राजेसाहेब हे नामदार बाळासाहेब खेर, प्रधान मंत्री, यांच्या भेटीस गेले होते.

त्याच दिवशीं दुपारीं श्रीमंतांच्या ७१ व्या वाढ-दिवसानिमित्त श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार, श्री. सरदार बाळासाहेब पुरंदरे, भारत हायस्कूल,

पुणें, या संस्थेचे मि. एस्. एन्. कुळकर्णी, श्रीयुत तुंगारशास्त्री व पुणें, पद्मा संगीत विद्यालयाचे चालक, अशी मंडळी आली. त्यांनीं श्रीमंतांस पुष्पहार अर्पण करून त्यांचें अभिनंदन केलें.

ता. १२-१०-४८ दसऱ्याच्या दिवशीं गव्हर्नमेंट हाउस, पुणें, येथील At Home पार्टीला श्रीमंत राजेसाहेब गेले होते.

## नामदार खेर यांची पंतसचिव बालवीर-मंदिर, पुणें, या संस्थेस भेट

नामदार बाळासाहेब खेर यांनीं गुरुवार ता. १४ ऑक्टोबर १९४८ इ. रोजीं सकाळीं ८ वाजतां वरील संस्थेस भेट दिली. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांनीं, संस्थेचे अध्यक्ष या नात्यानें, नामदारांचें स्वागत केलें. ना. खेर यांनीं नंतर जमलेल्या सुमारें १००० बॉय स्काउटस् व ५०० गर्ल गाइडस् यांच्या मेळाव्याची पाहणी केली. पाहणी आटोपून ते स्थानापन्न झाल्यावर, मुलें व मुली यांनीं आपल्या अनेकविध खेळांचीं व कार्यांचीं ( Scout Craft ) प्रात्यक्षिकें करून दाखविलीं. नंतर नामदारसाहेब, श्रीमंत राजेसाहेबांसह, उच्चासनीं विराजमान झाल्यावर, श्रीयुत बाबुराव जगताप यांनीं स्वागतपर भाषण करून बॉय स्काउट व हिंदुस्थान स्काउट या संस्थांची हकीगत निवेदन केली. नंतर, श्रीयुत नातु, असि. प्रॉव्हिन्शिअल स्काउट कमिशनर, मध्यभाग, मुंबई, यांनीं पुणें शाखेच्या सदर संस्थेच्या प्रगतीचा साद्यंत इतिहास सांगितला व श्रीमंत राजेसाहेब यांच्या पुरोगामित्वाकडेच त्याचें बरेंचसें श्रेय जातें, व समोर दिसत असलेल्या इमारतीच्या अस्तित्वास श्रीमंतांचें दातृत्वच बहुतांशीं कारणीभूत झालें आहे असा उल्लेख करून, संस्थेच्या कायम फंडास श्रीमंत राजेसाहेब यांनीं रु. ५००० पांच हजार नुकतेच दिल्याचें जाहीर केलें. त्यानंतर, नामदारांच्या हस्तें संस्थेतर्फे श्रीमंतांना, त्यांच्या बहुविध व दीर्घकालीन मदतीबद्दल, आभार-प्रदर्शक ( फ्रेंडस् बॅज ) स्वस्तिकाकृति व कमलयुक्त पदक अर्पण करण्यांत आलें. नंतर, श्रीमंतांनीं भाषण करून संस्थेस नामदारांनीं भेट दिल्याबद्दल त्यांचे आभार मानले. हें भाषण परिशिष्टांत नं. ३९ ठिकाणीं दिलें आहे.

श्रीमंत राजेसाहेब यांच्या भाषणानंतर, नामदारसाहेबांनीं भाषण केलें. त्यांत त्यांनीं मुलांमुलींनीं करून दाखविलेल्या यशस्वी व व्यवहारोपयोगी खेळां-

चित्रांक ८५



मुंबईचे गव्हर्नर सर महाराजसिंग हे श्री. राजेसाहेब यांच्या बंगल्यावर भेटीस आले व चहा घेतला.

बद्दल त्यांचें प्रथम अभिनंदन करून, बालवीर व गर्ल गाइडस्‌ची चळवळ जाती-धर्म-मतादि भिन्नतेपासून अलिप्त असल्यानें, राष्ट्राच्या आगामी उत्कर्षास अशाच व्यापक व उदार वृत्तीच्या स्त्रीपुरुषांची जरूरी असल्यानें व तशी भावी पिढी व्हावी हेंच या संस्थेचें ध्येय असून त्या दिशेनेंच संस्थेचे प्रयत्न चालू असल्यानें, संस्थेस केव्हांही जास्तींतजास्त शक्य ती मदत करूं असें त्यांनीं आश्वासन दिलें; व श्रीमंतांनीं संस्थेस केलेल्या बहुविध मदतीबद्दल संतोष व्यक्त करून, आपलें भाषण संपविलें.

नंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं नामदारसाहेबांना पुष्पहार व गुच्छ अर्पण केल्यावर हा समारंभ समाप्त झाला.

## गोपाळ गायन समाज, पुणें, या संस्थेचा तिसावा वार्षिकोत्सव व बक्षिस-समारंभ

गोपाळ गायन समाज, संगीत महाविद्यालय, पुणें, या संस्थेचा ३० वा वार्षिकोत्सव शनिवार ता. १६ ऑक्टोबर १९४८ इ. रोजीं सायंकाळीं ५ वाजतां श्रीमंतांच्या अध्यक्षतेखालीं झाला. गायन-वादन कलेच्या प्रथमा, द्वितीया व पदवीपरीक्षा वगैरे परीक्षांत उत्तीर्ण झालेल्या मुलांमुलींना प्रमाणपत्रें व बक्षिसें श्रीमंतांनीं दिलीं. नंतर, श्रीमंतांनीं भाषण केलें. (तें भाषण परीशिष्टांत नं. ४० ठिकाणीं दिलें आहे.) त्यांत संस्थेस मदतीदाखल रु. ५०० पांचशें दिल्याचें सांगितलें. संस्थेचे प्रमुख यांनीं श्रीमंतांचे हार्दिक आभार मानल्यावर, विद्यार्थिनींच्या गायनाचा कार्यक्रम झाला. शेवटीं, राष्ट्रगीत होऊन, समारंभाचें काम समाप्त झालें.

ता. १९-१०-४८ रोजीं नामदार वैकुंठलाल मेहता, अर्थमंत्री, हे श्रीमंत राजेसाहेब यांना भेटण्यास व त्यांच्याबरोबर चहा घेणेस बंगल्यांत आले होते.

ता. २०-१०-४८ रोजीं ने. ना. गव्हर्नर सर महाराजसिंग हे श्रीमंत राजेसाहेबांना भेटण्यास बंगल्यावर आले होते. चहा घेतल्यावर, श्रीमंतांसमवेत गव्हर्नरसाहेबांचा फोटो घेण्यांत आला.

राजेबहाद्दूर मेजर सर मालोजीराव नानासाहेब, राजेसाहेब, फलटण, यांनीं मुंबई सरकारच्या मिनिस्टर्सना ता. २२-१०-४८ रोजीं पुणें कोहिनूर हॉटेलमध्यें डिनर पार्टी दिली. तीस श्रीमंत गेले होते.

ता. २५-१०-४८ रोजीं नामदार फिरोदिया हे श्रीमंत राजेसाहेबांकडे बंगल्यावर चहास आले होते.

## पुणें येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणोत्तेजक संस्थेचा वाढदिवस व श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्या तसबिरीचें अनावरण

मंगळवार, ता. २-११-४८ इ.

श्रीमंत बाळासाहेब पुरंदरे यांच्या स्वागतपर भाषणानंतर सेक्रेटरी यांनीं संस्थेचा गतसालचा अहवाल निवेदित केला. नंतर, डॉ. बाळासाहेब मुजुमदार यांच्या शिक्षणविषयक कामगिरीची माहिती रा. कुळकर्णी यांनीं सांगितल्यावर, श्रीमंत राजेसाहेब यांनीं सरदार श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांच्या तसबिरी-वरील पडदा दूर सारून तिचें अनावरण करून भाषण केलें. तें परिशिष्टांत नं. ४१ ठिकाणीं दिलें आहे. नंतर, सरदार श्रीमंत आबासाहेब व डॉ. बाळा-साहेब यांचीं आभारप्रदर्शक भाषणें व वंदेमातरम् गीत होऊन समारंभ संपला.

## रु. ३०५०० तीस हजार पांचशेंच्या दर्शनी किंमतीच्या गव्हर्नमेंट प्रॉमिसरी नोटा पुणें युनिव्हर्सिटीच्या नांवें करून देण्याचें श्रीमंतांनीं ठरविलें आहे.

श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपल्या खाजगींतून वेगळी रक्कम काढून तिच्या व्याजांतून चार शिष्यवृत्त्या ठेवून ज्ञानाच्या वाङ्मय (Arts) शाखेव्यतिरिक्त वैद्यक, शेती, स्थापत्य वगैरे शाखांचें ज्ञान विद्यार्थ्यांना मिळविण्याची सोय केली होती. त्या सोयीचा फायदा आतांपर्यंत संस्थानातील विद्यार्थ्यांना मिळालाही आहे. तथापि, आतां संस्थान विलीन झालें असल्यानें, त्या व्याजाचा विनियोग इतर रीतींनीं व सर्वांच्याच हिताकरतां व्हावा, म्हणून सदरची रक्कम म्हणजे रु. ३०५०० तीस हजार पांचशेंच्या दर्शनी किंमतीच्या गव्हर्नमेंट प्रॉमिसरी नोटा, त्यांच्या व्याजाचा विनियोग मराठी भाषेंत शास्त्रीय (Sciences) वगैरे विषयांवरील ग्रंथ तयार होण्याकडे करावा व ती ग्रंथमाला कै. हर हायनेस

श्रीमंत सौ. जिजीसाहेब ( श्रीमंत राजेसाहेबांच्या मातोश्री ), कै. श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब ( श्रीमंत राजेसाहेब यांच्या प्रथम पत्नी ) व कै. श्रीमंत सौ. राणी लक्ष्मीबाईसाहेब ( श्रीमंत राजेसाहेब यांच्या द्वितीय पत्नी ) यांच्या नांवें प्रसिद्ध व्हावी, या शर्तीवर नुकत्याच प्रस्थापित झालेल्या पुणें युनिव्हर्सिटीच्या नांवें करून देण्याचें, सदर युनिव्हर्सिटीचे सध्यांचे व्हाइस चॅन्सेलर ने. ना. डॉ. जयकर, बार-ॲट-लॉ, यांच्याशीं विचारविनिमय करून, श्रीमंतांनीं ठरविलें आहे; व याबद्दल ने. ना. डॉ. जयकर, बार-ॲट-लॉ, यांच्याकडून तारीख २६-११-१९४८ चें पत्र श्रीमंत राजेसाहेब यांना आलें आहे. त्यांतील उतारा खालील-प्रमाणें आहे :

" Mahamahopadhyaya D. V. Potdar has seen me with your scheme of a donation of Rs. 30,500/- to this University, to be utilized periodically in publishing a series of books as mentioned in detail in a copy of the scheme supplied to me.

" May I first of all thank your good self for your generosity, which I, as the First Honorary Vice-Chancellor of this University, very deeply appreciate. It is in keeping with the traditions of the Gadi which you occupied until very recently.

Speaking generally, I have assured Mahamahopadhyaya Potdar that the University will gratefully accept this gift and will agree, in general terms, to the conditions mentioned in the document I have in my hand."

---

## प्रकरण २७ वें

# हिज हायनेस श्रीमंत राजेसाहेब यांच्या, युवराज असतां वेळच्या हकीगतीसह, पचवीस वर्षांच्या कारकीर्दीचें सिंहावलोकन

**मनसि वाचि क्रियायां च महतामेकरूपता ।**

श्रीमंत राजेसाहेब यांच्या पंचवीस वर्षांच्या कारकीर्दीचें जें सिंहावलोकन यांत करण्याचें योजिलें आहे, त्यांत श्रीमंतांच्या राज्यकारभारासंबंधींच्याच गोष्टींचा प्रामुख्यानें पुढें निर्देश केला जाणार आहे. अर्थात्, त्यांत श्रीमंतांच्या वैयक्तिक वा कौटुंबिक बाबींचा उल्लेख येणार नसला, तरी ज्या बाबींचा—उदाहरणार्थ, नरेंद्रमंडळाचें सभासदत्व, तोफांच्या सलामीचा मान वगैरे—संबंध प्रत्यक्षतः अथवा अप्रत्यक्ष रीतीनें राज्यकारभाराच्या गोष्टींशीं पोंचत आहे, अशा बाबींचाही तेवढ्यापुरता निर्देश या समालोचनांत व तोही प्रथमच अवश्यमेव म्हणून करण्यांत येत आहे.

राज्यकारभार म्हणजे राजा व प्रजा त्यांच्या संबंधाची अनेक कार्यांची अथवा कृतींची परंपरा; यापेक्षां दुसरें कांहीं एक नाहीं. या कृतींचें दर्शन प्रथम शब्द-द्वारा होतें. काय करण्याचें योजिलें आहे, तें अगोदर भाषणांत सांगितलें जातें, व नंतर त्याचें कृतींत रूपांतर होतें. ह्या भाषणाचा उगमही विचारांत असतो. जसा विचार असेल, तसा उच्चार होईल; व जसें बोललें जाईल, तसें तें कृतींत प्रतिबिंबित होईल. तथापि, विचार, उच्चार व आचार या त्रयींतील मध्यम पद म्हणजे ' उच्चार ' हे विचाराचें प्रतिबिंब असेलच, अशी नेहमींच व सर्वत्रच खात्री देतां येईल असें नाहीं. कदाचित्, विचाराप्रमाणें आचार होईल व उच्चारा-नुसार वर्तनही घडेल, असें एक वेळां म्हणतां येईल; पण, विचार व उच्चार यांच्या संबंधाबाबत मात्र तशी ग्वाही देतां येत नाहीं. विचाराचें स्वरूप कांहींसें कृतीनें समजून येईल, नाहीं असें नाहीं. पण, त्यांच्यांतही अव्यभिचारी संबंध असण्याची हमी मात्र देतां येत नाहीं. मूलभूत विचारसृष्टि (World of Basic

Ideas) ही इतकी अनवगाहनीय आहे; व म्हणूनच, ज्यांच्या ठिकाणीं, विचाराशीं जुळती वाणी व वाणीच्याप्रमाणेंच वर्तन, अशी स्थिति दिसून येईल, त्यासच मोठा मनुष्य असें म्हटलें जातें, असा वरील सुभाषिताचा तात्पर्यार्थ आहे. तेव्हां, श्रीमंतांच्या ठिकाणीं वरील त्रयी परस्पर-सुसंगत होती कां कसें, हें पाहणें आहे. विचार म्हणजेच स्वभाव; अशी स्थिति असल्यानें, प्रस्तुत प्रकरणाच्या कारणापुरती श्रीमंतांच्या विचाराची दिशा कशी होती, तें दर्शित करणें अवश्य ठरतें.

## श्रीमंतांच्या स्वभावाचें दर्शन

स्वभाव म्हणजे गुण व दोष यांचें मिश्रण. जगांत निर्दोष अथवा निर्गुण अशी वस्तूच नाहीं. अर्थात्, श्रीमंतांच्या स्वभावांत गुण आहेत, तसेंच दोषही आहेत, याची जाणीव खुद्द त्यांना आहे. तथापि, साकल्यानें विचार केल्यास व निर्विकार मनानें व परिस्थितीचें आकलन करून पाहिलें, तर त्यांच्या ठिकाणीं गुणांचेंच बाहुल्य आहे हें कोणीही मान्य करील. शिवाय, दोषांतही तरतमभाव असतोच. कांहीं स्वभावदोष क्षुल्लक व उपेक्षणीय असतात, तर कांहींचा प्रकृत वस्तुविषयाशीं संबंध नसतो; तर कांहीं, ‘ एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः । ’ या वचनाप्रमाणें, गुणसमुच्चयांत लुप्त होणारे असतात; तशीच वस्तुस्थिति श्रीमंतांच्या ठिकाणच्या दोषांची असल्यानें, त्यांचें विवेचन यांत करण्याचें कारण नाहीं. कांहीं दोषांना ‘ क्षुल्लक व उपेक्षणीय ’ असें वरती म्हटलें आहे, त्याचें कारण, श्रीमंतांना एखादी चूक झाली आहे असें पटलें, —मग, ती चूक त्यांची स्वतःची असो किंवा त्यांच्या अंमलदाराची वा इतर नोकराची असो— म्हणजे ती दुरुस्त करण्याच्या कामीं, Prestige is furniture in King's palace या महात्मा गांधींच्या वचनांतील मर्म लक्षांत घेऊन, श्रीमंत आपल्या प्रतिष्ठेची बाब कधींही आड येऊं देत नाहींत. ती चूक दुरुस्त करण्यास ते सदैव तयार असतात. त्यांच्या मनाची ही ठेवण अथवा घडण वैयक्तिक चूक दुरुस्त करण्यांत दिसून येते, तशीच ती सामाजिक चुका, म्हणजेच बहुजन समुदायाच्या समजुती व रूढी—एका काळीं त्या अवश्य व उपयुक्त असल्या, तरी बदललेल्या परिस्थितींत ज्या अपायकारक अशा होत असल्याचें दिसतें व अनुभवास येतें—दुरुस्त करण्याच्या कामांतही दिसून येते.

मात्र, समाजसुधारणेच्या संबंधांत—मग, ती बाब सामाजिक, धार्मिक, राजकीय किंवा इतर कोणत्याही प्रकारची असो—श्रीमंत राजेसाहेब हे उत्क्रांतीचे पुरस्कर्ते आहेत. जुन्यांतील व नव्यांतील चांगल्यांचें रक्षण व ग्रहण, याचेंच नांव प्रगति असें ते समजतात. क्रान्तीचा मार्ग त्यांना पसंत नसे. पर्णालिका पुढील पावलांची जागा सुरक्षित व निश्चित झाल्याविना मागील पाऊल उचलीत नाहीं. निसर्गाचें हें प्रात्यक्षिकच प्रगतिपथ आक्रमणाच्या कामीं अनुकरणीय आहे असें ते समजतात.

त्याचप्रमाणें श्रीमंतांचें वर्तन 'पुरस्कृतमध्यमक्रम' ( रघु. ८।९ ) या प्रकारचें असे. तें अति कडक किंवा अति मृदु, जास्त विश्वासाचें किंवा अतीव अविश्वासाचें असें नसे. इतकेंच नव्हे, तर प्रत्येकाला 'अहमेव मतो महीपतेः ।' म्हणजे श्रीमंतांचा माझ्यावर विश्वास आहे, त्यांचें मत मजविषयीं चांगलें आहे असें वाटावें, पण त्याचा दुरुपयोग त्यास करतां येऊं नये व मर्यादातिक्रम होऊं नये, असेंच असे.

महत्त्वाकांक्षा हें एक श्रीमंतांचें स्वभाववैशिष्ट्य आहे. त्या महत्त्वाकांक्षी स्वभावामुळेंच त्यांच्या ठिकाणीं 'युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्त-स्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥' या गीतावचनाप्रमाणें, वागणुकीचा मर्यादितपणा व नियमितपणा हा गुण दिसून येतो. त्यांची प्रकृति मूळची धडधाकट नव्हती; तथापि, चांगलीं कामें व तींही आपल्या हातून पुष्कळ व्हावीं, असें त्यांना वाटत असल्यानें व तें घडून येण्यास आपण पुष्कळ दिवस जगलें पाहिजे ह्याचीही जाणीव त्यांना असल्यानें, आहारविहाराच्या बाबतींत त्यांनीं आपल्या मनावर पुष्कळ व प्रशंसनीय असाच दाब ठेविला आहे. सर्वथा युक्त अथवा हितकर व परिमित वागण्यामुळेंच त्यांना दीर्घायुत्व लाभलें व इतकें कार्य करतां आलें, हें कोणीही कबूल करील.

श्रीमंतांच्या स्वभावांतील उल्लेख करण्यासारखा आणखी एक गुणविशेष म्हणजे त्यांचें क्षमाशीलत्व. खुनशीपणा हा स्वभावदोष त्यांच्या ठिकाणीं मुळींच नाहीं; इतकेंच नव्हे, तर 'शत्रोरपि गुणाः ग्राह्याः ।' या हितोपदेशाप्रमाणें, विरुद्ध पक्षांतीलही चांगल्याचें गुणग्रहण करण्यास ते अनमान करीत नाहींत. उदाहरणार्थ, श्रीमंत राजेसाहेब व त्यांचे वडील यांचीं मनें एकमेकांबद्दल चांगलीं नव्हतीं; तरी वडिलांच्या ठिकाणीं असलेल्या गुणांची त्यांना जाणीव होती.

त्या गुणांचा उल्लेख त्यांनीं किती मनमोकळेपणानें केला आहे, तें खंड ३ मधील चित्रांक २०८ या, श्रीमंतांच्या इंग्रजी हस्ताक्षराच्या, पत्रांतील मजकुरावरून कळून येणार आहे. इतकेंच नव्हे, तर भोर येथें श्रीरामबागेंतील जुन्या बंगल्या-शेजारीं नवीन बांधलेल्या गेस्ट हाउस बंगल्यास वडिलांचें नांव देऊन, श्रीमंतांनीं त्यांचें व आपल्या पितृभक्तीचें कायमचें स्मारक करून ठेविलें आहे. त्याचप्रमाणें वडिलांच्या वेळीं कांहीं नोकर श्रीमंतांशीं चांगल्या प्रकारें वागत नसत. तथापि, गादीवर आल्यावर श्रीमंतांनीं आपल्या मनांत तो आकस बिलकुल ठेविला नाहीं. कारण, जेथें पिता व पुत्र यांचे अन्योन्यसंबंध बऱ्या प्रकारचे नसतात, तेथें, 'नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता।' या भर्तृहरिवचनाप्रमाणें, पिता व पुत्र या दोघांना संतुष्ट ठेवणें नोकरांस अवघड होतें, याची जाणीव श्रीमंतांना होती. हा समंजसपणा ज्या राजपुत्राच्या ठिकाणीं नसतो—व पुष्कळांच्या ठिकाणीं तो नसल्याचेंच दिसून येतें—ते गादीनशीन झाल्यावर अशा प्रकारच्या पूर्वीच्या नोकरांना काढून टाकतात. पण, श्रीमंतांनीं तसें कांहीं एक केलें नाहीं. अशा नोकरांना त्यांच्या कामावर ठेविलें. इतकेंच नव्हे, तर त्यांपैकीं ज्यांची हुशारी व राजनिष्ठा दिसून आली, त्यांना श्रीमंतांनीं बढती देऊन त्यांच्या गुणांचें चीजच केलें. यामुळें, कामाच्या सातत्यांत ( Continuity ) बिघाड उत्पन्न झाला नाहीं, नोकरीच्या शाश्वतीचें तत्त्व सांभाळलें गेलें व माहितगार पण असंतुष्ट अशा सेवा-बहिष्कृत नोकरांचा वर्ग राज्यांत तयार होण्याची जी भीति असते, तीही टळली. सारांश, एक राजा गेला, कीं दुसऱ्याच्या सुरुवातीस राज्यांत जी उलथापालथ इतरत्र कांहीं ठिकाणीं होते, तसा प्रकार श्रीमंतांनीं बिलकूल होऊं दिला नाहीं. त्यांच्या या चातुर्याच्या व दूरदर्शीपणाच्या धोरणाची पोलिटिकल ऑफिसर लोकांनीं प्रशंसाच केली.

श्रीमंतांच्या स्वभावांतील आणखी एक विशेष म्हणजे पूर्वजांविषयीं आदर व अभिमान हा होय. श्रीशंकराजी नारायण यांच्याबद्दल तर त्यांच्या मनांत नितांत आदराची भावना आहे. त्याचें दृश्य स्वरूप म्हणजे अंबवडें येथील त्यांच्या पाषाणमय समाधीचें श्रीमंतांनीं स. १९३५ इ. सालीं रु. ३१,००० एकतीस हजार खर्चून संगमरवरी समाधींत केलेलें रूपांतर हें होय. तसेंच,

पूर्वीपासून चालत आलेलीं धर्मकृत्यें अबाधितपणें व यथास्थित रीतीनें चालावींत व करावींत, याविषयींही ते आस्थापूर्वक काळजी घेतात.

श्रीमंतांच्या ठिकाणीं महत्त्वाकांक्षेप्रमाणेंच, राजकारणपटुता, दीर्घोद्योगित्व व दमदारपणा हे वडिलांकडून आलेले गुण त्यांच्या स्वभावांत उत्कटत्वानें प्रतीत होतात; तसेंच, मातेकडून प्राप्त झालेले धर्मप्रवणता व नीतिमत्ता हें गुणद्वय ठळकपणें दिसून येतें.

संस्थानच्या हक्कांचें रक्षण करण्याची बाब असो, कीं प्रजेचें हित साधण्याची गोष्ट असो, आपली बाजू सत्य व न्याय्य आहे अशी त्यांची खात्री झाल्यावर, साम्राज्य सरकारशींही अगदीं शेवटपर्यंत झगडण्यांत त्यांनीं यत्किंचितही कसूर केली नाहीं, हें, भाटघर कॉंपेन्सेशन, अबकारी कॉंपेन्सेशन, पाली-खोपवली सडकेवरील मिरकुटवाडीजवळील मुंबई सरकारनें नवीन बसविलेलें टोलनाकें ( स. १९२३-२४ ) उठविणें, इत्यादि गुंतागुंतीचे प्रश्न त्यांनीं किती निर्धारानें व कुशलतेनें सोडविले, यावरूनच समजून येणार आहे.

श्रीमंतांच्या मूळच्या धर्मप्रवृत्तीस पूर्वायुष्यांतील एका आपत्प्रसंगानें तर जास्त दृढता आली, असें, त्यांच्याकडून श्रवण केलेल्या हकीगतीवरून, कळतें. त्यांचा प्रथम विवाह ' रत्नं समागच्छतु काञ्चनेन । ' ( रघुवंश ६।७९ ) या प्रकारचा असल्यानें व कै. श्री. सौ. गंगुताई यांच्या ठिकाणीं, ' यस्यां मनश्चक्षुषोर्निबन्धस्तस्यामृद्धिः । ' या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें, रूप व गुण या दोहोंचा समन्वय असल्यानें, त्यांच्या अकालीं व आकस्मिक निधनानें श्रीमंतांच्या मनावर मोठाच आघात झाला. आपत्ति ह्या मनुष्याचें मन ईश्वरसन्मुख करण्याचें एकमेव व प्रमुख साधन आहे. त्याप्रमाणें त्यांच्या मनास आलेल्या विषण्णतेचें निवारण होण्यास कै. प्रो. चिं. गं. भानु यांच्या ( मराठी ) सटीक गीतेचें वाचन व कान्हेरे शास्त्री यांच्या गीतेवरील प्रवचनांचें श्रवण ( हीं प्रवचनें पुण्यास तुळशीबागेंत त्या वेळीं नित्य रात्रीं श्रीरामापुढें होत असत. ), या दोहोंची बरीच मदत झाली. तसेंच, पुढें लोकमान्य टिळक यांचें ' गीतारहस्य ' वाचनांत आल्यावर तर, त्यांच्या मनास पुष्कळच शांति प्राप्त झाली. कर्म हें ज्ञानाधिष्ठित व भक्तिपुरस्कृत अशा स्वरूपाचें पाहिजे. कर्म हें नुसतें ज्ञानमूलक असलें, तर त्यास गतिमत्त्व येण्यास भक्ति ऊर्फ प्रेमाचा जोर मिळावा लागतो; तसेंच, केवळ

भक्तीच्या आधारावर अथवा प्रेरणेनें झालेलें कर्म ज्ञानावांचून आंधळें होण्याचें भय असतें. यास्तव, कर्म–मग, तें प्रवाहप्राप्त असो वा स्वेच्छास्वीकृत असो–ज्ञानाधिष्ठित व भक्तिपुरस्कृत असेंच पाहिजे; व तेंही निष्काम म्हणजे फलापेक्षा-रहितपणें केलें पाहिजे; कारण, सिद्धि अथवा फलप्राप्ति ही गोष्ट ईश्वरी सत्ता व प्राक्तनयोग यांवर, म्हणजेच परिस्थितीच्या आनुकूल्यतेवर, अवलंबून असतें, हें गीतेचें तत्त्व गीतारहस्याच्या वाचनानें आपल्या मनावर बिंबलें असें नेहमीं श्रीमंतांच्या बोलण्यांत येतें.

श्रीमंतांच्या एतद्विषयक विचारसरणींत व वागणुकींत प्रयत्नवाद व दैव-वाद या दोहोंचें मधुर मीलन झालें आहे. दैव हें प्रयत्नांनीं निश्चित होतें. ' पुरुषकारमनुवर्तते दैवम् । ' नुसत्या दैवावर विसंबून राहण्यानें कार्यसिद्धि होत नाहीं. ' न दैवप्रमाणानां सिद्धिः । ' तथापि, कांहीं घटना आकस्मिक-पणेंच घडून येतात. त्यांची कारणपरंपरा आपणास कळत नाहीं; व त्याविरुद्ध इलाजही नसतो. अशा घटना ईश्वरी इच्छेनें घडून येतात, असें ते समजत असल्यानें, सर्वथा प्रतिकूल परिस्थितींतही ते आपलें मनःस्वास्थ्य फारसें ढळूं देत नाहींत; इतकेंच नव्हे, तर विपरीत भासणाऱ्या घटनेंतूनही चांगल्याचा स्वीकार करणें, त्या विधिलसिताचें स्वागत करणें व आनंदानें तसल्याही स्थितीशीं पूर्णतः मिळतें घेणें, ह्या गोष्टी त्यांच्या ठिकाणीं प्रतीत होतात. त्याचा अनुभव नुकताच आला. ' ऋद्धं हि राज्यं पदमैन्द्रमाहुः । ' ( रघुवंश २-५९ ) अशी स्थिति अनुभवीत असतां, एकाएकींच आलेली संस्थानाच्या विलिनीकरणाची दुःखद गोष्ट त्यांनीं किती मनोधैर्यानें स्वीकारली, नंतर कालाचा ओघ लक्षांत घेऊन व प्रजाजनांचीही तशी इच्छा आहे असें पाहून तिचें स्वागत कसें केलें व सर्व देशाच्या हितांतच आपलें व्यक्तिगत अंतिम हित समाविष्ट करण्यांत शेवटीं त्यांनीं कसा आनंद मानला, हें ज्यानें पाहिलें आहे, त्यास दुसरें उदाहरण देणें नकोच; इतकें तें खात्री पटविणारें व उघड आहे. संस्थानाच्या विलिनीकरण कार्यक्रमास भोर येथें ता. ८-३-१९४८ रोजीं समक्ष हजर राहून ( अशी गोष्ट इतर संस्थानांत क्वचितच झाली ) ती गोष्ट त्यांनीं आपल्या प्रजाजनांस प्रत्यक्षच दाखविली. तात्पर्य, परिस्थितीशीं जुळती

( Adaptability ) अशी मनाची ठेवण तयार करून संतुष्ट असणें, हा एक श्रीमंतांच्या ठिकाणीं मोठाच गुण असल्याचें दिसून येतें.

लोक ज्यांना जगांत मोठे म्हणतात, त्यांच्याप्रमाणें आपण व्हावें, लोकांनीं आपणांस चांगलें म्हणावें व आपल्या हातून कांहीं तरी लोकोपयोगी चांगलें काम व्हावें, अशी महत्त्वाकांक्षा श्रीमंतांच्या ठिकाणीं असल्याचें, त्यांना समजूं लागल्यानंतर त्यांचे जे उद्गार निघत, त्यांवरून दिसून येई. अभ्यास केला व ज्ञान मिळविलें, तरच आपणांस मोठे होतां येईल, या समजेप्रमाणें ते झटून अभ्यास करीत; पण, बुद्धीचें मध्यम मान, मूळचीच अशक्त शरीरप्रकृति, वडिलांच्याबरोबर लहानपणीं वरचेवर करावे लागणारे प्रवास व तशांतच सुरुवातीचे जुन्या वळणाचे शिक्षक, या कारणचतुष्टयामुळें त्यांची व्हावी तितकी अभ्यासांत प्रगति होत असल्याचें दिसून येत नसे. पण, पुढें इंग्रजी विद्याभ्यासाकरतां श्रीमंतांना पुणें येथें स. १८९२ इ. च्या डिसेंबरांत ठेवल्यावर, स्वतःच्या मनाप्रमाणें अभ्यास करण्याचें जमून, पुण्याच्या मोकळ्या व सुसंस्कृत वातावरणांत त्यांच्या मनास प्रसन्नता प्राप्त झाली; व याचा त्यांनीं यावच्छक्य फायदाही घेतला. तथापि, तब्येतीचें मान व पुण्यास वरचेवर उद्भवणाऱ्या प्लेग, कॉलरा, वगैरेंच्या साथींमुळें अभ्यासांत येणारे अडथळे, यासारख्या कारणांनीं मॅट्रिक (स. १८९९ इ.) व प्रीव्हिअस ( स. १९०१ इ. ) या परीक्षांत त्यांना पहिल्या वर्षींच यश मिळवितां न आलें, तरी नाउमेद न होतां, पुढचा अभ्यास करून, थोडया उशीरानें कां होईना, पण ग्रॅज्युएट होण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. ही गोष्ट मॅट्रिक झाल्यानंतर त्यांना स. १९०० च्या मे महिन्यांत भोरास देण्यांत आलेल्या मानपत्रास त्यांनीं जें उत्तर दिलें, त्यांतील

> " जें काय कर्तव्य आहे, तें अद्याप पुढेंच आहे. तें मोठ्या नेटानें करून दाखविण्याची माझी उमेद आहे. विद्या हेंच मुख्य धन आहे. त्याची मोठी योग्यता आहे. "

या उद्गारांवरूनच सूचित होत आहे. तथापि, पुढें प्रीव्हिएस् झाल्यावर दृष्टीच अधू झाल्यानें, डॉक्टरच्या सल्ल्यावरून, त्यांना, नाइलाजच होऊन, अभ्यासक्रम स. १९०३ इ. सालअखेर सोडून देणें भाग पडलें. आपलें इच्छित ध्येय

सोडून द्यावें लागलें, याबद्दल अजूनही त्यांना वाईट वाटत असल्याचें, त्यांच्या मधूनमधून सहजीं बोलण्यांतील उद्गारांवरून, दिसून येतें.

ठराविक अभ्यासक्रम सोडावा लागला, तरी इतिहास, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, वगैरे विषयांवरील डेक्कन कॉलेजमधील व्याख्यानें ( Lectures ), प्रिन्सिपालच्या परवानगीनें, नेहमीं ऐकणें, तसेंच सभाचे अध्यक्ष होणें, सार्वजनिक व्याख्यानांचें श्रवण करणें व खाजगी वाचन चालू ठेवणें, वगैरे मार्गांनीं ते आपल्या ज्ञानांत भर करीतच असत.

याप्रमाणें पुण्यास राहिल्यानें मनमोकळेपणाचा लाभ श्रीमंतांना झाला, तरी वडिलांच्या अत्यंत काटकसरी वृत्तीमुळें, चांगल्या व अत्यवश्य वस्तूही त्यांना मिळत नसत व योग्य ठिकाणींही मनाप्रमाणें खर्च करतां येत नसे. त्यांच्या नैसर्गिक महत्त्वाकांक्षी स्वभावास तें कमीपणाचें वाटे. म्हणूनच,

## स्वतंत्र नेमणूक

करून घेण्याचा विचार त्यांच्या मनांत प्रादुर्भूत झाला. ती गोष्ट साध्य होणें फारच अवघड होतें. तशा प्रकारच्या गोष्टीचा पूर्वीं इतर ठिकाणचा दाखला असल्याचेंही आढळांत येत नव्हतें. खासगीरीत्या आपसांत ती मनीषा वडिलांकडून तृप्त होण्याचें मुळींच चिन्ह दिसेना; म्हणून, शेवटीं नाइलाजानें, त्यांनीं आपला हेतु कारणांसह मि. शेपर्ड पोलिटिकल एजंट यांस लेखी कळविला. पो. एजंटनें अवश्य ती चौकशी केली, व श्रीमंतांचें म्हणणें योग्य व खरें आहे अशी त्याची खात्री झाल्यावर, त्याच्याच मध्यस्थीनें, दरसाल रु. २५००० पंचवीस हजारांची नेमणूक स. १९०४ सालीं ठरली. श्रीमंतांचें वर्तन चोख असल्यानें, केवळ आप्तेष्ट अथवा तिऱ्हाईत प्रतिष्ठित गृहस्थ यांचेंच मत त्यांच्याविषयीं चांगलें व सहानुभूतिपूर्ण होतें एवढेंच नव्हे, तर ब्रिटिश अधिकारी वर्गासही त्यांच्या चारित्र्याची व लौकिकाची ( Reputation ) जाणीव होती; म्हणूनच, हें बिकट काम सिद्धीस गेलें. ( पदं हि सर्वत्र गुणैर्निधीयते। रघुवंश ३-६२. ) ‘ शीलं लोकवशीकरम्। ’ नेमणूक करून घेण्यांत त्यांची मनोभूमि शुद्ध होती, हें, ‘ फलानुमेयप्रारम्भाः ’। ( रघुवंश १-२० ) या वचनाप्रमाणें, त्यांच्या वर्तनावरून व पैशाच्या सद्व्ययावरून सिद्धच झालें. भोर येथें वाचनालयाच्या स्थापनेच्या वेळच्या अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत त्यांनीं पैशाच्या सद्व्ययासंबंधीं

" नैतिकदृष्ट्या पाहतां, प्रजेकडून आलेल्या पैशांतील बराचसा पैसा प्रजेच्याच कल्याणाकरितां खर्च झाला पाहिजे; व तसें तें न करणें म्हणजेच कृतघ्नपणा आहे, असें मला वाटतें. "

असे जे उद्गार काढले, त्यावरूनच ही गोष्ट स्पष्ट होत आहे. नेमणूक झाली, म्हणून त्यांनीं कधीं चैनीचा व उधळेपणाचा जीवनक्रम आरंभिला नाहीं. तर, आपल्या दर्जास योग्य व जरूर तेवढा खर्च करून, लोकोपयोगी सार्वजनिक कामाप्रीत्यर्थ देणग्याही ते देत असत. स. १९०४ तें स. १९१४ इ. या ९।१० वर्षांतील अशा देणग्यांच्या रकमांची बेरीज रु. १०००० दहा हजारांच्या सुमारांत होत आहे. ( आदानं हि विसर्गाय । रघुवंश ४।८६ ) या एकाच गोष्टीवरून ख्यालीखुशालीकरतां त्यांनीं नेमणूक करून घेतली नव्हती, हें उघड होत आहे.

पोलि. एजंट मि. शेपर्ड यांचा स्वतःचा श्रीमंतांच्या स्वभावासंबंधीं, कै. हि. हा. रावसाहेब यांना पाठविलेल्या पत्रांत, खालीलप्रमाणें अभिप्राय आहे.

" I would merely add that it has occurred to me in connection with this matter that you have perhaps hardly realised fully the age that your son has now attained; nor do I think that you have appreciated the high esteem in which he is held by all who have been brought in contact with him as an honourable and unassuming young nobleman of the highest character actuated by a strong desire to fit himself by study, travel and such experience as is open to him to eventually fill the exalted post in the distant future it should please God to call him. "

## विचित्रगड तालुक्याचा अधिकार

याप्रमाणें थोडें फार आर्थिक स्वातंत्र्य मिळालें, तरी स्वतः चांगलें काम करून दाखवावें, भावी काळांत आपणावर जी जबाबदारी पडण्याचा संभव आहे, तिचा म्हणजे राज्यकारभाराच्या कामाचा ( Administration ) अनुभव मिळावा व रयतेच्या हिताचें असें कांहीं तरी करावें, ही जी श्रीमंतांची त्या वेळीं प्रबळ इच्छा होती, ती तशीच अतृप्त राहिली होती. त्या दृष्टीनें त्यांनीं आपली

तयारीही केली होती. स. १९०४-०५ इ. मध्यें पुण्यास तज्ज्ञांच्याजवळ रेव्हिन्यु व क्रिमिनल कायद्यांचें त्यांनीं वाचन केलें होतें; इतकेंच नव्हे, तर पुणें ऑनररी मॅजिस्ट्रेटच्या बेंचवर स. १९०६ तें स. १९११ पर्यंत काम करून प्रत्यक्ष कामाचा अनुभवही घेतला होता. तेव्हां, त्यांच्या महत्त्वाकांक्षेस अनुसरून, संस्थानच्या राज्यकारभारांत अंशभागी व्हावें या ईर्षेनें, योग्य व अवश्य तेवढा, पण जरूर तितका स्वतंत्र, अधिकार देण्यांत येऊन चांगलें काम करून दाखविण्याची संधि आपणांस मिळावी अशी त्यांनीं वडिलांना प्रथम विनंति केली; अर्थात्, नेमणुकीच्या विनंतीप्रमाणेंच हीही विनंति पुष्कळ घासाघीस होऊन, शेवटीं गव्हर्नरसाहेबांच्या शिफारसीमुळेंच, वडिलांना मान्य करावी लागली. तरी पण, फक्त विचित्रगड ( शिरवळ ) तालुक्यापुरते व तेही असि. जज्ज व असि. कलेक्टर या हुद्यांचे अधिकार त्यांना देण्यास वडील कबूल झाले. अधिकारक्षेत्र अगदींच लहान व दिलेले अधिकारही फारच मर्यादित असल्याचें त्यांना स्पष्टच दिसत होतें; तथापि, तेवढ्यांतच जें काय चांगलें करतां येईल तें करावें, या ईर्षेनें श्रीमंतांनीं तें काम ता. १ मार्च १९१३ पासून पत्करलें. ही गोष्ट शिरवळ गांवकऱ्यांच्या मानपत्रास त्यांनीं दिलेल्या उत्तरांतील

> " ज्या संस्थानांत माझा जन्म झाला, त्या संस्थानच्या लोकांच्या कल्याणाकरितां आपण झटावें हा माझा हेतु परमेश्वरकृपेनें व आपल्या सर्वांच्या मदतीनें तडीस जाईल अशी मला आशा आहे."

या उद्गारांवरून दिसून येत आहे. परंतु, राज्यकारभाराचा खरा अनुभव ज्यांत मिळावयाचा व जनतेचें हित करण्याची ज्यांतच संधि असते, तो रेव्हिन्यु ऊर्फ मुलकी खात्याचा कारभार त्यांना असावा तितका प्रत्यक्षांत व पूर्ण खुला नसल्याचें पुढें अनुभवास आल्यानें, श्रीमंतांचा एका दृष्टीनें तेवढा विरसच झाला. तरी पण, Not failure but low aim is crime ह्या वचनाप्रमाणें, जेवढें लोकहित करतां आलें, त्यांतच ते समाधान मानून घेत असत. मात्र, मिळालेल्या संधीचा त्यांनीं जास्तींत जास्त शक्य तेवढा सदुपयोगच केला.

> ' ग्रामान्पुरांश्च देशांश्च स्वयं वीक्षेत वत्सरे । ' ( नारद. )

या वचनाप्रमाणें गांवोगांव, शक्य तों दरसाल, हिंडून लोकांची स्थिति पाहण्याचा व अडचणी समजून घेण्याचा क्रम त्यांनीं ठेवला होता. रयतेच्या

सुखसोयींच्या दृष्टीनें शिरवळास दवाखाना उघडण्याची जरूरी, भोरजवळ नीरा-नदीवर पूल होण्याची अत्यवश्यकता, वगैरे अनेक गोष्टी व उणीवा वडिलांच्या निदर्शनास आणणें व दवाखाना स्थापणें, आपल्याकडील दिवाणी व फौजदारी न्यायाची व तसेंच मुलकी कामकाजाची चोख व्यवस्था ठेवणें, स. १९१४ तें स. १९१८ इ. च्या पंचवार्षिक महायुद्धाच्या काळांत आपल्या तालुक्यांतून यावच्छक्य द्रव्याची व मनुष्यबळाची ( रिक्रूट ) मदत साम्राज्य सरकारास करणें, इत्यादि अनेक प्रकारें लोकांची व संस्थानची सेवा प्रत्यक्षाप्रत्यक्ष करून त्यांनीं वरिष्ठांकडून प्रशंसाच मिळविली.

व्यायामाल्लभते ह्यायुश्चिरारोग्यं बलं धृतिः ।

( व्यायामाच्या योगें आयुष्यवृद्धि, आरोग्य, शक्ति व धैर्य इत्यादींची प्राप्ति होते. )

यथेमां कल्याणीं वाचमावदानि जनेभ्यः । श्रुति.

( वाचनालयांच्या द्वारें लोकहितकारी वाङ्मय जनतेंत प्रसृत होतें. )

भोरास श्रीराम-क्रीडाभुवन ( स. १९१५ इ. ) व वाचनालय ( स. १९१८ इ. ) यांची स्थापना करून त्यांनीं लोकांच्या बलसंवर्धनाची व ज्ञानार्जनाची सार्वजनिक अशी सोय करून दिली.

धर्माय राजा भवति न कामकरणाय च ।
स्वस्य प्रियं परित्यज्य लोकस्य हितमाचरेत् । भारत-शांति.

( राजाचें कर्तव्य चैन करणें हें नाहीं. प्रजेचें हित करणें हाच राजाचा धर्म आहे. )

याप्रमाणें श्रीमंत युवराज असतांना ज्या दोन गोष्टी ( नेमणूक व तालुक्याचे अधिकार ) त्यांना महत्त्वाच्या वाटल्या व ज्यांचें उगमस्थान त्यांच्या लोकहितेच्छू महत्त्वाकांक्षेंत होतें, त्यांचाच निर्देश यांत केला आहे.

सर्वोपायैरात्मानमुज्जिहीर्षेत् । उद्यानं ते नावयानम् । श्रुति.
असंतुष्टा द्विजा नष्टाः संतुष्टाश्च महीभृतः । सुभाषित.

( हर प्रयत्नांनीं आपली उन्नति करावी. उन्नति हाच सृष्टिक्रम आहे. राजानें संतुष्ट असणें चांगलें नाहीं. )

श्रीमंत गादीवर आल्यानंतर, त्यांच्या या प्रकारच्या महत्त्वाकांक्षेस विस्तृत क्षेत्र व अनिर्बंध वाव मिळाला; व युवराजावस्थेंतल्याप्रमाणेंच, त्यांची महत्त्वाकांक्षा आत्मोन्नतिसाधक व लोकहितकारक अशा दुहेरी स्वरूपाची होती, हें विविध प्रकारें व जास्त स्पष्ट रीतीनें प्रत्यंतरास आलें. त्यासंबंधीं मुख्य बाबींचाच व विशेषेंकरून इतरेजनांना ज्या आपाततः फक्त वैयक्तिक उन्नतीच्या भासतात व वाटतात, पण ज्यांच्या मुळाशीं स्वोन्नतीबरोबरच प्रजाजनहित साधण्याचाच उद्देश असतो, अशांचाच यापुढें निर्देश करण्यांत येत आहे. त्या बाबी म्हणजे ( १ ) तोफांच्या सलामीचा मान मिळविणें व ( २ ) नरेंद्रमंडळांत स्वाधिकारानें बसण्याचा हक्क संपादन करणें, ह्या दोन होत. ह्या दोन गोष्टी दिसण्यांत वेगळ्या भासतात; पण, त्या अन्योन्यनिगडित आहेत. पहिल्या बाबीवर दुसरी अवलंबून आहे.

## नऊ तोफांच्या सलामीचा व हिज हायनेस या पदवीचा कायमचा मान

श्रीमंत राजेसाहेब यांच्या वडिलांना स. १९०३ इ. सालीं ९ तोफांच्या सलामीचा मान मिळाला, व स. १९११ इ. सालीं त्यांत दोन तोफांची वाढ करून त्यांच्या सलामीच्या तोफा ११ करण्यांत आल्या. तथापि, हे दोन्ही मान त्यांच्या हयातीपुरतेच चालणारे होते. स. १९११ इ. सालीं निदान ९ तोफांची सलामी त्यांना वंशपरंपरा करून घेणें अशक्य नव्हतें. पण, ‘ ज्यानें त्यानें आपल्या कर्तबगारीनें मानसन्मान मिळवावेत ’ असे संकुचित मनोवृत्तीचे उद्गार—अर्थात्, श्रीमंत राजेसाहेबांना ( ते त्या वेळीं युवराज होते ) अनुलक्षून—काढून ती संधि त्यांनीं गमावली. त्याचा परिणाम त्यांनाच स. १९२१ इ. सालीं नरेंद्र मंडळाच्या स्थापनेच्या समयीं, त्यांत स्थान न मिळण्याच्या रूपानें दिसून आला; व शिवाय, त्यांच्या पश्चात् तो मान त्यांच्याबरोबरच लुप्त झाल्यानें, संस्थानचा दर्जा तितका आपोआपच कमी झाला. यास्तव, वडिलांच्या पश्चात् गादीवर आल्यावर, श्रीमंत राजेसाहेबांना संस्थानला पूर्वीच्या दर्जावर नेण्याची इच्छा व्हावी हें त्यांच्या महत्त्वाकांक्षी स्वभावास अनुसरूनच होतें. शिवाय, ‘ ज्यानें त्यानें आपल्या कर्तबगारीनें मानसन्मान मिळवावेत ’ हे वडिलांचे एतद्विषयक शब्द त्यांच्या लक्षांत होते; व त्यायोगें त्यांच्या स्वाभिमानास चालना

मिळणेंही साहजीकच होतें. मात्र, या कामीं त्यांची स्वत:पुरतें पाहण्याची म्हणजे संकुचित वृत्ति नव्हती. त्यांनीं मिळविलेले बहुतेक मान—उदाहरणार्थ, ९ तोफांची सलामी ( १९२७ ), ' राजा ' ( १९३५ ) व ' हिज हायनेस ' ( १९४७ ) ह्या पदव्या, तसेंच नरेंद्र मंडळांतील स्थान ( १९४० )—हे वंश-परंपरा आहेत. के. सी. आय. ई. ( ही पदवी कोणालाही वंशपरंपरा मिळत नाहीं. ) या वैयक्तिक पदवीच्या जोडीस वरील तीन कायमचे मान मिळवून ' स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम् । ' हें वचन श्रीमंतांनीं सार्थ केलें.

श्रीमंत राजेसाहेबांना गादीवर आल्यावर, त्यांच्या उत्कृष्ट राज्यकारभाराचें प्रतीक म्हणून, अवघ्या पांच वर्षांत, त्यांना नऊ ९ तोफांच्या सलामीचा कायमचा मान साम्राज्य सरकारकडून देण्यांत आला. वडिलांच्या वेळचा ११ तोफांचा मान, मात्र तो कायमचा, मिळावा अशी त्यांची मनीषा होतीच; तथापि, मिळालेल्या कायमच्या ९ तोफांच्या सलामीनें ' नरेंद्र मंडळांत कायमचें स्थान ' मिळण्याचें साधन त्यांना उपलब्ध झालें. कारण, सुरुवातीस तरी नऊ तोफांच्या सलामीचा मान नरेंद्र मंडळांत प्रवेश होण्यास अवश्य होता. या साधनाचा उपयोग करून घेण्याच्या प्रयत्नास त्यांनीं सुरुवात केली व नरेंद्र मंडळांत कायम जागा मिळविण्यांत अखेर चिकाटीनें यश मिळविलें.

## नरेंद्र-मंडळांत स्वाधिकाराचें स्थान व स्थायी समितीवर निवडणूक

नरेंद्र-मंडळांत स्वाधिकाराचें स्थान मिळविण्याच्या पूर्वींही दक्षिणी संस्थानांच्या मध्यवर्ती संघातर्फे प्रतिनिधि सभासद म्हणून, स. १९२३ इ. तें स. १९३० इ. या सात वर्षांत, त्यांनीं काम केलें. त्यांच्या संस्थानिक बंधूंनीं आपले प्रतिनिधि म्हणून ३ वेळां त्यांचीच निवड केली; या एकाच गोष्टीवरून नरेंद्र-मंडळांत त्यांनीं किती प्रशंसनीय काम केलें, तें स्पष्ट होत आहेच.

श्रीमंतांनीं स. १९३० इ. सालांतील आपल्या विलायतच्या पहिल्या सफरींत लंडन येथें मेट्रोपोल हॉटेलमध्यें East India Association या हिंदुस्थानच्या हिंतचिंतक संस्थेच्या सभासदांना ता. २३-७-१९३० इ. रोजीं पार्टी दिली. त्या वेळीं सर जॉन सायमन, सर हारकोर्ट बटलर वगैरे बडी मंडळी हजर होती. श्रीमंतांनीं आपल्या स्वागताच्या भाषणांत सायमन कमिशनच्या

व बटलर कमिटीच्या रिपोर्टांतील संस्थानिकांसंबंधींच्या शिफारशींबाबत आपलें मत काय आहे तें, संस्थानिकांच्या व विशेषतः लहान संस्थानिकांच्या अडचणी कोणत्या आहेत त्यांसह, निवेदन केलें. या भाषणासंबधीं दुसऱ्याच दिवशीं ता. २४-७-३० च्या लंडन टाइम्समध्यें प्रशंसनीय लेख आला. श्रीमंतांच्या या उत्कृष्ट कामगिरीबद्दल हि. हा. नबाबसाहेब, भोपाळ, व दक्षिणेंतील त्यांचे संस्थानिक बंधू यांनीं पत्रद्वारें त्यांचा गौरव केला. ( यावरून श्रीमंतांचे आपल्या संस्थानच्या व संस्थानिक बंधूंच्या हिताविषयीं कसे प्रयत्न चालू असत तें कळून येणार आहे. ) सदर लेखाचा उतारा खालीं दिला आहे. खं. २ पा. ६६१.

" The first considered criticism of the Statutory Commission's Report in conjunction with the Butler Report coming from an Indian Ruler visiting this country was made by the Chief of Bhor, a State in the Bombay Deccan, at his reception yesterday to meet the president and members of the East India Association at the Hotel Metropole. The 250 guests included both Sir John Simon (accompanied by Lady Simon) and Sir Harcourt Butler.

" The Chief of Bhor said that it was a matter for great satisfaction that both the Indian States' Committee and the Statutory Commission were convinced of the justice of many of the claims and contentions of the States, though there were still some points entitled to fuller consideration than they had received. The federal solution of the Indian constitutional problem was not opposed by the Princes, but they held there should be no coercion or compulsion on the States to join the federation, and it was satisfactory that both reports favoured their unimpaired freedom of decision. The claim of the States to share in the Customs revenue and to be consulted in framing all-India fiscal policy had been recognized; but, it seemed to him that certain *obiter dicta* indulged in by both authorities would tend to restrict the free judgment of the expert body which was to be created to examine the whole question. Similarly, objection could be taken to the omission of both bodies to meet the suggestion of the Princes for the

establishment of an impartial tribunal to settle justiciable and constitutional questions.

"The Chief Saheb raised some other points, notably respecting the States grouped for representation in the Chamber of Princes. He expressed a hope that justice would be done to the States on such of their remaining grievances as might appear reasonable after close examination of them in all their aspects. The Princes were becoming increasingly responsive to the temper of the age, and were adjusting their Administrations to the British Indian model. Frequently, however, the resources of the States were insufficient to assimilate all modern improvements. This was an additional reason for giving a liberal share of Customs and other federal revenues to the States.

"The difficulties of the Indian problem were enormous; but had not Great Britain faced even greater problems, notably in the World War? He appealed to his countrymen of all parties and shades of opinion to attend the Round Table Conference, which was to be held at a propitious time for reaching a settlement.

"Sir Louis Dane, in conveying the thanks of the guests to the Chief Saheb for his great hospitality, said that the feelings of the people of Britain towards the States were most cordial and friendly. He was sure that no reasonable claim that the States had to make as to the adjustment of relations would fail to receive favourable consideration by the Parliament and people of this country."

श्रीमंतांच्या या उत्तम कामामुळेंच त्यांनीं दक्षिणी—विशेषत: लहान-संस्थानांची बाजू इंग्लंडास जाऊन गोलमेज परिषदेपुढें (Round Table Conference) मांडावी असा त्यांच्या संस्थानिक बंधूंचा त्यांना आग्रह होता. पण, त्या वेळीं त्यांचीं मुलें लहान होतीं व त्यांची काळजी घेण्यास त्यांच्या मातोश्रीही (राणीसाहेब) हयात नव्हत्या, व त्यांची स्वत:ची प्रकृतीही तितकी चांगली नव्हती, या कारणास्तव त्यांना इंग्लंडास जातां आलें नाहीं ही गोष्ट वेगळी. शिवाय, नरेंद्र-मंडळाचें

स्थान त्यांना केवळ वैयक्तिक भूषण अथवा शोभेची बाब म्हणून नको होतें, ही गोष्ट त्यांनीं आपल्या संस्थानच्या म्हणजेच प्रजाजनांच्या हिताकरतांच नरेंद्र-मंडळांत केलेल्या कामानेंच उघड होत आहे. मुंबई सरकारच्या इरिगेशन खात्याचें धोरण भोर संस्थानच्या हितसंबंधास बाधक असल्याचें श्रीमंतांना दिसून आलें होतें. संस्थानच्या घाटमाथ्याच्या प्रदेशांत ठिकठिकाणीं धरणें बांधण्यानें व विशेषतः धरणांत गेलेल्या जमिनीच्या मोबदल्यांत दुसरीकडे राजसत्तेसह जमीन न देण्यानें, संस्थानचें क्षेत्र कमी होऊन कायमचें आर्थिक नुकसान होण्याचें व संस्थानी प्रजा उपजीविकेच्या मुख्य साधनाच्या अभावीं देशोधडीस लागण्याचें भय उत्पन्न झालें होतें. ही बाब त्यांना अगदीं जिव्हाळ्याची व काळजीची वाटत होती. सबब, या भीतीचें निवारण व्हावें, म्हणून तो प्रश्न श्रीमंत राजेसाहेबांनीं नरेंद्र मंडळांत गेल्यानंतर लगेच, म्हणजे नरेंद्र मंडळाच्या फेब्रुवारी स. १९२८ इ. च्या बैठकींतच, मांडला व त्यावर विस्तृत, मुद्देसूद व आपल्या म्हणण्याची खात्री पटविणारें भाषण केलें. ही एकच गोष्ट तोफांच्या सलामीचा मान व नरेंद्र-मंडळांत स्थान मिळविण्याच्या मुळाशीं संस्थानच्या प्रजाजनांच्या हिताचीच भावना होती, हें दाखविण्यास पुरेशी असल्यानें, अशाच स्वरूपाच्या इतर गोष्टींचा निर्देश स्पष्टतः करण्याचें कारण नाहीं.

नरेंद्र-मंडळांत कायमचें स्थान मिळाल्यावर, स. १९४१ इ.च्या बैठकीस श्रीमंत राजेसाहेब प्रथमच स्वाधिकारानें हजर राहिले. पुढें, नरेंद्र-मंडळाचें नित्याचें काम करणारी राजे लोकांची जी स्थायी समिति (Standing Committee of Princes) असते, त्या समितीवर, दक्षिणेंतील संस्थानिकांनीं श्रीमंत राजेसाहेबांनाच, स. १९२३-३० इ. या सात वर्षांतील श्रीमंतांची उत्कृष्ट कामगिरी लक्षांत घेऊन, आपल्यातर्फे डिसेंबर स. १९४५ इ. सालीं निवडून दिलें. स्थायी समितीच्या मार्च स. १९४६ इ. मधील बैठकींस श्रीमंत दिल्लीस उपस्थित होते. या वेळेस घटनासमितीवर दक्षिणी संस्थानांतर्फे ३ तीन प्रतिनिधि घ्यावे असें त्यांनीं आपलें मत मांडलें; व शिवाय, नरेंद्र मंडळांत ज्या संस्थानिकांना कायमचें सभासदत्व नव्हतें, त्यांनाही—नरेंद्र मंडळ ही संस्था संस्थानिकांची खरी व पूर्ण प्रातिनिधिक व्हावी, म्हणून—तें देण्यांत यावें, असेंही प्रतिपादन केलें. यावरून, श्रीमंत आपल्या मतदार-संघाच्या हितास किती जपत

असत, हें स्पष्ट दिसून येणार आहे. सदर समितीच्या मुंबई येथील बैठकीसही ते हजर राहिले. परंतु, पुढें प्रकृतीच्या कारणास्तव वरचेवर होणाऱ्या बैठकींना हजर राहण्यास कराव्या लागणाऱ्या प्रवासाची दगदग आपणांस मानवणार नाहीं हें लक्षांत घेऊन, ता. ४-२-४६ रोजीं सदर जागेचा त्यांनीं राजीनामा दिला. त्या वेळीं त्यांच्या मतदार संस्थानिक-बंधूंनीं ' आपण या वेळीं समितीवर असणें फार इष्ट होतें. आपल्या अनुभवाचा आम्हांस फारच उपयोग झाला असता. प्रकृतीच्या कारणास्तव आपणांस राजीनामा द्यावा लागत आहे, याबद्दल फार वाईट वाटतें. आपण केलेली कामगिरी केव्हांही लक्षांत राहण्यासारखी आहे, ' वगैरे अर्थाचीं पत्रें पाठवून श्रीमंतांचा गौरव केला.

पुढें, ता. १५-८-४७ पासून हिंदुस्थानास स्वातंत्र्य देण्यांत आल्यानें, व्हाइसरॉयसाहेबांनीं नरेंद्र-मंडळ ही संस्था रद्द केली असली, तरी तिच्या अस्तित्वाच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या प्रजेचें हित साधण्याच्या प्रयत्नाकडे तिचा कसा उपयोग केला तें कळून यावें, म्हणूनच हें विवेचन केलें आहे.

श्रीमंतांनीं ज्या पदव्या व जीं मानसन्मानाचीं चिन्हें मिळविलीं व त्यायोगें आपली योग्यता वाढविली व आपल्या संस्थानचा दर्जाही वाढविला, त्याच्या मुळाशीं कोणता सद्धेतु होता व त्यांनीं तो कसा सिद्धीस नेला, हें वरती दाखविलेंच आहे. पदव्या, पदकें व त्यांवरून दर्शित होणारी वैयक्तिक योग्यता व दर्जा यांकडे वेगळ्या दृष्टीनें पाहणें आवश्यक व इष्ट आहे. तसें न केलें, तर त्यांचें महत्त्व यथातथ्यपणें तर लक्षांत येणार नाहींच; व शिवाय, गैरसमज होण्याचा संभव आहे. पदव्या व मान, हीं साध्यें नसून, साधनें असतात. यास्तव, पदवी व मान यांचें महत्त्व व त्या धारण करणाराची योग्यता, हीं दोन्ही तीं ज्या काळीं व ज्यांच्याकडून दिलीं जातात, त्या काळाच्या दृष्टीनें व देणाऱ्यांच्या भूमिकेवरून अजमावयाचीं असतात. तसें न करणें व भिन्न परिस्थितींत त्यांकडे पाहून त्यांचें मोल ठरविणें हें सर्वस्वीं चुकीचें होतें. बदलत्या काळाप्रमाणें त्यांची किंमत तर बदलतेच; पण विशेष नवलाची व ध्यानांत घेण्याची गोष्ट ही कीं, एकाच काळांत असलेल्या दोन व्यक्ती त्यांकडे अगदीं विरुद्ध दिशेनें पाहूं शकतात. उदाहरणार्थ, युनिव्हर्सिटीच्या डिग्र्या ऊर्फ पदव्या, या आपण

सामान्यतः मतभेदातीत समजतों; पण, हल्लींच्या युनिव्हर्सिटया अथवा विश्वविद्यालयें यांना जे ‘ कारकून तयार करण्याचे कारखाने ’ असें समजत, ते आपल्या विशिष्ट दृष्टिकोणानें विश्वविद्यालयांच्या पदव्यांचें मूल्य कसें व किती ठरवीत असतील, तें दिसतच आहे. इतकेंच नव्हे, तर कर्तव्याचें स्वरूप व मूल्य हीं सुद्धां काळानें बदलूं शकतात. उदाहरणानें ही गोष्ट स्पष्ट करावयाची म्हटल्यास, चातुर्वर्ण्यव्यवस्थेचें संरक्षण करणें, हें एका काळीं राजाचें आद्य व मुख्य कर्तव्य मानलें जात होतें; पण, आधुनिक काळच्या समतावादी मनुष्यास तें मान्य होईलच असें समजतां येत नाहीं. तात्पर्य, पदव्या वगैरेंचें महत्त्व त्या त्या काळापुरतें असतें. हीं चिन्हें व मान शुद्ध मार्गानें मिळविले आहेत कीं कसें, व त्यांचा उपयोग कसा केला जातो, याच गोष्टीकडे प्राधान्येंकरून लक्ष देऊन, त्यांचा विचार करावयाचा असतो.

## भाटघर-धरण कॉंपेन्सेशन

भाटघर धरणाच्या कामीं रयतेपैकीं ज्यांच्या जमिनींतील माल उपयोगांत आणला गेला, त्यांच्या वैयक्तिक ज्या तक्रारी होत्या, त्यांची योग्य दाद श्रीमंतांनीं लावून घेतल्याची हकीगत पुढें निवेदन केलेली आहे. त्यानंतर, समायिक गावकीच्या, म्हणजे देवालयें, गायरानें, वगैरे पाण्यांत गेल्याबाबतच्या, नुकसान-भरपाईचे प्रश्नही विशेष आयास न पडतां मिटले. फक्त, संस्थानच्या नुकसान-भरपाईचा प्रश्न राहिला होता. त्यासंबंधांतही श्रीमंत राजेसाहेबांनीं विशेष जागरूक राहून, धरणांत गेलेल्या जमिनीचा चालू सरकारधाराच केवळ नव्हे, तर, मूळचें रेव्हिन्यु सेटलमेंट झाल्यास ३० वर्षें होऊन गेल्यानें, पुढील रिव्हिजनवेळचा वाढावा, वगैरे इतर उत्पन्नाच्या बाबीही लक्षांत घेऊन नुकसान-भरपाईची रक्कम निश्चित केली जावी असा यशस्वी प्रयत्न केला. रयतेचें द्रव्यदृष्टया नुकसान न होण्याची जशी श्रीमंतांनीं काळजी वाहिली, त्याचप्रमाणें संस्थानलाही आर्थिक दृष्टया घस सोसावी लागूं नये, हेंही धोरण त्यांनीं सांभाळलें. या पुढील प्रश्न म्हणजे या रीतीनें ठरलेल्या रकमेची भरपाई होईल इतकी जमीन ताब्यांत घेणें, येवढाच राहिला होता. कारण, जमिनीच्या नुकसानीच्या मोबदल्यांत राजसत्तेसह जमीन ( Land for land with jurisdiction ) देण्यास

मुंबई सरकारनें स. १९०९ इ. सालींच मान्यता दिली होती. पण, प्रत्यक्ष जमीन देण्याघेण्याचा प्रश्न पुढें आला, तेव्हां कायद्याप्रमाणें राजसत्तेसह ( With jurisdiction ) जमीन देतां येत नाहीं असें मुंबई सरकारचें मत झालें, व तसें त्यांनीं दरबारला कळविलें. कायद्याप्रमाणें जें करतां येत नाहीं, तें करावें असें श्रीमंत राजेसाहेबांनाही मुंबई सरकारला म्हणतां येईना. पण, मुंबई सरकार कॉंपेन्सेशन फक्त द्रव्य-रूपानेंच देऊं इच्छीत होतें, त्यास मात्र श्रीमंत राजेसाहेबांनीं मान्यता दिली नाहीं. राजसत्तेसह गांवें देतां येत नसलीं, तर निदान इनाम म्हणून कां असेनात, पण गांवें द्यावींत असा श्रीमंतांनीं आग्रह धरला, व म्हणूनच मुंबई सरकारनें तें स. १९२६ इ. सालीं अखेर मान्य केलें; आणि विंग व विंझर हीं दोन इनाम गांवें संस्थानला दिलीं. सारांश, प्राप्त परिस्थितींतच, पण संस्थानला जास्तींत जास्त अनुकूल व हितावह अशी गोष्ट करून घेण्याकडे श्रीमंत राजेसाहेबांची दृष्टि व प्रयत्न, हीं दोन्ही कशीं असत, तें यावरून कळून येणार आहे.

## अबकारी कॉंपेन्सेशनचा प्रश्न

संस्थानच्या अबकारीसंबंधींचे हक्क मुंबई सरकारनें स. १८७९ इ. पासून आपणांकडे मुदतीनें ( Lease ) घेतले होते. त्यासंबंधीं दर दहा वर्षांनीं नवा करार होत असे. त्या वेळीं दशवार्षिक कॉंपेन्सेशनची रक्कम ठरे, व त्या मानानें पुढें दरसाल बसणारी रक्कम दरबारला मिळे. स. १९१४ तें १९२४ इ. चा दशवार्षिक करार होण्याच्या वेळीं दरबार व सुधागडांतील इनामदार यांच्या रकमा प्रत्यक्ष खपावरून पृथक् अशा निश्चित केल्या गेल्या. त्यामुळें, स. १९१७ इ. पासून परळीच्या इनामदारांना जास्त रक्कम मिळूं लागल्याचें दिसून आलें. परळीच्या दारू-दुकानाचा खप त्या गांवा-पुरताच नसून, सुधागड तालुक्यांतील संस्थानच्या इतर गांवांचे गिऱ्हाइक ( त्यांच्या गांवीं दारूचीं दुकानें नसल्यानें ) त्या दुकानाकडे जात असल्यानें, परळीच्या जास्त दिसणाऱ्या खपांत संस्थानचा अंश आहे, तो संस्थानला मिळाला पाहिजे अशाविषयीं माजी हिज हायनेस यांनीं ( स. १९२० इ. ) काम चालविलें; परंतु, त्याचा विचार स. १९२४ इ. अखेरचा दशवार्षिक करार संपल्यावर होईल, असें मुंबई सरकारनें कळविलें. म्हणून, श्रीमंत राजेसाहेब

गादीवर आल्यावर स. १९२३-२४ सालीं तो प्रश्न त्यांनीं हातीं घेतला, व त्याची चौकशी करण्यास दरबार, मुंबई सरकार व सुधागड इनामदार-हक्कदार, या प्रत्येकीं एक, अशा तीन प्रतिनिधींची कमिटी नेमून घेतली. सदर कमिटीनें चौकशी करून स. १९२९ इ. सालीं प्रत्येकांचे, म्हणजे इनामदार-हक्कदार व दरबार यांचे, कॉंपेन्सेशनच्या रकमेंतील अंश ठरविले. अर्थात्, दरबारच्या अंशांत वाढ होऊन, त्याप्रमाणें, मागील ९½ वर्षांची म्हणून जी रक्कम दरबारची ठरविण्यांत आली होती, त्यापेक्षां एकंदरींत रु. ६६,१२०-८-९ इतकी रक्कम दरबारला जास्त मिळाली. तात्पर्य, प्रत्यक्ष स्टेटचें म्हणजेच पर्यायानें रयतेचें हित श्रीमंत राजेसाहेबांनीं साधलें.

## कारकीर्द

य: पठति लिखति पश्यति परिपृच्छति पण्डितानुपासयति
तस्य दिवाकरकिरणैर्नलिनीदलमिव विकास्यते बुद्धि: ॥

श्रीमंत राजेसाहेब हे राज्यकारभारविषयक जुन्या कल्पनांच्या वातावरणांत जन्मले व आयुष्याच्या सुरुवातीचीं कांहीं वर्षें त्यांतच वाढले असले, तरी इंग्रजी शिक्षणानिमित्त त्यांचें राहणें बरींच वर्षें पुण्यासारख्या, सर्व दृष्टींनीं महाराष्ट्रांतील पुढारलेल्या व सुधारलेल्या शहरांत झाल्याकारणानें, त्यांच्या विचारास साहजीकच निराळें वळण लागलें. त्याचप्रमाणें वाचन, विद्वज्जन-संगति व प्रवास ह्यांची त्यांना स्वभावत:च आवड असल्यानें, त्यांचें मानसिक क्षितिज विस्तृत व उन्नत होण्यास वरील त्रयीची मोठीच मदत झाली.

श्रीमंतांनीं युवराज असतांना व गादीवर आल्यानंतर मिळून बहुतेक सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला आहे. या देशांतील काश्मीर तें रामेश्वरपर्यंत असलेलीं महत्त्वाचीं यात्रेचीं क्षेत्रस्थानें, प्रेक्षणीय स्थळें व इतिहासप्रसिद्ध ठिकाणें पाहिलीं आहेत; तसेंच बडोदें, म्हैसूर वगैरे प्रगत संस्थानांना भेट देऊन तेथील राज्यकारभारपद्धतीचें अवलोकन केलें. म्हैसूर संस्थानच्या प्रगतीबद्दल त्यांचे विचार काय झाले, तें त्यांनीं आपल्या भाषणांत व्यक्त केलें आहे. खं. १ परिशिष्ट ण, पा. ३२८ पहा. इतकेंच नव्हें, तर स. १९३० इ. मध्यें प्रथम व त्याचप्रमाणें स. १९३७ इ. सालीं सहावे जॉर्ज बादशहांच्या राज्यारोहणाच्या निमित्तानें

दुसऱ्यांदा इंग्लंड व युरोपखंडांतील कांहीं देश पाहून तेथील सामाजिक, औद्योगिक व राजकीय परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण केलें. १९३० सालीं श्रीमंतांना बादशहा पंचमजार्ज यांच्याबरोबर लंच घेण्याचा व भेटीचा सुयोग प्राप्त झाला. त्यायोगें केवळ राजकीय बाबतींतच नव्हे, तर धार्मिक, आर्थिक, सामाजिक वगैरे बाबतींत त्यांचे विचार प्रगल्भ झाले; तसेंच, विचार नुसते प्रगत असून उपयोगी नाहीं, तर ते अंमलांत आणले पाहिजेत, हेंही त्यांना कळून आलें.

' युक्तः प्रजानामनुरञ्जने स्याः । ' रामायण.

( प्रजानुरंजनाचें कर्तव्य कर. )

' राजा प्रकृतिरञ्जनात् ' । ( रघुवंश ४।१२ ) राजाचें कर्तव्य म्हणजे प्रजेचें कल्याण करणें, त्यांतच त्याचा मोठेपणा व लौकिक आहे; व तो साधला, तरच राजेपद सार्थ होणार आहे; अशी स्थिति असल्यानें व राज्यारोहणाच्या दुसऱ्या दिवशींच्या मानपत्र समर्पणाच्या दरबारांतील आपल्या भाषणांत श्रीमंतांनीं यासंबंधीं

" अधिपतीचें कर्तव्य सामान्यतः दोन प्रकारचें आहे, असें आमचें मत आहे. एक धर्म व ईश्वर यांची सेवा आणि दुसरें प्रजेचें परिपालन यथायोग्य करून तद्वारां जनतारूपी परमेश्वराची सेवा. याप्रमाणें दोन्ही प्रकारचीं राजाचीं कर्तव्यें यथाशक्ति आजन्म बजावीत राहण्याचा आमचा हेतु आहे. "

असेच स्वतःचे विचार बोलून दाखविले असल्यानें, या प्रकरणांत श्रीमंत राजेसाहेब यांनीं राजकीय क्षेत्रांत रयतेच्या सुखसोयी व उन्नति याप्रीत्यर्थ काय केलें, त्याचेंच विशेषतः संकलितरीत्या दिग्दर्शन केलें आहे. अर्थात्, त्यास पोषक व आनुषंगिक बाबींचा निर्देश यांत करणें जेवढें इष्ट व अवश्य दिसलें, तेवढ्या-पुरताच त्यांचाही ओझरता उल्लेख यापूर्वी केला आहे.

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्याच्या पूर्वीपासूनच राजाच्या कर्तव्या-संबंधीं त्यांची वैचारिक भूमिका अशा रीतीनें तयार झाली होती; इतकेंच नव्हे, तर संस्थानांतील शिरवळ तालुक्यापुरते त्यांना जे कांहीं राज्यकारभारासंबंधीं अगदीं मर्यादित अधिकार, ते युवराज असतांना, त्यांच्या वडिलांकडून देण्यांत

आले होते, त्यांचा उपयोग त्यांनीं त्या भूमिकेस अनुसरूनच केल्याचें दिसून आलें. ते युवराज असतांना पार्लीस गेल्या वेळीं त्यांना ता. ८-१२-१९१८ इ. रोजीं देण्यांत आलेल्या मानपत्रास त्यांनीं दिलेल्या उत्तरांत खालीलप्रमाणें म्हटलें आहे :

> " ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें अगदीं अलग राहणें शक्य नाहीं व इष्टही नाहीं. शिक्षण, कायदेकानू वगैरे बाबतींत जसें संस्थानिक इंग्रज सरकारचें अनुकरण करतात, तसेंच राजकीय सुधारणेंतही त्यांचें अनुकरण संस्थानिकांनीं करणें इष्ट आहे; व त्याप्रमाणें पुष्कळ संस्थानिक करूंही लागले आहेत, ही आनंदाची गोष्ट आहे; व बाकीचे लवकरच करतील अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. तेव्हां, तिकडील प्रजेच्या प्रतिनिधींशीं रोज निकट संबंध आल्यानें, संस्थानच्या प्रजेला क्रमाक्रमानें राजकीय हक्क मिळाल्यावांचून राहणार नाहींत. ज्या मानानें संस्थानिक प्रगमनशील असतील, त्या मानानें हक्क तेथील प्रजेस लवकर मिळतील यांत शंका नाहीं. "

या भाषणांत राजकीय सुधारणेच्या आवश्यकतेसंबंधीं त्यांनीं आपले विचार निःसंदिग्ध भाषेंत स्पष्ट मांडले आहेत. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आले, त्या वेळीं ब्रिटिश इन्डियांत, स. १९०९ इ. च्या मोर्ले-मिंटो सुधारणा मागें पडून, मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिफॉर्म्स नांवाची सुधारणांची योजना अंमलांत आली होती. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांतील संस्थानिकांना उद्देशून लिहिलेला खालील इशारेवजा मजकूर श्रीमंत राजेसाहेब यांनीं वाचून त्यांची नोंद आपल्या नोटबुकांत, राज्य-कारभाराच्या धोरणाची मार्गदर्शक व सूचक म्हणून, केली होती. तो मजकूर :

"There is a stronger reason why the present stir in British India cannot be a matter of indifference to the Princes. Hopes and aspirations may overleap frontier lines like sparks across a street. There are in the native States men of like minds to those who have been active in spreading new ideas in India.

" We need not conceal our conviction that the processes at work in British India cannot leave the States untouched

and must in time affect even those whose ideas and institutions are of the most conservative and feudal character. "

राज्यकारभार प्रजाभिमुख करण्याची इष्टता व जरूरी श्रीमंतांना पटल्याचें त्यावरूनच दिसत होतें; इतकेंच नव्हे, तर त्याचें प्रतिबिंब सुधागड तालुक्याच्या मानपत्रास दिलेल्या वरील उत्तरांत स्वच्छच दिसून येणारें आहे. राजकारभार-विषयक आपल्या याच ध्येयाचा व धोरणाचा पुनरुच्चार त्यांनीं राज्यसूत्रें हातीं घेतल्यासंबंधीं प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्यांतील

" आमची सर्व प्रजा सतत संतुष्ट राहून सुखी असावी व तिच्या कल्याणांतच आमच्या राज्याची हरएक प्रकारें सदोदित भरभराट होत जावी, अशी आमची उत्कट इच्छा आहे. "

या वाक्यांत, तसेंच, ता. १८-८-१९२२ इ. रोजीं राज्यारोहणदरबारांतील

" प्रस्तुतच्या राज्यकारभाराची तपशीलवार माहिती प्रथम करून घेऊन, त्यांत जरूर त्या सुधारणा क्रमाक्रमानें करण्याचा आमचा विचार आहे. तसेंच, प्रजा व ब्रिटिश सरकार यांनीं आमच्यावर टाकलेल्या विश्वासाचें योग्य चीज करून दाखविण्याची आमची फार फार इच्छा आहे. "

या उद्गारांत केला आहे. इतकेंच नव्हे, तर ता. १९-८-१९२२ इ. रोजींच्या मानपत्रांना दिलेल्या एकत्र उत्तरांतील

" सांप्रतची कारभाराची पद्धति कशी आहे, हें आमूलाग्र व तपशीलवार स्वतः समजून घेऊन, त्यांत कांहीं दोष आढळून आल्यास, ते कसे दूर करतां येतील, याचा विचार करण्याचा आमचा मनोदय आहे. तसेंच, दुसऱ्या प्रागतिक संस्थानांतून राज्यकारभार कसा चालतो ती माहिती घेऊन, त्याप्रमाणें कितपत अंमल करतां येईल तें आम्ही ठरविणार आहों. तसेंच, लोकांच्या अडचणी काय आहेत तें समजून घेऊन, त्यांची तत्काळ दाद लावण्याचा आमचा हेतु आहे; आणि, शेवटीं, बजेटची पद्धति ठेवून, लोकांची कर्तबगारी दिसून येईल, त्या मानानें, कारभाराच्या संघटितपणास कमीपणा न येईल अशा प्रकारें, लोक-प्रतिनिधित्वाचें तत्त्व कारभारास लावण्याची व सर्वतोपरी संस्थानचा उत्कर्ष करण्याची आमची आकांक्षा आहे. "

या मजकुरांत राज्यकारभार लोकमतानुवर्ती करून लोकप्रतिनिधींमार्फत चालविण्याचें आपलें अंतिम ध्येय असल्याचें श्रीमंतांनीं स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. अशाच स्वरूपाचे विचार त्यांनीं त्यानंतरही अनेक प्रसंगीं प्रदर्शित केले असले, तरी वरील उद्गार अगदीं सुरुवातीचे म्हणूनच ते उद्धृत केले आहेत. तथापि, कांहींच्या बाबतींत असा अनुभव येतो कीं, बोलण्याप्रमाणें करण्याचा समय आला कीं, तशी कृति होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर कृति बोलण्याच्या अगदीं उलट होते. सबब, श्रीमंत राजेसाहेबांच्या बाबतींत कशी स्थिति होती, तें समजून यावें, म्हणून त्यांच्या पंचविंशति वर्षांच्या कारकीर्दींतल्या कामगिरीचें समालोचन अगदीं थोडक्यांत असें करून, 'बोले, तैसा चाले' अशीच त्यांची वागणूक होती, हें निदर्शनास आणण्यांत येत आहे.

## जुन्या तक्रारींचें निवारण

सुधारणेच्या दोन बाजू असतात. एक—मागेंपासून चालत आलेल्या तक्रारींची दाद घेणें; व दुसरी—नव्या व चालू मन्वंतरास उचित अशा सुखसोयींच्या व प्रगतीच्या योजना अंमलांत आणणें. जुना पाया तसाच कच्चा ठेवून त्यावर नवी इमारत बांधणें श्रेयस्कर नसल्यानें, श्रीमंत राजेसाहेबांनीं आपलें लक्ष, राज्यावर आल्यावर, प्रथम जुन्या, व त्यांतल्यात्यांत निकडीच्या व सहजीं मिटवितां येणाऱ्या, तक्रारींच्या निराकरणाकडे लावलें. इतकेंच नव्हे, तर राज्यारोहणाच्या दरबारांतील भाषणांतच

( १ ) घरवण, लग्नटक्का, पाटदाम, इत्यादि कर

व ( २ ) तपकीर, शेंदूर, विड्याचीं पानें वगैरेंचा व्यापार करणाऱ्यांची लायसेन्स-फी माफ करून,

तसेंच ( ३ ) सुधागड तालुक्यांत सरकारी दवाखाना स्थापन करण्याचें व प्राथमिक शिक्षण मोफत देण्याचें जाहीर करून

अशा तक्रारी व उणीवा लगेच दूर केल्या आहेत.

लग्न-टक्का वगैरे कर फार दिवसांपासूनचे असून ते तसेच ठेवले असते, तर कांहीं दिवस तरी ते रयतेनें दिले असते. तथापि, पांढरपेशा वर्गावर ते कर नसल्यानें व सर्व प्रजेस सारखें वागविण्याचें श्रीमंतांचें धोरण असल्यानें,

त्यांनीं आपण होऊन ते कर कमी केले. तपकीर वगैरे जिनसांचा व्यापार करणारे थोडेच होते. तेव्हां, अशा किरकोळ व छोटया उद्योग-धंद्यांस उत्तेजन देण्याकरितां त्यांवरील फी माफ केली. सुधागड तालुका संस्थानच्या इतर चार तालुक्यांपासून दूर असून तेथें आधुनिक तऱ्हेच्या वैद्यकीय मदतीची सोय नव्हती, म्हणून त्या तालुक्याची ती दाद घेतली. तसेंच, संस्थानच्या इतर सर्व म्हणजे चार तालुक्यांत प्राथमिक शिक्षण मोफत दिलें जात होतें; फक्त, सुधागडासच तो लाभ मिळत नव्हता. सबब, श्रीमंत राजेसाहेबांनीं विषमतेचें तें शल्य काढून टाकलें.

( ४ ) सभाबंदीचा जाहीरनामा रद्द केला.

सभा-स्वातंत्र्य हें प्रगत राज्यपद्धतीच्या अनेक लक्षणांपैकीं एक लक्षण आहे. तथापि, तो हक्क माजी कारकीर्दीत ता. २३-६-२१ पासून नष्ट केला होता, व त्याबाबत लोकांची तक्रार असून मागील कारकीर्दीमध्यें सत्याग्रहा-पर्यंतही रयतेची मजल गेली होती. सबब, श्रीमंतांनीं तो जाहीरनामा आपल्या सुधागडच्या दौऱ्यांत त्या तालुक्यापुरता ता. २४-१२-२२ इ. पासून रद्द केला; व त्यानंतर, लवकरच इतर सर्व तालुक्यांवरील तें बंधन नाहींसें करून, आपलें उदार धोरण निदर्शनास आणलें.

( ५ ) पेन्शन, ग्रॅच्युइटी, भाडें, भत्ता वगैरेंचे नियम केले.

> भृत्येभ्यो विसृजेदर्थान्नैकः सर्वहरो भवेत् ॥
> अरैः संधार्यते नाभिर्नाभौ ह्यराः प्रतिष्ठिताः ।
> स्वामिसेवकयोरेवं वृत्तिचक्रं प्रवर्तते ॥

( मालक व नोकर हे परस्परावलंबी असल्यानें, मालकानें द्रव्य—योग्य पगार वगैरे—देऊन नोकरवर्ग संतुष्ट ठेवावा. )

राज्यकारभाराची कार्यक्षमता संतुष्ट व लायक अशा नोकरवर्गावरच बहुतांशीं अवलंबून असते. तसेंच, योग्य पगार, नोकरीची शाश्वति, पेन्शन वगैरेंची निश्चित योजना असेल, तरच नोकरवर्ग कार्यक्षम मिळून व संतुष्ट राहून चांगलें काम करतो. ही गोष्ट उघड असूनही पूर्वीच्या कारकीर्दींत त्यासंबंधीं निश्चित असे नियम केलेले नव्हते; ही स्थिति तशीच राहूं देणें अनिष्ट

असल्यानें, त्यासंबंधीं नियम व तेही शक्य तेवढे उदार बुद्धीनें करण्यांत आले. ता. १ जून स. १९२३ इ. पासून अंमलांत आणलेल्या नुसत्या 'पगारवाढीनें दरसाल रु. ३२००० बत्तीस हजारानें खर्च वाढला.

( ६ ) जांभळीच्या झाडांवरील आपला मालकी हक्क सोडून दिला.

संस्थानांतील रयतेच्या मालकीच्या जमिनींतील जांभळीच्या झाडांवर कोणत्याही तालुक्यांत सरकारनें आपला हक्क ठेवला नव्हता. फक्त, प्रचंडगड तालुक्यांतील कांहीं गांवांतीलच जांभळीच्या झाडांवर संस्थाननें आपली मालकी सर्व्हेच्या पूर्वीपासूनच राखून ठेविली होती. ही विषमतेची वागणूक नसावी, म्हणून दरबारनें आपला सदरचा हक्क काढून घेतला.

( ७ ) बारा गांवांतील जंगलची हद्द गांवापासून दूर सारली.

राजगड किल्ल्याच्या पायथ्याजवळ असलेल्या बारा गांवांच्या शीवेला स्टेटच्या फॉरेस्टची हद्द भिडली होती. यामुळें गांवकरी व फॉरेस्ट गार्ड यांच्या दरम्यान बोलाचाली व तंटे होत. एकदां तर, गांवकऱ्यांच्या या साध्या मागणीचा विचार न केल्यानें, मागील कारकीर्दींत रेंजरला मार खावा लागला होता. स. १९२४ इ. सालीं श्रीमंतांनीं स्वतः परिस्थिति पाहून ता. १ जानेवारी १९२५ इ. पासून सुमारें ५१४ एकर जमीन जंगलांतून कमी करून गांवकऱ्यांना दिली, व त्यांची गैरसोय दूर केली.

( ८ ) भाटघर धरणाच्या कामीं रयतेच्या जमिनींतील नेलेले दगड, नाहींशा झालेल्या गाडीवाटा, नष्ट होऊं घातलेले पाण्यावरील हक्क, वगैरेबद्दल योग्य अशी दाद लावून घेतली.

भाटघर धरणाचें बांधकाम चालू असतां, आसपासच्या गांवांतील रयतेच्या जमिनींतील दगड-धोंडा वगैरे जो माल काढून नेला होता, त्याची नुकसान-भरपाई झाली नव्हती, धरणांत नावा चालविण्याच्या व धरणाच्या पाण्याचा उपयोग माणसांना व गुरांना पिण्याच्या कामीं करण्याच्या हक्कास बाध येण्याची भीति उत्पन्न झाली होती व धरणाच्या कडेच्या गाडीवाटा नष्ट झाल्यानें, रहदारी त्रास-दायक झाली होती. त्यामुळें, रयतेचीं मनें अस्वस्थ झालीं होतीं; म्हणून, राजे-साहेबांनीं या कामीं पुढाकार घेऊन मुंबई सरकारकडून स. १९२३ इ. सालीं

एक मिश्र कमिटी नेमून घेऊन, वरील तिन्ही प्रश्न आपल्या रयतेस अनुकूल असे सोडवून घेतले.

( ९ ) हिरडेफळांचा लिलांव न करतां, रॉयल्टी घेण्याची पद्धत सुरू केली.

रयतेच्या मालकी नंबरांतील हिरड्यांच्या झाडांवर मालकी रयतेची कीं सरकारची, हा प्रश्न माजी कारकीर्दीपासून वादग्रस्त होता व तंटेही झाले होते. रयतेस आपला हक्क सिद्ध करतां येत नव्हता. सरकारी व मालकी जमिनींतील हिरडेफळांचा दरसाल लिलांव होत असे. त्यांत आपलें नुकसान होत, आहे असें रयतेस वाटून स. १९२५ इ. सालीं दंगाधोपा होण्याचा संभव दिसूं लागला. श्रीमंतांचें धोरण अतिरेकी किंवा हट्टाचें नव्हतें. सामोपचारानें व तडजोडीनें वादग्रस्त प्रश्न निकालांत काढण्याचा त्यांचा स्वभाव असल्यानें, लोक-पुढाऱ्यांच्या विचारें त्यांनीं लिलांवाची पद्धत बंद करून, खंडीमागें रु. २ दोन रॉयल्टी देऊन, सरकारी व मालकी जमिनींतील हिरडा गोळा करून, लोकांना तो कोठेंही विकण्यास स. १९२६ इ. पासून परवानगी दिली. याप्रमाणें रयतेस श्रीमंत राजेसाहेबांनीं संतुष्ट केलें, व वाद मिटविला.

( १० ) सुधागड तालुक्यांतील मालकी नंबरांमधील झाडोऱ्यांसंबंधींची तक्रार मिटविली.

सुधागड तालुक्यांतील रयतेच्या मालकी जमिनींतल्या साग, शिसव, चंदन, ऐन, खैर, हिरडा वगैरे १६ जातींच्या झाडांवर स. १८८४ पासून संस्थानची पूर्ण मालकी होती, बाकीच्या चार तालुक्यांत तशी स्थिति नव्हती. यामुळें, हा विषमतेचा व एक महत्वाचा वादाचा प्रश्न होऊन बसला होता. यास्तव, श्रीमंतांनीं, आपल्या नेहमींच्या न्याय्य व सामोपचाराच्या धोरणास अनु-सरून, या प्रश्नाबाबत शिफारस करण्यास एक मिश्र-कमिटी नेमली; व तिच्या शिफारसींस अनुसरून साग, शिसव, ऐन व खैर या झाडांवर, घाटावरील चारही तालुक्यांतल्याप्रमाणें, फक्त तिजाईचा हक्क ठेवून बाकी $\frac{2}{3}$ चा हक्क व इतर १० दहा झाडांवर पूर्ण हक्क रयतेस स. १९२७ इ. पासून देण्यांत आला; व चंदन-तोडीवर घेराप्रमाणें फक्त फी घेण्याचें ठरवून सर्वत्र संस्थानांत एकच

पद्धत सुरू केली. यापासून संस्थानचें दरसाल सुमारें रु. ३५०० नुकसान होत असल्याचें दिसत होतें; तरी, रयतेच्या संतोषाकरतां ती तूट सोसण्यास तयार होण्यांत श्रीमंतांनीं उदार-मनस्कता दाखविली.

( ११ ) फॉरेस्ट सेटलमेंटची पूर्तता केली.

स. १८७९ इ. पावेतों संस्थानांत फॉरेस्ट खातें विशेष महत्त्वाचें नव्हतें, किंवा कायद्याप्रमाणें सेटलमेंट होऊन राखीव व संरक्षित असे फॉरेस्टचे विभागही केले नव्हते. परंतु, त्यानंतर खडकवासला व भाटघर या धरणांचीं कामें ब्रि. सरकारनें हातीं घेतल्यावर, त्यावरील बराचसा मुलुख संस्थानचा व डोंगराळ झाडोऱ्यांचा असल्यानें, त्यांतील माती वाहून येऊन धरणें गाळानें भरून जाऊं नयेत, म्हणून ब्रि. सरकारनें संस्थानला फॉरेस्ट ठेवण्यास भाग पाडलें. संस्थाननें माजी कारकीर्दींत त्याप्रमाणें करून कांहीं भागाचें सेटलमेंटचें काम पुरें केलें. बाकीच्या भागाचें काम पुरें न झाल्यानें व जवळ जवळ ४०-४५ वर्षें तें तसेंच भिजत घोंगडें राहिल्यानें, त्याचें पर्यवसान माजी सरकारच्या कारकीर्दीच्या शेवटच्या सुमारास अराजक चळवळीच्या उद्‌भवांत झालें. श्रीमंत राजेसाहेबांनीं स. १९३६ सालीं हें ४०-५० वर्षें राहिलेलें काम, त्याकरतां तज्ज्ञ ऑफिसर नेमून, स. १९३७ इ. सालीं पुरें केलें. तथापि, लोकांच्या तक्रारी मिटल्याचें दिसेना; म्हणून, त्याकरितां त्यांनीं स. १९३८ इ. सालीं आपल्या वयाच्या षष्ट्यब्दपूर्ति-समारंभाच्या वेळच्या दरबारांतील भाषणांत मिश्र कमिटी नेमण्याचा आपला मनोदय व्यक्त केला. त्याप्रमाणें कमिटी नेमून, चौकशी अंतीं कमिटीनें केलेल्या शिफारसींबाबत कार्यकारी मंडळाचा अभिप्राय मागवून, त्यास आपली मान्यता ता. ३-१०-४६ इ. रोजींच्या ठरावानें देऊन फार दिवसांचा हा तंट्याचा प्रश्न, बरेंच नुकसान सोसण्यास तयार होऊन, उभय पक्षीं समाधान-कारक रीतीनें निकालांत काढला.

याप्रमाणें मागील कारकीर्दीपासून चालत आलेले सर्व तक्रारी-विषय त्यांनीं क्रमाक्रमानें हातावेगळे केले. तथापि, सुधारणेच्या एका बाजूचें हें काम चालू असतांना दुसऱ्या बाजूकडे त्यांचें लक्ष नव्हतें किंवा ती बाजू थोपवून धरली होती, असें नाहीं. तेंही काम चालूच होतें, हें खालील मजकुरावरून कळून येईल.

## नव्या सुधारणा व सुखसोयी

राज्यकारभार सुधारलेला व प्रगतिपर आहे किंवा नाहीं व असल्यास, ती सुधारणा व प्रगति कोणत्या प्रकारची व किती प्रमाणांत आहे, हें ठरविण्याचें हल्लींचें मोजमाप म्हणजे प्रजाजनांस, त्यांच्या प्रतिनिधींमार्फत, राज्यकारभारांत अंशभागी केलें आहे कीं नाहीं, व केलें असल्यास, तें कसें व किती केलें आहे, हें आहे; संस्थानांतील सुराज्याचीं जीं चार प्रमुख लक्षणें म्हणून, श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावेळच्या व्हाइसरॉयसाहेबांनीं सांगितलीं, त्यांत प्रातिनिधिक संस्था हें एक होतें; व श्रीमंतांनीं राज्यारोहणाच्या दुसऱ्या दिवशींच्या ( ता. १९-८-२२ इ. ) मानपत्रांच्या दरबारांतील आपल्या भाषणांत लोकप्रतिनिधित्वाचें तत्त्व राज्यकारभारास लावण्याची आपली आकांक्षा स्पष्टतः बोलून दाखविली असल्यानें, तें आपलें बोलणें त्यांनीं पुढें कसकसें पुरें केलें, तें प्रथम निदर्शनास आणणें जरूर व इष्ट दिसतें.

सभा च समितिश्चावताम् । उप मा शिक्षाचारु । श्रुति.

( लोकसभा व मंत्रिमंडळ यांनीं राजास योग्य तें सांगावें. त्यांतच राजाचें कल्याण आहे. )

## कायदे-मंडळाची स्थापना व विकास

राज्यसूत्रें हातीं घेतल्यावर ( ता. १८-७-२२ ) अवघ्या पांच वर्षांत श्रीमंत राजेसाहेबांना नऊ तोफांच्या सलामीचा कायमचा मान नोव्हेंबर १९२७ इ. मध्यें मिळाला. त्या आनंदाचें स्मारक म्हणून त्यांनीं कायदेमंडळ ता. १८-८-२८ इ. रोजीं स्थापन केल्याचें, त्याच्या घटनेसह, जाहीर केलें. या कायदेमंडळांत अधिकारी १० व बिनअधिकारी १० व अध्यक्ष संस्थानचे दिवाण असे २१ नेमलेले सभासद होते.

कार्यज्ञांश्च शुचीन्दक्षान्समूहहितवादिनः ।
देशकालविदो धीरान्वाग्मिनो निर्भयांस्तथा ॥
अप्रतीपांश्च तद्धर्मान्प्रातिनिध्ये नियोजयेत् ।

( विद्वान, सुशील, समाजहितेच्छु, देशकालपरिस्थिति जाणणारे, धैर्यवान, वक्ते, निर्भीड असे प्रतिनिधि असावेत. )

या कायदेमंडळांत लोकनियुक्त सभासद नसले, तरी श्रीमंतांनीं नेमलेले बिनसरकारी सभासद हे लोकनियुक्त सभासदांसारखेच होते, हें याबाबत ता. २८-८-२८ इ. च्या ' केसरी ' पत्राच्या ' प्रासंगिक बोल ' या सदरांतील

" त्यांनीं स्वतः नेमलेले दहाही सभासद असेच आहेत कीं, त्यांच्याहून अधिक चांगले सभासद प्रजेच्या भावनेच्या व हिताच्या दृष्टीनेंही निवडणुकींत येणें शक्यच नव्हतें. प्रारंभीं निवडणुकीचा खटाटोप लोकांना तर पडूं नये आणि त्यांना सर्वस्वीं मान्य होतील असेच प्रतिनिधि आपण नेमावे, असें दुहेरी चातुर्याचें धोरण बाबासाहेब यांनीं ठेवलें. यामुळें याच दिवशीं रात्रीं भोर येथील जाहीर सभेंत संस्थान-प्रजा-परिषदेच्या चळवळींतील जहालांत जहाल अशा पुढाऱ्यांनीं प्रांजलपणें असें बोलून दाखविलें कीं, श्रीमंतांनीं दिलें, तें आमच्याही अपेक्षे-बाहेर दिलें. "

या मजकुरावरून कळून येणार आहे. हेंच धोरण श्रीमंतांनीं पुढील कायदे-मंडळांत नेमलेल्या बिनसरकारी सभासदांच्या बाबतींत ठेवलें होतें.

कायदेमंडळाच्या स्थापनेच्या वेळीं मंडळाचा कायमफंड म्हणून रु. २०,००० वीस हजार श्रीमंत राजेसाहेबांनीं **आपल्या खाजगींतून दिले.** त्या रकमेच्या व्याजाचा उपयोग कायदेमंडळानें आपल्या कार्याच्या कक्षेंत पडणाऱ्या शेतकी, उद्योगधंदे, वगैरेंच्या सुधारणेप्रीत्यर्थ करावा असें ठरविण्यांत आलें. प्रश्न विचारणें, ठराव मांडणें व कायद्याचीं बिलें प्रविष्ट करणें हे अधिकार कायदे-मंडळास दिले होते. अर्थात्, सुरुवातीस म्हणून ठराव वगैरे शिफारसवजा असले, तरी श्रीमंतांनीं त्यांकडे लक्ष दिलें नाहीं असें सहसा झालें नाहीं. इतकेंच नव्हे, तर बजेट कौन्सिलांत मांडण्याचें ठरलें नव्हतें, तरी तें समजावून दिलें जात असे व त्यासंबंधीं सभासदांचें म्हणणें शक्य तों विचारांत घेण्याची प्रथा ( Convention ) ठेवली होती. याप्रमाणें लोकमताचें प्रतिबिंब राज्य-कारभारांत अप्रत्यक्षतः पडण्याची योजना, प्रथमची पायरी म्हणून, केली गेली.

यानंतर ४ वर्षांनीं ( सन १९३२ सालीं ) कायदे-मंडळाच्या वरील घटनेंत दुरुस्ती करून, कायदे-मंडळाच्या २१ या संख्येंत सरकारी अधिकारी ८ अध्यक्षासह, तालुक्यांतर्फे—प्रत्येकीं १ एक असे—५ व भोर म्युनिसिपालिटीतर्फे

१ मिळून निवडलेले ६ बिनसरकारी व ७ बिनसरकारी नेमलेले सभासद असण्याची योजना केली. कायदे-मंडळाचा उपाध्यक्ष बिनसरकारी निवडलेला असणें, हा अधिकार नवा दिला. याप्रमाणें अप्रत्यक्ष निवडणुकीच्या तत्त्वाचा कायदेमंडळाच्या घटनेंत, दुसरी वरची पायरी म्हणून, समावेश केला.

या कायदे-मंडळाच्या उद्घाटन-समयींच्या भाषणांत भोर संस्थान राज्य-कारभाराचा स. १९३२ इ. चा १ ला कायदा ( Bhor State Government Act I of 1932 ) श्रीमंतांनीं केल्याचें व त्यांतच जबाबदार राज्यपद्धति ( Responsible Government ) हें आपल्या राज्यकारभाराचें अंतिम ध्येय ( Goal ) असल्याचें घोषित केलें. ता. १९-८-२२ च्या भाषणांतील एतद्विषयक बोलून दाखविलेल्या आकांक्षेस याप्रमाणें श्रीमंत राजेसाहेबांनीं कायद्याचें ( Statutory ) स्वरूप दिलें.

## अनवश्यक व अनिष्ट चळवळ

संस्थानांत चळवळीचें बीजारोपण माजी कारकीर्दींतच झालें होतें, व त्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं तर त्या चळवळीनें अराजक स्वरूप धारण केलें होतें. अनेक तक्रारी-बाबींचा निकाल न लावल्यामुळें, पूर्वीच्या कारकीर्दींत तसें होणें स्वाभाविक होतें असें क्षणभर म्हटलें, तरी श्रीमंतांनीं, आपल्या सलोख्याच्या व तडजोडीच्या धोरणानें, त्या बहुतेक सर्व मिटविल्या होत्या; इतकेंच नव्हे, तर स. १९२८ इ. सालीं कायदेमंडळाची स्थापना करून व त्यांत माजी कारकीर्दींत चळवळ करणाऱ्या लोकपुढाऱ्यांचीच नेमणूक करून, लोकांच्या तक्रारी, गैरसोयी, उणीवा, वगैरे दरबारच्या निदर्शनास आणून त्यांची दाद लावून घेण्याचें सनदशीर साधन त्यांना उपलब्ध करून दिलें होतें. अशा स्थितींत, सावकार कुळांना लुबाडतात हें निमित्त पुढें करून, स. १९३० इ. सालीं, विध्वंसक चळवळ सुरू करणें हें कांहीं लोकपुढाऱ्यांचें कृत्य कोणीही समंजसपणाचें म्हणणार नाहीं. सावकार कुळांना लुबाडतात असें गृहीत धरलें, तरी तेवढ्या कारणानें कोर्टाच्या हुकूमनाम्याची बजावणी करण्यास गेलेल्या बेलिफास हाणमार करणें व त्याचे कागदपत्र फाडणें, तसेंच अशा बेकायदा कृत्य करणाऱ्यांना पकडून दरबारनें त्यासंबंधीं कायदेशीर चौकशीचें काम चालू केलें असतां,

शेंकडो लोक जमवून त्यांच्याकडून सरकारी वाड्यास गराडा देववून ‘ पकडलेल्या लोकांस सोडून द्या, नाहीं तर भयंकर परिणाम होईल ’ अशी दरबारला धमकी देणें, वगैरे प्रकारांना कोणीही अत्याचाराचें वर्तन असेंच म्हणेल. सावकारापासून कुळांचें रक्षण करणें, हाच सरळ व शुद्ध हेतु असणारा कोणीही लोकपुढारी तशा स्वरूपाचा, म्हणजे सावकार-नियंत्रणाचा, कायदा कायदे मंडळामार्फत करून घेऊन कायदेशीर मार्गेच इष्ट गोष्ट घडवून आणील. पण, हा विधायक मार्ग सोडून व कायदा आपल्याच हातांत घेऊन दंडेली करणाऱ्याच्या सद्धेतूबद्दल बळकट शंका येणें साहजिकच आहे. तशांत, ‘ सनदशीर मार्गावर आमचा विश्वास आहे व दरबारशीं सहकार्य करण्याचें आमचें धोरण आहे ’ असें म्हणणारेच जेव्हां वरीलप्रमाणें उन्मार्गगामी होतात व अत्याचार घडवून आणतात, तेव्हां त्याचें वरील सात्त्विकपणाचें बोलणें केवळ वरपांगीं असून, त्यांच्या अंतःकरणांत काळेंबेरें आहे असेंच निखालस अनुमान होतें. शिवाय, संस्थानांत आम्ही शांततेचें वातावरण ठेवूं असें श्रीमंत राजेसाहेबांना आश्वासन देऊन, व त्यावर विश्वास ठेवून ते आपल्या प्रकृतिस्वास्थ्याकरतां युरोपच्या सफरीवर गेले असतां, त्यांच्या पश्चात् असली अराजक चळवळ सुरू करणें, हें नुसतें गर्हणीयच नव्हे, तर अधमपणाचें आहे असेंच कोणीही म्हणेल.

चळवळीची ही दिशा संस्थानलाच केवळ नव्हे, तर इतरांनाही सर्वस्वीं नापसंत होती. संस्थानांतील चळवळीबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्यांपैकींच एक श्रीयुत न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांचीही या चळवळीस अत्याचारी व घातुक वळण लागल्याची खात्री होऊन, त्यांनीं आपल्या ‘ केसरी ’ पत्रांत खालील शब्दांत तिचा स्पष्ट व पूर्ण निषेध केला आहे. ‘ केसरीं ’ तील स्फुटांत ते लिहितातः—

“ चळवळीच्या पुढाऱ्यांनीं केलेला हा प्रकार सर्वस्वीं गैरशिस्त आहे, असें स्पष्ट म्हटल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. संस्थानांतील स्वराज्याचा हेतु जातिविद्वेषक तर नसलाच पाहिजे; पण, नेहमींच्या कायद्याच्या हेतूला-अंम्मलबजावणीला व न्यायदानाला-विघातकहि असतां कामा नये. संस्थानी प्रजेचा पक्ष घेऊन आम्ही संस्थानिकांवर त्यांच्या अन्यायाबद्दल प्रखरपणें आघात करावयाला केव्हांहि माघार घेतली नाहीं. इतकेंच नव्हें, तर त्या सनदशीर

चळवळीला हरएक प्रकारें उत्तेजनच देत आलों आहों. पण, प्रजा बेताल होऊन अन्याय करूं लागेल, तर तिचाहि निषेध कठोरपणानें केल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं. प्रजेनें कायदा हातीं घेणें हें अनिष्ट आहे. अशानें अनवस्था-प्रसंग येईल, व स्वराज्याची चळवळ म्हणजे बेबंदशाहीची किंवा अराजकतेची चळवळ असें तिला स्वरूप येईल. भोर संस्थानांतील चळवळीच्या पुढाऱ्यांनीं उद्योगशीलता व धैर्य दाखविलें, याबद्दल आम्ही पूर्वीं त्यांचा तो मोठा गुण घेतला. परंतु, त्या चळवळींत मिळालेल्या यशानें डोळे फिरून, लाभलेल्या लोकसत्तेचा जर ते असा दुरुपयोग करतील, तर त्यांना ही आत्मघातकी बुद्धि सुचली असेंच म्हणावें लागेल. " ( खं. २, पा. ५४५-४६. )

दुसऱ्या कायदे मंडळाची मुदत संपल्यावर, म्हणजे स. १९३५ अखेर, लोकल-बोर्डास व कायदे-मंडळासही प्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व लागू करण्याचें श्रीमंतांनीं ठरविलें होतें; परंतु, दरम्यानच्या काळांतील, म्हणजे स. १९३०-३१ सालांतील, लोकपुढाऱ्यांच्या वरील निष्कारण आरंभिलेल्या अराजक चळवळीमुळें जी अशांतता निर्माण झाली होती, तिचा—ती चळवळ मोडून काढली होती, तरी—पूर्ण उपशम झाल्याची खात्री नसल्यानें, त्या वेळच्या शांततेच्या शाश्वती-बाबत मन साशंकच होतें. शिवाय, या बाबतींत कायदे-मंडळ व लोकल-बोर्ड यांचे सभासद, तसेंच संस्थानांतील व संस्थानाबाहेरीलही सद्गृहस्थ, यांची सभा श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं स. १९३१ इ. च्या अखेरीस भरवून श्रीमंतांनीं लोकांना प्रत्यक्ष मताधिकार देण्याबाबत लोकमत अजमावलें होतें. त्यांत बहुमत ( Sense of the meeting ) मताधिकारास अनुकूल नसल्याचेंच दिसून आलें होतें. यास्तव, तिसऱ्या कायदे-मंडळाची घटना दुसऱ्याच्याप्रमाणेंच ठेवून, प्रजेला प्रत्यक्ष मताचा अधिकार देण्याचें श्रीमंतांना लांबणीवर टाकावें लागलें. ही गोष्ट सुधागड तालुका प्रजापरिषदेच्या १० व्या अधिवेशनाचे अध्यक्ष, व लोकपुढाऱ्यांपैकींच एक प्रतिष्ठित असे इसम, श्रीयुत ग. मा. पानसे, B.A., LL.B., वकील, यांनीं आपल्या भाषणांत ता. २७-१२-३६ इ. रोजीं स्पष्ट सांगितली आहे. ते म्हणतात :

" घाटावर ( संस्थानांतील चार तालुक्यांत ) जी चळवळ चालली होती, ती विध्वंसक स्वरूपाची असून विधायक स्वरूपाची नव्हती. त्यामुळें, जनतेंत

क्षोभ उत्पन्न होऊन, अशांतता मात्र पसरली व लाभाचे दृष्टीनें प्रजेच्या पदरांत कांहीं न पडतां, राजा व प्रजा यांच्या दरम्यान वितुष्ट मात्र वाढलें, हा बहुजन समाजाचा तोटा झाला. दरबारचा सर्व लोकांवरील विश्वास उडाला. श्रीमंत राजेसाहेब हे अंत:करणाचे सरळ असून प्रगतिप्रिय व उदारमनस्क आहेत. दुसऱ्या कौन्सिलच्या वेळींच त्यांनीं लोकप्रतिनिधींना बहुमत दिलें. त्यानंतर जबाबदारीचें राज्य देण्याबद्दल आपला संकल्प भोर स्टेट ॲक्ट पास करून जाहीर केला. मग, हें औदार्य कां मावळलें, अशी शंका उद्भवते. त्यावर एवढेंच उत्तर देतां येण्यासारखें आहे कीं, घातुक स्वरूपाच्या चळवळीमुळें त्यांचें मन बिथरलें असावें." ( खं. २, पा. ५२७. )

चळवळीच्या या घातुक स्वरूपावरूनच, चळवळीच्या मुळाशीं लोकपुढाऱ्यांचा उद्देश लोकांची दाद लावून घेण्याचा नसून, कोणत्यातरी कारणाचें निमित्त करून संस्थानांत गोंधळ उत्पन्न करून, अधिकाऱ्यांना संकटांत आणून व दहशतीचें वातावरण उत्पन्न करून सत्ता काबीज करणें व आपण म्हणूं त्याप्रमाणें राज्यकारभार चालविण्यास राजाला भाग पाडणें, हाच अंतस्थरीत्या असल्याचें स्पष्ट दिसून आलें; व म्हणूनच, वरील केसरीच्या उताऱ्यांत म्हटल्याप्रमाणें या चळवळीचा परिणाम आत्मघातकीच झाला. त्या लोकपुढाऱ्यांच्या बोलण्यावरचा श्रीमंतांचा विश्वास तर उडालाच, प्रजेला प्रत्यक्ष मतदानाचा अधिकार देण्याचें लांबणीवर पडलें, व ज्या पैशाचा विनियोग प्रजेच्या सुखसोयींत भर घालण्याच्या कामीं करतां आला असता, त्याचा व्यय असल्या अराजक प्रवृत्तींचें निर्मूलन करण्याकडे करणें, म्हणजे पोलिस फोर्स वाढवून त्याकरतां बंदुका वगैरे खरेदी करण्याकरतां खर्च करणें, भाग पडलें. तथापि, लोकपुढाऱ्यांपैकीं कांहीं थोड्यांच्या या दुष्कृत्यांमुळें इतरांना व सर्वसामान्य जनतेला प्रत्यक्ष मताचा अधिकार देण्याचें श्रीमंत राजेसाहेबांनीं दीर्घ काळ थांबविलें नाहीं. 'खल: करोति दुर्वृत्तं तद्दै फलति साधुषु ।' म्हणजे, एकाचा अपराध व दुसऱ्यास शासन, असें होऊं न देण्यांत श्रीमंतांच्या मनाचा मोठेपणा व प्रगतिप्रियता हींच व्यक्त झालीं.

प्रजाजनांच्या घातुक चळवळीमुळेंच, निवडणुकीचें तत्त्व लागू करण्याच्याप्रमाणेंच, जबाबदार राज्यपद्धति मिळण्याचेंही लांबणीवर पडण्याचा दोष

प्रजाजनांकडेच जातो, ही गोष्ट कै. श्रीयुत पानसे यांच्या वरील भाषणांत स्पष्टच झाली आहे.

त्यानंतर, संस्थानचें वातावरण निवळल्यावर, श्रीमंतांनीं आपल्या वयाच्या हीरक-महोत्सवाच्या वेळीं दरबारांतील भाषणांत ता. १६-१२-३८ इ. रोजीं प्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व कायदे-मंडळ व लोकलबोर्ड्स वगैरे स्थानिक स्वराज्य संस्थांना लागू केल्याचें जाहीर केलें; इतकेंच नव्हे, तर असेंच शांततेचें व सुव्यवस्थेचें वातावरण कायम राहिल्यास, पांच ५ वर्षांनीं,

( १ ) कायदे मंडळाचा अध्यक्ष लोकनियुक्तांपैकीं निवडलेला असणें,

( २ ) लोकनियुक्तांपैकीं एकास मन्त्री म्हणून नेमून त्यास कार्यकारी मंडळांत घेऊन त्याकडे राष्ट्संवर्धक खातीं सोपविणें, व

( ३ ) प्रिव्हि पर्स खेरीज बाकीचें बजेट, सर्टिफिकेशनचा अधिकार राखून ठेवून, कायदे-मंडळाच्या मतास टाकणें,

हे तीन अधिकार पुढें देण्याचेंही जाहीर केलें.

नंतर, कायदे मंडळाची घटना काय असावी म्हणजे कायदे-मंडळाच्या सभासदाची लायकी, मताधिकार व मतदार-संघ या तीनबाबत शिफारसी करण्यास घटना कमिटी नेमली; व तिच्या शिफारशींना, थोड्या फेरफारानें, ता. १ जुलै १९४१ च्या ठ. नं. ४ नें श्रीमंतांनीं मान्यता दिली. पुढें कमिटीनें केलेला निवडणुकीचा कायदा व नियम यांसही ता. ३-१२-४१ च्या ठ. नं. ९ नें संमति दिली. कायदे-मंडळाच्या कामकाजाचे नियम करण्यापूर्वी भोर स्टेट ॲक्ट स. १९३२ इ. चा १ ला दुरुस्त करणें जरूर असल्यानें, तसा दुरुस्त ॲक्ट स. १९४२ इ. चा ( मसुदा ) करून, तो व कायदे-मंडळाच्या कामकाजाचे नियम तयार करून ते, असे दोन्ही अनुक्रमें ता. १४-३-४२ व ता. १३-४-४२ रोजीं दरबारकडे घटना-समितीनें पाठविल्यावर, त्यांना श्रीमंतांनीं ता. १८ ऑगस्ट १९४२ रोजीं मान्यता दिली. या नव्या घटने-प्रमाणें कायदेमंडळाचे सभासद २३ केले; त्यांपैकीं, प्रत्यक्ष निवडणुकीनें निवडलेले १३ तेरा–( संयुक्त ) मतदार संघानें निवडलेल्या हरिजनांच्या प्रति-निधिसह, नेमलेले बिनसरकारी ५ ( त्यांत एक स्त्री-सभासद ) व सरकारी ५

( नेमलेल्या बिनसरकारी अध्यक्षासह ) अशी संख्या ठरविली; व बजेटवर चर्चा करण्याचा व कपातीच्या सूचना ( Cut motions ) आणण्याचा नवा अधिकार कायदे-मंडळास दिला. याप्रमाणें चवथ्या कायदेमंडळांत लोकनियुक्तांचें बहुमत झालें; तसेंच, उपाध्यक्ष व चेअरमन हे निवडलेले दिले.

कायदेमंडळाची बैठक ता. १४-११-४२ रोजीं सुरू झाली. सुरुवातीच्या भाषणांत श्रीमंतांनीं

( १ ) एक वर्षाच्या आंत मन्त्री नेमण्यांत येईल व

( २ ) प्रिव्हि पर्सपैकीं दरसाल रु. २५००० राष्ट्र-संवर्धक खात्याकडे देण्याचें योजिलें आहे,

असें विशेषरीत्या आपण होऊन जाहीर केलें.

राष्ट्रसंवर्धक खात्याकडे रु. २५००० प्रिव्हि पर्सपैकीं दिल्यानंतर, फक्त रु. ९०००० नव्वद हजार ( प्रिव्हि पर्स म्हणून ) घेण्याचें श्रीमंतांनीं ठरविलें, हें दिसतच आहे. हल्लीं हिंदुस्थान सरकारनें, संस्थान विलीन झाल्यावर, स्केलप्रमाणें श्रीमंत राजेसाहेबांची नेमणुकीची जी रक्कम ठरविली आहे, ती रु. ८९०४२ आहे.

## दरबारवर दिवाणी दावा करणें

या कौन्सिलच्या ३ ऱ्या अधिवेशनास ता. ३-१०-४३ रोजीं सुरुवात झाली. त्याच्या प्रारंभींच संस्थान-सरकारविरुद्ध व सरकारी नोकर यांनीं नोकरीच्या नात्यानें केलेल्या कृत्यांबद्दल त्यांच्या विरुद्ध, सिव्हिल प्रोसिजर कोडअन्वयें, दिवाणी दावा करण्याच्या हक्कावर मागील कारकीर्दीत घालण्यांत आलेला निर्बंध काढून टाकून, कायद्यानुसार दरबारविरुद्ध दिवाणींत दावा करण्याची परवानगी दिल्याचें जाहीर केलें. या कायदेमंडळाचें सुमारें तीन वर्षें अस्तित्व होतें.

नंतर, स. १९४३ इ. चा भोर स्टेट ॲक्ट ( दुरुस्तीचा ) करून, ता. १-१२-४३ इ. पासून लोकनियुक्तांपैकीं एकास मन्त्री नेमून व तो कायदे-मंडळास जबाबदार करून, त्याच्याकडे शिक्षण, वैद्यक वगैरे ६ राष्ट्रसंवर्धक खातीं सोंपविलीं; व त्यांचें बजेट ( Votable ) कौन्सिलच्या मंजुरीस पात्र राहील असें ठरविलें.

त्यानंतर, जनतेच्या वाढत्या आकांक्षा व ब्रि. इंडियांतील युद्धोत्तरकालीन बदलती परिस्थिति लक्षांत घेऊन, श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. ६-२-४६ रोजीं जाहीरनामा प्रसिद्ध करून, स. १९३८ रोजींच्या घोषणेंत राखून ठेवलेल्या तीन बाबींपैकीं, मन्त्री हा ता. १-१२-४३ पासूनच नेमण्यांत आल्यानें, राहिलेल्या दोन बाबी, म्हणजे कायदेमंडळाचा अध्यक्ष लोकनियुक्त सभासदांतून निवडलेला असणें व बजेट, प्रिव्हि पर्स व इतर अवश्य बाबी सोडून, कायदे-मंडळाच्या मतास, सर्टिफिकेशनचा अधिकार राखून ठेवून, टाकणें, हे हक्क देण्याचें जाहीर केलें व त्याकरतां, पुन्हा निवडणूक होण्यास सोयीस्कर पडावें, म्हणून कायदेमंडळ विसर्जित केलें.

त्याचप्रमाणें, श्रीमंत राजेसाहेबांची प्रजा नागरिकत्वाचे मूलभूत १० दहा हक्क उपभोगीत होतीच; तरी, ते हक्क कायद्यांत समाविष्ट केले नसल्यानें, सदर जाहीरनाम्यांत तेही दाखल केले.

## पांचवें कायदेमंडळ

ता. २ सप्टेंबर १९४६ च्या द. ठ. नं. ४ नें कायदेमंडळांतील निवडलेल्या सभासदांची संख्या १९ एकोणीस, सरकारनियुक्त बिनसरकारी ५ पांच ( तेही लोकनियुक्तांना पसंत असलेले ) व सरकारी अधिकारी २ दोन अशी करून, २६ सभासदांचें कायदेमंडळ ता. १८ ऑगस्ट १९४७ पासून झालें. ( १ ) खाजगी, ( २ ) संरक्षण, ( ३ ) परराष्ट्रीय काम व राजकीय संबंध व इनाम, सरंजाम वगैरे सोडून बाकी सर्व, म्हणजे १३ खातीं, सोपीव करण्याचा मनोदय द. ठरावांत व्यक्त केला. त्याप्रमाणें नोव्हेंबर १९४६ मध्यें निवडणूक होऊन ता. १-३-१९४७ पासून मन्त्री यांचा कारभार सुरू झाला.

### प्रजाः स्वतन्त्रयांचक्रे शश्वत्सूर्य इवोदितः। रघुवंश १७।७४.

त्यानंतर, जाहीरनाम्याप्रमाणें श्रीमंतांनीं प्रजाजनांस, स्वतंत्र भोर स्टेट ॲक्ट १९४७ इ. चा १ ला कायदा करून, संपूर्ण स्वराज्याचे ऊर्फ जबाबदार राज्यपद्धतीचे हक्क दिल्याचें, ता. १८-८-४७ इ. रोजीं आपल्या कारकीर्दीच्या रौप्य-महोत्सवाच्या दरबारांतील भाषणांत घोषित करून, राज्यारोहणापासून पंचवीस वर्षांच्या अवधींत आपलें राज्यारोहणाच्या वेळचें अभिवचन कृतींत

आणलें, हें वेगळें सांगावयास नकोच. Comparisons are always bad, म्हणजे ' तुलना करणें सर्वत्रच युक्त असतें, असें नाहीं. ' या वाक्यांतील तत्त्वाकडे दुर्लक्ष न करतांही, प्रजाजनांच्या हाडामांसाचा व त्यांच्या आकांक्षांशीं सहानुभूति असलेला राजा होता, म्हणून तर ब्रिटिश इंडियांतील प्रजेस जे हक्क मिळण्यास सुमारें दीडशें वर्षें झगडावें लागलें, ते हक्क भोरच्या प्रजाजनांस अवघ्या पंचवीस वर्षांत मिळाले, असें म्हटल्यास तें वावगें अथवा वस्तुस्थितीस सोडून होईल असें वाटत नाहीं.

श्रीमंतांच्या कारकीर्दीच्या रजत-महोत्सवाच्या दिवशीं लेखकास, सेवा-निवृत्तिनंतर, हजर राहण्याची संधि मिळाली, याचा आनंद वाटत आहे. त्या दिवशींच्या अधिकारदानाच्या समारंभांत श्रीमंतांनीं आपणाकडे अत्यवश्य व राजसत्तानिदर्शक असे थोडेच अधिकार ठेविल्याचें पाहून, रघुराजाच्या दानशूरत्वास उद्देशून कालिदासानें आपल्या ' रघुवंश ' काव्यांत तत्संबंधीं

अदेयमासीत्त्रयमेव भूपतेः
शशिप्रभं छत्रमुभे च चामरे । ३.१६

असें जें वर्णन केलें आहे, त्याची कोणालाही आठवण होण्यासारखीच ती गोष्ट होती. इतकेंच नव्हे, तर संपूर्ण जबाबदारीची राज्यपद्धति आपल्या रयतेच्या, म्हणजे लोकपुढाऱ्यांच्या, हवालीं करून श्रीमंतांनीं त्या समयीं जे कृत-कृत्यतेचे व समाधानाचे उद्गार काढले, त्यांवरून वरील महाकवीनेंच आपल्या अभिज्ञानशाकुंतल नाटकांत, आपल्या मानीव कन्येला-शकुंतलेला-राजा दुष्यंता-कडे पाठविल्यावर, कण्वऋषीनें आत्मसंतोषाचे

जातो ममायं विशदः प्रकामं
प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा ।

याप्रमाणें जे उद्गार काढल्याचें वर्णन केलें आहे, तें प्रत्येकाच्या मनश्चक्षूपुढें स्वाभाविकपणेंच आलें. 'राज्यं न्यासमिवाभुनक् ।' ( रघुवंश १२.१८ ) असें जें

म्हटलें जातें, तसेंच हें झालें. अशा प्रकारचा सदिच्छापूर्तीचा भाग्याचा लाभ फारच थोडयांच्या वाट्यास येतो.

## कार्यकारी मंडळ

त्र्यवरा परिषज्ज्ञेया ॥
मन्त्रिभिस्तु विना मन्त्रं नैकोऽर्थं चिन्तयेत्क्वचित् ।
कार्यसिद्धिकरं ब्रूयुर्भूयिष्ठास्तत्र तत्कुरु ॥
ज्ञात्वा च मन्त्रिणां मतं विदध्याद्धितमानसः ।

( मंत्रीमंडळांत तीनपेक्षां कमी सभासद नसावेत.

राजानें एकटयानें कार्य पाहूं नये.

मंत्र्यांनीं योग्य तेंच सांगावें, व राजानें त्याचा विचार करून हितकर तें करावें. )

माजी हिज हायनेस यांच्या कारकीर्दीत कार्यकारी मंडळाची योजना नव्हती. तालुकानिहायच्या निरनिराळ्या खात्यांकडून जीं कामें भोर येथील संबंधीभूत मुख्य ऑफिसकडे येत, त्यांवर हुजूरचे निकाली वगैरे शेरे जे होत, ते त्या खात्यावरील ऑफिसरचें म्हणणें लक्षांत घेऊन केले जात असत. महत्त्वाच्या विषयाच्या संबंधांत सर्व अथवा कांहीं जबाबदार उच्च दर्जाच्या अधिकाऱ्यांनीं एकत्र बसून व त्याची साधकबाधक वाटाघाट करून मग निर्णय करण्याची सोय, राज्यकारभारयंत्रांतील एक अवश्य भाग या स्वरूपांत, केलेली नव्हती. सुधारलेल्या राज्यपद्धतींत हें एक महत्त्वाचें अंग असल्यानें, ती उणीव दूर करण्याचें ठरवून, श्रीमंत राजेसाहेब यांनीं गादीवर आल्यापासून दोन वर्षांच्या आंत, म्हणजे स. १९२४।२५ इ. सालीं, कार्यकारी मंडळाची स्थापना केली. या कार्यकारी मंडळांत स्टेट कारभारी अथवा दिवाण असून, शिवाय मुलकी, दिवाणी वगैरे शाखांचे मुख्य अंमलदार असे एकूण, कामाच्या मानाप्रमाणें, तीन ३ तें ५ पांच सभासद असत. त्यांच्यामध्यें खात्यांची विभागणी (पोर्टफोलिओ) केलेली असून, कोणत्याही खात्याकडील चालचलाऊपैकींच पण महत्त्वाचा अथवा नवाच प्रश्न उत्पन्न झाल्यास, त्याची खुली वाटाघाट श्रीमंतांसमोर सर्व सभासदांनीं करून

आपआपलें स्वतंत्र मत त्याबाबत प्रदर्शित करावयाचें; व नंतर त्या मतांचा विचार सर्व बाजूंनीं करून हुजूरचा निर्णयात्मक हुकूम व्हावयाचा; व संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वानुसार त्यावर कार्यकारी मंडळांतील संबंधीभूत जबाबदार सभासदांच्या सह्या होऊन तो दरबारचा हुकूम म्हणून अंमलबजावणीस जावयाचा, अशी वहीवाट होती. श्रीमंत राजेसाहेब यांच्या खास अधिकारांतील बाबींचे निर्णय, वाटाघाट होऊन झालेले असले, तरी ते फक्त हुजूरच्या सहीशिक्क्यानेंच प्रसिद्ध होऊन अंमलांत येत. याप्रमाणें परिस्थिति सुमारें १८।१९ वर्षें होती. पुढें श्रीमंतांनीं स. १९३२ इ. सालीं जबाबदार राज्यपद्धति हें ध्येय घोषित केल्यावर व तदनुषंगानें कायदेमंडळाचे अधिकार व त्यांतील लोकनियुक्त सभासदांची संख्या स. १९४२ इ. सालीं वाढविल्यावर, जबाबदार राज्यपद्धतीची प्रथम पायरी म्हणून ता. १।१२।४३ इ. पासून लोकनियुक्त सभासदांपैकीं एकाचा मंत्री म्हणून कार्यकारी मंडळांत समावेश केला व त्याकडे शिक्षण, दवाखाने, वगैरे राष्ट्रसंवर्धक अशीं खातीं सोपविलीं. त्यानंतर, ता. ६ फेब्रुवारी १९४६ इ. च्या जाहीरनाम्यांत प्रसिद्ध केल्याप्रमाणें, कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षाच्या जागीं श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांची ता. ६।२।४६ पासून योजना केली; ( त्या वेळपावेतों कार्यकारी मंडळावर संस्थानाबाहेरील बिनसरकारी सभासद अध्यक्ष म्हणून कोणत्याही इतर संस्थानांत नेमला नव्हता. यास्तव, या नेमणुकीबद्दल श्रीमंतांचें सर्वांकडून अभिनंदन केलें गेलें. ) व ता. १८।८।४७ इ. पासून वरील ६ खात्यांत आणखी शेतकी, जंगल, बांधकाम ऊर्फ P. W. D. व उद्योगधंदे वगैरे तेरा खातीं मंत्र्यांकडे सोपीव म्हणून दिलीं; व कार्यकारी मंडळांत आणखी १ एक अथवा अधिक मंत्री घेण्याची ता. १।३।४७ पासून तरतूद केली. याप्रमाणें अनेक मंत्री घेतले, तरी ते, स. १९४७ इ. च्या भोर स्टेट ॲक्ट-प्रमाणें, संपूर्ण जबाबदार राज्यपद्धति प्रस्थापित केल्यावर, संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वावर मुख्य मंत्री यानें आपले मदतीस म्हणून घ्यावयाचे असत; पण, पुढें या तत्त्वाचें परिपालन न झाल्यानें, मुख्य मंत्री यांनीं आपल्या मंत्रिपदाचा राजीनामा ता. ७।१०।४७ इ. रोजीं दिला व म्हणून मंत्रिमंडळ विसर्जित करण्याचा प्रसंग दरबारवर आला. त्यानंतर मुख्य मंत्री यानें श्रीमंतांच्या आदेशा-नुसार आपलें दुसरें मंत्रिमंडळ ता. ९।१०।४७ रोजीं बनविलें.

पुढें ता. १७।१०।४७ रोजीं संघराज्य अस्तित्वांत येऊन, त्याच्या घटना-कमिटीवर संस्थानतर्फे ४ सभासद निवडून देणें असल्यानें व त्या वेळीं कायदे-मंडळ अस्तित्वांत नसल्यानें, प्रजासभेकडून चार सभासदांची निवड संघराज्याच्या घटनाकमिटीकरतां करण्यांत आली.

पुढें श्रीमंतांनीं, कायद्याप्रमाणें आपल्या विशेष अधिकारान्वयें, पूर्वीचेंच मंत्रिमंडळ चालू ठेविलें. संस्थान विलीन होईपर्यंत तें अस्तित्वांत होतें.

## स्थानिक स्वराज्य-संस्थांची स्थापना व संवर्धन

### ( अ ) भोर म्युनिसिपालिटी

भोर म्युनिसिपालिटीची स्थापना माजी हिज हायनेस यांच्या कारकीर्दींत स. १८८५ इ. सालीं झाली; परंतु, श्रीमंत राजेसाहेब गादीवर येईपावेतों तिचें अस्तित्व नामनीकच होतें. तिचें कामकाज एकाद्या अर्धवट सरकारी खात्या-प्रमाणेंच चाले. स्थानिक कामाचा अनुभव लोकांस स्वतंत्ररीत्या मिळावा, अशी सोय त्या संस्थेच्या घटनेंत केलेली नव्हती. तशी संधि लोकांना मिळावी, म्हणून राज्यसूत्रें हातीं घेतल्या वर्षींच स. १९२२ इ. सालीं श्रीमंतांनीं डि. म्यु. ॲक्ट लागू करून ९ नऊ सरकारी व ७ सात बिन-सरकारी अशा एकूण सोळा १६ नेमलेल्या सभासदांचें म्यु. बोर्ड तयार केलें, व त्याकडे शहरचें आरोग्य, दिवाबत्ती, रस्तादुरुस्ती इत्यादी कामें स्वतंत्ररीत्या सोपविलीं. या म्यु. बोर्डाचें काम नीट चालतें असें लक्षांत घेऊन, स. १९२९ इ. सालीं सदर बोर्डावर ८ आठ सभासद निवडून देण्याचा हक्क भोरवासीयांना दिला, व नेमलेले व निवडलेले सभासद, १६ च्या संख्येंत, म्यु. बोर्डावर सारखे केले. बोर्डाचा अध्यक्ष सरकारी व उपाध्यक्ष निवडलेला असे. यानंतर, संस्थेचें काम सहकार्यानें होत असल्याचें पाहून, १० वर्षांनीं म्यु. बोर्ड १५ सभासदांचें करून, त्यांत १० लोकनियुक्त सभासद असतील अशी स. १९३८ इ. सालीं योजना केली. तसेंच, अध्यक्ष व उपाध्यक्ष लोकनियुक्त केले. यानंतरच्या दोन त्रैवार्षिक निवडणुका होऊन म्यु. सभासदांनीं आपलें काम बरेंच चांगलें केलें. त्यानंतरच्या म्हणजे सन १९४५ इ. च्या निवडणुकींत मात्र म्यु. बोर्डाकडून जनतेच्या हिताच्या दृष्टीनें कामें होत

नाहींत असा स्थानिक स्वराज्य-मंत्र्यांचा रिपोर्ट आल्यावरून त्यांच्या रिपोर्टप्रमाणें म्युनिसिपालिटी ता. १५।१२।१९४७ इ. पासून रद्द करून, तिचें काम पाहण्यास प्रशासक ( ॲडमिनिस्ट्रेटर ) नेमावा लागला.

( ब ) शिरवळ नोटिफाइड एरिया कमिटी.

भोर संस्थानांत राजधानीच्या शहराव्यतिरिक्त शिरवळ व पाली हीं दोनच मोठीं गांवें असल्यानें, भोर येथील प्रजाजनांप्रमाणेंच या दोन गांवच्या रहिवाशांना स्थानिक स्वराज्याचें शिक्षण मिळावें, म्हणून श्रीमंत राजेसाहेब युवराज असतांना शिरवळ तालुक्याचें काम त्यांच्याकडे होतें, तेव्हांच त्या गांवच्या लोकांना स्थानिक स्वराज्याचे कांहीं तरी अनुभव मिळावेत अशी त्यांना कल्पना आली. ती त्यांनीं गादीवर आल्यावर स. १९२४ इ. सालीं शिरवळ गांवीं नो. ए. कमिटीची स्थापना करून अंमलांत आणली. सदर कमिटींत ७ सरकारी व ६ बिनसरकारी असे १३ नेमलेले सभासद असत; व अध्यक्ष मामलेदार असे. त्यानंतर स. १९३८ इ. सालीं सदर गांवच्या कमिटीचा कर भरणाऱ्यांना, कमिटी ९ सभासदांची करून, ६ सभासद निवडून देण्याचा हक्क देण्यांत आला. पूर्वीप्रमाणें मामलेदार अध्यक्ष असले, तरी $\frac{2}{3}$ इतकें लोकनियुक्तांचें बहुमत केलें, व लोकांना जबाबदारीनें काम कसें करावयाचें, याचें शिक्षण घेण्याचें साधन उपलब्ध करून दिलें.

( क ) पाली नोटिफाइड एरिया कमिटी.

शिरवळास नो. ए. कमिटी स्थापन केल्यानंतर, श्रीमंतांनीं स. १९२७ इ. सालीं पालीस सरकारी ४ व बिनसरकारी ३ अशा ७ नेमलेल्या सभासदांचें सॅनिटरी बोर्ड अस्तित्वांत आणिलें. पुढें स. १९३८ इ. सालीं सदर बोर्डाचें रूपांतर पाली नो. ए. कमिटींत करण्यांत येऊन, कमिटीच्या सभासदांची संख्या, पांच ५ सरकारी (मामलेदार अध्यक्षासह) व ४ बिन-सरकारी नेमलेले एकूण ९ करण्यांत आली. कमिटीच्या तीन वर्षांच्या अस्तित्वानंतर, स. १९३८ इ. सालीं दिलेल्या सुधारणांअन्वयें, स. १९४० इ. पासून नो. ए. कमिटीची घटना ६ सभासद निवडलेले व ३ सरकारी ( अध्यक्ष मामलेदारसुद्धां ) अशी—म्हणजे

लोकनियुक्तांचें २/३ बहुमत असलेली—करण्यांत आली; व लोकांना आपल्या इच्छेप्रमाणें गांवचें काम जबाबदारीनें वहिवाटून जास्त हक्क उपभोगण्यास आपली पात्रता निदर्शनास आणण्याची संधि देण्यांत आली.

( ड ) तालुका लोकल बोर्ड्स.

संस्थानांतील भोर, शिरवळ व पाली या मोठया गांवांत, लहान प्रमाणावर कां असेना, पण तेथील रहिवाशांना स्थानिक-स्वराज्याचें शिक्षण देणाऱ्या संस्था मिळाल्या. तथापि, तेंच शिक्षण इतर गांवांतील बहुजन समाजास प्राप्त करून घेण्याची संधि द्यावी अशी श्रीमंतांची इच्छा होती. स. १९३२ इ. सालीं 'जबाबदार राज्यपद्धति' हें त्यांनीं आपल्या राज्यकारभाराचें अंतिम ध्येय जाहीर केल्यानें, बहुजनसमाजाची त्या दृष्टीनें तयारी करणें अवश्यच झालें; म्हणून, त्याच वर्षी, ब्रि. इन्डियांतील डिस्ट्रिक्ट लोकलबोर्ड ॲक्टच्या धर्तीवर, त्यांत योग्य असे परिस्थित्यनुसार फेरफार करून, तालुका बोर्ड ॲक्ट तयार केला व त्याअन्वयें प्रत्येक तालुक्यांत ५ बिन-सरकारी व ४ सरकारी ( अध्यक्षासह ) अशा ९ नेमलेल्या सभासदांचें तालुका बोर्ड अस्तित्वांत आणलें. सदर बोर्डाचे अध्यक्ष तालुक्याचे मामलेदार असत, व उपाध्यक्ष बिन-सरकारी असे. या रीतीनें सुरुवातीपासून बोर्डांत बिनसरकारी सभासद जास्त असण्याची योजना करून, तालुक्यांतील जनतेला स्थानिक स्वराज्याचें शिक्षण व अनुभव मिळवण्याची सोय केली.

बोर्डांना दिलेल्या उत्पन्नाच्या बाबीशिवाय सर्व बोर्डांचा कायमफंड असावा व त्याच्या व्याजाचा विनियोग बोर्डांना आपल्या विशेष कर्तव्याकडे करण्यास चार दोन वर्षांनीं तरी आर्थिक सवड व्हावी, म्हणून श्रीमंत राजेसाहेबांनीं **आपल्या खाजगींतून** रु. २१,३२५ बोर्डास दिले.

त्यानंतर स. १९३८ इ. सालीं, षष्ठ्यब्दपूर्ति समारंभाच्या वेळीं केलेल्या सुधारणांच्या घोषणेअन्वयें, प्रत्येक तालुका लोकल बोर्ड ११ सभासदांचें करण्यांत येऊन, त्यांत तालुक्यांतील जनतेनें निवडलेले ६ सभासद असतील अशी बोर्डाची घटना केली. याप्रमाणें लोकांना अधिकार मिळाला, तरी तालुका

लोकल बोर्डाचें उत्पन्न पाहिजे तितकें जास्त नसल्यानें, दृष्टींत भरेल असें नवें काम, लोकांच्या सुखसोयीचें असें, बोर्डाला तालुक्याकरतां येत नाहीं असें दिसून आल्यावरून, स. १९४७ इ. सालीं, त्या वेळच्या स्थानिक-स्वराज्यमंत्र्यांच्या सल्ल्यास अनुसरून, सर्व संस्थानाकरतां एकच डिस्ट्रिक्ट लोकलबोर्ड, ब्रिटिश इंडियांतील डि. लो. बोर्ड ॲक्टाच्या नमुन्याप्रमाणें, पण त्यांत स्थानिक परिस्थितीप्रमाणें थोडा बदल करून, स्टेटचा डि. लो. बोर्ड ॲक्ट तयार केल्या-अन्वयें, स्थापना करण्याचें ठरविलें; पण, त्याचा अंमल होण्याची संधि, मंत्रि-मंडळाची २।३ वेळां झालेली उलथापालथ व नंतरचें संस्थानचें विलिनीकरण, यांमुळें मिळाली नाहीं.

वरील संस्थांच्या स्थापनांची आणि विकासाची हकीगत लक्षांत घेतां, असें दिसून येतें कीं, जबाबदार राज्यपद्धतीच्या ध्येयाची घोषणा श्री. राजेसाहेबांनीं स. १९३२ इ. सालीं केली असली, तरी तिचें बीज त्यांच्या ता. १९।८।२२ इ. रोजींच्या मानपत्रसमारंभाच्या वेळच्या भाषणांतील लोकप्रातिनिधित्वाचें तत्त्व राज्यकारभारास लावण्याविषयीं बोलून दाखविलेल्या आकांक्षेंतच सापडतें; व त्या दृष्टीनेंच वरील घोषणेच्या पूर्वींपासूनच—म्हणजे स. १९२८ इ. सालीं कायदेमंडळ स्थापून, स. १९२८ इ. सालीं भोर म्यु. ला मताचा हक्क देऊन व शिरवळ व पाली या गांवांना अनुक्रमें नो. ए. कमिटी व सॅनिटरी बोर्ड देऊन—त्यांनीं घोषणेस व तिच्या भावी परिपूर्तीस अनुकूल अशी प्राथमिक भूमिका तयार करण्याची तजवीज केल्याचें स्पष्ट दिसतें. इतकेंच नव्हे, तर त्यांनीं वेळोवेळीं प्रदर्शित केलेल्या इच्छेप्रमाणें संस्थानांत शांततेचें वातावरण लोकांनीं ठेवलें असतें, तर जबाबदार राज्यपद्धतीचें दान स. १९४७ इ. मध्यें जें दिलें गेलें, तें निःसंशय त्याच्या बरेंच अगोदर देतां आलें असतें; व त्याचा अनुभव लोकांना घेतां आला असता, व श्रीमंतांनाही तें योग्य रीतीनें चालल्याचें पाहून कृतकृत्य झाल्याचें तितकें जास्त समाधान वाटलें असतें.

श्रीमंत राजेसाहेब यांनीं वेळोवेळीं राज्यकारभार सुधारण्यासंबंधीं जे जे उद्गार काढले, त्याप्रमाणें योग्य वेळीं त्यांनीं ते अंमलांतही आणले; पण, दुर्दैवानें त्याचा प्रत्यक्ष फायदा प्रजेच्या पदरांत जसा पडावा तसा पडला नाहीं. जी गोष्ट

प्राप्त व्हावी, म्हणून लोकपुढाऱ्यांनीं २०।२५ वर्षें चळवळ केली, त्याच्या मुळाशीं लोककल्याण करण्याची त्यांची खरी व पूर्ण सदिच्छा असेल असेंच कोणीही मानील; इतकेंच नव्हे, तर फार दिवसांनीं मिळविलेल्या हक्काचा व अधिकाराचा लोकपुढारी किती व कसा सदुपयोग करतात, हें प्रचीतीस आणण्याची त्यांच्यांत अहमहमिका सुरू होईल असेंच वाटत होतें. पण, तें वाटणें चुकीचें ठरलें. परंतु, भोरचे मुख्य मंत्री श्रीयुत गो. बा. पोतनीस यांचें धोरण बरेंच सुसंगत व वर्तनही बऱ्याच उच्च प्रकारचें होतें असें नमूद करण्यास हरकत नाहीं. मंत्रिपद काय किंवा म्युनिसिपल सभासदत्व काय, त्याचा उपयोग लोककल्याणाकरतांच झाला पाहिजे. पण तसें झालें नाहीं. त्याचें कारण Power intoxicates and corrupts या इंग्रजी म्हणीप्रमाणें अथवा 'मिळता अश्व बसाया याचक चौखूर दामटी त्यास।' या आर्यार्धांत म्हटल्याप्रमाणें झालें असेल काय? ही स्थिति पाहून श्रीमंतांना, तसेंच संस्थानांतील व संस्थानाबाहेरीलही समंजस लोकांना अत्यंत वाईट वाटलें. लहानशा क्षेत्रांत राज्यकारभाराचें उदात्त ध्येय तंतोतंत अंमलांत आणण्या-लायक—पक्षभेदादींच्या पातळीच्या वर राहून काम करणारे—बुद्धिवान्, चारित्र्यवान् व कर्तबगार असे लोकपुढारी असणें, अगर क्वचित् तसे असले, तरी ते निवडून येणें, कठीण आहे. ह्याच, इतरत्र बऱ्याच ठिकाणीं अनुभवास आलेल्या, स्थितीस भोर संस्थान अपवादात्मक नाहीं हेंच सिद्ध झालें. इतकेंच नव्हे, तर Slow but sure हा श्रीमंत राजेसाहेबांचा Motto ( वर्तनविषयक ध्रुवतारा ) व राज्यकारभारांत Hasten slowly ( सावकाशयुक्त जलद गती ) चें तत्त्व किती व कां आदरणीय, अनुसरणीय व उपयुक्त आहे, हें अनुभवानेंच सर्वांना कळून आलें. मंत्रि काय किंवा म्युनिसिपल सभासद काय, त्यांच्या हातून लोकहिताकडे दुर्लक्ष होण्यांत जी चूक झाली, ती चूक प्रामा-णिकपणानें झाली असेल, तरच क्षम्य ठरते. कारण, (Opportunity to commit mistakes is the only way to learn and be wise.) 'चुका करण्याची संधि मिळणें हाच शहाणें होण्याचा राजमार्ग आहे.'

# खातेनिहायच्या सुधारणा

## शिक्षण

प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि ।
स पिता, पितरस्तासां केवलं जन्महेतवः ॥ रघुवंश १.२४

( प्रजेला शिक्षण देणें, तिच्या अन्नवस्त्राची सोय करणें व आपत्तीपासून तिचें रक्षण करणें, हें मावाप राज्यकर्त्यांचें कर्तव्य आहे. )

घांटावरील चार तालुक्यांतल्याप्रमाणें सुधागड तालुक्यांतही प्राथमिक शिक्षण सन १९२२ इ. पासून मोफत केल्याचें मागें सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें ज्या एका गांवीं अथवा नजीक असलेल्या अनेक लहान खेडयांच्या मध्यवर्ती ठिकाणीं किमान वीस विद्यार्थी जमूं शकण्याची हमी दिली जाईल, त्या ठिकाणीं प्राथमिक शाळा देण्याचें व लायक ( खासगी ) शाळांना ग्रँट्स देण्याचें धोरण जाहीर करण्यांत आलें.

मराठी सातव्या इयत्तेपर्यंतच्या शिक्षणाची सोय फक्त शिरवळ व पाली या दोनच ठिकाणीं असे. संस्थानचें दप्तर व हिशेबही मराठींत व जुन्या नमुन्याप्रमाणें असल्यानें, त्या माहितीचा नोकरवर्ग तयार होण्याची सोय राजधानीच्या गांवीं असावी, म्हणून सन १९३४ इ. पासून भोर येथें मराठी ७ सात इयत्तांपर्यंतचें शिक्षण मिळण्याची तजवीज करण्यांत आली.

भोर हायस्कूलची इमारत विद्यार्थ्यांच्या संख्येस अपुरी झाल्यानें, गांवाबाहेर स्वतंत्र इमारत आधुनिक पद्धतीच्या सोयींनीं व फर्निचर, शास्त्रीय उपकरणें वगैरे सामग्रीनें युक्त अशी सुमारें १ लक्ष रुपये खर्चून सन १९३७ इ. सालीं बांधण्यांत आली. या रकमेपैकीं रु. २०,००० वीस हजार श्रीमंत राजेसाहेबांनीं **आपल्या खासगींतून** दिले. हायस्कूलच्या विद्यार्थ्यांस उत्तेजन यावें, म्हणून मासिक स्कॉलरशिप्स् सन १९३३ पासून सुरू करण्यांत आल्या.

अन्नदानं महत्पुण्यं विद्यादानं ततः परम् ।
अन्नेन क्षणिका तृप्तिर्यावज्जीवं च विद्यया ॥
शुद्धा हि विद्या ननु कामधेनुः । विद्यया धनमाप्नोति ।

( विद्यादानानें शिष्य हा यावज्जीव स्वतः धन व धनापासून अन्न मिळवूं शकतो; म्हणून, अन्नछत्रें सुरू करण्यापेक्षां शाळा स्थापन करणें, विद्यार्जनाच्या सोयी करणें, हेंच जास्त श्रेयस्कर आहे. )

हायस्कूलच्या वरचें आर्ट्स कॉलेजांतील शिक्षण संस्थानच्या गरीब व होतकरू विद्यार्थ्यांस घेतां येण्याची कांहीं तरी सोय व्हावी, म्हणून श्रीमंत राजेसाहेबांनीं डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणें, या सस्थेच्या विलिंग्डन् कॉलेज, सांगली, या संस्थेस सन १९२४ सालीं रु. १०,००० दहा हजार व फर्ग्युसन कॉलेजच्या होस्टेलप्रीत्यर्थ रु. १००० एक हजारची मदत देऊन, सदर सोसायटीच्या कॉलेजमध्यें संस्थानच्या विद्यार्थ्यांकरितां चार फ्रीशिप्स राखून ठेवण्याची मान्यता मिळविली.

त्याचप्रमाणें आर्ट्स ( वाङ्मयीन ) कॉलेज शिक्षणाव्यतिरिक्त म्हणजे शेतकी, स्थापत्य ( एंजिनिअरिंग ), वैद्यक, कायदा, व्यापार, भौतिक शास्त्रें, उद्योगधंदा, इत्यादींचें शिक्षण देणाऱ्या शाळा व कॉलेजें यांतील शिक्षण संस्थानच्या गरीब व होतकरू विद्यार्थ्यांना घेतां यावें, म्हणून सन १९२८ इ. पासून श्री. राजेसाहेबांनीं आपण होऊन रु. ३०,५०० तीस हजार पांचशेंच्या फेस व्हॅल्यूच्या प्रामिसरी नोटा बाजूस काढून, त्यांच्या व्याजाचा उपयोग आपल्या मातोश्री, द्वितीय पत्नी, प्रथम पत्नीची मयत कन्या व द्वितीय पत्नीचा मयत पुत्र यांच्या नांवें, अनुक्रमें रु. २५, रु. २०, रु. १५ व रु. १५ अशा रकमांच्या चार स्कॉलरशिप्स देण्याच्या कामीं व्हावा अशी योजना केली. यांपैकीं रु. १५ ची एक शिष्यवृत्ति सन १९३८ इ. पासून हरिजनांपैकीं संस्थानचा लायक विद्यार्थी असल्यास, त्यास देण्यांत यावी असें ठरविलें.

मिरज ( सीनियर ) संस्थानाधिपति कै. श्रीमंत सर बाळासाहेब पटवर्धन यांनीं भोरास सन १९३७ इ. सालीं भेट दिली. त्याचें स्मारक म्हणून, त्यांनीं रु. २००० दोन हजार व रु. ६०० सहाशें श्रीमंतांकडे पाठविले. त्यांपैकीं रु. २००० च्या व्याजांतून श्रीशंकराजी नारायण यांच्या नांवें, दात्याच्या इच्छेप्रमाणें, मासिक स्कॉलरशिप हायस्कुलांत ठेवण्यांत आली आहे; व रु. ६०० च्या

व्याजांतून हायस्कुलांत एक बक्षिस कै. श्रीमंत सर बाळासाहेब यांच्या नांवें श्रीमंतांनीं ठेवण्याची तजवीज केली आहे.

पाली येथील शाळेची इमारतही मुलांच्या संख्येच्या मानानें अपुरी असल्याचें दिसून आल्यानें, तेथील जुन्या शाळेनजीकच नवीन इमारत स. १९२८-२९ इ. सालीं बांधून, त्या शाळेची जागेची उणीव दूर करण्यांत आली. त्याचप्रमाणें भोर मराठी शाळेंतील वाढत्या विद्यार्थ्यांची जागेच्या दृष्टीनें सोय व्हावी, म्हणून हायस्कूलाजवळच वेगळी इमारत श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपल्या मातोश्रींच्या नांवें सन १९४१ इ. सालीं बांधली.

## वाचनालयें

वाचनालयें हीं आधुनिक काळांतील शिक्षणाचींच साधनें समजलीं जात असल्यानें, श्रीमंतांनीं रु. २५,००० पंचवीस हजारांची विशेष मदत देऊन, भोर येथें आपल्या प्रथम पत्नीचें स्मारक म्हणून वाचनालयाची स्वतंत्र इमारत सन १९२८ इ. सालीं बांधली, व वाचनालयास वार्षिक ग्रँट रु. १०० देण्याचें ठरविलें. त्याचप्रमाणें पाली व शिरवळ येथील वाचनालयांना, ग्रँट्स व तत्संबंधीं नियम करून, दरसाल ग्रँट देण्याची सोय केली.

## बालवीर संस्था

'बालवीर' चळवळ हें एक करमणुकीच्या खेळांच्या द्वारें शिक्षणाचेंच साधन ( Learning through recreation ) असल्याचें सर्वमान्य झालें आहे. यास्तव, श्रीमंत राजेसाहेब हे पूना बॉय स्काउट संस्थेचे सन १९२३ इ. सालीं अध्यक्ष झाले; व सन १९२४ इ. सालीं भोर हायस्कूलमध्यें त्यांनीं स्काउट शिक्षकाची नेमणूक केली. सन १९२६ इ. सालीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं दिलेल्या रु. ७,५०० साडेसात हजार मदतीच्या रकमेंतून पूना बॉय स्काउट–ऊर्फ हिंदुस्थान स्काउट–असोसिएशननें आपल्या स्काउट संस्थेची इमारत सन १९२७ सालीं बांधून श्रीमंतांच्या मदतीचें द्योतक, म्हणून तिचें 'पंतसचिव बालवीर मंदिर' असें नामाभिधान सन १९२८ इ. पासून

केलें आहे. त्या ठिकाणींही संस्थानच्या विद्यार्थ्यांना स्काउटिंगचें शिक्षण घेण्याची सोय करण्यांत आली.

## श्री शंकराजी नारायण पारितोषिक

ग्रंथनिष्पत्ति हें ज्ञान मिळविण्याचें मुख्य साधन असल्यानें, मराठी भाषेंत अनेकविध विषयांवर चांगले ग्रंथ निष्पन्न व्हावेत, म्हणून श्रीमंतांनीं आपल्या सचिव घराण्याच्या मूळ पुरुषाच्या नांवें दरसाल रु. ३०० तीनशेंचें पारितोषिक ( सर्व अथवा विभागून ) ग्रंथकर्त्यांना देण्याची योजना सन १९३४ इ. पासून केली.

## वैद्यकीय मदत

माजी हिज हायनेसच्या कारकीर्दींत सन १९१४ इ. पावेतों फक्त भोरास सरकारी दवाखाना होता. श्रीमंत राजेसाहेब युवराज असतांना ते शिरवळ तालुक्याचें काम पहात होते त्या वेळीं वरील सालीं त्यांच्या शिफारसीवरून शिरवळास सरकारी दवाखाना सन १९१५ इ. सालीं उघडण्यांत आला.

भैषज्य यज्ञा वा एते ।
धर्मार्थकाममोक्षाणामारोग्यं कारणं यतः ।
अतस्त्वारोग्यदानेन नरो भवति सर्वदः ॥

( औषधिदान म्हणजे दवाखाने, रुग्णालयें हे एक प्रकारचे यज्ञच आहेत. चतुर्विध पुरुषार्थाचें साधन शरीरारोग्य हें असल्यानें, आरोग्याची सोय करणाऱ्यानें सर्व कांहीं दिलें, असेंच होतें. )

श्रीमंत गादीवर आल्यावर, संस्थानांत वैद्यकीय मदतीचा प्रसार व्हावा या सद्हेतूनें, त्याच सालीं ( १९२२ इ. ) त्यांनीं पाली येथें सरकारी दवाखाना सुरू केला. त्यानंतर वेल्हें (स. १९२९), नसरापूर (स. १९३१) व कोळवण (स. १९३४) या तालुक्यांच्या मुख्य गांवीं दवाखाने क्रमाक्रमानें स्थापून, रयतेला शक्य तेवढी नजीक वैद्यकीय मदत मिळण्याची सोय विस्तृत करण्यांत आली.

पुणें येथील ' शेट ताराचंद रामनाथ आयुर्वेदिक दवाखाना व रुग्णालय ' या संस्थेस रु. १२००० बारा हजारांची देणगी सन १९३२ इ. सालीं देऊन, संस्थानांतील रोग्यांच्या ( Indoor patients ) उपयोगाकरितां सदर रुग्णालयांत, एका भागास हर हायनेस जिजीसाहेब ( श्रीमंतांच्या मातोश्री ) वॉर्ड असें नांव देऊन, दोन बेड्स ( जागा ) कायमच्या राखून ठेवल्या जातील व संस्थेच्या दवाखान्यांत संस्थानच्या इतर रोग्यांना ( Outdoor patients ) आल्यास मोफत औषधपाणी मिळेल अशी सोय करून घेतली.

आरोग्यशालां कुर्वीत महौषधिपरिच्छदाम् ।
विदग्धवैद्यसंयुक्तां घृतान्नमधुसंयुताम् ॥

( हॉस्पिटलमध्यें उत्तम औषधादींची व अन्न, घृत वगैरे पौष्टिक व सात्त्विक अन्नादींची समृद्धि पाहिजे व निष्णात वैद्य असावा. )

त्यानंतर सन १९३६ इ. सालीं भोर दवाखान्याचें रूपांतर, 'किंग जॉर्ज दी फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल' या नांवें रुग्णालयांत ( Hospital ) करण्यांत आलें; व राजधानीच्या गांवींही लहान प्रमाणावर Indoor patients ची सोय करण्यांत आली. नेहमींची दवाखान्याची सोय चालू होतीच व आहेही. तथापि, सदर रुग्णालयाच्या चालचलाऊ खर्चाच्या निभावणीकरितां श्रीमंतांनीं रु. २०,००० वीस हजारांची रक्कम कायम फंड म्हणून वेगळी काढून ठेविली. या रकमेंतच श्रीमंतांनीं **आपल्या खासगींतून** दिलेली रु. १०,००० दहा हजारांची रक्कम आहे. या फंडांत पुढें किंग जॉर्ज दि फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली फंडास स्टेटकडून पाठविलेल्या रकमेपैकीं सन १९३५-३६ सालीं परत आलेली रु. ५,६०० पांच हजार सहाशेंची रक्कम सामील करण्यांत आली. तसेंच, बादशहांच्या अँटी-ट्युबरक्युलोसिस फंडास स्टेटमधून पाठविलेल्या रु. ३००० मदतीपैकीं परत आलेली रक्कमही त्यांतच जमा केली.

भोरास वेडे लोक ठेवण्याची सोय मुळींच नव्हती. ती अल्प प्रमाणावर स्थानिक परिस्थितीप्रमाणें Lunatic Asylum स्थापून सन १९३३ इ. पासून करण्यांत आली.

तसेंच, प्रेताची तपासणी ( Post-Mortem Examination ) करण्याची स्वतंत्र जागा नसल्यानें, त्याकरितां नव्या पद्धतीची स्वतंत्र खोली सन १९३५ सालीं बांधून ती उणीव व अडचण दूर करण्यांत आली.

सातारा येथील आर्यांग्ल वैद्यक शाळेला मदतीदाखल श्रीमंतांनीं रु. १०५० दहाशें पन्नास देऊन सन १९२८ इ. पासून सदर शाळेंत संस्थानच्या एका विद्यार्थ्यास वैद्यकीचें शिक्षण मोफत मिळण्याची सोय केली. भोरचे ख्यातनाम वैद्य के. श्रीधरशास्त्री गोखले यांनीं श्रीमंतांजवळ आयुर्वेदाच्या उत्तेजनार्थ रु. २००० दोन हजार दिले होते. त्या रकमेच्या व्याजांतून दरमहा रु. ८ आठची शिष्यवृत्ती शास्त्रीबोवांच्या नांवें ठेवून, तिचा उपयोग सदर शाळेंत शिकणाऱ्या संस्थानच्या विद्यार्थ्यास व्हावा अशी तजवीज करण्यांत आली.

## सार्वजनिक बांधकाम खातें

अनृक्षराश्च सुकृताः पन्थानः सन्त्वरेणवः ।
सेतुमन्तस्तरुच्छायाः निर्बाधा ऋजवस्तथा ॥
स्थाने स्थाने तथान्नोदगृहाणि सुखयातवे ।

( राजरस्ते सरळ, सपाट, टणक, नदीनाल्यांवर पूल बांधलेले, ठिकठिकाणीं छायावृक्ष व पथिकाश्रम असलेले असे असतील, तर प्रवास सुखावह होतो. )

सार्वजनिक बांधकाम खातें ( P. W. D. ) : या खात्यामार्फत होणाऱ्या सडका, पूल वगैरेंचें महत्त्व श्रीमंतांना पहिल्यापासून पटलें होतें. प्रवासाची सोय व व्यापार व उद्योगधंद्याची वाढ, या दृष्टीनें सर्व वर्षभर चालू असणाऱ्या रस्त्यांना राष्ट्ररूपी शरीरांतील सर्वत्र रक्ताभिसरण करणाऱ्या शिरा ( Arteries ) अथवा धमन्या असेंच म्हटलें जातें. युवराज असतांना श्रीमंत शिरवळ तालुक्याचें काम पाहत होते. त्या वेळींच त्यांनीं भोरजवळ नीरेवर पूल असण्याची आवश्यकता आपल्या वडिलांच्या निदर्शनास आणिली होती. श्रीमंत गादीवर आले, त्या वेळीं महाड-पंढरपूर रस्त्याच्या,

संस्थानच्या ताब्यांत असलेल्या भागापैकीं, वरंधा घाटांतील सुमारें पांच मैल रस्ता अगदींच नादुरुस्त झाल्याचें समजून आल्यानें, रु. २०,००० वीस हजार खर्च करून सन १९२४ इ. सालीं तो दुरुस्त करण्यांत आला. तसेंच, त्याच सालीं सुधागड तालुक्यांतील पेहेडली पूल, अंबा नदीस आलेल्या महापुरानें नादुरुस्त झालेला, रु. ९००० नऊ हजार खर्च करून दुरुस्त केला. वेल्हें गांवाजवळील कानदी नदीवर छोटा पूल ( Foot Bridge ) व राजगड तालुक्यांतील अंबवणें येथील ओढयावर कॉजवे, या दोन नवीन कामाप्रीत्यर्थ सन १९३१ सालीं रु. ७००० सात हजार खर्च केला. भोरजवळील नीरा नदीवर पूल सुमारें दीड लक्ष रुपये खर्चून सन १९३३ इ. सालीं बांधण्यांत आला. त्यानंतर पवन-मावळ तालुक्यांत चालें गांवाजवळील वळकी नदीवर सन १९३५ सालीं रु. ४५०० चार हजार पांचशें रुपये खर्चून एक लहान ( Foot Bridge ) पूल बांधला. सन १९३६ इ. सालीं अंबवडें गांवाजवळील धूळ ( धवल ) गंगा ओढयावर झुलता पूल रु. ९००० नऊ हजार खर्चून बांधला. त्यायोगें पर्जन्य-काळांतही श्री शंकराजी नारायण यांची समाधि व श्री नागनाथ यांच्या दर्शनास जाण्याची मोठीच सोय झाली. शिवाय, या पुलामुळें त्या खोऱ्यांतील लोकांची जा-ये करण्याची सोय झाली. सन १९४० इ. सालीं नसरापूर गांवानजीक शिवगंगा नदीवर रु. ३२,३०० खर्च करून पूल बांधल्यानें, राजगड व प्रचंडगड या तालुक्यांत अखंड दळणवळणाची अत्यावश्य असलेली सोय झाली. सन १९४२ इ. सालीं भोर गांवाजवळच मांगिरा ओढयावर पूल बांधण्याप्रीत्यर्थ रु. १२,००० खर्च केले.

पालीजवळील अंबा नदीचा पश्चिम कांठ तें नागोठणेंनजीकचें वाकण हें ठिकाण, या दरम्यानचा सुमारें पांच मैलांचा रस्ता कुलाबा जिल्हा लोकल-बोर्डानें अर्धवट तयार केला होता. युद्धजन्य महागाईमुळें युद्धपूर्व मंजूर झालेल्या खर्चाच्या रकमेंत झालेल्या वाढाव्यामुळें सदर रस्त्याचें काम तहकूब केलें गेलें होतें. या रस्त्यानें सुधागड-पालीचें मुंबईशीं व पेण, रोहें वगैरे कुलाबा जिल्ह्यांतील तालु-क्यांशीं होणारें दळणवळण नजीक व सोयीचें असल्यानें, श्रीमंतांनीं पाली-नागोठणें रोड-कमिटीमार्फत, सदर बोर्डास त्या रस्त्याचें काम लवकर हातीं घेऊन पुरें

करतां यावें, म्हणून रु. २५,००० पंचवीस हजारांची रक्कम बिनव्याजी सन १९२५ सालीं उसनवार दिली; व याप्रमाणें आपल्या सुधागडवासी जनतेची गैरसोय कायमची दूर केली.

सुधागड तालुक्यांत जांभुळपाडा गांवानजीक तांबट ओहोळावर रु. ३५,००० पसतीस हजार खर्चून पूल बांधण्याचें काम चालू आहे. तसेंच, पाली-सिद्धेश्वर रस्ता नवा तयार करण्याचें कामही सुरू झालें असून, पुढें पेहडली तें आतोण्यापर्यंत व्हावयाच्या सडकेस, हा रस्ता नाडसूरपर्यंत नेऊन जोडावयाची योजना आहे.

## मुठें खिंड रस्ता

पुणें, सॅपर्स व मायनर्सना डोंगरी वाटा तयार करण्याचें शिक्षण द्यावयाचें असल्यानें, भोरपैकीं पवनमावळ तालुक्यांतील उरवडें गांवाजवळील टेकड्यांची पहाणी करण्यास मिलिटरी एंजिनिअरिंगचे अधिकारी सन १९३१ सालीं आले असतां, त्या वेळचे पवनमावळचे मामलेदार यांनीं त्यांना संस्थान हद्दींतील मुठें खिंडीची टेकडी दाखवून, त्या ठिकाणीं वाट करण्यासंबंधीं सुचविलें. मिलिटरी एंजिनिअर यांना ती गोष्ट पसंत पडली व त्यांनीं, सदर तालुक्याच्या मामलेदारा-मार्फत, श्रीमंतांकडे खिंडीपर्यंत वाट करण्याची परवानगी मागितली. सदर टेकडीवर खिंडीपर्यंत रस्ता तयार करण्याचा झाल्यास, मुठें खोरें व पौड खोरें, या दोन खोऱ्यांतील दळणवळण सुकर होऊन, सदर खोऱ्यांत राहणाऱ्या आपल्या रयतेची मोठीच सोय होणार आहे हें लक्षांत घेऊन, श्रीमंत राजेसाहेबांनीं लगेच परवानगी दिली. त्याप्रमाणें सन १९३२ इ. सालीं कामास सुरुवात करून सॅपर्स-मायनर्स यांनीं सन १९३४ इ. अखेर टेकडीच्या पायथ्यापासून खिंडी-पर्यंत मोटार जाण्यासारखी वाट तयार केली. टेकडीच्या उत्तरेकडील वाट चढाची, लांबणीची व बिकट होती. ती तयार झाल्यावर, पुढें दक्षिणेकडील वाट सन १९४४-४५ सालीं स्टेटनें केली. या रीतीनें हें महत्त्वाचें काम शेवटास गेलें.

## शेती, उद्योगधंदे, व्यापार, वगैरेंच्या वाढीस व स्थापनेस उत्तेजन

शेती व उद्योगधंदे ( Industries ), व त्यांच्या अनुषंगानें व्यापार,

यांच्या वाढीच्या व प्रस्थापनेच्या दृष्टीनें संस्थानच्या प्रदेशाची विशिष्ट परिस्थिति आहे, व ती तिनकीशीच नव्हे, तर बऱ्याच प्रमाणांत त्यास अनुकूल नाहीं. एक तर, संस्थानचा कोणताच मुलुख रेल्वेनें जोडलेल्या प्रदेशांशीं नजीक असा संलग्न नाहीं. सह्याद्रिपर्वताच्या मुख्य रांगेच्या पश्चिमेस अगदीं पायथ्याशीं, म्हणजे समुद्रापासून दूर, व पूर्वेस उतरणीवर, म्हणजे घाट माथ्यावर, दऱ्याखोऱ्यांनीं व्याप्त असाच बहुतेक मुलुख आहे. त्यांतील जमीनही बहुतेक तांबुस रंगाची व माळरान स्वरूपाची असल्यानें, भात, नाचणी, वरी, सावा, इत्यादि डोंगरी पिकांव्यतिरिक्त गहूं, हरभरा, ज्वारी वगैरे देशी धान्यें, अथवा जवस, तीळ, भुईमूग वगैरे गळिताचीं बियाणें किंवा कापूस, ऊंस, मिरची, हळद, तंबाखू इत्यादि पैक्याचीं पिकें तींत काढतां येणारीं नाहींत. पर्जन्यमानही या दुसऱ्या प्रकारच्या पिकांस पोषक नाहीं. यामुळें, या बाबतींतले प्रयत्न मोठया प्रमाणावर करणें व त्यांचें फळ डोळ्यांत भरेल असें दिसणें अशक्य आहे. तथापि, श्रीमंत राजेसाहेबांनीं हा प्रश्न मनांतून दूर केला होता, असें मात्र बिलकूल नव्हतें. संस्थानांत हिरड्यांची निपज बरीच होते. तो माल परदेशांत तसाच पाठविण्यापेक्षां त्यापासून येथेंच, कांतडीं कमावण्यास जरूर असलेलें, टॅनिक अगर टॅनिन ॲसिड काढलें, तर तें जास्त किफायतीचें होईल, असें बरेच लोक बोलत. त्या दृष्टीनें माहिती घेण्यास मधून मधून कांहीं भांडवलवाले लोक येतही, व दरबारकडून त्यांना पाहिजे ती माहिती देण्यांत येऊन धंद्यासंबंधीं सवलतींचाही खुलासा करण्यांत येई. परंतु, माहिती घेण्यापलीकडे कोणाचीही मजल जात नसे, असाच अनुभव येत असे. संस्थानच्या पूर्व दिशेच्या घाटावरील मुलुखांत घायपात ( केकताड ) लावला, तर त्यापासून कृत्रिम रेशीम तयार करण्याचा मोठा फायदेशीर धंदा उभारतां येईल. सुधागडांत सावर वगैरे झाडांपासून काडयाच्या पेटया व काडया तयार करण्याचाही धंदा निघूं शकेल. भाटघरच्या खालीं नीरेच्या दक्षिणेस संस्थानहद्दींत ऊंसाची लागण करून लहानसा साखरेचा कारखाना सुरू केल्यास, तोही फायद्याचा होईल, वगैरे वगैरे अनेक लोक म्हणत; पण, स्वतः पुढाकार घेऊन खटपट करणारें कोणीच नसे. हल्लींच्या स्पर्धेच्या काळांत धंदा मोठया प्रमाणावर उभारला, तरच तो किफायतीचा व टिकाऊ होऊं शकतो. अशा धंद्यास भांडवली खर्च तर मोठाच लागतो. तो झेंपण्याइतपत

संस्थानची आर्थिक स्थिति संपन्न व मजबूत नव्हती; निदान, उद्योगधंद्यांतील प्रथमारंभींचे संभवनीय नुकसानीचे धक्के सोसण्याचा धोका पतकरण्याइतकी बळकट अशी खास नव्हती. शिवाय, धंद्यास लागणाऱ्या शिक्षित व अनुभवी तज्ज्ञांची व नैसर्गिक अनुकूलतेचीही वाण असल्यानें, दरबारला आपण होऊन या बाबतींत हालचाल करणें शक्य नव्हतें. जी स्थिति उद्योगधंद्याबाबतची, तीच शेतीसंबंधाची होती. पाण्याचा मुबलक पुरवठा, ट्रॅक्टरसारख्या यंत्रानें नांगरण, आधुनिक खनिज खतें उपयोगांत आणणें, वगैरेंची योजना केली, तरच शेतींत मोठा फायदा राहून अलीकडील जागतिक स्पर्धेंत तिचा टिकाव होईल; पण, असें होण्यास पाट-बंधाऱ्याची सोय, सपाट व काळ्या जमिनीचें विस्तीर्ण क्षेत्र, वगैरेंची अनुकूलता असावी लागते व संस्थानांत त्याचीच तर मुख्य उणीव. तथापि, असें असलें तरी शेती व उद्योगधंदे यांच्या वाढीच्या व स्थापनेच्या दृष्टीनें, विशेषतः ग्रामोद्धाराच्या तात्त्विक पद्धतीनें, करतां येण्यासारख्या गोष्टी श्रीमंत प्रथमपासून करीतच होते.

## शेती व शेतकरी यांविषयीं सहानुभूति

अन्नं बहु कुर्वीत । कृषन्नित्फाल आशितं करोति । श्रु०
वृक्षादीनामारोपण-प्रसव-पालनादिक्रिया कृषिः । भृगु.
न च धान्यसमो ह्यर्थः ।

( कृषि ऊर्फ शेतीपासून धान्य मिळतें. धान्य हेंच सर्वश्रेष्ठ धन आहे. यास्तव, शेतीकडे जास्त लक्ष देऊन धान्याची निपज वाढवावी. )

श्रीमंतांनीं आपल्या राज्यारोहणसमयींच घरवण वगैरे कर माफ करणें, जांभळाच्या झाडांवरील स्टेटची मालकी सोडणें, फॉरेस्टांतील कांहीं जमीन सोडून गांवास देणें, इत्यादि गोष्टी केल्याचें मागें आलेंच आहे. या सर्वांचा संबंध विशेषतः शेतकऱ्यांच्याच जीवनाशीं होता. श्रीमंत गादीवर आले, त्या वेळीं लँड रेव्हेन्यू सेटलमेन्ट ( तरम आकारणी ) झाल्यास तीस वर्षांच्या वर काल होऊन गेला होता; व रिव्हिजन करावी अशा-विषयीं मेहेरबान अँडरसनसाहेब, कलेक्टर, यांचाही आग्रह होता; तथापि, शेती हेंच शेतकऱ्यांच्या जीवनाचें मुख्य साधन, बहुतेक प्रजानन शेतकरीच व

शेतीचें उत्पन्नही सामान्यतः जेमतेम निर्वाहापुरतें, ह्या तीन गोष्टी लक्षांत घेऊन, श्रीमंतांनीं रिव्हिजन करून आकार वाढविण्याचें मनांत आणिलें नाहीं. अवर्षणाच्या दिवसांत कायद्याच्या अगदीं काटेकोर दृष्टीनें सूट अगर तहकुबी देण्यास कारण न दिसलें, तरी सन १९२९।३० इ. सालीं रु. ८००० आठ हजारांची शिरवळ भागास तहकुबी व सन १९३१।३२ इ. सालीं सर्व संस्थानांत रु. ४०,००० चाळीस हजारांची सूट देण्यांत आली. विशेषतः, तहकुबीपेक्षां सूट देण्याचेंच जास्त धोरण असे. राज्यारोहण (१९२२ इ.) व राज्यारोहणाचा रौप्यमहोत्सव (सन १९४७ इ.) यांसारख्या आनंदाच्या प्रसंगीं सारासूट अनुक्रमें रु. ३५,००० व ४०,००० ची दिली, व त्याचा फायदा गरीब शेतकऱ्यांस जास्त मिळेल अशीच योजना केली. आधुनिक पद्धतीच्या शेतीचें व डेअरी, पोल्ट्री वगैरे घरगुती धंद्यांचें ज्ञान शेतकऱ्यांना व्हावें, म्हणून शेतकऱ्यांपैकींच दोघांना स्टेटच्या खर्चानें शिकवून आणलें.

वृषोत्सर्गः सुपुण्याय । हेमाद्रि.

( देवाप्रीत्यर्थ पोळ सोडणें हें पुण्यकृत्य आहे. असा वृष उत्तम जातीचा असावा लागतो. त्याच्या पोषणाचा खर्च कोणाही एकावर न पडतां, सर्वांच्या गायींना त्याचा उपयोग होऊन दुभत्या व शेतीच्या जनावरांची अवलाद सहजीं सुधारावी, ही कल्पना या चालीच्या मुळाशीं आहे. )

शेतीच्या बैलांची व त्याचप्रमाणें दुधाळ गायींची अवलाद सुधारावी, म्हणून एक खिलारी जातीचा उत्तम खोंड रु. २०० किंमतीचा आणून तो शिरवळास गायींच्या उपयोगाकरितां शेतकऱ्यांना देण्यास म्हणून ठेविला होता.

अल्प भाड्यानें देण्याकरितां स्टेटनें कांहीं लोखंडी नांगर विकत घेतले होते, व नवीन तयार केलेलें कोळंबा जातीच्या भाताचें बियाणें—ज्यास वीट रोगाची फारशी इजा पोंचत नाहीं व पिकाचा उताराही ज्याचा जास्त पडतो, असें—ज्या शेतकरी लोकांना पाहिजे, त्यांना आणवून देण्याची तजवीज केली होती. शेतकऱ्यांना शेतीच्या कामीं मदत देतां यावी, म्हणून ( Agriculturist Loans Act, 1884 ) शेतकऱ्यांस

शेतीकरितां कर्ज देण्याचा स. १८८४ इ. चा कायदा हा संस्थानास लागू करून, शिवाय पावसाळ्याच्या पडीच्या दिवसांत अगदीं हलक्या व्याजानें तगाई देण्यास म्हणून सन १९४० इ. पासून रु. १५,००० पंधरा हजाराचा—प्रत्येक तालुक्यास रु. ३००० प्रमाणें—फंड बाजूस काढून ठेवला होता. त्याचप्रमाणें शेती सुधारण्यास उत्तेजन यावें, म्हणून श्रीमंतांनीं आपल्या ६२ व्या वाढदिवसाच्या आनंदसमयीं, **आपल्या खासगींतून** सन १९३९।४० इ. सालीं रु. १००० बाजूस काढून, त्या फंडाच्या व्याजांतून जो शेतकरी अगर जो गांव नमुनेदार शेतकाम करून दाखवील, त्यास बक्षीस देण्याची सोय श्रीमंतांनीं केली होती. सन १९३८ इ. सालीं श्रीमंतांनीं आपल्या वयाच्या षष्ठ्यब्दपूर्ति-समारंभाच्या वेळीं शेतीच्या उपयोगाचे बैल व रेडे यांची चरगण माफ केली; व शेतीच्या पिकाचें रानडुकरांसारख्या जनावरांपासून रक्षण व्हावें, म्हणून लायक शेतकऱ्यांना बंदुकांचे परवाने सढळ रीतीनें देण्याचें ठरविलें. त्याचप्रमाणें, शेतकरी लोकांच्या नित्याच्या खाण्याच्या मासळी या पदार्थाच्या लिलावाची पद्धत बंद करून, त्यांचें जीवन त्या दृष्टीनें सुखावह व स्वस्त केलें.

## ग्रामोद्धार कमिट्या

ग्रामोद्धाराचें कार्य सुकर व्हावें, शेतकरी लोकांत वैयक्तिक व सार्वजनिक स्वच्छतेच्या ज्ञानाचा प्रसार व्हावा, पिण्याच्या पाण्याची ऊर्फ पाठवठ्याची व्यवस्था नीट राहावी व एकंदरींत खेडेगांवाची राहणी सुधारावी, म्हणून सन १९३४ इ. सालीं ऑफिसर लोकांची एक ग्रामोद्धार कमिटी नेमण्यांत आली. सन १९३७ इ. सालीं त्या कमिटींत तालुकानिहायचे बिनसरकारी लोक घेऊन, तिचेंच मिश्र कमिटींत रूपांतर केलें; व पुढें, या मिश्र कमिटीच्या शिफारसींप्रमाणें, सन १९४० इ. सालीं, प्रत्येक तालुक्याकरतां वेगळी मिश्र कमिटी नेमण्यांत येऊन ग्रामोद्धाराच्या कार्यास जोराची चालना दिली.

याशिवाय, वेगळ्या मार्गें शेतीच्या उन्नतीस मदत व्हावी व शेतकऱ्यांस आपल्या मिळकतींत भर घालण्याची सोय व्हावी, म्हणून आणखी एक योजना करण्यांत आली. सन १९२७ इ. सालीं भोरच्या एका उत्साही इसमास अल्प

व्याजानें जरूर तें रु. २०,००० वीस हजाराचें भांडवल कर्जाऊ देऊन डायनामोनें तयार होणारी वीज लोकांना उपलब्ध होईल अशी श्री राजेसाहेबांनीं तजवीज केली. त्यापासून भोर गांवच्या दिवाबत्तीची सोय तर झालीच; पण, मूळची व महत्त्वाची कल्पना अशी होती कीं, लोकांनीं वीजेचा पंपिंगकडे ( पाणी वर खेचणें ) उपयोग करून—विशेषतः नदीकांठची शेती सुधारावी व वाढवावी, बागाईताकडे जास्त लक्ष द्यावें व ज्यास शेती नसेल, त्यानें व शेतकऱ्यानेंही फुरसतीच्या वेळांत छोटे धंदे ( Cottage industries ) सुरू करावेत. अशांना वीज स्वस्त मिळण्याचीही मुद्दाम सोय करारांत नमूद केली होती. पुढें, सन १९३४ इ. सालीं भाटघर येथील पाण्यावर तयार होणारी वीज जास्त स्वस्तांत मिळूं लागल्यावर, शेती सुधारण्याची फार मोठ्या प्रमाणावर सोय झाली.

भाटघरची वीज मिळण्याची सोय झाल्यावर, पुण्याच्या राजेश्री चुणीलाल तुळशीरामशेट यांनीं भोरजवळ ( भाटघरनजीक ) ' राजा रघुनाथराव मिल्स ' नांवाची कापडाची गिरणी श्रीमंतांच्या हस्तें तारीख ११ डिसेंबर १९३७ इ. रोजीं सुरू केली. कांहीं शेतकरी व गरीब लोकांना उपजीविकेचें नवें साधन—मजुरीच्या रूपानें—गिरणीनें प्राप्त झालें. पुढें, या गिरणीस भांडवल कमी पडूं लागलें, म्हणून हलक्या व्याजानें रु. ६००० सहा हजार श्रीमंत राजेसाहेबांनीं कर्जाऊ देऊन ती तरती केली; नंतर, तीच गिरणी पुण्याच्या महाराष्ट्र टेक्स्टाइल लि. कंपनीनें विकत घेऊन पूर्वीच्याच नांवानें ती चालू केली आहे.

## शेतकी-कमिटी

भोरप्रमाणें भाटघरच्या विजेचा फायदा शिरवळास मिळावा व तेथील आणि आसपासच्या गांवांच्या लोकांना शेती व उद्योगधंद्यांबाबत पुढचें पाऊल टाकतां यावें, म्हणून, भोरच्याच वीज-कॉन्ट्रॅक्टरला आणखी जरूर ती रक्कम अल्प व्याजानें कर्जाऊ देऊन, भाटघरची वीज शिरवळासही स्वस्त दरानें मिळेल, अशी सन १९४० इ. च्या ऑगस्टपासून श्रीमंत राजेसाहेबांनीं व्यवस्था केली.

याप्रमाणें शेती व शेतकरी यांच्या उन्नतीबद्दल प्रयत्न विविध प्रकारें चालू होते; तरीही, शेती सुधारण्याबाबत तज्ज्ञांचें मत आपल्यासमोर असावें, म्हणून

श्रीमंतांनीं सन १९४२ इ. च्या जानेवारींत शेतकी-कमिटी नेमली. त्या कमिटीनें आपल्याकडे सोपविलेल्या प्रश्नानुसार सर्व संस्थानची शेतीविषयक पाहाणी करून, प्रश्नपत्रिकेनुसार लोकांचीं मतें मागवून व समक्ष माहिती घेऊन, संस्थानच्या असलेल्या स्थितींत संस्थानला व व्यक्तिशः शेतकऱ्याला शेतीच्या उन्नतीस व शेतकऱ्याची स्थिति सुधारण्यास काय करतां येईल, यासंबंधीं आपल्या शिफारसींचा अहवाल सन १९४३ इ. सालीं श्रीमंतांकडे सादर केला. तो अहवाल जंगल-कमिटी पूर्वी ( स. १९३९ इ. ) नेमली होती, तिजकडे अभिप्रायाकरितां श्रीमंतांनीं पाठवून दिला. जंगल-कमिटीनेंही आपला रिपोर्ट सन १९४६ मध्यें, शेतकी-कमिटीच्या शिफारसींचा विचार करून, श्रीमंत राजेसाहेबांकडे केला. त्याचाही बहुतेक संबंध शेतकऱ्यांच्या सुखसोयींशीं असल्यानें, त्यास श्रीमंतांनीं ता. ३ आक्टोबर १९४६ रोजीं मान्यता दिली; व ता. १८ ऑगस्ट १९४७ इ. रोजीं आपल्या कारकीर्दीच्या रौप्य-महोत्सवसमयीं, ग्रेझिंग फी कमी करून, ‘ धनगरी महाल ’ नांवाचा करही रद्द केला; तसेंच, नांगरखुंट वगैरेवर जी फी शेतकऱ्यांपासून घेतली जात असें, तीही माफ केली. शिवाय, सुधागडांतही, घाटावरील चार तालुक्यांतीलप्रमाणें, हिरडयाबाबत रॉयल्टीची पद्धत सुरू करण्याचें जाहीर करून, शेतकरी लोकांच्या बहुतेक तक्रारी दूर केल्या.

## ग्रामोद्धार कार्यास मदत

संस्थाननें प्रत्यक्षतः शेती व शेतकऱ्यांच्या हिताकरितां काय केलें, तें वरती दिलें आहे. अन्य रीतीनेंही या प्रश्नाचा परामर्ष घेण्याचें श्रीमंतांचें धोरण होतें व तें याबरोबरच चालू ठेविलें होतें. ग्रामोद्धाराचें कार्य जितकें स्वयंस्फूर्त, स्वावलंबनाच्या तत्त्वावर व सहकारीपणानें होईल, तितकें तें टिकाऊ असतें, असें श्रीमंतांचें मत असल्यानें, या तत्त्वावर संस्थानांत जीं गांवें अथवा ज्या संस्था काम करतील, त्यांच्या कामाचें गुणग्रहण करून व त्यांना यथाशक्ति मदत करून प्रोत्साहन देण्याचा क्रम श्रीमंतांनीं ठेवला होता. भाटघरजवळील सांगवी गांवच्या लोकांनीं आपली शेती सुधारण्याच्या दृष्टीनें भाटघर धरणांतील पाणी ( Waste weir ) कॅनाल बांधून आपल्या गांवास नेण्याचें ठरविल्यावर, त्यांच्या विनंती-

प्रमाणें, त्यांना रु. ५००० अल्प व्याजानें सन १९२९ इ. सालीं देऊन, त्यांना प्रोत्साहन दिलें. उत्रवली गांवच्या लोकांनीं आपल्या गांवापासून महाड-पंढरपूर सडकेपर्यंत रस्ता तयार केला, गांवाजवळ एक ल्हानसा पूल बांधला व पिण्याच्या पाण्याचीही उत्तम व्यवस्था सन १९३४ इ. सालीं केली. याबद्दल त्यांना रु. ४०० मदतीदाखल देऊन श्रीमंतांनीं त्यांचें अभिनंदन केलें. भादें गांवकऱ्यांनीं आपल्या गांवीं शिक्षणाचें केंद्र सन १९३५ इ. सालीं सुरू केलें; त्यासही श्रीमंतांनीं उत्तेजनार्थ रु. २५० अडीचशें दिले. बावडें गांवकऱ्यांनीं आपल्या गांवापासून पुणें-सातारा सडकेला मिळणारी गाडीवाट सन १९३८ सालीं तयार केली; त्याचप्रमाणें आपल्या गांवीं वाचनालय, तालीम वगैरेंची सोय सन १९३९ इ. सालीं केली. म्हणून, त्यांच्या कार्याचें गुणग्रहण श्रीमंतांनीं त्या गांवांस दोन वेळ भेट देऊन व रु. ६०० ची मदत देऊन केलें. खेड-शिवापूर येथें पुणें डेक्कन ॲग्रिकल्चर असोसिएशनचें ग्रामोद्धार केंद्र होतें. त्याचा फायदा संस्थानच्या रयतेस मिळत होता व असोसिएशननें संस्थान-हद्दींत कासुर्डी गांवीं शाळा चालविली होती; म्हणून, श्रीमंतांनीं सदर संस्थेच्या केंद्रास रु. ४०० मदतीदाखल देऊन सन १९४० इ. सालीं भेटही दिली.

सुधागड तालुक्यांतील आपद्ग्रस्तांना यथाशक्ति द्रव्य, औषधपाणी वगैरे देऊन मदत करणारा समाज-सेवासंघ, अस्पृश्यांच्या पिण्याच्या पाण्याचे हाल दूर व्हावे व यांची उन्नति व्हावी म्हणून अनेकविध खटपट करणारा हरिजन सेवक संघ व ठाकूर, कातकरी वगैरे डोंगरी लोकांच्या अडचणी व तक्रारी दूर करून त्यांचें जीवन सुखावह करण्यास झटणारें आदिवासी सेवा-मंडळ, या तीन संस्था उच्च व परोपकाराच्या ध्येयानें प्रेरित होऊन ग्रामोद्धाराचेंच कार्य करीत आहेत. सबब, त्यांना वेळोवेळीं आर्थिक मदत देऊन, तसेंच भेटी देऊन व त्यांच्या कार्याबद्दल पसंती व्यक्त करुन, श्रीमंतांनीं त्यांना प्रोत्साहन दिलें. स. १९४६ इ. सालीं श्रीमंतांनीं आदिवासी सेवामंडळास रु. २०० देऊन, शिवाय आदिवासींच्या उन्नतीच्या कार्याप्रीत्यर्थ बजेटमध्यें रु. ५०० पांचशें वेगळे दिल्याचें मंडळास भेट दिल्यावेळीं सांगितलें.

दशकूपसमा वापी दशवापीसमो ह्रदः ।
दशह्रदसमः पुत्रो दशपुत्रसमो द्रुमः ॥ हेमाद्रि.
वृक्षो रक्षति रक्षितः ।

( वृक्षारोपण दशपुत्रसमान श्रेयस्कर आहे. फळवृक्ष म्हणजे शेतकऱ्याचें पेन्शनच. तें त्यांच्या जीवनाचें कायमचें साधन आहे. )

वृक्षांच्या विपुलतेवर हवा व पर्जन्य अवलंबून असल्यानें, सन १९३६ इ. पासून सुधागडांत दरसाल तारीख १८ जून हा दिवस 'वृक्षारोपण दिन' म्हणून साजरा करण्याची प्रथा सुधागड हरिजन सेवक संघानें चालू केली आहे. ता. १८ जून हाच दिवस पसंत करण्यास तसेंच महत्त्वाचें कारण आहे. अस्पृश्य समाजाबद्दल श्रीमंतांच्या मनांत प्रथमपासूनच सहानुभूति असून हिंदु-समाजांतील अस्पृश्यतेची रूढी, निदान सार्वजनिक अशा कांहीं ठिकाणीं तरी, बंद करावी या उदात्त व प्रगतिपर विचारानें, त्यांनीं आपल्या संस्थानांत शाळा, दवाखाने, कोर्ट-कचेऱ्या वगैरे ठिकाणीं अस्पृश्यता पाळूं नये असा जाहीरनामा स. १९३२ इ. च्या आक्टोबरांत प्रसिद्ध केला. यासंबंधीं ता. २१।१०।३२ इ. च्या 'ज्ञानप्रकाश' पत्रांत खालीलप्रमाणें मजकूर आहे :

"भोर दरबारनें या ( अस्पृश्यता-निवारण ) बाबतींत चांगली आघाडी मारली आहे, ही खरोखरच अत्यंत समाधानाची गोष्ट होय. भोर संस्थानांतील सुधारलेल्या कायदेमंडळाची दुसरी बैठक भोर येथें नुकतीच भरली होती. त्या सुप्रसंगीं प्रास्तविक भाषण करतांना, भोर संस्थानचे सुविद्य, प्रगमनशील आणि लोकहिततत्पर अधिपति श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव यांनीं जाहीर केलें कीं, सुरुवातीची पायरी, म्हणून यापुढें आमच्या राज्यांत सरकारी शाळा, कोर्टें, कचेऱ्या, ( देवळांशीं संबंध नसलेल्या ) चावडया व धर्मशाळा, या ठिकाणीं स्पृश्यास्पृश्य-विचार पाळला जाणार नाहीं."

'समः सर्वप्रजासु स्यात् ।' स्मृ०
( सर्व प्रजेला समान वागव. )

श्रीमंतांनीं जाहीरनामा प्रसिद्ध केला इतकेंच नव्हे, तर श्रीमंतांना 'राजा'

ही पदवी मिळाल्याबद्दल जो अभिनंदनपूर्वक मानपत्र-समर्पणाचा दरबार ता. १८।६।३५ इ. रोजीं झाला, त्या वेळीं सुधागड हरिजन सेवक संघाचें मानपत्र श्रीराममंडपांतील दरबारांत अस्पृश्यांकडून स्वीकारून त्यांना स्वतः समानतेनें वागविलें. श्रीमंतांच्या या उदार धोरणाच्या व कृतीच्या आठवणीस्तव सुधागड हरिजन सेवक संघानें तोच दिवस वृक्षारोपणकार्याचा म्हणून कायम केला.

श्रीमंतांकडून दरसाल उत्तेजनार्थ संदेश पाठवून वृक्षारोपणास आर्थिक मदत करण्यांत येत असे.

याप्रमाणें अनेक प्रकारें श्रीमंत राजेसाहेब यांनीं शेती व शेतकरी यांकडे अत्यंत सहानुभूतीनें पाहून, जें काय थोडें फार त्यांच्या हितार्थ करणें शक्य होतें, तें केल्याचें दिसून येईल.

## उद्योगधंद्यांच्या स्थापनेस प्रोत्साहन

विज्ञान ( सृष्ट वस्तु ज्ञानम् ) मुच्यते शिल्पम् ।
शिल्पानि मानुपाणि । शिल्पकर्म कलादिकम् ।
विविधानि च शिल्पानि समादेयानि यत्नतः ।

( सृष्ट वस्तूचें ज्ञान मिळवून कला-उद्योग आत्मसात् करण्यानें जीवन समृद्ध व उच्च होतें. )

यदृच्छया प्रवृत्तानि भूतानि स्वेन वर्त्मना ।
नियम्यास्मिन्नयति यत्तद्यन्त्रमिति कीर्तितम् ॥

( पंचमहाभूतांच्या सहज प्रवृत्तींना—पंप, चक्र, इत्यादि साधनांनीं—आळा घालून, आपल्या कामास जुंपण्यानें मानवी जीवन सुखावह करतां येतें. )

संस्थानांतील परिस्थिति उद्योगधंद्यांच्या स्थापनेस कशी प्रतिकूल आहे, तें वरतीं थोडक्यांत दिग्दर्शित केलेंच आहे. तथापि, याही बाबतींत जें काय करतां येईल, तेवढें—शेतीच्या संबधांतीलप्रमाणें—करावें, असें श्रीमंत राजे-साहेबांचें धोरण होतें. पण, गादीवर आल्यानंतर पंधरा वर्षें तरी त्यांची इच्छा फलद्रूप होण्याचा सुयोग आला नाहीं. सन १९३७ इ. सालीं संस्थानांत

पहिलीच अशी ' राजा रघुनाथराव मिल ' स्थापन झाल्याची हकीगत यापूर्वी दिलीच आहे. त्यानंतर सन १९४२ इ. सालीं मुंबईच्या डेक्कन मर्चंट्स को-ऑपरेटिव्ह बँकेच्या रौप्यमहोत्सवानिमित्त श्रीमंतांचें मुंबईस जाणें झाल्यावेळीं, बँकेनें तारीख २५ सप्टेंबर रोजीं ताजमहाल हॉटेलमध्यें श्रीमंतांच्या सन्मानार्थ लंच ( दुपारचें भोजन ) दिलें. सदर लंचला मुंबईंतील कांहीं उद्योगपति जमल्याची सुवर्णसंधि साधून, आपल्या संस्थानांत उद्योगधंदे काढण्यास वीज, मजुरी, हवामान वगैरे कसें अनुकूल आहे व धंद्यास संस्थानकडून कोणत्या सवलती देण्यांत येतील, तें आपल्या भाषणांत श्रीमंतांनीं स्पष्ट निवेदन केलें. त्याचा सुपरिणाम होऊन त्यानंतर मुंबईचे कित्येक कारखानदार श्रीमंतांकडे आले; व उद्योगधंदे सुरू करण्यासंबंधीं वाटाघाटी होऊन, खालीलप्रमाणें कारखाने भोरास सुरू झाले. भोर इंडस्ट्रीज लि. व दी भोर ट्रेडिंग कंपनी लिमिटेड, या नांवांचे दोन उद्योगधंदे भोरनजीक सन १९४३ इ. च्या फेब्रुवारीमध्यें सुरू झाले. त्यानंतर तारीख १६ एप्रिल १९४४ इ. रोजीं श्री लक्ष्मी टेक्स्टॉइल मिल या सूत तयार करणाऱ्या गिरणीचा उद्घाटन-समारंभ श्रीमंतांच्या हस्तें झाला. याच सालीं ' परेख पेपर मिल ' नांवाचा ( कार्डबोर्ड ) कागद तयार करण्याचा कारखाना सुरू झाला.

या सर्वच कारखान्यांच्या सोयीकरितां अत्यवश्य असलेल्या भोर स्टेट बँकेचेंही उद्घाटन श्रीमंतांनीं तारीख ९ ऑगस्ट १९४४ रोजीं केलें. त्यानंतर सदर बँकेच्या शाखा पाली व शिरवळ येथें श्रीमंतांच्या हस्तें उघडण्यांत आल्या.

वरील चार व पूर्वींची ' राजा रघुनाथराव गिरणी ' अशा ५ कारखान्यांत मिळून पुष्कळ मजुरांना कामधंदा मिळाला आहे व हल्लींच्या महर्घतेच्या दिवसांत त्यांच्या प्रपंचाच्या खर्चाची चांगली सोय झाली आहे. त्याचप्रमाणें रॉयल्टीच्या रूपानें कांहीं कारखान्यांपासून संस्थानच्या उत्पन्नांतही भर पडूं लागली.

याच प्रकारचे फायदे साखरकारखान्यापासून मिळणारे असल्यानें व शिरवळच्या आसपास उंसाच्या लागणीस क्षेत्रही अनुकूल असल्यानें, तेथें साखरेचा कारखाना निघावा अशी श्रीमंतांची फार इच्छा होती. पण, पाण्याची

बाब परतंत्र असल्यानें, ती इच्छा फलद्रूप होऊं शकली नाहीं. तरी पण, शिरवळच्या आसपास ३००० एकर जमिनींत, वीरचें धरण वाढविल्यानंतर, उंसाची लागण करण्यापुरतें पाणी मिळावें व त्याचा उपयोग संस्थानांत त्या ठिकाणीं साखरेचा कारखाना काढण्यास करावा अशी श्रीमंतांची फार दिवसांची मनीषा असून, त्या दृष्टीनें मुंबई सरकारशीं वाटाघाटी केल्या. त्याप्रमाणें मुंबई सरकारनें पुढें पाणी देण्याचें कबूल केलें. त्यासंबंधीं कराराचा मसुदाही दरबारकडे आला; पण, लोकनियुक्त मंत्र्यांनीं त्यास संमति न दिल्यानें, तो प्रश्न तसाच राहून गेला.

## न्यायखातें

राज्ञश्च प्रकृतीनां च प्रदेष्टा न्यायकर्मणि ।

( न्यायाच्या कामांत राजा व प्रजा या दोघांनाही योग्य मार्गदर्शन करणारा असा न्यायाधीश असावा. )

संस्थानांतील सुराज्यास अवश्य असलेल्या गोष्टी, श्रीमंत राजेसाहेब गादीवर आले, त्या वेळच्या व्हाइसरॉयसाहेबांनीं सांगितल्या; त्यांपैकीं नेमस्त (Fixed) व मर्यादित (Moderate) प्रिव्हि पर्स आणि नोकरवर्गाच्या नोकरीची–पेन्शन, प्रमोशन वगैरे बाबी नियमबद्ध करून–शाश्वती, या दोन गोष्टी राज्यसूत्रें हातीं घेतल्यानंतर १।२ वर्षांतच श्रीमंतांनीं घडवून आणल्याचें निवेदन मागें येऊन गेलेंच आहे. त्याचप्रमाणें म्युनिसिपालिटया वगैरे प्रातिनिधिक म्हणजे स्थानिक स्वराज्य-संस्था सुरू करणें अथवा सुधारणें यांचाही उपक्रम ४-५ वर्षांतच केल्याचेंही दिग्दर्शित केलें आहे. प्रातिनिधिक संस्थांचाच एक प्रकार, म्हणून कायदे मंडळाची स्थापनाही सन १९२८ इ. सालीं, म्हणजे गादीवर आल्यानंतर ६ व्याच वर्षी, करून सर्वसाधारण राज्यकारभारपद्धतीसंबंधीं व खातेनिहायच्या कामकाजाबावत लोकमत कळून येण्याची महत्त्वाची व्यवस्था केली. इतकेंच नव्हे, तर राज्यकारभाराचा बरेवाईटपणा ज्या एका मुख्य व महत्त्वाच्या योजनेवरून पारखला जातो, तिची म्हणजे न्यायदानाच्या स्वातंत्र्याची ( Independent Judiciary ) योजना, तीही सन १९२८ इ. पासूनच अंमलांत आणली. ब्रिटिश हद्दींत चोख न्यायदानाविषयीं ज्यांचा लौकिक आहे,

अशा तिकडील सेवानिवृत्त इसमाची, वर्षांतून कांहीं दिवस, संस्थानच्या हायकोर्ट जजाच्या जागीं नेमणूक करून न्यायदानाच्या निःपक्षपातित्वाची व कार्यक्षमतेची श्रीमंत राजेसाहेबांनीं तजवीज केली. त्याचप्रमाणें मुन्सीफच्या जागांवर पदवीधर म्हणजे LL. B. झालेल्यांची नेमणूक करून डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्जांचीही—डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या न्यायाच्या कामापासून—वेगळी नेमणूक केली. याप्रमाणें खालपासूनच न्यायाचें काम चांगलें व्हावें अशी मांडणी केली. संस्थानांतील मामलेदारांच्या जागांवरही शक्य तों खालसांतील अनुभवी व लायक पेन्शनरांची अथवा संस्थानच्याच वाकबगार इसमांची नेमणूक मुलकी व मॅजिस्ट्रेटी कामाच्या जागीं करण्याचें धोरण ठेवून त्या बाजूचेंही काम सुव्यवस्थित व्हावें अशी तरतूद केली.

रयतेस निःपक्षपाती व उत्तम न्याय मिळावा, म्हणून कोल्हापूर येथें स्थापन झालेल्या समायिक हायकोर्टाच्या योजनेस श्रीमंतांनीं मान्यता दिली होती; पण, पुढें श्रीछत्रपति शहाजीमहाराज, कोल्हापूर, यांनीं आपलें संस्थान त्यांतून काढून घेतल्यानें, ती योजना रद्द झाली.

## पोलीस खातें

बलमार्तभयोपशान्तये । रघुवंश. ८।३१.

क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः
क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः । रघुवंश. २।५३.

रयतेचें वित्त व जीवित सुरक्षित असण्यावर संस्थानच्या राज्यकारभाराचा चांगुलपणा व एकंदरींतची संस्थानची सुस्थिति व भरभराट अवलंबून असते; व वरील सुरक्षितता प्राप्त होण्यास मुख्यतः संस्थानांतील पोलीसवर्ग कार्यक्षम व संतुष्ट असावा लागतो. ही महत्त्वाची गोष्ट लक्षांत घेऊन, त्या खात्याकडे श्रीमंत राजेसाहेबांनीं प्रथमपासूनच लक्ष दिलें होतें. त्या खात्यावरील मुख्य, खालसांतील अनुभवी व हुषार असाच, अधिकारी नेमला जात असे. पोलिसांत शारीरिक दृष्ट्या लायक असलेल्यांचीच भरती करून त्यांनाही कवाईतीचें ( Drill ) व शिस्तीचें ( Discipline ) शिक्षण देऊन ते आपल्या कामांत तरबेज होतील

अशी योजना केली होती. त्याकरतां साताऱ्यास होम इन्स्पेक्टरचें काम करीत असलेल्या व नांवाजलेल्या इसमांस मागून घेऊन श्रीमंतांनीं त्यांची संस्थानच्या पोलीस खात्याचे प्रमुख म्हणून नेमणूक केली होती. त्याचप्रमाणें, पोलिसांना नेमबाजीचें ( Musketry ) शिक्षण देण्यास बंदुकाही नव्या व चांगल्या प्रकारच्या खरेदी केल्या होत्या. शिवाय, बंदुका वगैरे हत्यारें व बंदुका वगैरेंच्या उपयोगाची दारू, काडतुसें वगैरे स्फोटक वस्तू सुरक्षित राहाव्यात म्हणून वेगळी शस्त्रागाराची जागा ( Armoury ) तयार केली. नेहमींच्या जरूरीच्या पोलीसच्या संख्येशिवाय 'हेड-क्वार्टर पोलीस' म्हणून, निकडीच्या ( Emergency ) प्रसंगीं उपयोगास, कांहीं जादा ( Reserve ) पोलीस ठेवले होते. तसेंच, वेळप्रसंगीं जरूर तर पोलिसला मदत करतां यावी अथवा अन्य कामीं पोलीस देतां यावेत, म्हणून स्टेटच्या शिबंदीस व स्वार लोकांनाही पोलीसबरोबरच कवाईतीचें व हत्यारें वापरण्याचें शिक्षण देण्यांत आलें होतें. यामुळें, स्वारांचा Mounted Police या रीतीनेंही उपयोग करतां येण्याची तरतूद केली होती.

याप्रमाणें श्रीमंतांनीं राज्यारोहण-प्रसंगीं व पुढेंही वेळोवेळीं आपल्या राज्यकारभाराचें जे ध्येय म्हणून बोलून दाखविलें, तें उदात्त ध्येय कृतींत आणून आपली एकंदर कारकीर्द प्रगत व उज्ज्वल कशी केली, तें वरील त्रोटक हकीगतीवरून समजून येणारें आहे.

चित्रांक ८६



स्वतंत्र भारताची राजमुद्रा

# वंदेमातरम्

वन्दे मातरम्, वन्दे मातरम्
सुजलाम् सुफलाम् मलयजशीतलाम्
सस्यश्यामलाम्, मातरम् ।। वन्दे ।।

शुभ्रज्योत्स्नापुलकितयामिनीम्
फुल्लकुसुमितद्रुमदलशोभिनीम्
सुहासिनीम् सुमधुरभाषिणीम्
सुखदाम् वरदाम्, मातरम् ।। वन्दे ।।

सप्तकोटिकंठकलकलनिनादकराले
द्विसप्तकोटिभुजैर्धृतखरकरवाले
के बोले मा तुमि अबले
बहुबल-धारिणीम् नमामि तारिणीम्
रिपुदल-वारिणीम्, मातरम् ।। वन्दे ।।

तुमि विद्या तुमि धर्म तुमि हृदि तुमि मर्म
बाहु ते तुमि मा शक्ति
हृदये तुमि मा भक्ति
तोमारइ प्रतिमा गडि मंदिरे, मातरम् ।। वन्दे ।।

त्वं हि दुर्गा दशप्रहरणधारिणी
कमला कमलदलविहारिणी
वाणी विद्यादायिनी
नमामि त्वाम् नमामि कमलाम्
अमलाम् अतुलाम्, मातरम् ।। वन्दे ।।

श्यामलाम्, सुस्मिताम् भूषिताम्
धरणीम् भरणीम्, मातरम् ।। वन्दे ।।

**बंकिमचंद्र चतर्जी**

# जन–गण–मन

जन–गण–मन–अधिनायक जय हे भारत–भाग्य–विधाता
पंजाब–सिंधु–गुजरात–मराठा–द्राविड–उत्कल–बंग
विंध्य–हिमाचल–यमुना–गंगा उच्छ्वल–जलधि–तरंग
तव शुभ नामे जागे, तव शुभ आशीष मागे, गाहे, तव जय-गाथा
जनगण–मंगलदायक जय हे भारतभाग्यविधाता
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय जय हे ॥

अहरह तव आह्वान प्रचारित शुनि तव उदार वाणी
हिंदु–बौद्ध–शिख–जैन–पारसिक–मुसलमान–खृस्तानी
पूरव–पश्चिम आसे, तव सिंहासन पाशे, प्रेमहार होय गाँथा
जनगण–ऐक्य–विधायक जय हे भारतभाग्यविधाता ॥ जय हे ॥

पतन–अभ्युदय–बन्धुर–पन्था युगयुग धावित यात्री
तुमि चिर–सारथि तव रथ–चक्रे मुखरित पथ दिनरात्रि
दारुण–विप्लव–माझे, तव शंखध्वनि वाजे, संकट–दुःख–त्राता
जनगणपथपरिचायक जय हे भारतभाग्यविधाता ॥ जय हे ॥
घोर–तिमिर–घन–निबिड–निशीथपीडित–मूर्च्छित देशे
जाग्रत छिल तव अविचल मंगल नत–नयने अनिमीषे
दुःस्वप्ने आतंके, रक्षा करिले अंके, स्नेहमयी तुमि माता
जनगणदुःखत्रायक जय हे भारतभाग्य-विधाता ॥ जय हे ॥

रात्रि प्रभातिल उदिल रविच्छवि पूर्व–उदय–गिरि–भाले
गाहे विहंगम, पुण्य समीरण नव–जीवन–रस ढाले
तव करुणारुण–रागे, निद्रित भारत जागे, तव चरणे नत माथा
जय जय, जय हे जय राजेश्वर, भारतभाग्यविधाता ॥ जय हे ॥

**रवींद्रनाथ टागोर**

# परिशिष्ट १

रा. रा. लोकपुढारी पानसे यांचें आभार-प्रदर्शक भाषण

श्रीमंत राजेसाहेब, युवराजसाहेब, राजकुमार, दिवाणसाहेब व इतर सभ्य गृहस्थहो,

आज श्रीमंतांनीं माझा जो गौरव केला, तो माझा व्यक्तीचा नसून, मी ज्या संस्थेंत काम करतों, त्या भोर म्युनिसिपालिटीचा, म्हणजेच पर्यायानें भोरच्या नागरिकांचा हा गौरव होय असें मी समजतों. श्रीमंतांची स्वारी विलायतेहून आली, त्या वेळीं श्रीमंतांचें स्वागत भोर येथेंच फार मोठ्या प्रमाणावर झालें. त्या वेळीं मला भोरच्या नागरिकांनीं व मित्रांनीं बहुमोलाची मदत केली होती. तसेंच, षष्ट्यब्दपूर्तीच्या समारंभाच्या वेळीं पांचही तालुक्यांतर्फे सत्कार करण्यासाठीं माझीच निवड करण्यांत आली होती व त्या वेळच्या त्या अपूर्व सत्काराची जबाबदारी पार पाडतांना भोरच्या स्थानिक, तसेंच परस्थ, मित्रांनीं आपलेपणानें जी मदत केली ती केली नसती, तर सत्कारसमारंभ पार पाडण्यास मी असमर्थ ठरलों असतों. अर्थात्, आजचा हा मान माझा नसून माझ्या मित्रांचा म्हणजेच पर्यायानें भोर नागरिकांचा आहे, हें उघड आहे. मला जें पदक देण्यांत आलें, त्याचें महत्त्व आकार व किंमत यांवर नसून, तें भोरच्या नागरिकांच्या राजनिष्ठेबद्दल श्रीमंतांच्या आनंदानें प्रतीक आहे, असें मी समजतों.

यावरून, एक महत्त्वाची गोष्ट घडून आली आहे, हें निर्विवाद होय. आतांच घटना आणि जंगल कमिट्यांसंबंधीं जी घोषणा करण्यांत आली, त्यावरून दरबारच्या धोरणांत पालट झाला आहे, किंबहुना हृदयपालट झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. यापूर्वीं अनेक दरबार झाले, परंतु आजच्याप्रमाणें पदकें देऊन लोकपुढाऱ्यांपैकीं कोणाचा गौरव केला गेला नाहीं. गौरव करण्याची अशी प्रथा पूर्वीं नव्हती. मला सांगण्यास आनंद वाटतो कीं, हल्लीं वातावरण पुष्कळच निवळलें आहे. प्रजा आणि राजा यांचे संबंध सलोख्याचे आणि शांततेचे आहेत. आतां दिलेल्या या पदकावरून ही गोष्ट सिद्ध होत आहे. आतांच जंगल-कमिटी आणि घटना-कमिटी यांच्याबद्दल घोषणा करण्यांत आली,

त्याबाबत कांहीं बोलावें असें वाटल्यावरून मी येथें बोलत आहें. अर्थात, तें मर्यादित स्वरूपांत असणार, हें निराळें सांगावयास नकोच. मी मघाशीं सांगितलेंच कीं दरबारचा दृष्टिकोन आतां बदलला आहे. या जाहीरनाम्यांतील भाषा प्रजेला व पुढाऱ्यांना संमत होईल असें माझें वैयक्तिक मत आहे. २।४ दिवसांत कोणाचें काय मत आहे, तें बाहेर पडेल असें मला वाटतें.

घटना-कमिटींत माझें नांव आलें आहे. या कमिटीवर माझी निवड केल्याबद्दल श्रीमंतांचे मी आभार मानतों. माझे मित्र रा. शिंदकर, इनामदार व रा. आगाशे यांचींही नांवें जंगल-कमिटीवर दाखल करण्यांत आलीं आहेत. तेव्हां, त्यांच्यातर्फे व माझ्या इतर मित्रांच्यातर्फे मला तसा हक्क दिला आहे असें समजून, मी श्रीमंतांचे आभार मानतों.

या कमिट्यांसंबंधीं चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि, मी आपलें वैयक्तिक मत येथें बोलून दाखविलें आहेच. कमिट्यांवर निवडलेल्या सभासदांबद्दल लोकांना संतोषच वाटेल, असें मला वाटतें. सध्यां दरबारचा दृष्टिकोन पालटला असल्यानें न सुटणारे अगर बिकट वाटणारे प्रश्न आपोआप सुटण्याच्या मार्गाला लागतील अशी मी खात्री देतों.

बोलण्याची वेळ संपत आल्यानें मला आतां आटोपतें घेतलेंच पाहिजे. तथापि, श्रीमंतांचें पुन्हां एकवार अभिनंदन करून, शेवटीं तुकाराम महाराजांच्या शब्दांत मी आपलें भाषण पुरें करीत आहें.

मज पामराचें काय थोरपण ।
पायींची वहाण, पायीं बरी ॥

---

## परिशिष्ट २

राजा रघुनाथराव हायस्कूलमधील शिक्षक रा. **ग. वा. तगारे**, एम्. ए., बी. टी. यांनीं Historical Grammar of Apabhramsha ( अपभ्रंशाचें ऐतिहासिक व्याकरण ) नांवाच्या तयार केलेल्या ग्रंथाची प्रस्तावना ( उतारा )

### Preface

The present dissertation on Apabhramsha was accepted by the University of Bombay for the degree of Ph, D. in

September 1946. It required six long years to complete this work, as I was then working as a secondary teacher at Bhor, where there are no library facilities for such a type of research work. If I could complete this work in spite of indifferent health and under very trying circumstances, it is due to the encouragement of His Higheness the Rajasaheb of Bhor and the infinite patience with which my esteemed Guru, Prof. Dr. S. M. Katre, went through all my material and made valued suggestions from time to time giving me loan facilities of important books on the subject wherever required.

'A Historical Grammar of Apabhramsha' is such a vast subject as would require the study of a life-time. The application of the chrono-regional method of study to Apabhramsha literature, published so far, has its own obvious limitations as the time-space context of some Apabhramsha texts being still unsettled, one has to accept the earlier and later bates of the text as the upper and lower terminal of the linguistic phenomena represented therein. As this is the first historical grammar of Apabhramsha, the chrono-regional method of study has to be emphasized. Though I had to criticise occasionally some theories of great savants like Pischel, Grierson, Block and others, I express my indebtedness to all of them as early pioneers in the field, but for whose labours the present work would have been impossible.

It was intended to add some more sections and chapters on 'Reductions and Extensions in Apabhamsha', 'NIA and Apabhramsha', 'Apabhramsha and extra-Indian Prakrits' and other topics in Apabhramsha linguistics in general; but, they are published separately in oriental journals, as they could not be included under "historical grammar."

His Highness Raja Shrimant Sir Raghunathrao Shankarrao alias Babasaheb Pandit Pant Sachiv, K.C.I.E. the Raja Saheb of Bhor, to whom the present work is most respectfully dedicated, is already known as a progressive ruler. His patronage to learning and munificent donation to educational,

social, humanitarian and other cultural activities, ( even outside the State ) have given him a highly respectable position in the hearts of his subjects as well as in those of others in the Indian Dominion.

Born in 1878 A. D. in the historical family of Pant Sachives, who saved the Maratha kingdom in the most critical period of the early 18th century, His Highness inherited a noble tradition of self-sacrifice. After receiving his higher education in the Deccan College, Poona, the Rajasaheb carefully equipped himself with the necessary accomplishments and varied practical administrative experience, both at Poona and in the State. Even as a Prince, he was noted for his love of learning, progressive democratic views, social nature and nobility of character. Small wonder that his accession to the Gadi on the 18th July 1922 inaugurated a new era in the history of the State. At the very outset, the Rajasaheb removed the long-standing and legitimate grievances of his subjects by giving them freedom of thought, speech and association and by abolisihng certain invidious medieaval type of taxes. Removal of untouchability by law marks the liberal spirit of his administration on the social side. In order to improve the efficiency of the public services of the State, His Highness had to overhaul and to reform the State departments with their various branches of administration.

The most outstanding feature of his reign is the rapid progress of the constitutional reforms. Soon after his accession in 1922 he introduced representative institutions as parts of the administrative machinery of: the State. The establishment of an Executive Council ( 1924 ), the Legislative Council ( 1928 ) and Local Self-Government bodies ( 1932 ) was but a beginning of granting Responsible Government in the State. The Government of Bhor State Act ( 1932 ), the Diamond Jubilee Celebration of the Rajasaheb ( 1938 ) and the Silver Jubilee of his accession to the Gadi ( 1947 ) were important land-marks in the rapid process of transformation of a medieval type of

हातून अधिकारत्याग करविणें हें जितकें कठीण आहे, तितकेंच त्या सुधारणा चांगल्या रीतीनें वापरून व राबवून लोकप्रतिनिधींनीं त्यांचा जनतेला पूर्ण फायदा मिळवून देणें, या दोन्हीही गोष्टी कष्टसाध्यच ठरतात.

आमच्या जुन्या शास्त्रकारांच्या मताप्रमाणें पूर्वीं पुण्य संपादून उत्तम लोकांत गेलेले जीव, तें पुण्य क्षीण झालें, म्हणजे खालीं येऊन पृथ्वीवर राजे होतात. न जाणो, संस्थानिकांच्या पूर्वजांनीं असेंच पुण्य जोडलें असेल, म्हणून त्यांच्या पुढच्या पिढीला राज्यें मिळालीं. त्यांचा हेवा इतरांनीं करून काय उपयोग? पण, राजपद मिळालें हा, गांठींची पूर्व पुण्याई खर्चीं पडली, याचाहि पुरावा ठरतो; यामुळें, आपल्या पुढच्या पिढीला नव्या युगांतील नव्या दृष्टीचें राजपद भोगावयास मिळावें अशी संस्थानिकांची इच्छा असेल, तर त्यांनीं या आयुष्यांत नवीन पुण्य जोडण्याचा प्रयत्न करावा हें ठरतें; आणि तें पुण्य लाभण्याचा मार्ग ह्मटला म्हणजे 'प्रजेला रंजविणारा, तो राजा' ही व्याख्या डोळ्यांपुढें ठेवून यथाशक्ती प्रजेचें अनुरंजन करणें, हा होय. पण, उलट, प्रजेनें राजाशीं कसें वागावें हेंहि आपल्या शास्त्रकारांनीं सांगितलें आहे. राजधर्माप्रमाणें प्रजाधर्म म्हणूनही कांहीं असतोच; आणि हे दोन धर्म परस्पर प्रतियोगी असेच मानले पाहिजेत. म्हणून, राजाला नांवें ठेवतांना, आपणही किती सत्पात्र आहों, आपणही आचरणांत किती न्यायबुद्धीनें व सत्प्रवृत्तीनें वागतों, हें प्रजेनेंही लक्षांत ठेवलेंच पाहिजे. कोणत्याही विद्वत्ता-प्रदर्शनाचा आक्षेप स्वतांवर न घेतां, मी, राजा व प्रजा या दोघांनींही महाभारतांतील शांतिपर्वाचें वाचन रिकाम्या वेळीं मार्मिक दृष्टीनें करावें असें ह्मणूं शकेन. कोणाचेही जुने नमुने नव्या काळीं टिकत नाहींत, हें खरें. तथापि, राजशाही झाली काय, लोकशाही झाली काय, प्रत्येक प्रकारांत गुणश्रेष्ठत्व म्हणून कांहीं असतेंच. त्या गुणांचें महत्त्व युगांतरानेंही जाणार नाहीं. नव्या लोकशाहीच्या काळांतही तिला नांवें ठेवण्याला जागा कशा निर्माण झाल्या आहेत व तीं नांवें कोणत्या दुर्गुणांमुळें ठेवलीं जातात, याविषयीं वाटेल तितकें इंग्रजी वाङ्मय आज उपलब्ध आहे.

पण, या गहन विषयांत मी आज अधिक शिरूं इच्छीत नाहीं. त्याविषयींचे माझे विचार मीं स्वतंत्र रीतीनें पूर्वीं प्रगट केले आहेत, व कारण पडेल

तेव्हां पुढेंही प्रगट करीन. आजचें माझें भाषण, माझा जो सत्कार करण्यांत आला व गुणग्रहणाचे उद्‌गार मला ऐकविण्यांत आले, त्याविषयीं कृतज्ञताबुद्धि व्यक्त करणें, इतक्यापुरतेंच आहे. राजेसाहेब, आपल्या भाषणांतलेच शब्द घेऊन मी असें समजतों कीं, मी स्नेही तर खराच, परंतु विद्येची थोडीबहुत उपासना केलेला असाही आपल्याला वाटल्यामुळें माझा हा सत्कार आपण केला. म्हणून राजे लोकांविषयीं कालिदासानें काय म्हटलें, तें मला या ठिकाणीं आठवतें. तो श्लोक असा आहे—

बलमार्तभयोपशांतये विदुषां सत्कृतये बहुश्रुतम् ।
वसु तस्य विभो र्न केवलं गुणवत्तापि परप्रयोजना ।।

कवि म्हणतो—राजा ही व्यक्ति बलसंपन्न असावी, पण तिचा हेतु स्वतः पहिलवान होऊन आखाड्यांत कुस्त्या मारण्याकरितां नव्हे, तर जे प्रजाजन आर्त म्हणजे भयग्रस्त असतील, त्यांची भीति निवारण करण्याकरितां. राजा श्रीमंत असावा, पण ती श्रीमंती स्वतःपेक्षां देखील परकारणीं म्हणजे परोपकाराच्या कृत्यांकरितां तिचा उपयोग व्हावा म्हणून. राजा हा स्वतः गुणसंपन्न असावा, पण हे त्याचे गुण स्वतःची प्रौढी मिरविण्याकरितां नसावे, तर प्रजाजनांतील गुणवान लोकांची परीक्षा करून त्यांच्या गुणांचें चीज करण्याकरितां असावे; आणि शेवटीं, राजा हा स्वतः बहुश्रुत असावा, पण तिचा उपयोग स्वतः विद्वान् म्हणून मिरविण्याकरितां नव्हे, तर प्रजाजनांतील जे विद्वान असतील, त्यांचा सत्कार करण्याकरितां ती बहुश्रुतता असावी. याचा अर्थ हाच कीं, राजाला स्वतःला ग्रंथकार होतां आलें नाहीं, तरी चालेल. परंतु, इतर जे कोणी ग्रंथकार वा विद्वान असतील, त्यांचा सत्कार राजानें केला, म्हणजे स्वतः विद्वान असल्याचेंच श्रेय त्याला मिळतें.

---

## परिशिष्ट ९

भोर महिला-समाजातर्फें भरविण्यांत आलेल्या हळव्याच्या व स्त्रियांच्या हस्तकौशल्याच्या वस्तूंचें प्रदर्शन खुलें करण्याच्या समयींचें श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण ( ता. २५-१-४० ).

सभ्य स्त्रीजनहो,

येथील महिला-समाजातर्फे भरविण्यांत आलेल्या हलव्याच्या व स्त्रियांनीं केलेल्या इतर हस्तकौशल्याच्या वस्तूंचें प्रदर्शन खुलें करण्याचा मान आपण आम्हांस दिलात व आमचें जें येथें स्वागत केलेंत, त्याबद्दल आम्ही आपले आभारी आहोंत. येथें महिलासमाज स्थापन करणें व त्या समाजातर्फे हलव्याचें प्रदर्शन भरविणें, या दोन्ही कल्पना आपल्या मनांत येणें, हीच आम्हांस कौतुकावह गोष्ट वाटत आहे. तशांत, आपण या दोन्ही गोष्टी सत्य सृष्टींत घडवून आणल्यात, हें पाहून आम्हांस विशेषच आनंद वाटत आहे. सौ. मालती-बाई देवधर यांनीं आपल्या स्वागतपर भाषणांत, आम्ही संक्रान्तीला येथें येऊं न शकल्यानें, हा कार्यक्रम लांबणीवर पडला, असें म्हटलें आहे. त्या बाबतींत आमचें सांगणें असें आहे कीं, याची कल्पना संक्रांतीच्या अगोदर आम्हांस आणून दिली गेली असती, तर संक्रान्तीकरितां आम्ही येथें येऊं शकलों नसतों, असें नाहीं. तथापि, समारंभ लांबणीवर पडण्यानें कांहीं बिघडलें आहे, असें मुळींच नाहीं. त्यामुळें, चार वस्तू जास्त तयार करून, प्रदर्शनीय वस्तूंच्या संख्येंत भर घालण्यास आपणांस तितका आणखी अवसर मिळाला; व आपणही त्या दृष्टीनें या संधीचा उपयोग करून घेतला असला पाहिजे. अर्थात्, झालेला उशीर फायदेशीरच झाला, असें आम्ही समजतों.

येथील महिलांनीं आपला समाज स्थापून संघटित होण्याचा विचार केला व संघटनेनें आपणांस कांहीं तरी कार्य, अल्प कां असेना, पण करतां येतें, हें या प्रदर्शनाच्या योगानें निदर्शनास आणलें, ही मोठीच संतोषदायक गोष्ट आहे. प्रचलित मनूचें हें लक्षण आहे. येथील स्त्रीसमाजाच्या जागृतीचें हें सुचिन्हच आहे, असें म्हणण्यास आम्हांस प्रत्यवाय वाटत नाहीं. आपल्या संस्थानांत पालीस बऱ्याच दिवसांपूर्वी महिलासमाज स्थापन झाला असून, नुकतेंच त्या समाजातर्फे असेंच छोटें प्रदर्शन भरविण्यांत आल्याचें आमच्या वाचनांत आलें आहे. येथेंही आपण हा उपक्रम केलात, ही उत्तम गोष्ट आहे. याप्रमाणें संस्थानांतील दोन मुख्य ठिकाणीं महिला-समाज स्थापन होणें, ही मोठीच आशादायक गोष्ट आहे; तशांत, "समाजोपयोगी कार्य करावें" हें या महिला-समाजाचें ध्येय असल्याचें

कार्याध्यक्ष सौ. चंद्रिकाबाई दबडघाव यांच्या भाषणावरून आम्हांस समजून आलें. अर्थात्, हें ध्येय उच्च असल्यानें, या समाजास आमचा केव्हांही शुभाशीर्वादच आहे व समाजातर्फे होणाऱ्या सत्कार्यास आमची सहानुभूति राहील, हें आम्ही वेगळें सांगितलें पाहिजे असें नाहीं.

कुलीन स्त्रियांनो, प्रदर्शनाची कल्पना आपल्या समाजास नवी आहे, असें नाहीं. आपल्याकडील गृहव्यवस्थेसंबंधींच्या वार्षिक कार्यक्रमांत या कल्पनेस कायमचेंच स्थान दिलें गेलें आहे. चैत्र महिन्यांत गौरीच्या हळदीकुंकवाचा समारंभ घरोघर करण्याचा आपला प्रघात आहे. त्या वेळीं आरास करून गौरीपुढें चित्रें वगैरे वस्तू ठेवण्याची रीत आहे. अर्थात्, ह्या वस्तू बाजारी विकत घेऊन मांडण्याचा मूळचा उद्देश नाहीं; तर, प्रत्येक कुलयुवतीनें त्यापूर्वींच्या वर्षांतील दररोजचा आपला दुपारचा फुरसतीचा वेळ कोणत्या रीतीनें घालविला, आपल्या गृहास शोभा आणण्यालायक कलाकुसरीच्या कोणत्या वस्तू तयार केल्या, इत्यादि सर्वांस समजावें, म्हणून समाजानें चैत्र-गौरीप्रीत्यर्थ अशीं प्रदर्शनें दरसाल व घरोघर व्हावीं अशी योजना केलेली आहे. परंतु, विपरीत कालमान व विपर्यस्त कल्पना, यांमुळें आमच्या समाजांतील अशा जुन्या प्रथांच्या मुळाशीं असलेल्या कल्पनेची ओळख न राहिल्यानें, असे समारंभ नाममात्र व नीरसरीत्या साजरे होऊं लागले तथापि, आपल्या ह्या प्रदर्शनाच्या कल्पनेनें त्या जुन्या परंपरेस यापुढें इष्ट तें वळण लागेल अशी आम्हांस उमेद आहे. हें प्रदर्शन म्हणजे घरोघरीं होणाऱ्या अनेक छोटया व वैयक्तिक प्रदर्शनांचें एकीकरण आहे; म्हणजेच, विचार व आचार जुनेच, पण त्यांची मांडणी नव्या पद्धतीची अशी ही गोष्ट आहे; व ती केव्हांही स्वागतार्ह व उत्तेजनार्हच आहे.

आतां, प्रदर्शनांत आपण ठेवलेल्या निरनिराळ्या वस्तूंच्या संग्रहाविषयीं सांगणें म्हटल्यास, वेळेच्या अभावीं प्रत्येक वस्तूचें गुणवर्णन न करतां, थोडक्यांत आम्हांस इतकें म्हणतां येईल कीं, बहुतेक वस्तू सुबक झाल्या आहेत. त्यांतही, आपला हा प्रथमचा प्रयत्न आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली, तर हें प्रदर्शन वस्तूंच्या व मांडण्याच्याही दृष्टीनें पुष्कळच यशस्वी झालें आहे, असें आमचें प्रांजल मत आहे. आम्ही हें केवळ औपचारिकरीत्या म्हणत नाहीं. प्रदर्शनांतील प्रत्येक वस्तु आम्हीं बारकाईनें पाहिली आहे. त्यावरून, यांतील कांहीं वस्तू तर कोठल्याही

इतर ठिकाणच्या प्रदर्शनांत मांडल्यास, त्या तेथें शोभादायक ठरतील अशी आमची खात्री आहे. शिवाय, आपण आतांच म्हटल्याप्रमाणें, ह्याकडे पाहण्याची आमची दृष्टि आत्मीयतेची आहे, हें तर खरेंच आहे. आम्ही यापूर्वी अनेक वेळां व मोठमोठीं प्रदर्शनें पाहिलीं आहेत व यापुढेंही पाहूं. परंतु, आम्ही सत्य व स्पष्ट तेंच सांगतों कीं, आमचें हें छोटें प्रदर्शन पाहून आम्हांस अपूर्व असा आनंद वाटत आहे. इतर अनेक मोठीं संस्थानें असलीं व आम्हीं त्यांचें वैभव पाहिलें असलें, तरी आम्हांस जसा आमच्या या छोटया भोर संस्थानाबद्दलच मनांत अभिमान व आनंद वाटतो, तशाच भावना आमच्या अंतःकरणांत या प्रदर्शनाबद्दल वसत आहेत. सबब, येथें उपस्थित राहिल्याबद्दल सौ. सुशिला-बाईंनीं आमचे आभार मानले आहेत, तें कृत्य लौकिकरीत्या योग्य असलें, तरी वस्तुतः येथील महिला कलाकुसरीच्या कामांत किती कुशल आहेत, तें एकत्र पाहण्याची ही सुसंधि आम्हांस आणून दिल्याबद्दल, आम्हींच महिलासमाजाचे आभार मानणें उचित होणार आहे.

या प्रसंगीं आम्ही महिलासमाजाच्या फंडास रुपये ५१ व आजच्या प्रदर्शनाच्या वस्तूंपैकीं कमिटीच्या मतानें ज्यास बक्षिस देणें योग्य आहे, त्या वस्तूंना बक्षिसें देण्याकरितां रुपये ५० देणगी म्हणून देत आहोंत. बक्षिसें कोणास द्यावयाची त्याकरितां आम्ही एक कमिटी नेमिली आहे. ती कमिटी ठरवील, त्या वस्तूंना बक्षिसें देण्यांत येतील.

शेवटीं, आपल्या महिलासमाजाचा उत्तरोत्तर उत्कर्ष होत जाऊन त्या-मार्फत येथील स्त्रीसमाजाची अनेकविध उन्नति होवो, अशी श्रीरामचंद्रप्रभूच्या चरणीं प्रार्थना करून व पुन्हा एकवार आपले आभार मानून, प्रदर्शन खुलें केल्याचें आम्ही मोठ्या आनंदानें जाहीर करतों.

---

## परिशिष्ट १०

' श्रीरामक्रीडाभुवन ' या संस्थेच्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेल्या भाषणांतील उतारा.

ता. १६-४-१९४०

## ४०-च श्रीराम क्रीडाभुवन रौप्यमहोत्सव प्रसंगाच्या वेळचें श्रीमंतांचें भाषण

सद्गृहस्थहो, आपली ही संस्था सुरू झाल्यापासून २५ वर्षे झालीं व तिचा रजतमहोत्सव करण्याचा समय प्राप्त झाला व त्याकरितांच आपण येथें जमलांत, ही गोष्ट खरोखर संतोपदायक अशीच वाटत आहे. जनतेंत व्यायामाची आवड उत्पन्न करणें व व्यायाम घेण्याचा उत्कृष्ट मार्ग म्हणजे खुल्या हवेंत विविध प्रकारचे मैदानी खेळ खेळणें हा असल्यानें, त्याचाही प्रसार करणें हें संस्थेचें ध्येय प्रशंसनीय असेंच आहे. व्यक्तीच्या काय किंवा समाजाच्या काय उन्नतीस शरीरसामर्थ्याची किती गरज आहे, हें आम्हीं विशेष रीतीनें सांगितलें पाहिजे असें नाहीं. ' बले सर्वं प्रतिष्ठितम् '। असें जें वेदवचन आहे, त्यांत ही गोष्ट थोडक्यांत ग्रथित केली आहे. त्याचप्रमाणें व्यायामापासून शरीरसामर्थ्याची प्राप्ति होते, याविषयींही कोणाचें दुमत होणारें नाहीं. अर्थात्, या ध्येयानें प्रेरित होऊन अविरतपणें पंचवीस वर्षें काम करीत असलेल्या संस्थेचें कोणालाही कौतुकच वाटणार आहे. तसेंच, टेनिसशिवाय येथें इतर प्रकारचेंही खेळ खेळण्याची सोय करण्याची जी मनीपा सभासदांनीं बाळगिली आहे, तीही योग्य अशीच आहे; व आमची खात्री आहे कीं, संस्थेच्या सभासदांनीं त्या दिशेनें आपले प्रयत्न चालू ठेवल्यास व येथील धनिकांनींही ह्याकडे लक्ष पुरविल्यास, ही मनीपा पूर्ण होण्यास फार दिनावधि लागेल असें नाहीं. अशा संस्था लोकांनीं स्वतः उमेदीनें यशस्वीरीत्या चालवून भरभराटींत आणण्यांतच आम्हास एक प्रकारचा विशेष आनंद वाटत असतो.

सद्गृहस्थहो, दरसालप्रमाणें आपण टेनिसचे सामने करविलेत व त्यांतील यशस्वी खेळाडूंना आमच्या हस्तें बक्षिसें देवविलींत, ही गोष्ट त्यांना जितकी उत्साहवर्धक, तितकीच आम्हांसही आनंददायक वाटत आहे. खेळणाऱ्या मंडळींत तरुणांप्रमाणेंच वृद्ध मंडळीही आहेत, हें पाहून आम्हांस विशेष कौतुक वाटत आहे. या उदाहरणावरून, व्यायाम हें शरीर व मन हीं दोन्हीही उल्लसित व तरतरीत ठेवण्याचें साधन आहे हें स्पष्टच होत आहे; इतकेंच नव्हे, तर इतर वयस्क मंडळींना अनुकरणीय असेंच हें उदाहरण आहे, असें आम्ही समजतों. आज ज्यांनीं बक्षिसें मिळविलीं, त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करितों.

# परिशिष्ट ११

## भोर येथील ' राष्ट्रीय स्वयंसेविकासमिती 'च्या नामकरणाच्या व स्वागतास संस्थानचें " भगवा झेंडा " निशाण देण्याच्या समारंभाच्या वेळचें श्रीमंतांचें भाषण, बुधवार, ता. २७-८-४१.

सभ्य स्त्रीपुरुषहो,

मुलांच्या स्वयंसेवक संघाच्या धर्तीवर येथें कांहीं मुलींनीं राष्ट्रीय सेविका-समिति स्थापन केली असून, समितीमार्फत मुलींनीं व्यायाम घेण्याचें वगैरे कामही चालू केलें आहे, असें आम्हीं ऐकलें होतें. तथापि, तें काम समक्ष अवलोकन करण्याचा सुप्रसंग आजपर्यंत आला नव्हता. तो सुयोग आज आल्यानें, आम्हांस आनंद वाटत आहे; व याबद्दल व आजच्या स्वागताबद्दल आम्ही समितीच्या चालिका श्रीमती सौ. दबडघाव. व त्यांचें साहाय्यक भगिनीमंडळ यांचे आभार मानतों.

सभ्यजनहो, समितीच्या चालिकेनें आतांच केलेल्या भाषणावरून, समितीनें जें ध्येय आपल्यापुढें ठेविलें आहे, त्याच्या उपयुक्ततेबद्दल व आवश्य-कतेबद्दल मतभेद असण्याचें कारणच नाहीं. हिंदु समाजांतील स्पृश्य व अस्पृश्य या दोन समुदायांमध्यें सलोखा निर्माण करून अखिल हिंदुमात्राचें संघटन करणें व त्यामार्गें सर्व मानवजातीची सेवारूपानें उन्नति करणें, हें ध्येय अत्यंत उदात्त तर आहेच; पण, त्याच्या सिद्धीकरितां प्रयत्न करणें ही प्रस्तुतच्या काळीं सर्वांच्याच हिताची व फार जरूरीची गोष्ट झाली आहे; याबद्दलही दुमत असणें शक्यच नाहीं. मानवी समाजांत एका विशिष्ट ध्येयानें प्रेरित होऊन कार्य करणारे अनेक व भिन्न जनसमुदाय असतात; व हे समुदायही अनेक व्यक्तींचे बनलेले असतात. अर्थात्, व्यक्ति उन्नत झाल्या, म्हणजे समुदायांचा अभ्युदय साध्य होतो. यासच मानवी समाज उन्नत होणें असें म्हटलें जातें. ही गोष्ट विचारांत घेतल्यास, ओघानेंच असें कळून येईल कीं, इतरांची उन्नति घडवून आणण्यास अगोदर स्वतः आपण आपली उन्नति करून घेतली पाहिजे. त्या दृष्टीनें समितीचा उपक्रम योग्य असाच आहे, असें म्हणण्यास आम्हांस प्रत्यवाय वाटत नाहीं. आतां, वैयक्तिक उन्नति ही एकांगी गोष्ट नाहीं. व्यक्तीची उन्नति म्हणजे

तिची केवळ बौद्धिक वाढ, असा अर्थ केव्हांही व कोणीही समजत नाहीं. व्यक्तीचा शारीरिक, आत्मिक व आर्थिक विकास होण्यावरच बौद्धिक उन्नतीचा हितपरिणामीपणा अवलंबून असतो, हें सर्वमान्यच आहे. तेव्हां, समितीनें आपल्या कार्यांत नैतिक, धार्मिक व शारीरिक उन्नतीच्या बाबींना प्राधान्य दिलें आहे, ही सर्वथैव उचित व अवश्य अशीच गोष्ट आहे, असें आम्ही समजतों.

सज्जनहो, मुलींचा काय किंवा मुलांचा काय, कोणाचाही भावी आयुष्य-क्रम यशस्वी होण्यास कणखर शरीर व उत्तम शील यांचीच मुख्यत: आवश्यकता असते. या दृष्टीनें समितींतील मुलींनीं सांघिक खेळ खेळण्याची केलेली योजना योग्यच आहे. मुलींनीं अनेक प्रकारचे खेळ खेळून बलसंपन्न होणें, ही गोष्ट आपणांस अपरिचित आहे, असें मुळींच नाहीं. आपल्या प्राचीन गृहव्यवस्थेंत मुलींनीं दुपारीं फुगड्या, झिम्मा, छप्पापाणी वगैरे प्रकारचे बिनखर्ची खेळ, अनेक जणींनीं एकत्र जमून, खेळण्याचा प्रघात होताच; व अजूनही कित्येक ठिकाणीं—विशेषत: खेडोंपाडीं—हे खेळ खेळले जात असल्याचें दिसून येतें. आतां, बदलत्या कालमानास व रुचीस अनुसरून, समितीमधील मुलींच्या खेळांत लेजीम, ड्रिल, लाठी वगैरेंचा समावेश केला आहे, ही गोष्टही वावगी नाहीं; इतकेंच नव्हे, तर ती अवश्य अशीच गोष्ट आहे. कारण, त्यांत सांघिक-रीत्या खेळण्यास जास्त अवसर मिळतो व व्यक्तीच्या ठिकाणीं स्वसंरक्षणक्षमता उत्पन्न होण्यास जास्त मदत होते. अशा सांघिक व मैदानी खेळण्यापासून अनेक फायदे आहेत; वैयक्तिक खेळांत श्रम व करमणूक होते; व त्यांचेंच प्रमाण विस्तृत करून त्यास नियमबद्धतेची व शिस्तीची जोड दिली, म्हणजे त्यांची सांघिक व्यायामाच्या सदरांत गणना होते; व ते जास्त उत्साहवर्धक व दर्शनीयही असतात. अशा व्यायामापासून, "व्यायामाद् बललाभ: स्याद् चिरारोग्यं न संशय:।" या वैद्यशास्त्रवचनानुसार, आरोग्य व बल यांची प्राप्ति तर होतेच; पण, त्याशिवाय, व्यक्तीच्या ठिकाणीं अत्यंत अवश्य असलेले आज्ञाधारकता, समाजप्रियता व सहकार्यभावना हे तीन सद्गुण उत्पन्न होऊं शकतात. तसेंच, त्यापासून विशेषरीत्या स्वत:चें रक्षण स्वत: करण्याचें सामर्थ्य अंगीं येतें. ह्याविषयीं स्मृतिकार मनूनें म्हटलें आहे, "आत्मानमात्मना यास्तु रक्षेयुस्ता: सुरक्षिता: ।" याचें तात्पर्य इतकेंच कीं, स्त्रिया स्वसंरक्षणक्षम होऊं

शकतील, असें व्यायामाचें शिक्षण त्यांना मिळालेलें असावें. त्या दृष्टीनें हाही या खेळांचा मोठाच लाभ आहे. मुलींनीं सायंकाळीं उघड्या जागेंत खेळ खेळण्याची आपल्यांत फार पूर्वीं प्रथा होती, असें श्रीमद्वाल्मीकि रामायणांतील एका उल्लेखावरून स्पष्ट दिसून येतें. अराजक स्थितींत नगरवासीयांच्या व्यवहारांत कोणकोणते अनिष्ट फेरफार होतात, हें सांगतांना आद्यकवि वाल्मीकिमुनि म्हणतात: " नोद्यानेपु च सायान्हे क्रीडितुं यांति कन्यकाः । " याचा अर्थ इतकाच कीं, देशाच्या अशा अराजक अवस्थेंत मुलींना नेहमींप्रमाणें संध्याकाळीं उद्यानाच्या म्हणजेच श्रमभूमीच्या अथवा खेळांच्या मैदानावर ( Play-ground ) जाऊन खेळतां येत नाहीं. तात्पर्य, ही पुरातन प्रथा चालू करण्याचें समितीनें योजिलें आहे, ही फार चांगली गोष्ट आहे. हल्लींच्या मुलीच पुढें गृहिणी व माता होणार असल्यानें, त्यांच्याच ठिकाणीं हें व्यायामप्रियतेचें, सद्धर्मशीलतेचें व स्वराष्ट्रप्रेमाचें बीजारोपण केलं जात आहे, ही इष्ट अशीच गोष्ट आहे. मुली शीलवान् व बलवान् झाल्यावर, त्यांचीं मुलें तशींच होऊन राष्ट्रोन्नतीही आपोआपच साधणार आहे, हें वेगळें सांगितलें पाहिजे असें नाहीं. या प्रसंगानें आम्हास एका इंग्रजी ग्रंथकाराच्या वचनाची आठवण होत आहे. तो म्हणतो : " Take care of the women's education, and men's education will take care of itself "–याचा अर्थ, मुलींच्या शिक्षणाची काळजी घ्या, म्हणजे सहजींच मुलांच्या शिक्षणाची काळजी घेतल्यासारखें होईल. या वचनांतील मर्म-हेतु आपणांस समजण्यासारखाच आहे. सारांश, समितीची स्थापना कालानुरूप झालेली आहे, व तिचे उद्देश व कार्यक्रम हितावह असल्यानें, समितीच्या चालक-मंडळाच्या विनंतीस आम्हीं संतोपानें मान्यता दिली.

समितीनें राजकीय बाब आपल्या कार्यक्षेत्रांतून अजीबात वगळली असून, संस्थान सरकार व ब्रिटिश सरकार यांच्याशीं राजनिष्ठ राहण्याचें ठरविलें आहे, ही संतोषाची गोष्ट आहे; तसेंच, इतर समाजांशीं दुजाभाव धारण न करतां कार्य करण्याचें जें धोरण आंखलें आहे, तेंच समितीच्या भावी यशःप्राप्तीचें गमक असून, यायोगें समितीचा साधनमार्गही सुगम होणारा आहे. समितीनें पुरस्कृत केलेलें कार्य चांगलें असल्यानें, मुलींच्या पालकांना आमचें सुचविणें आहे कीं, त्यांनीं आपल्या मुलींच्या संस्कारक्षम बालमन प्रवृत्तींना उत्कृष्ट वळण

लागलें जाण्याविषयीं समितीनें केलेल्या या योजनेचा अवश्य व शक्य तितका जास्त फायदा घ्यावा; यांतच त्यांचें व त्यांच्या भावी पिढयांचें हित आहे. त्याचप्रमाणें सर्वच मुलींनाही आमचें कळकळीचें सांगणें आहे कीं, तुम्हीही या सुसंधीचा या पूर्ववयांत जास्तींत जास्त उपयोग करून घ्या, व विद्वान् आणि बलशीलसंपन्न होऊन, "कन्या हि कुलत्रयजीवितम् ।" ही प्राचीनकालीन म्हण सार्थ करा.

शेवटीं, समितीचें व तिच्या साहाय्यक भगिनीमंडळाचें या नव्या उपक्रमाबद्दल अभिनंदन करून व समितीस उत्तरोत्तर वाढतें सुयश चिंतून, त्यांच्या विनंतीप्रमाणें या समितीस "राणी लक्ष्मीबाई सेविका-समिति" असें नांव व संस्थानचें "भगवा झेंडा" हें निशाण दिल्याचें जाहीर करून, आम्ही आपली रजा घेतों.

---

## परिशिष्ट १२

श्रीमंत राजेसाहेब यांनीं हिंदवी स्वराज्याच्या त्रिशत-सांवत्सरिक उत्सवाच्या वेळीं बनेश्वर येथें ता. २७ मे १९४५ रोजीं केलेलें भाषण.

उपस्थित इतिहासप्रेमी सुजन व आमचे राजनिष्ठ प्रजाजन व मावळे लोकहो,

श्री छत्रपति शिवाजी महाराज यांनीं स्वराज्यस्थापनेच्या कामीं ज्या प्रथम आणाभाका घेतल्या व स्वराज्य-स्थापनेचा उपक्रम केला, त्या गोष्टीला अंदाजी तीनशें वर्षें लोटून गेल्यानें, महाराष्ट्रांत निरनिराळ्या ठिकाणीं हा उत्सव साजरा होत आहे. आम्हास साभिमान आनंद वाटतो, तो यासाठीं कीं, त्या स्वराज्याच्या कालांतील महत्त्वाच्या जागा व मुलुख आमच्या संस्थानांत आहे; म्हणून, असा मंगलोत्सव आमच्या संस्थानांत आम्हीं करण्याचें योजिलें व जरूर ती आर्थिक योजनाही उत्सव-मंडळाच्या विचारें केली व तेरा हजार पांचशें रुपयांची मंजुरी दिली. वरील योजना, अत्यंत विचारपूर्वक प्रथम तयार करून ती समग्र आम्हापुढें मांडली, ह्याबद्दल आम्ही श्रीयुत तात्यासाहेब केळकर, रावबहादुर दीक्षित व सह्याद्रीचे संपादक रा. काळे यांचे जाहीर रीतीनें हार्दिक आभार मानतों. तसेंच, आम्ही येथें हेंही मुद्दाम नमूद करूं इच्छितों कीं, या समारंभाची

कल्पना रावबहादुर दीक्षित यांनीं आम्हास सन १९४३ च्या आक्टोबरमध्यें प्रथम कळविली; व पुढें श्री. तात्यासाहेब यांनीं भोर मुक्कामीं ता. १२-६-४४ रोजीं केलेल्या भाषणांत त्या गोष्टीस पुष्टी दिली व ती, आमच्याही मनांत पुष्कळ दिवस घोळत असल्यानें, आम्हास पसंत पडली व तिची हळूहळू वाढ होऊन तिची परिणति आजच्या समारंभांत होत आहे, हें पाहून आमच्याप्रमाणें आपणां सर्वांसही संतोष वाटत असेल, अशी आम्हास खात्री आहे.

वरील प्राथमिक निवेदन झाल्यावर, प्रस्तुत समारंभाच्या महत्त्वाकडे वळतांना प्रथम जी गोष्ट नजरेपुढें येते, ती म्हणजे श्री बालशिवाजीराजे यांचें अलौकिक शौर्य व कार्यकुशलता—इसवी सन १६३० च्या फेब्रुवारींत महाराजांचा जन्म झाला, वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षी प्रकट होऊन त्यांनीं स्वराज्याची मुहूर्तमेढ रोविली व ती जेथें रोविली, तो आमच्या संस्थानांतील रायरेश्वर हा भूप्रदेश होय. ह्या रायरेश्वराच्या पठारावरच शिवाजीच्या सहकाऱ्यांनीं बेलभंडार घेऊन स्वराज्य संपादनाच्या कामीं तनुमनधन अर्पण करूं अशी ग्वाही दिली. ज्यांनीं हा प्रदेश पाहिला असेल, त्यांना तेथील निसर्गाच्या शोभेमुळें जसा आनंद वाटेल, त्याप्रमाणेंच या भागाचा अवघडपणाही मनांत येऊन, शिवाजी व त्यांच्या सहकाऱ्यांनीं किती अडचणीच्या जागेंतून आपला मार्ग आक्रमिला, हें पाहून आपल्या पूर्वजांविषयींचा आदर द्विगुणित झाल्यावांचून राहणार नाहीं. किती हाल व किती कष्ट त्या काळच्या लोकांनीं आपल्या ध्येयप्राप्तीसाठीं सोसले असतील, हें मनांत आलें, म्हणजे क्षणभर मनाची चलबिचल झाल्यावांचून रहात नाहीं.

मनुष्याच्या खोल हृदयमंदिरांत व्यक्तिपूजेला महत्त्वाचें स्थान नाहीं असें कोण म्हणेल? श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं याबद्दल असें म्हटलें आहे कीं, शिवाजीमहाराजांविषयीं व्यक्तिशः जी आदरबुद्धि वाटते, तिचें कारण त्यांचें अलौकिक व्यक्तिमत्व हें होय. व्यक्तिमत्वांत त्यांची बुद्धिमत्ता, मुत्सद्देगिरी, नीतिमत्ता, धर्मनिष्ठा, सुराज्य-व्यवस्थेविषयीं आस्थेवाईकपणा, इत्यादि गुण तर आहेतच; परंतु, शिवाजी खरा वीरशिरोमणी होता, ही गोष्ट ठळकपणें लक्षांत येते. शिवाजी म्हणजे मूर्तिमंत स्वातंत्र्य, मूर्तिमंत त्याग, मूर्तिमंत निष्ठा व मूर्तिमंत कर्तृत्व होय. अशा विभूतीची पूजा अगर उत्सव म्हणजे त्या ध्येयाची पूजा होय. महाराजांच्या पाठीशीं असे एकनिष्ठ ध्येयपूजक होते, म्हणूनच त्या वेळीं त्यांना

स्वतंत्र राज्याची स्थापना, बलाढ्य व शिरजोर झालेल्या मोगलांचा पराभव करून, करितां आली. त्या वेळच्या लोकांचें वर्णन संतशिरोमणि ज्ञानेश्वर महाराजांच्या पुढील ओवीनें उत्तम प्रकारें होतें.

आमुचिया काजाचेनि पाडे । देखति आपुलें जीवित्व थोकडें ।
ऐसे निरवधि चोखडे । स्वामिभक्त ॥

आतां, श्रीशिवाजी महाराजांच्या अंगीं, गीतेंत जे क्षत्रियांच्या अंगीं गुण असावे लागतात असें म्हटलें आहे, ते पूर्णत्वानें वसत होते असें म्हणावें लागतें.

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥

वरील प्रत्येक गुण व महाराज, यांचें कसें निकट साहचर्य होतें, हें दाखवितां येईल. पण, महाराष्ट्राचा इतिहास आपणांस पूर्णपणें माहीत असल्यानें, त्याबद्दलचें विवरण आम्ही येथें करूं इच्छीत नाहीं.

यानंतर, असे उत्सव करण्यापासून कार्यसिद्धि काय होते हें पाहूं. श्रीयुत तात्यासाहेबांनीं म्हटल्याप्रमाणें, जुनी ऐतिहासिक आठवण ही एकाद्या नंदादीपासारखी होय. श्रीराम, श्रीकृष्ण यांचे जन्मोत्सव आपण सालोसाल करतोंच ना ? विक्रमादित्याचा उत्सव नुकताच हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं साजरा केला गेला, तो कशासाठीं ? अशा उत्सवांमुळें आपल्या पूर्वजांविषयींचा आदर सहाजिकच उचंबळून येतो, व उच्च गुणांचा संचार आपल्यांत झाल्यावांचून राहात नाहीं. Carlyle च्या Hero and Heroworship या ग्रंथांत यासंबंधीं भरपूर विवरण आहे व Heroworship ही किती जरूरीची व महत्त्वाची बाब आहे, हें लक्षांत येतें. जगांतील प्रत्येक राष्ट्रानें–अमेरिका काय, इंग्लंड काय, फ्रान्स काय, ग्रीस व इटली काय–आपले जे शूर, मर्द पूर्वज होऊन गेले, त्यांचीं प्रचंड स्मारकें करून व उत्सव अव्याहत चालू ठेवून, तरुण पिढीला सतत योग्य मार्गदर्शन व्हावें, म्हणून प्रयत्न चालू ठेवले आहेतच. त्याप्रमाणेंच, आपल्या ह्या आनंदभुवनांत आपण प्रयत्न सतत केले पाहिजेत. श्रीशिवाजी महाराजांच्या राज्यांतील अत्यंत महत्त्वाचा भूप्रदेश म्हणजे तोरणा, राजगड, रोहिडा, रायरेश्वर, हे सर्व आमच्या संस्थानांत आहेत; व त्यामुळें साहजीकच आम्हास नेहमीं विशेष आनंद होतो. त्या किल्ल्यांचें दर्शन म्हणजे गतवैभवाची आठवण व गतवैभवाची आठवण म्हणजे आजच्या स्थितीची जाणीव.

स्वराज्य-कालातील तोच भूप्रदेश, त्या वेळच्या राजकीय आंदोलनांत, पुन्हां मोगलांकडे गेला; पण, या संस्थानचे संस्थापक, आमचे पूर्वज ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण, यांनीं आपल्या अतुल शौर्यानें व संघटना-चातुर्यानें तोच मुलूख पुन्हां मोगलांपासून घेऊन कायमचा मुक्त केला; व त्याचमुळें आज आपण हा समारंभ येथें साजरा करूं शकत आहोंत. माणिक मिळविणें हें तर कठीण खरेंच; पण, गिळलेलें माणिक परत मिळविणें हें दुर्घट होय. श्रीशंकराजी नारायण यांनीं हें असाध्य तें साध्य करून आपलेंही अलौकिक व्यक्तिमत्व चिरंजीव करून ठेविलें आहे, हें नमूद करण्यास आम्हास सहाजिकच मोठा अभिमान वाटतो. भोर संस्थानचे संस्थापक शंकराजी यांचे आजोबा मुकुंदपंत गांडेकर मोगलाईंतून पोट भरण्यासाठीं मांगदरी या खेडेगांवीं आले. सदरील मांगदरी गांव या समारंभाच्या जागेपासून ३-४ मैलांवरच असल्यानें, या प्रसंगीं त्याची आठवण आम्हास झाल्यावांचून रहात नाहीं. मुकुंदपंतांचा मुलगा नारो यानें शिवाजीमहाराजांची आपल्या कामामुळें चांगली मर्जी संपादन केली व त्यानें सन १६७७ सालीं प्रतापगडावर महाराज असतांना आपल्या अल्पवयी मुलाला, शंकराजीला, घेऊन महाराजांच्या पायांवर घातलें. शंकराजीची तरतरी, हुशारी व तडफ पाहून त्या वेळचे पेशवे मोरोपंत पिंगळे यांनीं त्यास नोकरीस लागलीच ठेवून घेतलें. राजाराम महाराज जिंजीला असतांना शंकराजी नारायण यांनीं जी मुलुखगिरी करून मराठ्यांचा ढासळणारा व नामशेष होऊं पहाणारा दरारा व लौकिक आपल्या शौर्यानें राखला व मराठ्यांची झालेली जी पांगापांग मोठ्या चातुर्यानें नाहींशी करून त्यांची संघटणा उत्तम प्रकारें केली, यामुळेंच राजाराम महाराजांचें दक्षिणेंत पुनरागमनाचें कार्य सुकर झालें. राजाराम महाराज हे इकडे आल्यावर, त्यांनीं आपण होऊन खरा कर्मवीर, योद्धा व मुत्सद्दी असा शंकराजी नारायण आहे, हें लक्षांत घेऊन यांस अष्टप्रधानांपैकीं महत्त्वाच्या सचिवपदाच्या मानाच्या जागेवर बसवून, त्यांच्या इतमामाप्रमाणें जहागिरी, मानमरातब व 'मदार-उल्-महाम' हा किताब देऊन त्यांचा यथोचित गौरव केला. हें उदाहरण पाहिलें, म्हणजे खरी स्वामिभक्ति व खरा उदार धनी कोणाला म्हणावें, हें सहज कळून येतें. पुढील राजकीय आंदोलनांत जरी कांहीं मराठे घराणीं पुढें सरसावलीं, तरी मूळ मानाच्या दृष्टीनें सचिवपदाची थोरवी ही स्वतंत्र असल्यानें, व आम्हीही त्याच घराण्यांतील असल्यानें, आम्हास एक प्रकारचा विशेष स्वाभिमान वाटतो.

शिवरायांच्या त्या कालीं हिंदुधर्म हा पराकाष्ठेच्या निकृष्टावस्थेला पोंहोचला होता. रामदासांनीं आपल्या अमोघ वाणीनें चैतन्य उत्पन्न करून स्वधर्मरक्षणासाठीं स्वराज्य असणें किती जरूर आहे, हें लोकांस पटवून दिलें. शिवाजी राजांनीं:—

श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥

या वचनांचें पालन पूर्णत्वें करून आपला व महाराष्ट्राचा बोलबाला त्रिखंड केला.

अशा उत्साहवर्धक व आनंददायक समयीं जितकें बोलावें तितकें थोडेंच; म्हणून, बोलण्याचा मोह आवरून आपणां सर्वांचे पुन्हा एकवार मनःपूर्वक आभार मानून व या त्रिशतसांवत्सरिक समारंभाचे दूरगामी व हितकर परिणाम होवोत, अशी प्रभू श्रीरामचंद्र यांची विनम्र भावानें प्रार्थना करून, आम्ही आमचें अध्यक्षीय भाषण पुरें करितों.

---

## परिशिष्ट १३

### Speech of Shrimant Raja Saheb at the time of the Opening Ceremony of the Bombay Provincial Secondary Teachers' Conference at Poona on 4th Nov. 1939.

Ladies and Gentlemen,

I feel great pleasure in declaring open the exhibition held in connection with the 4th session of the S. T. Conference of this Presidency. When Dr. Paranjapye and Prof. Naralkar came to me with an invitation to perform this pleasant task, I accepted it with a view to come in contact with those who are working in the educational field and in a way shaping the destiny of the country, with a desire to know what progress Secondary Education is making in this Presidency and to see, if possible, by what ways and means it is being advanced. I am pleased with what little I could see of your activities in general and of the means used in schools in particular to help the all-sided growth of the pupils and thus to advance the cause of the Secondary Education, from every point of view.

This pleasure is enhanced by the significant fact that the exhibition is held in a place which is justly styled 'The Fountainhead of learning in the Bombay Presidency and the nucleus of the various educational and literary activities.' To say that the City of Poona boasts of many institutions, that have given a lead to others of the same type and have influenced the educational activities of other places, is but to express a familiar statement in the mildest term. I may, in passing, refer to the outstanding feature of these institutions that those, who worked in them and for them, with a sincerity and sacrifice that few possess, have also helped in no small degree, the social, political and literary advancement of the country. It is, therefore, in my opinion, a rare pleasure for me to find that the conference, of which this exhibition forms a part, is, in the fitness of things, held in this historical place and the exhibition too housed in the High School, which has as its founder the late Vishnu Shastri Chiplunkar, that renowned writer of Maharashtra.

To many of you, who are interested in the progress of education and particularly that of the Secondary Schools, the importance of this exhibition, displaying the various activities of the pupils, whose interest you have at heart, need not be pointed out. It is gratifying to note that all of us are gradually, though rather late, realising the importance of "practical work" on the part of the pupil. A time there was when the teachers dealt, more or less, with books, with words and with ideas. We have, however, come to realise, with the progress of education and its democratisation, that though books are necessary as a record of the experiences of the ages gone by, the pupil, during his school-career, should necessarily come in contact with things, with facts and the realities of life. Educationalists have understood the importance of making pupils do things and learn them through actual contact with them. You know that ordinary text-book instruction appeals to only one side of the pupil and in the case of the backward, the appeal is, in most cases, ineffective. Hand-

work, in which the boy 'creates', appeals to many, and in the case of the dull boy it proves the means of improving the quality of his mental activities by teaching him to use his hands to aid his mental process. Besides, making the pupil self-reliant, active and creative, it makes him interested in manual work, which, to a few educated, still appears to be undignified. This principle of self-activity and self-expression, which this exhibition symbolises, is, if I mistake not, the basis upon which the present 'Wardha System' rests. Certainly, 'he who wants his head clear must have his hands hard.'

The exhibition, besides, reminding us of what pupils can do, if proper encouragement is given to them, will provide us opportunities to discover the creative aptitudes of each child, which may help him in later life, when the child grows into the fulness of powers. It should not be forgotten that culture and mental power can both be developed by means of such practical work and that mental power is not exclusively synonymous with literary education. However, I think that a teacher, who merely looks upon such exhibits or practical work as merely exercises in which the pupil may gain or increase skill in handling tools or joining or disjoining certain parts or encourages him to do these things, so that it might help him in later life, is going too far. Our aim in encouraging the pupil to do such 'exhibits' should be to educate him to increase muscular skill, to develop some ability to do and to make things and to train him that he may use his leisure-time well and worthily, to the end that he should see and create beauty in his work, realise the interdependence of the things all around and see the links that bind them together, rendering them useful, beautiful and therefore joyful.

There are in this exhibition, besides the exhibits of pupils, certain articles, such as charts, maps and other educational devices, which may be useful and thought-provoking to the teachers themselves. I trust that the teaching profession will make the best of this exhibition, whose careful inspection will solve many of their difficulties and enlighten them on

many points. Even to those, who are outside the field of education, it may interprete its activities and methods, in a clear and convincing way and impress upon them the necessity of appreciating and encouraging the workers in every possible way.

Before I conclude, I have to express my thanks to you for the honour you have done me in asking me to open the exhibition and in giving me an opportunity to learn from you and to talk to you on this occasion. I am very glad to find that you are moving with the times and doing your best to help the cause of Education and thus shape the greater India that is to come.

---

## परिशिष्ट १४

हुजूरपागेंतील बक्षिस-समारंभाच्या वेळचें श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांचें भाषण. ता. २२ डिसेंबर १९३९ इ.

महाराष्ट्रीय कन्या-शिक्षण-मंडळाचे सभासद व सभ्य स्त्रीपुरुषहो,

आपण या संस्थेचा आजचा वार्षिक बक्षिस-समारंभ आमच्या अध्यक्षत्वाखालीं करण्याचें ठरवून आमचा जो एक प्रकारें बहुमान केला, त्याबद्दल आम्ही आपले प्रथम मन:पूर्वक आभार मानतों.

आम्ही युवराज असतांना पुण्यास होतों, त्या वेळेपासून व त्यानंतरही आपल्या या संस्थेच्या शिक्षणविषयक कार्याकडे आमचें लक्ष असे. संस्थेचें ध्येय उच्च असून, कार्यपद्धतीही चांगली असल्याविषयीं दुमत असण्याचें कारणच नाहीं. आमच्या सूनबाई चि. सौ. माईसाहेब यांचेंहि शिक्षण याच शाळेंत झालें आहे. येथील शिक्षणपद्धति उत्कृष्ट असल्याची आमची खात्री असल्यानें, आम्हीं आमची कन्या चिरंजीव पद्मावतीबाई इजला व आमच्या नाती यांना या संस्थेंत शिक्षण घेण्यास पाठवीत असतों. या गोष्टीनें या संस्थेविषयींचें आमचें मत आपणांस कळून येणार आहे. शिक्षण व व्यवहार यांची फारकत असूं नये, हें अत्यंत महत्त्वाचें व हितकारी असें तत्त्व ध्यानांत घेऊन, येथील शिक्षणक्रम, कन्याजनांच्या भावी आयुष्यांतील गरजा व परिस्थिति यांकडे लक्ष देऊन, विविध व उपयुक्त प्रकारचा आखला आहे, ही गोष्ट प्रशंसनीय आहे; बौद्धिक

शिक्षणाच्या बाबतींत या शाळेची कामगिरी स्पृहणीय असते. यंदाहि शाळेचा मॅट्रिकचा व तसेंच इतर वर्गांचेहि निकाल तदनुरूप उत्कृष्ट असल्याबद्दल कोणालाही आनंदच वाटणार आहे. त्याचप्रमाणें येथें शारीरिक शिक्षणाकडे जरूर तेवढें लक्ष दिलें जातें, व विविध प्रकारच्या खेळांमध्येंही या शाळेंतील विद्यार्थिनींनीं यश संपादन केलें आहे व Shield विजयाची ढाल मिळवून आपलें नैपुण्य प्रकट केलें आहे, याची आज आनंददायक आठवण होणें साहजिक आहे. निरोगी व सुदृढ शरीरांतच सद्विचार परिणामकारकरीत्या राहूं शकतात. तुम्ही मोठ्या विद्वान झालांत व पदव्या मिळविल्यात, पण तुम्ही निरोगी व बलसंपन्न नसाल, तर त्या विद्वत्तेचा तुह्माला व समाजाला कांहीं एक उपयोग नाहीं हें पक्कें समजा. तेव्हां, संस्थेनें केलेल्या शारीरिक शिक्षणाच्या सोयीचा याच वयांत पूर्ण फायदा करून घ्या, असें आमचें तुह्मांस सांगणें आहे. याशिवाय, स्वयंपाकादि गृहव्यवस्थाशास्त्र-विषयांचें, तसेंच शिवणकला, जरतारी, भरतकाम, गायन, चित्रकर्म इत्यादि हस्तव्यवसायांचें ज्ञान मुलींना व्यावहारिक दृष्ट्या उपयोगी पडेल अशा रीतीनें दिलें जातें, ही संतोषाची गोष्ट आहे. त्यांत विशेष-रीत्या उल्लेखनीय अशी गोष्ट म्हणजे उच्च वर्गांतील मुलींना प्रचलित विषयांचें योग्य व थोडक्यांत ज्ञान व्हावें, त्याबद्दल त्यांना विचार करण्याची संवय लागावी व तत्संबंधीं आपले विचार समाजांत सभाधीटपणानें व परिणामकारक पद्धतीनें बोलून दाखविण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत उत्पन्न व्हावें, म्हणून वादविवाद-मंडळाची सोय करून दिली आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. इतकेंच नव्हे, तर विशेष कौतुकाची व अत्यंत आनंदाची गोष्ट ही कीं, अन्तर्शालेय वक्तृत्वाच्या चढा-ओढीच्या मोठ्या सामन्यांत या शाळेंतील विद्यार्थिनींनीं भाग घेऊन त्यांतही पहिला नंबर पटकावून वक्तृत्वकलेंतहि वैयक्तिकरीत्या आपलें प्राविण्य दाखवून आपल्या शाळेचें नांव त्याही बाबतींत पुढें आणलें आहे, ही अभिमानाची गोष्ट आहे. मुलींनो, तुमच्या मनांत पुष्कळ सुविचार आहेत, पण ते इतरांच्या मनांत कसे भरवावे याचें कौशल्य तुमच्याजवळ नसलें, तर ते सुविचार असून नसून सारखेच आहेत. याकरतां, बहुश्रुत व्हा व त्याचबरोबर वक्तृत्वकला संपादन करा, असें आमचें तुम्हांस आग्रहाचें सांगणें आहे.

यानंतर, आम्हांस विशेषरीत्या कौतुकाची गोष्ट ही वाटत आहे कीं, संस्थेच्या अधिकारक्षेत्रांतील शाळांचें स्वरूप Cosmopolitan आहे व त्यांत शिक्षण घेण्याऱ्या मुलींच्या ठिकाणीं सार्वजनिक कार्य करण्याची आवड उत्पन्न व्हावी आणि ती फलद्रूप होण्यास सहकार्यानें व संघटनेनें कार्य करण्याचा सुरुवातीचा धडाही येथेंच मिळावा, या उद्देशानें House System चा उपक्रम केला आहे, ही मोठी आशादायक गोष्ट आहे. तात्पर्य, The School can rightly be said to be a model one असें या शाळेचें वर्णन यथार्थ आहे.

सभ्य स्त्री-पुरुषहो, जीवनार्थ कलह यशस्वी रीतीनें चालविण्यांत शारीरिक, मानसिक व नैतिक दृष्ट्या मनुष्य प्राण्यास तयार करणें हें शिक्षणाचें ध्येय आहे. स्त्रीशिक्षणाचें अंतिम ध्येय स्त्री-जातीस अनुरूप असेंच असलें पाहिजे. बुद्धिमत्तेच्या अथवा आर्थिक सुस्थितीच्या दृष्टीनें अपवादात्मक अशा कांहीं स्त्रियांचें जीवनवृत्त वगळल्यास, आपल्या सर्वसामान्य आर्यकन्यकांचें संसार हेंच कर्तव्यक्षेत्र आहे; व म्हणूनच, Perfect Woman चें म्हणजे आदर्श मातेचें ध्येय आमच्या आर्य-कन्यकांनीं आपल्यापुढें असूं द्यावें असें आम्हीं म्हटल्यास, तें अयोग्य होईल असें आम्हांस वाटत नाहीं. स्त्री-शिक्षणाची मांडणी, हें ध्येय स्त्रीजनांस सुलभ करील, अशीच असली पाहिजे, असें आमचें प्रांजल मत आहे.

विद्यार्थिनींनो, या संस्थेचा लौकिक तुम्ही, येथून शिक्षण घेऊन बाहेर पडल्यावर, व्यवहारांत ज्या प्रकारें वागाल, त्यावर अवलंबून आहे, हें लक्षांत ठेवा. सर वेडर्बर्न, न्यायमूर्ति रानडे, डॉ. भांडारकर, नामदार गोखले, इत्यादि अनेक दिवंगत पुण्यात्म्यांच्या सदिच्छेनें व प्रयत्नानें सन १८८४ इसवी सालीं स्थापन झालेल्या व आज भरभराटींत असलेल्या या शाळेंत शिक्षण घेण्याची सुसंधि तुम्हांस लाभली, ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे असें समजा. अशाच स्वरूपाच्या बक्षिस-समारंभाच्या वेळीं या शाळेंतील विद्यार्थिनींना उद्देशून, 'पाश्चात्य देशांतील लोकांचें अंधानुकरण करूं नका, त्यांच्या शिक्षणविषयक प्रयोगांकडे पहा, त्यांतलें चांगलें असेल, तेवढेंच घ्या व आपलें उच्च ध्येय व सत्व गमावूं नका' असा जो बहुमोल उपदेश केला आहे, तो सदैव डोळ्यांपुढें असूं द्या. ज्यांना आज बक्षिसें मिळालीं आहेत, त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों; तसेंच, इतर

विद्यार्थिनींना आमचें सांगणें आहे कीं, त्यांनीं झटून अभ्यास करावा म्हणजे त्यांनाही अशींच बक्षिसें मिळतील.

सभ्य स्त्रीपुरुषहो, शाळेच्या एकंदरींतच्या या वर्षीच्या सुयशाबद्दल व प्रगतीबद्दल लेडी सुपरिंटेंडेंट कुमारी वेणूबाई पानसे यांचें व त्यांच्या हाताखालील सर्व स्त्री-पुरुष शिक्षकवर्गाचें आम्ही मोठ्या आनंदानें हार्दिक अभिनंदन करून, शाळेची व संस्थेची अशीच उत्तरोत्तर अनेक प्रकारें वाढ होवो अशी श्रीरामचंद्र-चरणीं आम्ही प्रार्थना करितों.

शेवटीं, आजच्या या मानाबद्दल संस्थेच्या मंडळाचे पुन्हां एकवार आभार मानतों आणि या शाळेंत शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या युवती आपल्या उभय-कुळांस व समाजास ललामभूत होवोत असा सर्व कन्यकांना शुभाशीर्वाद देऊन आम्ही आपलें भाषण पुरें करतों.

---

## परिशिष्ट १५

आरोग्यमंडळ, पुणें, या संस्थेच्या रौप्य-महोत्सव-समयीं सभेचे अध्यक्ष या नात्यानें श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेलें भाषण.

ता. २५-३-१९४०.

सभ्य स्त्री-पुरुषहो,

आरोग्य मंडळाच्या रौप्य-महोत्सव-समारंभाचें अध्यक्षस्थान आम्हाला देऊन आपण जो आमचा आज बहुमान केलात व येथें आमचें जें स्वागत केलेंत, त्याबद्दल आम्ही मनःपूर्वक आपले आभार मानतों. या समारंभास उपस्थित झालेला हा येथील नामांकित व्यक्तींचा जनसमुदाय पाहून आम्हास आनंद वाटणें साहजिक आहे. त्यांतल्या त्यांत विशेष संतोषाची गोष्ट ही कीं, हा बहुजनसमाज मंडळाच्या ध्येयाशीं सहमत व सहकारी असलेल्या भिन्न मतांच्या व निरनिराळ्या व्यवसायक्षेत्रांत काम करणाऱ्या सुप्रसिद्ध व्यक्तींचा असल्यानें, मंडळाच्या कार्याच्या उपयुक्ततेबद्दल व चिरस्थायित्वाबद्दल आतां कसलाच संशय उरलेला नाहीं, याचेंच हें निदर्शक आहे असें आम्ही समजतों.

सज्जनहो, मंडळाचे अध्यक्ष व इतर सन्मान्य स्त्रीपुरुष-सभासद यांच्या आतां-पर्यंतच्या झालेल्या भाषणांवरून मंडळाचें ध्येय, कार्यपद्धति, कार्याचा विस्तार व यश आणि भावी आकांक्षा यांविषयींची समुचित कल्पना आपणास आलीच असेल

व यानंतर प्रकाशित होणाऱ्या रौप्यमहोत्सव-स्मृतिग्रंथावरून तर ती तपशीलवार रीतीनें सर्वांस कळून येणारी आहे. अर्थात्, आम्ही आपल्या भाषणानें त्यांत कांहीं भर घालणार आहोंत अथवा महत्त्वाची किंवा नवी अशी एखादी हकीकत आपणास निवेदन करणार आहोंत असें मुळींच नाहीं; व आपलीही तशी अपेक्षा असणार नाहीं याची आम्हांस खात्री आहे. तथापि, एकतर, मंडळाबद्दल आम्हास आत्मीयता वाटत असल्यानें व दुसरें, मंडळाचें ध्येयही तितकेंच उच्च, महत्त्वाचें सर्वमान्य व सर्वजनोपयोगी असल्यानें, अशा महोत्सवसमयीं मंडळाबद्दलचे आमच्या मनांतील विचार बोलून दाखविणें इष्ट व अवश्य असल्याचें आम्हास वाटत असल्यानें, आपण अनायासें आणून दिलेल्या या सुसंधीचा फायदा आम्ही घेत आहोंत.

सभ्यजनहो, स्वच्छता व आरोग्य हा सर्व उन्नतीचा व सुखाचा पाया आहे. Health is happiness and Health is wealth या दोन म्हणींवरूनच व आपणा सर्वांच्या एतद्विषयक अनुभवावरूनही याविषयीं आणखी जास्त कांहीं सांगितलें पाहिजे, असें नाहीं. स्वच्छता व आरोग्य या शब्दांत वैयक्तिक व सार्वजनिक, अशा दोन्ही दृष्टींचाही समावेश होत आहे. वैयक्तिक स्वच्छता व आरोग्य हीं सार्वजनिक स्वच्छतेस व आरोग्यास परिपोषकच असतात. हीं दोन्ही परस्परांस पूरक म्हणजे Complimentary अशींच आहेत. वस्तुस्थिति अशी असली, तरी व्यवहारांत अनुभव मात्र असा येतो, कीं वैयक्तिक स्वच्छतेचीच खरी कल्पना पुष्कळांना नसते; व ज्यांना ती असते, त्यांना तिचा संबंध सार्व-जनिक स्वच्छतेशीं किती जिव्हाळ्यानें व कोणत्या प्रकारें निगडित आहे हें समजत नाहीं. युरोपांतील अनेक देशांतील लोकांची यासंबंधींची परिस्थिति पहाण्याची आम्हास दोन वेळ संधि आली. त्यावरून सार्वजनिक हितसंबंधाच्या जबाबदारीची जाणीव ( Sense of public good and responsibility ) व त्याचप्रमाणें स्वच्छता व आरोग्य या विषयांबाबतची वैयक्तिक जाणीवही ( Health and Sanitary consciousness ) या दोन्ही संबंधांत आपला समाज पाश्चात्य समाजाच्या फारच मागें आहे असें म्हटल्यास, तें अयोग्य अथवा अति-शयोक्तीचें होईल असें आम्हास वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर मंडळांतील कार्यकर्ती माणसें आपल्या अनुभवावरून आमचें म्हणणें वस्तुस्थितिनिदर्शकच

आहे असें म्हणतील, अशी आम्हास खात्री आहे. अर्थात्, आम्हीं जें वरती तुलनात्मक मत दिलें, त्यावरून यासंबंधांत पाश्चात्य समाज सर्वस्वीं निर्दोष आहे, असें म्हणण्याचा आमचा आशय नाहीं. त्यांच्यांत जें चांगलें आहे, त्याचें अनुकरण व्हावें, याच हेतूनें आम्ही ही गोष्ट प्रामुख्यानें निर्दिष्ट केली आहे, असें आपण समजा.

सद्गृहस्थहो, या मागासलेपणाच्या मुळाशीं आपल्यांतील कित्येक धार्मिक वा सामाजिक विपरीत रूढी व समजुती आहेत, हें आपणांस माहीत आहेच; व त्यांच्याशींच मंडळाला प्रथम झगडावें लागलें; व तसेंच, आपल्या कार्याचा व हेतूचा सोज्वळपणा येथील स्थानिक स्वराज्य संस्थेलाही पटवावा लागला, हेंही आपणांस वेगळें सांगितलें पाहिजे असें नाहीं. तात्पर्य, इतर कोणत्याही संस्थेप्रमाणें व सत्कार्याप्रमाणेंच या मंडळाला आपल्या यशाचा मार्ग, वैयक्तिक व सार्वजनिक विरोध, उपहास, उदासीनता, इत्यादि प्रकारांतून जाऊनच, शोधावा लागला आहे. आम्ही जवळजवळ प्रथमपासून मंडळाचे सभासद होतों, व हल्लींही सल्ला-गार व आश्रयदाते यांच्या यादींत आमचें नांव असलें, तरी राजमान्यता व लोक-मान्यता मिळविण्याच्या कामीं यशाचें श्रेय मंडळांतील दिवंगत व हयात असलेल्या खऱ्या कार्यकर्त्यांनाच आहे, हें कोणीही प्रांजलपणें व कृतज्ञतेनें कबूल करील. या प्रसंगानें आम्हास आमच्याबरोबर मंडळांत असलेले आमचे आप्तसंबंधी कै. श्री. सरदार बाळासाहेब विंचूरकर यांची आठवण होत आहे. आमचे श्वशुर श्रीयुत नाना पुराणिक हेही त्या वेळीं मंडळाचे प्रमुख सभासद होते, व हल्लींही आहेत. त्याचप्रमाणें आरोग्यमंडळाच्या त्या वेळच्या शहरतपासणीच्या फेरीची व त्यासंबंधीं ज्ञानप्रकाश वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होणाऱ्या मनोरंजक व उद्बोधक ( Interesting and informative ) हकीकतीची आमची स्मृति आज जागृत होत आहे. इतकेंच नव्हे, तर आम्हास अगदीं ताज्या गोष्टीप्रमाणें स्मरत आहे, कीं मंडळाची फेरी एकदां आमच्या वाड्यांत आली होती व वाड्यांतील व त्याच्या आसपासच्या स्थितीबद्दल वर्तमानपत्रांत एक टीकालेखही आला होता. आम्ही त्या टीकेकडे चांगल्या दृष्टीनेंच पाहिलें; कारण, तिचा हेतु व आशय ( Spirit ) चांगलाच होता. नित्याच्या परिचयानें एकाद्या वाईट गोष्टींतील दोष आपल्या लक्षांत येणार नाहींत; ते लक्षांत आणण्यास व त्यांत दुरुस्ती होण्यास अशा त्रयस्थांचा व त्यांच्या पाहणीचा फार उपयोग होतो, असा आमचा अनुभव आहे.

तात्पर्य, मंडळाला निःस्वार्थी, उत्साही व तज्ज्ञ कार्यकर्त्यांची कधींच उणीव भासली नाहीं, ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे; म्हणूनच, आजचा आनंदाचा दिवस आपणांस पाहतां आला. मंडळाच्या कार्याकडे आमचें सदैव सहानुभूतीचें लक्ष आहे, हें आम्ही वेगळें सांगितलें पाहिजे असें नाहीं.

शेवटीं, आजच्या दिलेल्या सन्मानाबद्दल पुन्हा एकवार आपले आभार मानून व मंडळाला वाढतें यश प्राप्त होवो, अशी श्रीरामचंद्रप्रभूच्या चरणीं प्रार्थना करून, रौप्य-महोत्सवग्रंथ प्रकाशित केल्याचें आम्ही आनंदानें जाहीर करतों व आपली रजा घेतों.

---

## परिशिष्ट १६

पुणें अनाथ हिंदु महिलाश्रमाच्या इमारतीच्या उद्‌घाटन-समयींचें श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण. ता. १४-८-१९४० इ.

हिंदु महिलाश्रमाच्या कार्यकारी मंडळाचे सन्मान्य सभासद व सभ्य स्त्रीपुरुषहो,

आपण आज या ठिकाणीं आमचें जें स्वागत केलेंत व आजच्या कार्याचें अध्यक्षस्थान आम्हांला देऊन आमचा जो गौरव केलात, त्याबद्दल आम्ही आपले सानंद आभार मानितों. आमचें हें म्हणणें केवळ औपचारिक अशा स्वरूपाचें नाहीं.

या संस्थेतर्फे चाललेल्या परोपकारी, कालोचित व अत्यवश्यक कार्याची हकीकत वर्तमानपत्रांवरून आम्हास समजत असे. तथापि, तें कार्य प्रत्यक्ष पाहावें अशी आमची फार दिवसांची मनीषा होती. ती आपण आणून दिलेल्या या सुसंधीमुळें आज फलद्रूप झाली असल्यानें, आम्हास एक प्रकारें कृतज्ञ व संतोषित वाटणें स्वाभाविकच आहे, हें आपणांस कळून येणार आहे.

सभ्य स्त्रीपुरुषहो, संस्थेच्या अस्तित्वास पांच वर्षें झालीं आहेत. या अवधींतील संस्थेच्या कार्याचीं मागील चार वर्षांचीं इतिवृत्तें आम्हीं सर्व वाचलीं आहेत. या वर्षाचें वृत्तही आतांच्या भाषणावरून व रिपोर्टावरून सर्वांस कळून आलेंच आहे. यावरून, संस्थेच्या कार्याच्या अत्युपयुक्ततेची व जरूरीची कोणासही कल्पना येणार आहे. संस्थेनें अवघ्या चार अनाथ स्त्रिया व चार पोरक्या अर्भकां-

पासून कार्यास प्रारंभ करून आज स्त्रिया व मुलें मिळून त्याच्या दसपट इतक्या अनाथांचें पालन-पोषण संस्था करीत आहे, ही निःसंशय कौतुकास्पद गोष्ट आहे. आजपर्यंत एकूण ३८० निराश्रित स्त्रिया व मुलें यांना संकटांतून मुक्त करून संस्थेनें स्वावलंबी बनविलें, हें कार्य कोणीही अभिनंदनीय असेंच मानील. पीडितांचें रक्षण करण्याच्या कामीं स्वतःच्या प्राणाचीहि पर्वा न करणाऱ्या या आर्यावर्तातील प्राचीन शिबिराजाचे तत्संबंधींचे उद्‌गार हेंच संस्थेनें आपलें ध्येय-वाक्य म्हणून घेतलें असल्यानें, तिच्या कार्याच्या चांगुलपणाबद्दल वेगळें कांहीं सांगितलें पाहिजे किंवा त्यास कोणाचे शिफारसपत्राची जरूरी आहे, असेंही नाहीं. 'अन्नदाता भयत्राता' या श्लोकांत जे पांच प्रकारचे पिते सांगितले आहेत, त्या सर्वांचें मिळून कार्य ही संस्था करीत असल्यानें, खरोखरच हें अनाथांचें केवळ आश्रयस्थान नव्हे, तर अभ्युदयस्थानही आहे, असें म्हटल्यास, वस्तुस्थितीचें तें निदर्शक असेंच होणार आहे. पतित-परावर्तन व या पद्धतीचें अनाथसंरक्षण हीं दोन्ही कार्यें परस्परपूरक आहेत. संस्थेच्या कार्यकारी मंडळांत सर्व मतांचे समाजधुरीण असून, संस्था रजिस्टर्ड आहे. शिवाय, सर्टिफाइड स्कूल अशी राजमान्यताही तिला मिळाली आहे. तसेंच, संस्थेचें कार्य उत्कृष्टपणें चालल्याविषयीं तज्ज्ञांचेही अभिप्राय असून, आमचीही त्याविषयीं खात्री आहे. अशा या स्थितींत बहुजनसमाज व विशेषतः त्यांतील धनिक, उदारधी व समाजहितेच्छु मंडळी, यांच्या आश्रयास ही जातिपक्षभेदातीत, सर्वजनोपयोगी व वर्धिष्णु कार्य करणारी संस्था आहे असें आमचें प्रांजल मत बोलून दाखविण्यास आम्हांस यत्किंचित्‌ही प्रत्यवाय वाटत नाहीं.

सभ्य स्त्रीपुरुषहो, आपल्यांत दानधर्माकडे प्रवृत्ति नाहीं असें मुळींच नाहीं. मुख्य प्रश्न आहे, तो या प्रवृत्तीचा ओघ योग्य मार्गानें वळविण्याचा आहे. 'योजकस्तत्र दुर्लभः' हीच काय ती अडचण आहे. 'देशे काले च पात्रे च' या गीतावचनाप्रमाणें आमच्या लोकांना सात्त्विक दानधर्माची कल्पना यावी तितक्या प्रमाणांत आलेली नाहीं; व ज्या थोड्यांना ती आली आहे, त्यांच्या बाबतींतही त्यासंबंधीं जेवढा जिव्हाळा, जेवढी तीव्रता व जेवढें कार्यप्रवणत्व दिसून यावयास पाहिजे, तेवढें दिसून येत नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागत आहे. तथापि, यासंबंधांत अलीकडे बरीच जागृती झाली आहे, व

तिचा फायदा घेऊन योग्य प्रकारें विनियोग करणाऱ्या या संस्थेसारख्या संस्था निघाल्या आहेत, हें हिंदुधर्मीयांच्या भावी उन्नतीच्या आशेचें सुचिन्हच आहे असें आम्ही समजतों; व अशा संस्था सर्वत्र निघोत असें इच्छितों.

सभ्य स्त्रीपुरुषहो, आतां एकाच बाबीसंबंधीं आम्ही आमचे विचार निवेदन करून, हें भाषण संपविणार आहोंत. हे विचार म्हणजे आम्ही कांहीं अपूर्व सांगणार असें मुळींच नाहीं. ते विचार आपणांसारख्या हिंदुसमाजहित-चिंतक, विद्वान् व कार्यकर्त्यांच्या मनांत घोळत असलेच पाहिजेत, नव्हे आहेतच अशी आमची खात्री आहे. तथापि, 'विवरिलें, तेंची विवरावें' या समर्थवचनाप्रमाणें अभीष्टसिद्धि होईपर्यंत ते विचार पुन्हां सर्वांसमोर मांडणें योग्य होणार असल्यानें, आम्ही तसें करीत आहोंत. सद्गृहस्थहो, आपण हा आश्रम स्थापून विपद्-ग्रस्तांना हात देऊन हिंदुधर्मीयांच्या संख्येंत घट येऊं नये, याविषयीं जी आस्थे-वाईकपणें व धर्माभिमानमूलक योजना केली आहे, तिच्या युक्ततेबद्दल दुमत असण्याचें कारणच नाहीं. तरी पण, आपणास माहीत आहेच कीं, 'Prevention is better than cure' रोग-निवारणाच्या कार्यापेक्षां रोगोत्पत्तीच न होईल अशी योजना करणें जास्त श्रेयस्कर आहे. समाजस्थैर्याला स्त्रीजनाच्या संरक्षणाची व चारित्र्यसंपन्नतेची किती मूलभूत आवश्यकता आहे, हें गीतेंतील 'स्त्रीपु दुष्टासु' या अर्जुनाच्या म्हणण्यावरून दिसून येत आहे. अर्थात्, स्त्रिया आपद्-ग्रस्ततेमुळें धर्मभ्रष्ट व शीलभ्रष्ट होऊन समाजास लागणारी गळती थोपवून धरण्याचें कार्य संस्था करीत आहे, तें केव्हांहि व कोणीहि प्रशंसनीय मानीलच. पण, मुख्य प्रश्न आहे कीं, ही गळतीच बंद झाली पाहिजे. हें छिद्रच बुजविलें पाहिजे. संस्थेचे अहवाल जे आम्हीं वाचले आहेत, त्यांवरून विधवांपेक्षां परि-त्यक्त सधवांचीच संख्या संस्थेंत येणाऱ्यांत जास्त असते, असें दिसतें. असें कां व्हावें? हा महत्त्वाचा व मूलग्राही प्रश्न आहे. स्त्रिया व अर्भकें यांच्यावर अनाथ-त्वाची पाळी कां यावी, व तशी न येण्यास काय केलें पाहिजे, यांचा सर्वांनींच व्यापकदृष्टया विचार करणें अत्यवश्य व निकडीनें क्रमप्राप्त झालें आहे.

कायदा व समाजशास्त्र यांशीं परिचित असलेल्या आपणांसारख्यांनीं हा प्रश्न सोडविला पाहिजे. या बाबतींत कायद्यानें जेवढें करितां येण्यासारखें आहे, तें कायदे करून घडवून आणिलें पाहिजे. कायद्याचे हात पोंचत नाहींत,

तें क्षेत्र जनतेच्या समजुतींत व सारासारविचारशक्तींत इष्ट तो फेरबदल घडवून आणून, तशी कल्पना लोकमतांत रुजवून, ती वाढीस लावून व तशा रूढी पाडून निर्वेध व निर्भय केलें पाहिजे. 'सुक्षेत्रे पतितं बीजं' या न्यायानें आपणांसारख्यां-पुढें हे विचार मांडल्यास, ते निरर्थक होणार नाहींत, या दृढ भावनेनें आम्हीं यासंबंधींचे आमचे विचार आपणांपुढें ठेविले आहेत. त्यांचा योग्य परामर्ष आपण घ्याल अशी उमेद आहे. रोग होणें अशक्यप्राय करणें हेंच उद्दिष्ट असलें पाहिजे, व त्या दृष्टीनेंच समाजाची मांडणी केली पाहिजे. मात्र, तें साध्य होईपर्यंत, रोग-निवारणार्थ कांहींच न करणें हेंहि योग्य होणार नाहीं. तशी सुस्थितीची मांडणी समाजाची होईपर्यंत, ज्याप्रमाणें रुग्णावस्थेंत दवाखाने व इस्पितळें यांची गरज आहेच, तशीच या संस्थेसारख्या संस्थांची आज आवश्यकता आहे, हें कोणीहि कबूल करील. तेव्हां, आपल्या संस्थेची सर्व प्रकारें वाढ व सुसंपन्नता होवो, अशीच केव्हांहि आमची इच्छा आहे.

शेवटीं, आपण आम्हांस आज दिलेल्या या मानाबद्दल पुन्हा आपले सानंद आभार मानून व ईश्वरचरणीं संस्थेचें सदैव वर्धिष्णु शुभ चिंतून, आम्ही आपली रजा घेतों.

---

## परिशिष्ट १७

डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आश्रयाखालील पुणें येथील मुलींच्या इंग्रजी शाळेच्या द्वितीय वार्षिक सामाजिक संमेलनप्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें श्रीमंत सरकार राजेसाहेब यांनीं केलेलें भाषण.

ता. १८-१-१९४१

डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या व्यवस्थापक मंडळाचे सभासद व सभ्य स्त्रीपुरुषहो,

सोसायटीच्या आश्रयाखालील मुलींची इंग्रजी शाळा, पुणें, या संस्थेच्या द्वितीय वार्षिक स्नेहसंमेलनसमयींच्या बक्षिस-समारंभाचें अध्यक्षस्थान आम्हांस देऊन आपण आज आमचा जो गौरव केलात, त्याबद्दल प्रथम आपले अंतःकरण-पूर्वक आम्हीं आभार मानतों. या संस्थेच्या कमिटीचे चेअरमन प्रोफेसर आपटे यांनीं संमेलनाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयीं आम्हांस विनंति केली, त्या वेळीं, अशा प्रसंगीं ज्या योग्यतेची व्यक्ति प्रमुखस्थानीं असावी लागते, तशी शिक्षण-

विषयक योग्यता आमच्या ठिकाणीं नसल्याचें आम्ही जाणत असल्यानें, त्यांना होकार द्यावा कीं कसें, हा आम्हांस मोठाच विचार पडला. कारण, डॉक्टर रँग्लर आप्पासाहेब परांजपे किंवा प्रिन्सिपाल वैजनाथपंत राजवाडे, इत्यादि मंडळीप्रमाणें आम्ही मोठे विद्वान् किंवा शिक्षणतज्ज्ञ नाहीं, याची जाणीव आम्हांस होती व आहे. इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष नसलों, तरी अप्रत्यक्षतः आम्ही त्यांचे शिष्यच आहोंत व त्यांच्यापासून आम्हांस शिकण्यासारखें पुष्कळच आहे असें आम्ही अजूनही समजतों. त्याचप्रमाणें श्री. प्रो. आण्णासाहेब कर्वे किंवा कै. बाबासाहेब देवधर वगैरेंच्याप्रमाणें स्त्रीजनांच्या शैक्षणिक व सामाजिक उन्नती-प्रीत्यर्थ अहर्निश कळकळ बाळगून झटणारे असेही आम्ही नाहींत, याचीही कल्पना आम्हांस होती. तथापि, इतकें मात्र आम्ही खात्रीनें सांगूं शकतों कीं, शिक्षण या विषयाबद्दल आम्हांस आवड असून, स्त्रीशिक्षणाची सर्वांगीण वाढ व्हावी, ही इच्छा आमच्या ठिकाणीं जागृत असल्यानें, त्या हेतूचा पुरस्कार करून कार्य करणाऱ्या संस्था अवलोकन कराव्या असें आम्हांस वाटतें. म्हणून, त्या दृष्टीनें चालून आलेली ही संधि वायां घालवूं नये अशा उद्देशानें, स्त्रीशिक्षणा-सारख्या पवित्र कार्यास ज्यांनीं आपणांस वाहून घेतलें आहे अशा, आपल्या-सारख्या मंडळींचा परिचय व्हावा, या हेतूनेंच केवळ आम्हीं ही कामगिरी आनंदानें पत्करली, हें आपणांस प्रांजळपणें निवेदन करण्यास आम्हास संकोच वाटत नाहीं. अर्थात्, अशा संमेलनप्रसंगीं अध्यक्षस्थानीं असणाऱ्यानें विद्यार्थिनींना उपदेशवजा चार शब्द सांगण्याची सर्वमान्य प्रथा असल्याप्रमाणें, आम्हीं जें कांहीं या समयीं बोलण्याचें योजिलें आहे, त्यांत आपणांस माहीत नाहीं किंवा आमच्या अनुभवाचें असें नवें कांहीं असेल अशी आमची कल्पना नाहीं, व आपणही तशी अपेक्षा करीत असाल, असें आम्हास वाटत नाहीं. इतका खुलासा प्रथम करून, आम्ही आजच्या कार्याकडे वळतों.

कुलीन स्त्रीपुरुषहो, श्रीयुत पाठक यांनीं आतांच सांगितलेला शाळेचा अहवाल आपण सर्वांनीं ऐकलाच आहे. त्यावरून, स्थापनेपासून अवघ्या दीड वर्षांत संस्थेनें केलेली प्रगति निःसंशय अभिनंदनीय असून, तिच्या यशाचें व भावी उत्कर्षाचें तें सूचक चिन्ह आहे असें म्हणण्यास आम्हास मुळींच प्रत्यवाय वाटत नाहीं. इतकेंच नव्हे, तर थोडक्याच काळांत या संस्थेचें रूपांतर हाय-

स्कूलमध्यें होऊन ही शाळा या शहरांतील नमुनेदार व नांवाजलेल्या स्त्रीशिक्षण-संस्थांपैकीं एक होईल अशी आमची खात्री आहे.

सज्जनहो, स्त्रीशिक्षणाच्या आवश्यकतेबद्दल आतां सर्वांचीच खात्री पटली आहे; तसेंच, शिक्षण व व्यवहार यांची सांगड पाहिजे, म्हणजेच शिक्षणाचा उपयोग व्यवहारांत झाला पाहिजे व तसा करतांही आला पाहिजे, याविषयींही आतां कोठें दुमत राहिलेलें नाहीं. त्या दृष्टीनें विचार करतां, शिक्षणविषयक बौद्धिक भागाबरोबरच शारीरिक शिक्षणाची सोय संस्थेनें केली आहे, ही फार चांगली गोष्ट आहे. त्याचप्रमाणें, शाळेच्या अभ्यासक्रमांत संस्थेनें चित्रकला, गायन, शिवणकाम व गृहव्यवस्थाशास्त्र याही उपयुक्त विषयांचा ऐच्छिक म्हणून समावेश केला आहे; यावरूनच, येथील शिक्षण व्यवहारसन्मुख आहे हें दिसून येत असल्यानें, आम्हास समाधान वाटत आहे. आपल्या समाजांतील सर्वसामान्य मुलींच्या भावी आयुष्यांत तिच्या सभोंवतालची परिस्थिति साधारणतः कशी असते व तिच्या नेहमींच्या गरजा, आकांक्षा इत्यादि कोणत्या असूं शकतील, तें लक्षांत घेऊन त्यांची परिपूर्ति करील असेंच शिक्षण त्यांना दिलें पाहिजे; इतकेंच नव्हे, तर हल्लीं जें आपल्या समाजाचें एक प्रकारचें स्थित्यंतर होऊं पहात आहे, त्याचे दूरवर पोंचणारे परिणाम लक्षांत घेतां, आम्हास असें सुचवावेंसें वाटतें कीं, मुलगे काय किंवा मुली काय, प्रत्येक जण आयुष्याकडे ( Romantic or Idealistic ) कल्पनारम्य अथवा केवळ ध्येयवादी दृष्टीनें न पाहतां, ( Realistic ) वास्तव दृष्टीनें पाहूं लागेल, असेंच शिक्षणाचें ध्येय व तदनुसार त्याची आंखणी असली पाहिजे; तरच, तरुण पिढीला परिस्थितीचें आकलन करून, तिच्यांत शक्य ती सुधारणा घडवून आणून व तिच्यापासूनच आपलें जास्तींत जास्त खरें हित कसें करून घ्यावें तें समजून येईल. या शाळेचे चालक व येथील शिक्षक व शिक्षकिणी हे सर्वच शिक्षणप्रेमी असून त्यांच्या ताब्यांत ज्यांचें शिक्षण दिलें आहे, त्या मुलींच्या भावी हितास व सुखास जपणारें असल्यानें, यासंबंधी आम्ही यापेक्षां तपशीलवार अथवा जास्त विवेचन करण्याची आवश्यकता आहे असें आम्हास वाटत नाहीं.

मुलींनो, तुमच्या गुरुजनांचा कित्ता तुमच्यापुढें नित्य असून, त्यांचें उपदेशामृत व शिक्षण दररोज तुम्हांस मिळतच आहे; सबब, तुम्हांला वेगळें असें कांहीं

आम्हांस सांगावयाचें नसलें, तरी येथील शिक्षणाचा व उपदेशाचा तुमच्या भावी आयुष्यावर मोठाच परिणाम होणार असल्यानें, तें शक्य तितकें जास्त व चांगलें मिळविण्याचा प्रयत्न करा असें आमचें तुम्हांला आग्रहाचें व कळकळीचें सांगणें आहे. आजच्या कार्यक्रमांतील तुमचा Recitations ऊर्फ पाठांतर वगैरे भाग आम्हांस फार आवडला. शालेय पुस्तकांतील अथवा तुमच्या (Supplementary Reading) पुरवणी-वाचनांत येणाऱ्या इतर ग्रंथांतील उत्कृष्ट वेंचे पाठ करण्याची पद्धत अवश्य ठेवा. चांगली भाषासरणी व श्रेयस्कर ज्ञानाचा कायमचा संग्रह, या दोन्ही दृष्टींनीं याचा तुम्हांस पुढें फार उपयोग होणार आहे. तुमच्या बौद्धिक शिक्षणाचें काम उत्तम झालें आहे, हें सर्वच वर्गांच्या परीक्षांच्या निकालांचे तक्ते पाहिल्यानें दिसून येत आहे, ही संतोषाची गोष्ट आहे. ड्रॉइंग ऊर्फ चित्रकला अथवा रेखाकर्म या विषयांतही तुम्हीं आपली निपुणता निदर्शनास आणली आहे, याबद्दल आम्हांस आनंद वाटत आहे. शारीरिक शिक्षणाकडे असेंच लक्ष द्या. A sound mind in a sound body, या तत्त्वाचा केव्हांही विसर होऊं देऊं नका. तुमचीं शरीरें बलसंपन्न व निरोगी असलीं, तरच येथें मिळविलेल्या ज्ञानाचा तुम्हांस आपल्या भावी आयुष्यांत योग्य व सपूर्त उपयोग करतां येणार आहे. संस्थेनें केलेल्या Debating Union म्हणजे वादविवाद-मंडळाच्या सोयीचा अवश्य फायदा घ्या. तुमच्या भावी आयुष्यांत येथें तुम्हीं आत्मसात् केलेल्या वक्तृत्वकलेचा तुम्हांस फार फायदा होणार आहे. गोड व परिणामकारक कसें बोलावें, तें शिका. गृहव्यवस्थेंत प्रथमोपचार व रुग्णशुश्रूषा (First-aid and Nursing) या विषयांच्या तात्त्विक ज्ञानाचें मोठेंच महत्त्व आहे. तें येथें मिळवा. तात्पर्य, आमचें तुम्हा सर्व कन्यांना सांगणें आहे कीं, खऱ्या आर्यकन्यका व्हा. सुगृहिणी व सुमाता होण्याचें अत्युच्च व अति पवित्र असें प्राचीन आर्य कन्यकांचें ध्येय आपल्यापुढें सतत असूं द्या. त्याची विस्मृति केव्हांही होऊं देऊं नका. Life is duty and Duty is beauty and pleasure हेंच तुमचें अढळ ध्येयवाक्य ऊर्फ Ideal असूं द्या. यांतच तुमचें कल्याण आहे. श्रीराम तुम्हाला तशी सुबुद्धि देवो, असें आमचें त्याच्याजवळ मागणें आहे.

सुकन्यांनो, दिवंगत विष्णुशास्त्री चिपळूणकर, लो. टिळक, महर्षि आगरकर, नामदार गोखले इत्यादि नररत्नांनीं प्रस्थापित केलेल्या व जीमध्यें

त्यांपैकीं कित्येकांनीं प्रत्यक्ष शिक्षणदानाचें वगैरे पवित्र व राष्ट्रोद्धारक कार्य केलें आहे, अशा डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या विद्यमानें सुरू झालेल्या अनेक शिक्षणसंस्थांपैकीं, या संस्थेच्या शाळेंत शिक्षण घेण्याचें भाग्य तुम्हास लाभलें आहे, त्याचें उतम चीज करा.

विद्यार्थिनींनो, वार्षिक परीक्षांत पास होऊन आज बक्षीस मिळविणाऱ्या विद्यार्थिनींचें मोठया कौतुकानें अभिनंदन करण्यास आम्हास संतोष वाटत आहे. तसेंच, ज्यांना अनेक कारणांस्तव परीक्षेंत उतीर्ण होतां न आल्यानें बक्षीस मिळवितां आलें नाहीं, त्यांनाही आमचें सांगणें आहे कीं, नाउमेद होऊं नका, झटून अभ्यास करा, म्हणजे बक्षीस हें आपोआप तुमच्या जवळ चालून येईल.

सभ्य स्त्रीपुरुषहो, शाळेनें थोड्याच अवधींत केलेल्या प्रगतीबद्दल संस्थेचें, तसेंच शाळेंतील शिक्षक व शिक्षकिणी, यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करून, या शाळेची उत्तरोत्तर वाढ व भरभराट होवो असें इच्छितों.

शेवटीं, आजच्या सन्मानाबद्दल पुन्हां एकवार आपले हार्दिक आभार मानून, व या संस्थेंत शिक्षण घेऊन बाहेर पडणाऱ्या मुली आपल्या उभय कुलांस व समाजास भूषण होवोत असा त्यांना आशीर्वाद देऊन, आम्ही आपली रजा घेतों.

---

## परिशिष्ट १८

### Speech of Shrimant Raja Saheb as President of the General Meeting of the Maharashtra Divisional Branch, Poona, of the Bombay Presidency Baby & Health Week Association, Bombay, held at M'war on 26-5-1941.

Members of the Maharashtra Divisional Branch of the Bombay Presidency Baby & Health Week Association, Ladies & Gentlemen,

It is a matter of delight to me to express my sincere thanks to you all for the warm welcome extended to me on this occasion. My heart-felt gratefulness is also due to all the Members of the Association for doing me the honour of offering the Presidentship of their today's General Meeting, Social Function and Inauguration Ceremony of the Health Exhibition and Cinema Show. I cannot say what an amount of pleasure I feel in meeting almost all of the principal honorary social workers, official and non-official, of the Divisional Branch of the Association here at one place and time.

Ladies and gentlemen, I have read some of the printed annual reports of the Bombay Branch of this Association. I have also heard the annual Report of the Divisional Branch of the Association, which is conducted by the Arogya Mandal of Poona, in which Mandal I have been taking some interest since its inception, for the year 1940 just read out to us by Dr. Bhat, its Hononary Secretary. Dr. Mhaskar, the enthusiastic worker of the Association, has likewise laid before us an account of the 16 years' public service of the Association. All these have gone to give us, I am sure, a very good idea of the big amount of the really useful social work that the Association and its Divisional Branch are carrying on for the benefit and uplift of the poor populace of this part of our country.

Ladies and gentlemen, no particular words of mine are required to bring out and stress the importance, need and utility of the high and noble aims and objects which the Association has set before itself for achieving. No emphasis also can ever be too much to lay upon the great exertions bestowed by the members, one and all, of the Association and its Divisional Branch upon seeing their ideal translated into an actual fact. I can say, without the least hesitation, that it is not at all a small thing for this Branch to arrange 254 Cinema or Magic Lantern Shows, organise Health Exhibitions with an attendance of all-told nearly 2 lacs of people

and to undertake tours on that account for the spread of the urgently wanted and most useful hygienic knowledge among rural population of the six districts of Maharashtra, that form their area of work. To remove prejudices, both social and religious, and to create and quicken sanitary consciousness among the poor and illiterate vast masses—especially, in our country consisting of people of diverse castes, creeds and religions—is, I have no doubt all will agree, the most difficult of all the tasks of this kind ; and I am, on that very account, really gratified to hear in Dr. Mhaskar's report that the Herculian efforts of the Association in that direction have been rewarded with ample success. Along with this, I can not but make special mention of one—among the many and varied social items of activities of the Association—I mean, the investigation of the food of the poor, the finding out of Cheap Balanced Diets for their use and the demonstration of the importance of milk in diet, both vegetarian and non-vegetarian. The successful labours of Dr. Mhaskar in this connection are commendable indeed and deserve praise and thanks of all concerned.

Ladies and gentlemen, the field of work before the Divisional Branch of the Association is vast. The importance and necessity of propaganda-work in the achievement of its laudable aims also cannot be too much stressed. It is, therefore, quite natural in the course of things that the Association's work should be continuously growing in extent and increasing in expenditure. The results of the Association's endeavours are, however, satisfactory and encouraging ; and I am, therefore, glad to associate myself with the hope expressed in the report that, the public will lend its helping hand to the Association in its self-imposed noble task. It gives me pleasure to express my genuine and complete appreciation of this praiseworthy mission of the Association and its Divisional Branch with full trust in Divine dispensation, that no good work should in the long run suffer from want of support.

Ladies and gentlemen, one word more and I have done. I would like to draw your attentiton to the words "financial stringency due to war conditions" in the report sent to me by the Honorary Divisional Secretary. War, as you all know, has hindered the progress of many a good cause in this country as well as all the world over. The present war is a fight between good and evil or right and might or, to speak in political language, it is a tussle for ascendency between democracy and tyranny. And, as we are all assembled here for promoting a Divine cause–I mean, helping the poor–I do think, it is our bounden and sacred duty to pray God, with the concurrence of you all, for graciously crowning His Majesty's arms with early and complete success for the peace, happiness and progress of all mankind.

Lastly, it is pleasure to me to assure you, members of the Divisional Branch of the Association, of my sympathy in the cause you have undertaken.

With these words, I repeat my thanks to you all for the welcome and honour given to me, and I now declare the Exhibition opened.

---

## परिशिष्ट १०.

आयुर्वेद रसशाळा, पुणें, या संस्थेच्या धन्वंतरी-उत्सव समारंभाच्या वेळीं अध्यक्ष या नात्यानें श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेलें भाषण. ता. १८-१०-४१
वैद्य नानलशास्त्री व सद्गृहस्थहो,

आपल्या या संस्थेच्या आजच्या धन्वंतरी-उत्सव समारंभाचें अध्यक्षस्थान आम्हास देऊन व या ठिकाणीं स्वागतपूर्वक आपण आमचा जो गौरव केला, त्याबद्दल आम्ही प्रथम आपले मनःपूर्वक आभार मानतों.

सज्जनहो, समारंभाच्या कार्यक्रमांत 'अध्यक्षांचा समारोप' हें एक कार्य आपण ठेविलें आहे, म्हणूनच केवळ चार शब्द आम्ही सांगणार आहोंत. येरव्ही,

आपण जाणतच आहां कीं, आयुर्वेद हा विषय असा आहे कीं, त्यावर तज्ज्ञ अशा इसमानेंच बोलणें उचित होणार आहे. आम्ही तज्ज्ञ नसल्यानें व विशेषतः येथें तशा तज्ज्ञ व लायक व्यक्ति, म्हणजे सुप्रसिद्ध अशी भिषग्वर्य व डॉक्टर मंडळी अनेक असल्यानें, हें काम आपण न स्वीकारावें असाच आमचा विचार होता; परंतु वैद्य नानलशास्त्री यांची आग्रहाची विनंति अमान्य करणें आम्हास बरें वाटेना; व शिवाय, या निमित्तानें आयुर्वेदासंबंधींचे तज्ज्ञांचे विचार श्रवण करण्याची व या संस्थेचे अनेकविध व्याप समक्ष पाहाणें व तिच्या उत्कर्षाची हकीकत समजून घेणें या दृष्टींनीं सहजीं चालून आलेली ही अनुकूल संधि दवडूं नये, या उद्देशानेंच केवळ आम्हीं ही जागा स्वीकारली आहे. अर्थात्, आयुर्वेद या विषयाबाबत आम्हास कांहीं विशेष सांगतां येणार नाहीं व तसें करण्याचा आमचा मनोदयही नाहीं, ह्याचा आम्हीं उल्लेख केलाच पाहिजे असें नाहीं व आपलीही तशी अपेक्षा असणार नाहीं, याची आम्हास खात्री आहे. तथापि, सभाजनहो, आपणांस माहीत आहेच कीं, आयुर्वेदाच्या उन्नतीविषयीं आस्था बाळगणाऱ्यांपैकीं आम्ही एक आहोंत; व त्याचाच आज येथें पुनरुच्चार करण्यांत आम्हास अभिमान वाटत आहे. वैद्यपंचानन गुणेशास्त्री यांचे आयुर्वेदासंबंधींचे अनुभवात्मक व उद्बोधक विचार आपण सर्वांनीं आतांच श्रवण केले आहेत. त्याचप्रमाणें, वैद्य नानलशास्त्री यांच्या प्रास्ताविक निवेदनावरून, या संस्थेच्या सध्यांच्या कार्यविस्ताराची आपणास कल्पना आलीच असेल; व तसेंच, यापुढें संस्था काय काय करूं इच्छीत आहे, तेंही सर्वांस कळून आलें आहे. आयुर्वेदीय औषधींचा फार्मा-कोपिआ ( औषधीपाठग्रंथ ) तयार करणें, ही गोष्ट अवश्य अशीच आहे तिच्या योगानें आयुर्वेदीय औषधांच्या प्रसारास मदतच होणार आहे. त्याचप्रमाणें हल्लीं पाश्चात्य वैद्यकांत Treatment by injections ( सूचिकाभरण ) चा प्रसार झाला आहे. त्या प्रकारें आर्यौषधींच्या अर्कांचीं मिश्रणें सूचिकाभरणाच्या द्वारें उपयोगांत येऊं लागल्यास, ती गोष्ट आयुर्वेदाच्या उत्कर्षास पोषक अशीच होईल, याविषयींही दुमत असण्याचें कारणच नाहीं. सध्यां ओव्हलटाइनच्या तोडीचें पेय या संस्थेनें तयार केलें आहे, ही गोष्टही युक्त अशीच आहे. हा क्रम पुढें चालू राहून, निरनिराळीं Tonics ऊर्फ पुष्टिदायक खाद्यें अथवा पेयें, या स्वरूपाचे पदार्थ व पेटेंट ( खात्रीशीर ) औषधें बनवून तीं स्वस्तांत स्वस्त देतां येतील, अशी

दुहेरी योजना झाल्यास, तें आर्थिकदृष्ट्या तर राष्ट्रास हितावह: आहेच, पण, त्याशिवाय, शारीरिकदृष्ट्याही हितपरिणामी आहे, अशी आमची समजूत आहे. 'यस्मिन्देशे हि यो जातः तज्जं तस्यौषधं हितम्' हें तत्त्व आपणां सर्वांस अवगत आहेच. ज्या देशांत जो जन्म घेतो व वाढतो, त्या देशांतील औषधी वनस्पती घेणें त्याच्या प्रकृतीस मानवतें. तसेंच, Surgical instruments and appliances ( शल्ययन्त्रें व इतर शालाक्य उपकरणें ) हीं येथेंच तयार करण्याचा प्रयत्न करण्याची संस्थेनें जी उमेद बाळगिली आहे, तीही प्रशंसनीय आहे.

सद्गृहस्थहो, आपला बहुमूल्य वेळ जास्त न घेतां, संस्थेच्या प्रस्तुतच्या उन्नतीबद्दल तिचें आम्ही अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों; व श्री धन्वंतरीकृपेनें संस्थेचें अभीष्ट सिद्धीस जावो अशी श्रीरामप्रभुचरणीं प्रर्थना करून व पुन्हां एकवार आजच्या मानाबद्दल आभार मानून, आम्ही आपली रजा घेतों.

---

## परिशिष्ट २०

पुणें, वेदपाठशाळा हीरक-महोत्सवांतील श्रीमंतांचें भाषण.

ता. २६-१०-४१

॥ श्रीराम ॥

श्रीमत् शंकराचार्य व इतर वेदाभिमानी सभ्य स्त्रीपुरुषहो,

ॐनमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या । जयजय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥

येथील वेदपाठशाळेच्या हीरकमहोत्सव-प्रसंगीं होणाऱ्या समारंभास आपण आम्हास निमंत्रण करून व अध्यक्षपद देऊन आमचा जो सन्मान केलात, त्याबद्दल आम्ही आपले अत्यंत आभारी आहोंत.

सद्गृहस्थहो, आजच्या ह्या मानास आमच्यापेक्षां खरोखरच जास्त लायक असे ज्ञानानें, वयानें व अनुभवानें वृद्ध असलेले कांहीं गृहस्थ या पुण्यनगरींत आहेत व त्यांपैकीं कोणासही आजच्या समारंभाचें अध्वर्युत्व आपण दिलें असतें, तर आमच्यापेक्षां त्याच्याकडून आपणांस जास्त उपयुक्त व माहितीपूर्ण सुविचार ऐकण्याचा लाभ मिळाला असता, ही गोष्ट प्रथमच प्रांजळपणें कबूल करणें हें

आम्ही आपलें कर्तव्य समजतों. अर्थात्, असें असूनही आपण आम्हास जो हा मान दिला, त्याचें मुख्य कारण म्हणजे आमच्याविषयीं वसत असलेली आपली स्नेहबुद्धि हें एकच आम्ही समजतों. आतां, आम्हीं आज येथें येण्याचें जें कबूल केलें, त्यास दोन कारणें प्रमुख होत. एक म्हणजे आम्हास श्री. रा. केळकर वकील यांचा आग्रहाचा शब्द मोडवेना; व दुसरें म्हणजे आम्हास वेदविद्येबद्दल असलेला जिव्हाळा हें होय. वेदविद्येबद्दल आम्हास अत्यंत आदर असून त्याबाबत सक्रिय कांहीं तरी करावें, या हेतूनें आम्ही आमच्या राज्यारोहणप्रसंगीं सन १९२२ सालीं भोर येथें ब्राह्मणांच्या मुलांना धार्मिक शिक्षण देण्यासाठीं एक वेदशाळा स्थापन करण्याचें ठरवून त्याप्रमाणें तिला मूर्त स्वरूपही दिलें. ही एक अल्पशीच गोष्ट वेदविद्येबद्दल आम्हास किती आदर आहे, हें द्योतित करते.

आतां, आपल्या सर्व हिंदुसमाजांचा जर मुख्य आधार कांहीं असेल, तर ते 'वेद' होत. आपणां सर्वांस विदितच आहे कीं, या वैदिक आधारावर ऐतिहासिक कालांत बुद्ध, जैन, इस्लाम, वगैरे निरनिराळ्या धर्मानुयायांकडून जबरदस्त हल्ले, तो नेस्तनाबूद व्हावा, म्हणून चढविण्यांत आले. पण, त्या सर्व संकटांना धिटाईनें तोंड देऊन आपला वैदिक धर्म अव्याहत व अखंड चालू आहे. अनेक संकटांतून व दिव्यांतून पार पडल्यामुळें त्याचें तेज अधिकच वृद्धिंगत झालें आहे. वेद हे अपौरुषेय असल्यानें, कोणा एका व्यक्तीकडे त्यांचा मोठेपणा जात नाहीं. वेद हे अमूर्त, अमेय व अपौरुषेय असल्यानें, त्यांची योग्यता शब्दानें वर्णन करणें अशक्य आहे. त्यांच्याबद्दल आपणांस वाटणारा आदर आपण त्यांच्या सेवेनें व अभ्यासानें व्यक्त केला पाहिजे. वेदराशी अनंत असून त्यांपैकीं फारच थोडा भाग आपणांस लाभला आहे. पण, जो लाभला आहे, तोच इतका अमूल्य आहे कीं, त्याचें वर्णन कोठवर करावें ?

आद्य श्रीजगद्गुरु शंकराचार्यांपासून तों तहत गीतारहस्यकार टिळक यांच्यापर्यंत व त्यानंतरही हल्लीं वेदव्यासंगी गृहस्थ हे वेदांची सेवा यथामति करीतच आले आहेत. मराठी सत्ताकालीं व त्यानंतर पेशवाई कालांतही वेदविद्येला अग्रपूजा-मान असून त्याचें संवर्धन योग्य तऱ्हेनें होईल याकडे राजकर्त्यांचें लक्ष असे. त्यामुळें वेदविद्या ब्राह्मणांच्या जिव्हाग्रीं थयथय नाचत असे. श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं ब्राह्मणांना वेदांचीं वज्रांगें असें म्हटलें आहे. यावरून ब्राह्मणांनी

वेदविद्या किती कष्टानें अबाधित कायम ठेविली, हें उघड होतें. इंग्रजी अमदानीं सुरू होण्यापूर्वीं कांहीं काल व त्यानंतरही कांहीं वर्षें वेदविद्येला हालाखीची गेलीं. कारण, त्राता व आश्रयदाता कोणी न राहिल्यानें, त्या विद्येकडे दुर्लक्ष झालें. तशांत, पूर्वीप्रमाणें वेदांतचतुर व बुद्धिमान जन यांकडून द्यावें तितकें लक्ष याकडे न दिल्यानें, जीं माणसें त्यांचा अभ्यास करीत, त्यांची स्थिति तुकोबारायांनीं म्हटल्याप्रमाणें म्हणजे 'वेदाचें गव्हार न कळे पाठका' अशी झाली होती. अशा खालावलेल्या परिस्थितींतून वेदविद्येला तिचें पूर्वीचें स्थान प्राप्त व्हावें, म्हणून पुणें येथें शके १८०३ सालीं ज्या थोर महाभागांनीं ही संस्था स्थापन केली, त्यांचे आपण कायमचे ऋणी आहोंत. बुधवारांतील सरदार किबे यांच्या वाड्यांत ही शाळा प्रथम भरूं लागली, व तेव्हांपासून आपल्या उपयुक्ततेनें तिनें पुष्कळांचें लक्ष आपणांकडे वेधून घेतलें. वेदविद्येचें जरूर तें शिक्षण देण्याची सर्व सोय वेळोवेळींच्या चालकांनीं करून वेदविद्येचा प्रवाह अनुसृत चालविण्याची खबरदारी घेतली, ह्याबद्दल तेही प्रशंसेस पात्र आहेत. कांहीं वर्षांपूर्वीं संस्थेच्या मालकीची एक भरवस्तींत इमारत केली व अशा रीतीनें वेदपाठशाळेला स्थायिकत्व आणून दिलें. या शाळेंतून जुन्या परंपरेचे, त्याचप्रमाणें आंग्ल-विद्याविभूषितही, लोक पास होऊन गेले, हें पाहून आम्हास अत्यंत समाधान वाटलें.

हल्लींचा काळ ज्याला टीकेचें युग (Critical age) म्हणतात, असा आहे. नुसतें घोकित ज्ञान न घेतां व त्यावरच संतुष्ट न राहतां, अर्थबोधक ज्ञान प्राप्त करून घेणें हें अत्यंत आवश्यक आहे. नुसत्या घोकीव विद्येची हेटाळणी होते; म्हणून, ही विद्या देतांना, उपरिनिर्दिष्ट दृष्टिकोनही बाळगला, म्हणजे फार बरें होईल. या आजच्या हीरकमहोत्सवानें ह्या पाठशाळेची उपयुक्तता व आवश्यकता सहजासहजीं सिद्ध झालेली असल्यानें, त्याबाबत निराळें सांगण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं. पण, इतकें मात्र सांगितल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं कीं, या वेदरूपी आईची सेवा आपण सर्वांनीं यथाशक्ति केलीच पाहिजे; व तसें करून त्या ऋणांतून, अल्प कां होईना, उतराई होण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे. सनातन धर्माभिमान्यांना याबद्दल विशेष सांगण्याची जरूरीच नाहीं.

वेदविद्येचा शास्त्रीय पद्धतीनुसार व्यासंग पाश्चात्य राष्ट्रें मोठ्या हौसेनें करीत आहेत. Max Muller, तसेंच आधुनिक पाश्चिमात्य पंडित, वेदविद्यांचा अभ्यास अंगोपांगांनीं करून ज्ञानांत प्रत्यहीं भर घालीत आहेत. त्याचप्रमाणें आपल्या देशांतही तसें झालें पाहिजे, असें आम्हास वाटतें; व आपलीही इच्छा तशीच असेल, अशी आमची खात्री आहे. श्रीयुत केळकर, त्याचप्रमाणें रानडे शास्त्री, यांनीं ह्या विषयाचा उत्तम ऊहापोह आपल्या माहितीपूर्ण भाषणांत आगाऊच केला असल्यानें, त्यापेक्षां जास्त कांहीं ह्या प्रसंगीं सांगावें असें आम्हास वाटत नाहीं. जातां जातां इतकेंच म्हणावेंसें वाटतें कीं, 'वर्षे पष्ठितमे शान्तिः कार्यं पुष्यति मन्त्रतः। तदारोग्यं विजानीयादैश्वर्यं च यथेप्सितम्॥' ज्याप्रमाणें माणसाला साठ वर्षें पुरीं झालीं म्हणजे शांति करतात व त्या वेळीं जे मंत्र म्हणतात, त्या योगानें शरिरामध्यें बळ वाढतें, आरोग्य प्राप्त होतें व ऐश्वर्याची वृद्धि होते, त्याचप्रमाणें या संस्थेलाही तें सर्व पूर्णपणें प्राप्त होवो, अशी आम्ही मनापासून प्रभू श्रीरामचरणीं प्रार्थना करतों.

तसेंच, आजच्या या मंगल प्रसंगीं या संस्थेचा उत्कर्ष व्हावा, म्हणून ज्या थोर सद्गृहस्थांनीं वेदपाठशाळेचें अध्यक्षस्थान वेळोवेळीं मंडित केलें, अशांपैकीं कांहींच्या फोटोंचें आज जाहीररीत्या अनावरण झाल्याचें जाहीर करण्यास आम्हास आनंद वाटत आहे. संस्थेच्या मालकीच्या प्रशस्त जागेंत त्या फोटोंना कायमचें स्थान मिळाल्याचें पाहून, आम्हाप्रमाणेंच आपणां सर्वांना समाधान वाटत असेल अशी आमची खात्री आहे.

## परिशिष्ट २१

दे. ऋ. ब्रा. संस्थेच्या समारंभाच्या वेळीं श्री. राजेसाहेब यांनीं केलेलें भाषण.

ता. २१-१२-४१

सन्मान्य अध्यक्ष व सभ्य गृहस्थहो,

आज आपण आमच्या छायाचित्राचा अनावरण-समारंभ व तोही लोकनायक अणे यांच्यासारख्या 'नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता' अशा थोर गृहस्थांच्या हस्तें केला, याबद्दल प्रारंभींच आपणां सर्वांचे हार्दिक आभार मानणें हें आम्ही आपलें पवित्र कर्तव्य समजतों. आमच्याबद्दल श्रीमंत सरदार बाळासाहेब पुरंदरे यांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत, तसेंच लोकनायक अणे यांनीं आपल्या ओजस्वी भाषणांत, जे प्रशंसापर उद्गार काढले, त्यांस आम्ही पात्र आहोंत असें आम्हास वाटत नाहीं. तथापि, त्याबद्दल आम्ही आपली कृतज्ञता व्यक्त करूं इच्छितों. आमच्या छायाचित्राचें अनावरण म्हणजे आमच्या ऐतिहासिक संस्थानाविषयीं आपणांस, जो अभिमान व आदर वाटत आहे, त्याचें प्रतीक होय असेंच आम्ही समजतों; असो.

आज आपणाला एका खरोखरच थोर व कर्तृत्ववान् पुरुषाच्या संगतीचा, अल्पकाळ कां होईना, लाभ झाला, याबद्दल कोणाला बरें संतोष वाटणार नाहीं? श्रीयुत माधवरावजी अणे यांनीं अत्यंत बिकट परिस्थितींतून आपला मार्ग आक्रमण करून आजचें उच्च स्थान गाठिलें आहे. त्यांची नैतिक शीलसंपत्ति, तसेंच त्यांची देशसेवेची खडतर तपश्चर्या, इतकी दीर्घ आहे, कीं त्यापुढें त्यांच्या शत्रूलादेखील हार खावी लागेल. त्यांचा मनमिळाऊ, परोपकारी स्वभाव व कर्तृत्वशक्ति इतकी प्रभावी आहे कीं, त्यामुळें अत्यंत जोखमीचीं कामें त्यांनीं सहज यशस्वी करून दाखविलीं आहेत. त्यांनीं अखंड लोकसेवेनें जनतेचा विश्वास व प्रेम इतकें संपादन केलें, कीं त्यांना साहजिकच 'लोकनायक' पदवीचें स्थान प्राप्त झालें. हल्लींच्या आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांनीं वरिष्ठ सरकारांत (Executive Councillor) कार्यकारी मंडळाचे सभासद म्हणून जी कामगिरी पत्करली आहे, तीही त्यांच्या निर्भीड व कणखर देशभक्तीचें द्योतकच आहे, असें आम्ही तरी समजतों. लोकनायक अणे यांनीं सर परशुरामभाऊ कॉलेजमध्यें जें भाषण केलें, तें ऐकून आम्हास संतोष वाटला; विशेषतः संस्थानें असावींत अशाबद्दल जे उद्गार काढले, ते ऐकून आम्हास विशेष आनंद वाटला. लोकनायकांविषयीं जितकें बोलावें तितकें थोडेंच. वेळही बराच झाला असल्यानें, पुन्हा एकदा आपणां सर्वांचे मनःपूर्वक आभार मानून, आपल्या या संस्थेच्या हातून अशीच स्पृहणीय कामगिरी सतत होत जावो अशी श्री प्रभू रामचंद्रापाशीं प्रार्थना करून, आम्ही आपलें भाषण येथें संपवितों.

# परिशिष्ट २२

## श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी कन्याशाळा, पुणें, रजत-महोत्सव समारंभाच्या वेळचें श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांचें अध्यक्षीय भाषण

रविवार, ता. ५ डिसेंबर १९४३ ई.

डॉ. कर्वे, लेडी ठाकरसी व सभ्य स्त्रीपुरुषहो,

श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी कन्याशाळा, पुणें, या संस्थेचा आजचा हा आनंदाचा रजत-महोत्सवाचा समारंभ साजरा होत आहे, हें पाहून आपणां सर्वांप्रमाणेंच मलाही अतिशय आनंद होत आहे. तशांत, ह्या समारंभाचें अध्यक्षस्थान संस्थेच्या चालकांनीं मला दिलें, त्याबद्दल प्रथमच मी त्यांचे हार्दिक आभार मानतों. अशा समयाला स्त्रीशिक्षणाच्या कामीं ज्या कोणी महाशयानें अविरत परिश्रम घेतले असतील, अशाला आजचें अध्यक्षस्थान देणें खरोखर उचित झालें असतें. पण, ज्या वेळीं मला अध्यक्ष होण्याबद्दल विनंति केली, त्या वेळीं ती विनंति केवळ स्त्रीशिक्षणाबद्दल वाटणाऱ्या कळकळीमुळें मीं मान्य केली.

इतर देशांतील स्त्रीशिक्षणाकडे पाहिलें, म्हणजे आपण किती मागासले आहोंत, हें बघून मनाला धक्का बसतो. फार दूर कशाला ? आपल्या हिंदुस्थानांतील त्रावणकोर व कोचीन या संस्थानांकडे पाहिलें, तरी तेथील स्त्रीशिक्षणप्रगति किती उच्च आहे, हें सहज समजून येतें. महाराष्ट्रानें शिक्षणाच्या क्षेत्रांत खरोखरच महनीय कामगिरी बजाविली नाहीं, असें कोण म्हणेल ? पण, उपयुक्त व योग्य अशा तऱ्हेचें स्त्रीशिक्षणकार्य मात्र जितकें व्हावयास पाहिजे, तितकें अद्याप झालें नाहीं, असें कष्टानें म्हणावें लागतें. पण, ही उणीव दूर व्हावी, म्हणून खरे कर्मयोगी डॉ. आण्णासाहेब कर्वे यांनीं अहर्निश व अविश्रांत परिश्रम करून स्त्रीशिक्षणाकडे विबुधजनांचें लक्ष वेधिलें. केवळ स्त्रीशिक्षणाकडे एकाग्रचित्तानें व अविरत परिश्रम घेऊन जर कोणीं बघितलें असेल, तर तें म्हणजे खरे शिक्षणतपस्वी डॉ. कर्वे यांनींच होय. अनंत संकटांशीं धैर्यानें झुंज देऊन, डॉ. कर्वे यांनीं हिंदुस्थानांत स्त्रीशिक्षणाचें कार्य स्वतंत्रपणें चालू करून त्यास आजचें विलोभनीय स्थान प्राप्त करून दिलें आहे. ‘ विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्य-

मानाः । प्रारब्धमुत्तमजनाः न परित्यजन्ति ॥ ' यांतील तत्त्व म्हणजे डॉ. कर्वे यांचें आयुष्य होय.

स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत डॉ. कर्वे यांचे जे दोन प्रमुख सिद्धांत आहेत, ते म्हणजे—

१. मातृभाषेंतून शिक्षण.

२. स्त्रियांचीं सामाजिक, तसेंच राष्ट्रीय व आर्थिक, (Economy), बाबतींत पुरुषांपेक्षां भिन्न कामें आहेत.

Women as a class have different functions to fulfil in the social and national economy from those of men.

वरील मूलभूत तत्त्वाला अनुसरून डॉ. कर्वे यांनीं आपली स्त्रीशिक्षणाची कामगिरी अव्याहत चालू ठेवून, तिला आजची सर्वमान्य स्थिति प्राप्त करून दिली आहे.

अशा विभूतीबरोबर सहकार्यानें काम करण्यास आपण होऊन आलेले कै. गोपाळराव चिपळूणकर यांनीं १९१८ सालीं केवळ एक विद्यार्थिनी असलेली ही कन्याशाळा स्थापन केली. पुढें १९२० सालीं हिंदु वुइमेन्स् युनिव्हर्सिटीनें ही शाळा आपल्याकडे घेतली. १९२६ सालीं ही शाळा हल्लींच्या प्रशस्त अशा इमारतींत आली. या शाळेंतील अभ्यासक्रम इतर मुलींच्या शाळांतल्यापेक्षां भिन्न असल्यानें, प्रथम पालक आपल्या मुली रुळलेली वाट सोडून या शाळेंत पाठविण्यास कचरत. पण, शाळेची उपयुक्तता जसजशी पटूं लागली, तसतशी मुलींच्या संख्येंतही भर पडूं लागली. शिक्षणाचें माध्यम मराठी असल्यानें, विषय समजण्यास सुलभ जातात व मातृभाषेचीही अनायासें सेवा घडते. ही शाळा भारत विद्या महिला पीठाची असून तिचा सर्व खर्च कै. सर विठ्ठलदास यांच्या १५ लाखांच्या उदार देणगीच्या व्याजांतून चालतो. दुय्यम शिक्षण देणाऱ्या शाळांना प्राथमिक शाळांची जोड मिळाल्यास, संस्थेला आपल्या विशिष्ट शिक्षणाचा ठसा जास्त सुलभतेनें विद्यार्थ्यांच्या मनावर उमटवितां येतो. या दृष्टीनें या वर्षापासून या शाळेंत निघालेल्या प्राथमिक शाळेचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

कै. गोपाळराव चिपळूणकर यांनीं (The Scientific Basis of Woman's Education) 'स्त्रीशिक्षणाचा शास्त्रीय पाया' या नांवाचा अत्यंत उद्‌बोधक असा ग्रंथ लिहिला. त्यांतील मुख्य सिद्धांत म्हणजे (It is not a sound policy to solve Eastern problems by applying Western principles.) 'पाश्चिमात्य तत्त्वें जशींच्या तशीं लावून पौर्वात्य अडचणी सोडविणें योग्य होणार नाहीं.' आपल्याकडील स्त्रीशिक्षण म्हणजे पुरुषांचें शिक्षण होय. स्त्री व पुरुष यांच्यांतील मूलभूत असणाऱ्या फरकाकडे लक्ष न देतां, केवळ शिक्षण देणें हेंच ध्येय जनतेपुढें होतें. आपला स्त्रीवर्ग स्वावलंबी कसा होईल व त्याचप्रमाणें स्त्रीकडे जी नैसर्गिक कामगिरी आहे, तीही कशी उत्तम रीतीनें पार पडेल अशा जोड दृष्टीनें स्त्रीशिक्षण झालें पाहिजे. एका ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, Even though woman may not actually earn, the capacity to earn, if ever the need arises, will not only enhance her practical utility in the home, but add also to her status and respect in society. स्त्री ही माता, शिक्षक व कुटुंबांतील मुख्य असल्यानें, तिचें शिक्षण या तिन्ही कामगिरी उत्तम तऱ्हेनें तिला पार पाडतां येतील, अशा तऱ्हेचें असलें पाहिजे हें उघड आहे. नाहीं-तर, एका सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें—जातेति कन्या महतीहि चिंता कस्मै प्रदेयेति महान्वितर्कः। दत्ता सुखं यास्यति वा न वेत्ति कन्यापितृत्वं खलु नाम कष्टम्॥ अशी स्थिति वडील माणसांची व्हावयाची.

पूर्वी वडील माणसें मुलीला पुढील आशीर्वाद देत. त्यावरून स्त्रियांकडे ते किती उच्च विचारानें बघत हें स्पष्ट होतें. ते म्हणत—अविधवा भव वर्षाणि शतं साग्रं तु सुव्रता। तेजस्वी च यशस्वी च धर्मपत्नी पतिव्रता॥

वरील सर्व गोष्टींचा विचार करितां, डॉ. कर्वे यांच्या स्त्रीशिक्षण कार्य-क्रमांत योग्य त्या तत्त्वांचा समावेश केला असल्यानें, स्त्रीशिक्षणाचें पवित्र कार्य झपाट्यानें पुढें जात आहे, हें पाहून सर्वांना समाधान होत आहे. त्या शिक्षण-क्रमापैकीं ही कन्याशाळा ही एक संस्था असल्यानें, तिचा आजचा हा रजत-महोत्सव-प्रसंग साजरा करण्याचा योग आला, हें पाहून आपणां सर्वांप्रमाणेंच त्या स्वर्गस्थ गोपाळराव चिपळूणकर यांच्या आत्म्यास निरतिशय आनंद व

समाधान वाटेल, यांत शंका नाहीं. ह्या शाळेची, त्याचप्रमाणें स्त्रीशिक्षणाची, अशीच सतत वाढ होत जावो अशी प्रभू श्रीरामचंद्रापाशीं प्रार्थना करून व पुन्हां एकवार आपणां सर्वांचे आभार मानून माझें भाषण पुरें करतों.

---

## परिशिष्ट २३

### महाराष्ट्र चित्रकार मंडळाच्या सांवत्सरिक समारंभाच्या वेळचें श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण

ता. २३-१-४४ इ.

सभ्य स्त्रीपुरुषहो,

महाराष्ट्र चित्रकार मंडळ, पुणें, या संस्थेतर्फे यंदाच्या वर्षी ज्या चित्रकलाकृतींच्या बाबतींत चढाओढ झाली, तींतील यशस्वी कलावंत विद्यार्थ्यांना बक्षिसें देण्यासाठीं म्हणून हा आजचा समारंभ असून, त्याचें अध्यक्षस्थान या संस्थेच्या चालकांनीं मला दिल्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. चालकांनीं मजकडे प्रथम जेव्हां विनंति केली, त्या वेळीं आमची प्रकृति तितकीशी बरी नसल्यानें, असें निमंत्रण पत्करावें अगर कसें, याबद्दल शंका वाटत होती. पण, संस्थेच्या कार्यकारी मंडळानें एकमतानें आम्हाला आजचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल केलेली विनंति अमान्य करणें जड वाटलें, व शेवटीं ललितकलाविषयीं आम्हाला जो आदर आहे, तो प्रभावी ठरून आम्ही चालकांची विनंति मान्य केली.

आतांच संस्थेच्या सेक्रेटरींनीं जी थोडक्यांत माहिती सांगितली, त्यावरून ही संस्था चित्रकलासंबंधींच्या कामीं किती झटत आहे, हें सहज दिसून येणार आहे. ललितकला, मग ती कोणतीही असो, मनाला आल्हादच देते. कर्णमधुर सुरेल गायन ऐकल्यानें, तसेंच हृदयस्पर्शी व नयनमनोहर चित्राकृतींच्या दर्शनानें, मानवाच्या हृदय-मंदिरांत सात्त्विक व उच्च विचाराचे पडसाद उठल्यावाचून राहात नाहींत. स्वर्गस्थ कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर ह्यांची गीतांजली काय, किंवा प्रथित-यश चित्रकलासम्राट् रविवर्मा काय, किंवा अचेतन दगडाला आपल्या शिल्पज्ञानयोगानें चैतन्याकृति बनविणारे म्हात्रे, फडके, करमरकर वगैरे काय,

ह्या कलावंतांच्या कलाकृति मानवी जीविताला जडसृष्टींतून उच्च वातावरणांत सहज नेऊं शकतात.

कलेची जो कोणी भाडोत्री पद्धतीनें सेवा करील, त्याला फळही तितक्याच किंमतीचें प्राप्त होतें. पण, जे कलावंत स्वतःला पूर्णपणें विसरून आपली कृति जगापुढें आणतात, त्यांच्या कृतीचें जग अतिशय कोडकौतुक करतें, हा आजवरचा अनुभव आहेच. राजसूय यज्ञाच्या वेळीं पांडवांच्याकडे कौरव आल्यावेळीं त्यांच्यापैकीं कित्येकांची, पाणी म्हणून जमीन व घट्ट जमीन तेथें सखोल पुष्करणी, यांमुळें जी फसगत व फजिती झाली, ती आपणां सर्वांस माहीत आहेच; ही फसगत काय दर्शविते, तर पांडवांच्या पदरीं असे निष्णात कारागीर होते कीं, त्यांनी अशी चमत्कृतिजन्य कामगिरी करून लोकांना थक्क करून टाकिलें. अशा स्वरूपाचें दुसरें उदाहरण म्हणजे एका चित्रकारानें असें चित्र काढलें कीं, ज्यांतील परिपक्व व सतेज फलसमृद्धीनें पक्षी भराभर येऊन त्यांत आपले चंचू प्रविष्ट करूं लागले. ही खरी दिव्य कलाकृति ! असो. हें महाराष्ट्र चित्रकारमंडळ चित्रकलेच्या निरनिराळ्या दालनांत बसणाऱ्या कृतींचें संवर्धन व पोषण करीत आहे व ह्याला निरनिराळ्या कलावंतांचें, तसेंच कलाभिमानी सद्गृहस्थांचें, साहाय्य होत आहे, हें पाहून आपणांप्रमाणेंच आम्हासही संतोष वाटत आहे. महाराष्ट्र चित्रकार मंडळानें चालविलेल्या या कार्यासाठीं जनतेनेंही शक्य ती मदत देऊन हातभार लाविला पाहिजे. तसेंच, गतसालापेक्षां यंदा चढाओढींत भाग घेणाऱ्यांची संख्या वाढली आहे, हें पाहून आनंद होतो व ही वाढ अशीच सतत वाढत गेल्यास, चित्रकलेचीही वाढ होण्यास खास मदत होईल असें मला वाटतें. कलेची अभिजात आवड असणाऱ्या लहान विद्यार्थ्यांच्या कलाविकासाला याच वेळीं प्रोत्साहन मिळाल्यास, भावी कालांत हींच मुलें उत्कृष्ट कलावंत म्हणून महाराष्ट्राची कीर्ति वाढवितील.

आतां, ज्यांना ज्यांना त्यांच्या उत्तम कामगिरीबद्दल उत्तेजनार्थ बक्षिसें मिळालीं, त्यांचें अभिनंदन करून व पुन्हां एकदां ह्या मंडळाच्या चालकांचे हार्दिक आभार मानून, आपली चित्रकला यशाच्या उत्तुंग शिखराला पोंहोचून तिची जगभर वाहवा होवो, अशी प्रभू श्री रामचरणीं प्रार्थना करून, मी आपलें अल्प भाषण पुरें करितों.

## परिशिष्ट २४

Inaugural Address of Shrimant Raja Saheb of Bhor on the occasion of the 25th Anniversary Celebrations of the Poona City Boy Scouts Local Association at 6 p. m. on the 6th of May 1944.

Mr. Pearce, ladies and gentlemen,

As the President of this Association, it is my proud privilege to extend a sincere and hearty welcome to you all, some of whom like our worthy President of this Function–I mean, Mr. Pearce-have come here at great personal discomfort and inconvenience in these difficult days of travel. But, the lure of the Silver Jubilee Function of the Poona City Boy Scouts Local Association was too strong to be ignored. I am connected with this Association for the last twenty years and I am glad to see that it has completed its nonage and is going ahead with its robust development. Let me frankly admit that I am a staunch believer in the fruitful potentialities of this movement and I feel delighted to tell you that my eldest son-Bhausaheb-completed a short course of this movement, when we were in England.

The Scouting movement not only puts life in youngsters but it invigorates the drooping spirits of the old. If at all a proof be required for this, I may at once point out to our worthy Chairman of the Executive Committee, Mr. K. C. Jathar.

The Founder of the Boy Scouts Movement, late Lord Baden-Powell, and the Founder of the Indian Boy Scouts Association, late lamented Dr. Besant, were active and energetic even at the green old age of 80 or so. These shining examples lead me to say that we should all make it a point to follow these great personalities in their way of life. The spirit of the Scout puts enthusiasm in the work and the job is finished with cheerfulness and alacrity.

No nation, to my mind, can be strong without discipline and no people can be either healthy or happy unless they cultivate personal habits of hard work and keeping cleanliness. The children of today will be the responsible citizens of tomorrow, and if they receive good and sound training that will endow them with habits of discipline, cleanliness and broad-minded tolerance, we shall raise our people to a high standard of efficiency and honour. In short, a well-ordered and sternly disciplined life, characterized by genuine quest of knowledge, should be cultivated in the young plastic minds.

You have met here to explore the avenues that would help the Indian boys and girls to be good and useful citizens. The task is no doubt difficult, but the presence of Mr. Pearce will be, I am sure, of great use to you. Many of you, I suppose, are aware that Mr. Pearce was the Chief Commissioner of the Indian Boy Scouts Association, of which this our Association is a branch since 1919. After taking stock of the work done during the last twentyfive years, you will have to devise and formulate programme for future work. The era of the Post-War Reconstruction has already begun and we cannot afford to lag behind.

On a joyous occasion like this, it is my duty to remember with gratitude the services rendered to this Association by late Mr. H. K. Patwardhan, late Dr. V. C. Gokhale, late Prof. J. P. Trivedi, late Prof. M. V. Venkateshwaram and late Dr. Shikhare. This Association could so smoothly wend its way over this long period, because it had secured services of men like Prof. Hardikar, Raosaheb Gadkari, Messrs. Godbole, Bhagwat and others. Dr. Abasaheb Natu, I think, is the breath of this Association for the last many years. It also gives me great pleasure to say that Mr. D. P. Joshi–an indefatigable worker in this movement–had come to Bhor for organizing the Scouts on good lines in the year 1924 on the

occasion of the visit of His Excellency Sir Leslie Wilson, the then Governor of Bombay. Sardar Jagannath Maharaj Pandit, Dr. V. V. Bapat, Principal S. R. Tawade, Mr. B. G. Jagtap, Principal R. P. Sabnis and many others have also helped considerably in the work of this Association.

Last, but not the least, I am thankful to Bombay Government for giving this Body this fine piece of land so close to the city. I am glad to tell you that our Association had voluntarily placed at the disposal of the Government this ground and headquarters for A. R. P. activities.

Ladies and gentlemen, I do not wish to detain you any longer. I am quite confident that your deliberations and the programme will be successful under the able direction of Mr. Pearce. I know that there are to be two conferences, one for patrol leaders and the second for workers of other juvenile organizations. It is in the fitness of things that the Scout organization should try to get together the workers of other similar bodies to discuss on what lines all of them can come together with the ideal of helping the boys and girls to become the best citizens of our Motherland.

I wish this Conference all success and trust that, as a result of your mature deliberations, you will be able to chalk out a programme which will guide the future destinies of this movement. I again wish you all good happy time here and thank you once again.

---

# परिशिष्ट २९

## पुणें, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिषदेच्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांचें उद्घाटनाचें भाषण. ता. २०-५-४४

श्रीमद् जगद्गुरु शंकराचार्य, व सभ्य स्त्री-पुरुषहो,

आजच्या ह्या आनंददायक व शुभ प्रसंगीं उद्घाटनाचें भाषण करण्याबद्दल परिषदेच्या चालकांनीं जी आग्रहाची विनंति केली, त्याबद्दल प्रथम त्यांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानतों. ह्या परिषदेची वेळ व दुसऱ्या कांहीं जरुरीच्या कामाची वेळ जवळजवळ आल्यानें, आम्हाला या समारंभास उपस्थित होतां येईल कीं नाहीं, ह्याची शंका होती; पण, रा. ब. वैद्य, सरदार मुजुमदार व सरदार पुरंदरे यांसारख्या माननीय गृहस्थांचा शब्द मोडणें जीवावर आलें, व आपणही आपल्या अल्पस्वल्पपरीनें या सार्वजनिक कामाला हात लावावा या हेतूनें, आम्ही त्यांचें प्रेमाचें निमंत्रण स्वीकारलें. आपल्या ह्या परिषदेला श्रीमत् शंकराचार्य ह्यांचा आशीर्वाद असल्यानें, परिषदेचें कार्य ज्या उदात्त हेतूनें आखलें आहे, त्या दृष्टीनें यशस्वीपणें पार पडेल, यांत आम्हाला तर तिळमात्र शंका वाटत नाहीं.

आजच्या या सभेला दूरदूरचे लोक आलेले दिसत आहेत व जिकडे तिकडे आनंद व उत्साह ह्यांचें वातावरण पसरलें असून, कोणतेंही कठीण कार्य तडीस नेण्याला आवश्यक असणारी मनाची प्रसन्नता व प्रफुल्लता कार्यकर्त्यांच्या मुखावर स्पष्टपणें दृग्गोचर होत आहे. हल्लींच्या काळांत प्रवास किती कष्टमय आहे, ह्याची कल्पना करणेंच बरें. तशांत, इतके कष्ट सोसून कोणी येथें आलें, तर पूर्वींच्या काळीं जेवणाखाणाच्या ज्या सोयी सहज होत असत, त्याही प्रचलित रेशनिंगमुळें तितक्याशा चांगल्या होत नाहींत, ह्याची पूर्ण जाणीव आम्हाला आहे. अशा सर्व प्रतिकूल परिस्थितींत आपण सर्व येथें आलांत, ह्याबद्दल खरोखरच आपणां सर्वांचें हार्दिक स्वागत करणें जरूर आहे व तें आम्ही मोठ्या आनंदानें करीत आहों.

आतां, परिषदेच्या कार्याकडे वळतांना, प्रथम एका गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे; ती म्हणजे कित्येक सूज्ञ लोकांच्या मतें ब्राह्मणांमधील

चित्पावन, देशस्थ, कऱ्हाडे अशा निरनिराळ्या घटकांची अशी स्वतंत्र परिषद भरविणें हें योग्य व हितावह नाहीं; कारण, अशामुळें ब्राह्मणसमाज हा कमकुवत बनेल. सकृत्दर्शनीं हें कारण कितीही खरें दिसलें, तरी जरा विचार केल्यास, तें तितकेंसें भरीव नाहीं, असें सहज दिसून येईल. जसें एकंदर शरीराच्या स्वास्थ्यासाठीं व सुदृढपणासाठीं आपण शरीराच्या निरनिराळ्या अवयवांची काळजीपूर्वक जोपासना करतों व त्याचें फळ म्हणजे बांधेसूद व सशक्त शरीर; तसेंच, कोणत्याही समाजाच्या पोटजातींची सुधारणा, म्हणजेच त्या मूळ समाजाची सुधारणा होय. प्रत्येक पोटजातीचीं जीं वैशिष्ट्यें असतील, तीं कायम राहतील; पण, त्याबरोबरच एकंदर समाजाचीही अभिवृद्धि होईल, ह्याकडे कार्यकर्त्यांनीं लक्ष दिल्यास, अशा निरनिराळ्या स्वतंत्र कार्या-पासून फायदाच होईल, असें आम्हाला वाटतें.

थोड्या दिवसांपूर्वीं मुंबई येथें अखिल चित्पावन ब्राह्मणपरिषदेचें दुसरें अधिवेशन केसरीचे ख्यातनाम संपादक रा. ज. स. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें, हें आपणास माहीत आहे. त्या वेळीं अध्यक्ष नात्यानें त्यांनीं जें सु-विचारपरिप्लुत भाषण केलें, त्यांतील पुढील मूद्दे व त्या वेळचे ठराव हे विचारणीय आहेत. ते म्हणाले कीं, आपण जगावयाचें हें तर खरेंच, पण त्याबरोबरच जगावयाचें तें मानानें जगावयाचें आहे. एकंदर ब्राह्मणसमाज घ्या, त्या समाजांतच एक प्रकारचे अंतर्गत चातुर्वर्ण्य असल्याशिवाय तो समाज स्वयंपूर्ण व राष्ट्रकार्यधुरंधर होऊं शकत नाहीं. हें चातुर्वर्ण्य, अर्थात्, गुणनिष्ठ असावें. समाजांत पूर्वीची सुसंघटित सहकार्याची वृत्ति राहिली नसल्यानें, आपण स्वयंपूर्ण बनलें पाहिजे. पण, त्याचबरोबर ब्राह्मणांचें नैसर्गिक व अढळ स्थान जें बौद्धिक मार्गप्रदर्शन, तें तर कायमच राहिलें पाहिजे.

आतां, या परिषदेपुढें आपल्या समाजाच्या सर्वांगीण उन्नतीच्या दृष्टीनें निरनिराळे प्रश्न येतीलच व त्यांचा आपण यथायोग्य निकाल करालच. वैदिक परंपरेनें आलेले वेद व शास्त्रें ह्यांचें अध्ययन व अध्यापन यांची योग्य ती सोय होणें अत्यंत इष्ट आहे. आम्हाला वाटतें, या बाबतींत तरी कोणाचें दुमत असणार नाहीं. आपली वैदिक परंपरा किती उज्ज्वल व उच्च आहे, हें विशद

करण्याची जरूरी नाहीं. आपल्या समाजांतील तरुणांनीं आपलें जुनें क्षात्रतेज संपादन करण्याच्या हेतूनें लष्करांत जाऊन लष्करी शिक्षण न डगमगतां घेतलें पाहिजे. सरदार विंचूरकर, सरदार पानसे, वगैरे शूर वीरांचे अतुल पराक्रम आपला इतिहास आपणास सांगत नाहीं काय? त्याप्रमाणेंच, आपल्या समाजांतील ज्या लोकांना कांहीं व्यवसाय नसेल, अशांसाठीं Employment Bureau सारखी एक मध्यवर्ती संस्था असणें जरूर आहे. हल्लीं नोकऱ्या हव्या तेवढया मिळतात; पण, हें युद्ध संपल्यावर, काळ खात्रीनें बिकट येईल, व त्याची तरतूद आपण आतांपासूनच करावयास नको का?

उपरिनिर्दिष्ट कल्पनांचा आपणही विचार करणें जरूर आहे. केवळ बौद्धिक वर्चस्व असून इतउत्तर चालणार नाहीं. आपला समाज स्वयंपूर्ण कसा बनेल, ह्याकडे लक्ष पुरविलें पाहिजे; आणि आम्हाला सांगावयास आनंद वाटतो कीं, या परिषदेच्या चालकांनीं आर्थिक उन्नतीच्या दृष्टीनें नवीन बँक स्थापन करण्याचा जो स्तुत्य उपक्रम केला आहे, तो अभिनंदनीय नाहीं असें कोण म्हणेल? आम्हाला आशा आणि खात्री आहे कीं, आपल्यांतील विद्वान् कार्यकर्ते आपल्या समाजाला बदलत्या कालमानानें योग्य तें मार्गदर्शन करतील. 'सर्वदा प्रसंग पाहोन वर्तन जावें ।' या श्रीसमर्थवचनाप्रमाणें आपण आपल्यांत ज्या उणीवा असतील, त्या भरून कशा निघतील याकडे लक्ष दिलें पाहिजे. पण, त्याचबरोबर जीं दोषस्थलें असतील, तींही नाहींशीं कशीं होतील, तें पाहण्याकडेही कानाडोळा करून भागणार नाहीं. जीवनकलह उत्तरोत्तर किती बिकट होत चालला आहे, हें आपण सर्व जाणतच आहां; व त्याची झळ आपल्या समाजाला कमी कशी लागेल, ह्या दृष्टीनें आपण विचार करून मार्ग काढला पाहिजे. सबंध राष्ट्रहिताच्या प्रश्नांचा निकाल जसा राष्ट्रनेत्यांकडून झाला पाहिजे, तसा ज्या त्या पोटजातींच्या विवक्षित अडीअडचणींचा विचार त्या त्या जातींच्या पुढारी माणसांनीं एकत्र जमून सर्वांच्या विचारें केला पाहिजे, व हितावह व श्रेयस्कर मार्ग काढला पाहिजे. जोंपर्यंत पोटजाती अस्तित्वांत आहेत, तोंपर्यंत त्यांच्या अस्तित्वाकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं. सबंध एकराष्ट्रीय समाज निर्माण होईपर्यंत पोटजाती या अस्तित्वांत राहणार; आणि त्या अस्तित्वांत आहेत,

तोंपर्यंत त्यांचे असे खास प्रश्न असणारच. सबब, आपल्यांतील अनुभवी, विचारवंत व कार्यक्षम गृहस्थांनीं असे खास प्रश्न हातीं घेऊन, योग्य त्या तऱ्हेनें त्यांचा निकाल केला पाहिजे; आणि आम्हाला अशी आशा—नाहीं खात्री-आहे कीं, ह्या परिषदेचे माननीय व अनुभवी अध्यक्ष, तसेंच रा. ब. वैद्य व इतर कार्यकुशल गृहस्थ, यांच्या एकत्रित अनुभवांचा व ज्ञानाचा फायदा आपल्या समाजास मिळेल व त्याची सर्वांगीण उन्नति होईल.

असो. आमचें हें उद्‌घाटनाचें औपचारिक भाषण असल्यानें, जिव्हाळ्याच्या निरनिराळ्या प्रश्नांकडे न वळतां—कारण, त्याबद्दल विषयनियामक कमिटी जरूर तें लक्ष देणार असल्यानें—आम्ही आपणां सर्वांचे फिरून एकदा हार्दिक आभार मानून व श्रीमत् आचार्यांना नम्र प्रणिपात करून, सभेच्या कार्यास रीतसर प्रारंभ करावा अशी इच्छा प्रदर्शित करितों. आपल्या सर्वांच्या सहकार्यानें परिषदेचें कार्य उत्तम रीतीनें पार पडेल, अशी आम्हाला खात्री आहे; व तें तसें निर्विघ्नपणें घडून यावें, म्हणून प्रभू रामचंद्राची आम्हीं मनोभावें प्रार्थना करितों. शेवटीं, श्री ज्ञानेश्वरमहाराज यांनीं ज्ञानेश्वरीच्या अखेरीस म्हटल्याप्रमाणें,

जे खळाची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥

अशी प्रार्थना करून, या परिषदेचें उद्‌घाटन झालें आहे, असें जाहीर करतों.

## परिशिष्ट २६

Speech of Shrimant Raja Saheb of Bhor at the time of the Silver Jubilee Ceremony of the Bhandarkar Oriental Research Institute, Poona.

( 4-1-43 )

Rajesaheb, Sir Radhakrishnan, ladies and gentlemen,

At the very outset, I deem it necessary to express my gratefulness for the honour you have done to me in asking me to preside over the Silver Jubilee Function of today. Let me confess that, I complied with the request of the Managing Body of the Institute with great reluctance and trepidation of heart. I know that Shrimant Raja Saheb of Aundh is the fittest personality for this honour, because the Rajasaheb's shoulders, as everybody of you know, are sufficiently strong and broad to wear the mantle of the Presidentship of today's memorable function. But, for certain technical reasons,— as His Highness is the Chairman of the Regulating Council -- I think that, that course was not possible. His Highness' various attainments, age and cultural equipment of a unique kind merit respect and regard from all. I must now allude to one other important point, namely, that as the worthy President of this Institute, His Excellency Sir Roger Lumley, the popular Governor of Bombay, was to preside over this function, but on account of unavoidable circumstances, His Excellency could not come today. We all feel and feel so keenly the absence of His Excellency, particularly on an occasion like this.

I now turn to the good and enduring work done by the Bhandarkar Oriental Research Institute, which has completed its ( 25 ) twentyfive years of useful existence. Let me tell you that, already I had twice the good fortune of being associated with the ceremonial occasions relating to this Institution. It vividly recalls to my mind the day of July in 1919 when I unveiled the inspiring bust of the late revered Dr. Bhandarkar.

Lord Willingdon, who in later part of his life, came to be regarded as an Ambassador of Empire, inaugurated, as you know, this cosmopolitan-character Institute, which aims at understanding and learning the real history of the past. Then again, in Nov. 1919, I had the proud privilege to offer a hearty vote of thanks to the then Governor of Bombay, His Excellency Sir George Lloyd-who presided over the First Oriental Conference held under the auspices of this Institute. That conference was the fiirst of its kind in the educational history of India. And, this is the third time that I am privileged to show my regard for this worthy Institute, which is devoting its attention to the following fourfold activities :—

(i) The work of the epoch-making Critical Edition of the Mahabharat.

(ii) To give new impetus to Oriental studies by holding Oriental Conferences periodically.

(iii) The publication of the volumes in the Government Oriental series.

(iv) Looking to the administration of the Government Manuscript Library.

The British Academy, London, has appreciated the beneficent activities of this Body in the following terms :— " The Academy has been impressed by the unanimity of many eminent scholars warmly approving the work of the Bhandarkar Oriental Research Institute, as apparent in the published portions of its edition, and trusts that all needful support may be accorded to the prosecution of so national a task." The stupendous work of editing the Critical edition of the Mahabharat is receiving the warm attention of the President of the Institute and the latest report states that, but for the personal solicitude of our worthy President, His Excellency Sir Roger Lumley, for the well-being and progress of the Mahabharat work, it would have been well nigh impossible for the authorities of the Institute to improve the

finances of the Mahabharat Department-especially, during the War period. This amply bears testimony, if at all that be needed, to the keen interest taken by His Excellency, in the good work of this Temple of Learning, which has enabled good many devoted students to bear and carry the torch of Oriental Learning to the distant parts of this world.

I wish to touch one more point, and that is the close affinity between the two cultural nations-I mean India and China. I understand that some time back the Chinese Government have given a full set of the Buddhistic literature in Chinese to this Institute as a token of their regard for this famous Institute. Dr. George K. C. Yeh, the Councillor of the Chinese Embassy in London, has said that China owes much to India and it is not without reason that the Generalissimo-Chiang Kai Shek-said, when he was in India last year, that China owes India a debt which she will try to repay in the future. Taoism has, as many of you know, a great hold on the Chinese mind and by Taoism itself it was darkly (obscurely) hinted that something, that could fill life and eternity with light and hope-this something was to come from the distant wonder-lands of those parts then better known as T'ien Chu-the old name for India. Tien-Chuwas to China in those days what China was to Europe in the 15th and 16th centuries—a remote paradise of wisdom and wealth.

Before I conclude, I cannot refrain from touching the point vital to everybody of us-I mean, the World War. We live in grave and perilous times. The unholy and demonish Axis-alliance ranged against the United Nations is still not completely beaten. Mr. Wendell Wilkie, the famous American personage, observed a few days ago, "This formidable militaristic array is bound together by no relationship other than a common desire for conquest and plunder. It is an alliance that is self-condemned and self-doomed". But, the recent war developments go to inspire hope and confidence in our minds. The tables are turning. A very high

ecclesiastical personality in England has recently said in his Christmas message – " It may still be long before the hour of liberation strikes, but in the place of hope there is now confident assurance. All must pledge themselves to ensure the reality of peace, when the fighting ends, in freedom's triumph." So, let us all hope that, the valiant allied arms may vanquish the enemy this year and bring peace to this tormented world.

I am aware that, you are all so eager to listen to the stimulating and instructive address of the world-famous Seer and Philosopher–I mean Sir Radhakrishnan, who is a distinguished son of India. His contributions to the philosophic field are too well known to need repetition.

I once more thank the Institute for the honour done to me today and warmly hope and trust that the Institute will thrive from year to year and will get the public and Government support in an ever increasing measure to carry out its precious and useful activities ; and now, not wishing to stand any more between the distinguished lecturer of this evening and yourselves, I request Sir Radhakrishnan to give us the benefit of his inspiring address.

---

## परिशिष्ट २७

भारतीय गोसेवा-प्रचारक मंडळ यांच्याकडून मानपत्र

श्री

सम्मानपुरस्सरमाशीर्वादपत्रम् ।

जीयाच्छतं च शरदां भुवि भोरनाथः ।

( रचयिता—हरिभक्तिपरायण विनायकबुवा भागवत, कीर्तनाचार्य, कीर्तनालंकार प्रधानाध्यापक, श्रीनारदीय संकीर्तन शिक्षण महाविद्यालय, रतनवाटक, काशी )

श्रीरामचन्द्रसदुपासनसक्तचित्तः । श्रीशंकरार्चितपदस्सुयशोभिरामः ॥
गोब्राह्मणादिबहुदीनदयार्द्रशीलो । जीयाच्छतं च शरदां भुवि भोरनाथः ॥ १ ॥

नानामहींद्रसमुदायमहाग्रगण्यो । दुर्गाधिपः परममातृपितृप्रभक्तः ।।
सम्राट्प्रदत्तसमुपाधितिप्रशस्तो । जीयाच्छतं च शरदां भुवि भोरनाथः ।। २ ।।
पंतश्च पण्डित इति प्रथितः पुनश्च । साचिव्यभागपि च यो रघुनाथनामा ।।
सर. के. सि. आय. इ. पदवीमनुभूयमानो । जीयाच्छतं च शरदां भुवि भोरनाथः।।३।।
मित्रे तथास्ति पवनस्तु हिरण्यवीर्ये । शत्रौ तु तोयमिव स्थैर्यगिरिर्गरीयान् ।।
स्वीयप्रजासु जननीव सदा शरण्यो । जीयाच्छतं च शरदां भुवि भोरनाथः ।। ४ ।।
पुत्रप्रपौत्रधनधान्यसमृद्धिबुद्धिपूर्णोस्तु । कामधुगभीष्टकरस्त्वखण्डम् ।।
सम्प्रार्थये रघुपतिप्रणतः शुभेच्छु-र्जीयाच्छतं च शरदां भुवि भोरनाथः ।। ५ ।।

श्रीसमर्थकृपेंकरून आजचा मोठा सुदिन समजला पाहिजे, कीं येथें श्रीमंत गोब्राह्मणप्रतिपालक, स्वधर्मनिष्ठ व श्रीरामभक्त राजे सर रघुनाथराव बाबासाहेब पंडित पंतसचिव, के. सी. आय. इ., भोर संस्थानाधिपति, यांच्या शुभागमनाचा अलभ्य लाभ श्रीकाशी येथील श्रीसमर्थ गोसेवा-मठ व भारतीय गोसेवा-प्रचारक मंडळास झाला आहे. तेव्हां, महाराजांच्या करकमलांनीं काशीक्षेत्रीं झालेला श्रीसमर्थ भवन व श्रीरामदुग्धालय यांचा उद्घाटनमहोत्सव अत्यंत यशस्कर असून, भावी उत्कर्षाचा दर्शक आहे. महाराजांचा परिचय भारतवर्षांत नसेल, असा माणूस विरळाच. मोठमोठाल्या रोहिडेश्वरादि दुर्जय दुर्गांच्या रक्षणाचें भाग्य महाराजां-शिवाय इतर कोणासही लाभलेलें नाहीं. श्रीरामसेवेचा व गोरक्षणाचा भाग्योदय श्रीमंतांच्या बाळपणींच झाला आहे; व श्रीमंतांचा आश्रय श्रीगोवर्धनसंस्थेस आहेच. शिरवळ गोवर्धन-आश्रम यांच्या कृपेचें फळ आहे. श्रीमंतांनीं वडिलांची पूर्वपरंपरा मोठ्या एकनिष्ठेनें चाळविली आहे, हें मोठें भूषणावह आहे. असे स्वधर्मनिष्ठ व प्रजाहित तत्पर महाराज पुत्रपौत्रांसह चिरायु होवोत व गोमातेचे कष्ट निवारण होण्याकडे सदैव लक्ष ठेवोत, अशी श्रीरामप्रभू व श्रीविश्वनाथ महाराज यांना प्रार्थना आहे.

श्रीबालकराममंदिर
रामघाट, बनारस
ता. २३-३-४१

श्रीमंतांचे कृपाभिलाषी
श्रीसमर्थ गोसेवा-मठ
व
भारतीय गोसेवा-प्रचारक मंडळ, काशी.

# परिशिष्ट २८

## काशी येथील श्रीसमर्थ महाराष्ट्र भवनांत श्रीचौंडे महाराज यांनीं अर्पण केलेल्या मानपत्र-समारंभाच्या वेळचें श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण.

गुरुवार ता. २३-३-४१ इ.

गोभक्त चौंडे महाराज व सद्‌गृहस्थहो,

आपण आज येथें आमचा जो सत्कार केलात, त्याबद्दल प्रथमतः आम्ही आपले अंतःकरणपूर्वक आभार मानतों. येथें जमलेल्या सर्व सज्जनांच्या एकत्र भेटीचा हा योग केवळ महाराजांच्या इच्छेमुळेंच आम्हास प्राप्त झाला, हे त्यांचे उपकारच आहेत; व या सुसंधीबद्दल आम्हास फार आनंद वाटत आहे.

सज्जनहो, मानपत्राविषयींची इच्छा गोभक्त श्रीचौंडे महाराजांनीं बोलून दाखविली, त्या वेळीं त्यांच्या इच्छेस रुकार द्यावा किंवा नाहीं, असा विचार आमच्या मनांत आला; कारण, ज्या संस्थेतर्फे हा सन्मान केला जात आहे, तिच्या कार्यांत आमच्याकडून तिला कांहीं हातभार लावला गेला आहे, अशीं स्थिति नाहीं. तथापि, महाराजांची इच्छा म्हणजे आज्ञाच अशी आमची समजूत असल्यानें, आमच्यानें त्यांना नाहीं म्हणवेना; शिवाय, आपल्यासारख्यांचा परिचय होण्याची ही अनायासें चालून आलेली संधि वायां कां घालवावी, असेंही आमच्या मनांत आलें; व शेवटीं, आम्ही महाराजांच्या शब्दास अनुमोदन दिलें; म्हणूनच, आजचा हा आनंददायक योग जुळून आला.

सभ्यजनहो, आतांच येथें वाचून दाखवून आम्हास अर्पण करण्यांत आलेल्या मानपत्राचा आम्ही संतोषपूर्वक स्वीकार करीत आहोंत. आपल्या मानपत्रास आपण ‘ आशीर्वादपत्रम् ’ असें म्हटलें आहे, तें फारच समर्पक आहे. कारण, महाराजांच्या संस्थेतर्फे होणाऱ्या सन्मानाकडे आम्ही आशीर्वादाच्याच दृष्टीनें पहातों. या आशीर्वचन-पत्रकांत आमच्याबद्दल आपण जे गौरवाचे उद्गार नमूद केले आहेत व जी शुभेच्छा प्रदर्शित केली आहे, त्यांबद्दल आपले आभार मानणें आमचें कर्तव्य आहे.

सभ्यजनहो, काशीस येणाऱ्या महाराष्ट्रीय प्रवासीजनांच्या सुखसोयीस्तव श्रीसमर्थ-भवन ऊर्फ धर्मशाळा स्थापन करण्याची महाराजांची कल्पना अगदीं योग्य अशीच आहे. अशा भवनाची येथें किती जरूरी आहे, तें आम्ही स्पष्ट करून सांगितलें पाहिजे असें नाहीं; इतकी ती गोष्ट सर्वपरिचित व सर्वमान्य झालेली आहे. गरीब लोकांकरितां अन्नछत्रें व सदावर्तें धनिक लोकांनीं ठेवलींच आहेत. अडचण पडते, ती मध्यम दर्जाच्या लोकांचीच. त्यांच्या राहण्या-उतरण्याची वगैरे विश्वासयोग्य अशी सोय असणाऱ्या ठिकाणांची येथें मोठीच उणीव होती. ती महाराजांच्या या योजनेनें दूर होणारी आहे, ही परम समाधानाची गोष्ट आहे. याच ठिकाणीं शुद्ध गोदुग्ध मिळण्याची सोय करण्याचें महाराजांनीं योजलें आहे, हीही फार चांगली व आवश्यक अशीच गोष्ट आहे. शिवाय, गोरक्षण या एकाच विषयाला महाराजांनीं आपलें सर्व आयुष्य तनु-मनधनेंकरून अर्पण केलें असल्यानें, येथील महाराष्ट्रीय भवनांत गायींचें निर्मळ दूध मिळावें, ही महाराजांची मनीषा सर्वस्वीं योग्य अशीच आहे.

सभासदहो, गाईच्या दुधाच्या महतीबद्दल आम्हीं वेगळें कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. दुधास ‘ पृथ्वीवरील अमृत ’ असें म्हटलें आहे. पाश्चात्य वैद्यक शास्त्रांत व आहारशास्त्रांतही त्यास Perfect food म्हणजे पूर्णान्न असें म्हटलें आहे. गाईच्या दुधांत जो कॅरोटिन नांवाचा पिवळा सत्वांश असतो, त्याचा उपयोग मुख्यतः मेंदूच्या संवर्धनाकडे होतो. या एकाच गोष्टीनें गोदुग्धाचें महत्व शरीरपोषणाच्या व बुद्धि तेजस्वी ठेवण्याच्या कामीं किती आहे, तें सर्वांस कळून येणार आहे. या सर्व दृष्टींनींच हल्लीं पाश्चिमात्य देशांतही गायीला ‘संपत्तीची जननी’ ( The mother of wealth and prosperity ) असें म्हणूं लागले आहेत. तेव्हां, श्रीमहाराजांची ही कल्पना व इच्छा सर्वतोपरी स्तुत्य अशीच आहे, असें म्हणण्यास आम्हास कांहींच प्रत्यवाय वाटत नाहीं; इतकेंच नव्हे, तर असें म्हणण्यांत येथें जमलेल्या आपणां सर्वांचेच विचार आम्ही बोलून दाखवीत आहोंत, असें म्हटल्यास, तें अस्थानीं अथवा अयोग्य होईल असें आम्हांस वाटत नाहीं.

सद्गृहस्थहो, गोरक्षण, गोदुग्धप्रसार व अतिथिभवन हे तिन्ही विषय इतके महत्त्वाचे व जरूरीचे आहेत, कीं त्यांविषयी कितीही बोललें, तरी थोडेंच

होणार आहे. शिवाय, आपणासारख्या सूज्ञांस या विषयांच्या संबंधांत जास्त कांहीं सांगण्याची आवश्यकताही नाहीं. तेव्हां, आपला जास्त वेळ न घेतां, श्रीसमर्थ-भवन व श्रीराम-दुग्धालय या दोन्ही संस्थांचें उद्‌घाटन केल्याचें आम्ही आनंदानें जाहीर करतों. ह्या दोन्ही संस्थांचा जनतेला चांगला उपयोग होवो व त्यांची उत्तरोत्तर भरभराट होवो, अशी श्रीरामचरणीं प्रार्थना करून व आजच्या या सन्मानाबद्दल पुन्हा एकवार आपले मनःपूर्वक आभार मानून, आम्ही आपली रजा घेतों.

---

## परिशिष्ट २९

### मुंबई, डेक्कन मर्चंट्स को-ऑपरेटिव्ह बँकेच्या रौप्य-महोत्सवाच्या वेळचें श्रीमंतांचें अध्यक्षीय भाषण. ता. २५-९-४२ इ.

Mr. Bhopatkar, Dr. Velkar, Mr. Sardesai and the Directors of the Bank, ladies and gentlemen,

We have assembled here this afternoon on a happy occasion. The Deccan Merchants Co-operative Bank Ltd. is celebrating its Silver Jubilee today. It has worthily passed through its period of nonage, and has rightfully taken its place among the great co-operative Banking institutions of the Bombay Presidency. And here, I shall be failing in my duty if I do not express my warm feelings of thankfulness to the lively and energetic management of this Bank. Let me frankly tell you that when Mr. Sardesai first approached me with an importunate request to preside over this function, my heart really trembled, the reason for this being obvious. However, with great trepidation of heart, I accepted the invitation, because I could not say 'No' to him. I lay no claim to any proficiency in or great experience of banking. And, therefore, before proceeding further, I must express my gratefulness to you for the kind words you have spoken about me.

This world-famous city of Bombay is often spoken of, as the hub of the financial and industrial activities of India. Mills, factories, banking houses of enormous magnitude, insurance companies etc. are crammed in this city of smoke and towering structures. But, the irony of it is that, all the above financial activities are practically in the hands of the non- Maharahstrians. The reason for this is not far to seek. The Maharashtrians had devoted their energy and attention to education, in which field they stand supreme. In this city, I am told that, the Deccanis easily outnumber any other community, but unfortunately what they have gained in number, they have terribly lost in the monetary sphere. This deplorable phenomenon may even lead one to utter that business and the Maharashtrian stand at cross roads and are diametrically opposed to each other.

But, the last World War of 1914-18 gave a stimulus to the apathy or lethargy—whatever we may call it—of our community residing particularly in Bombay. 'Out of evil cometh good,' they say; and some enterprising young men made up their minds to enter this preserve of other people. Realising the truth that 'Union is strength', these young men, fired with the ambition of making their name in business, established the Deccan Merchants Association in 1912, and this bank, which has seen this glorious day, is the logical development of that parental body. As you have just listened, this Bank came into being in 1917--a year most critical in the period of the last war. And one naturally feels proud to see this Institution attaining its present-day position among the co-operative banks of this Presidency. And, here one must pause for a while to give credit to the cautious and economic management of this concern. Year after year, the turn-over of the bank's business is steadily increasing and thereby bringing in corresponding increase in the gains; but, the noteworthy point appears to be that, the expenses are not allowed

to mount up. This speaks volumes for the wise and economic management of this Bank.

We all know that this bank is worked on a conservative principle—a principle certainly not unknown to our forefathers. In the days of yore, the village-folk carried on their work on the basis of mutual help. There may not then be an elaborate procedure of the co-operative system, but the idea of team-work underlying was, to all intents and purposes, a part and parcel of the life of the rural population. But, to be fair, one must admit that the co-operative progress formulated on scientific lines is a distinct contribution of the modern times. And, we all owe a deep debt of gratitude to the modern pioneers—such as the late Gopal Krishna Deodhar, Lallubhai Samaldas, Brayne and others, who moved heaven and earth to popularise this activity.

Even at the present critical juncture, one finds the imperceptible hand of this principle guiding and steering the wheel of the allied war-machine. The whole world is passing through a very critical ordeal. But, it is the inevitable law that darkness must give place to light and the right must overpower the evil. Therefore, those wise heads, that cogitate over the intricate questions of finance and business, must bestir in time to the programme of post-war reconstruction. The present World War has opened many a new avenue to the businessmen of India and the Maharashtrians of this city, I hope and trust, who have already made a mark in the commercial life, will not fail to broaden the field of their activities and thus assist the younger generation to come to the fore. In doing this, one may, with advantage, bear in mind that it is our duty to make our population economically strong and psychologically more receptive of new ideas. The banking habit must grow. We are given to too much thinking of political issues. Social and particularly economic questions receive but scant attention. But, the great Madhavraoji

Ranade had harped on this very point long ago. I would consider that all these essentials move *pari passu*.

I cannot refrain from alluding here to the all-important and all-absorbing present day question of War which is knocking at our doors. The eastern enemy is near our threshold and none knows when it intends actually to cross it. Heaven forbid such a calamity ! But, it as well behoves us all to pool our resources and muster up our strength to keep at bay our common enemy. In this connection, I am put in mind of some of the words of that galvanising Royal Christmas message of 1941.

His Imperial Majesty said, " It is in serving each other and sacrificing for the common good that we are finding our true life ". And, it is a curious coincidence that the principle of co-operation found a tacit expression in that inspiring message.

Ladies and gentelmen, I have said what little I wanted to say. The inaugural address of Mr. Bhopatkar and the speeches made by the gentlemen who preceded me, have, if I may say so, done justice to the subject. And, it now remains for me to thank you once again for inviting me to preside over your Silver Jubilee celebrations and to wish prosperity and success in an ever increasing measure to this banking concern in this metropolitan city of Bombay.

## परिशिष्ट ३०

कुरुंदवाड (सीनिअर) स्टेट लायब्ररी या संस्थेच्या रौप्य-महोत्सव-प्रसंगीं कै. श्रीमंत अण्णासाहेब पटवर्धन यांच्या छायाचित्राच्या अनावरण-समयींचें श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण. (बुधवार ता. ४-२-४२ इ.)

श्रीमंत राजेसाहेब, श्रीयुत तात्यासाहेब केळकर, दिवाणबहादुर कुळकर्णी व सभ्य स्त्रीपुरुषहो,

कुरुंदवाड (सीनिअर) स्टेट लायब्ररीच्या चालकांनीं आम्हास कै. श्रीमंत भालचंद्र चिंतामणराव उर्फ आण्णासाहेब पटवर्धन यांच्या छायाचित्राचा अनावरण-विधि करण्याबद्दल विनंति केली व ती विनंति आम्हीं मोठ्या आनंदानें मान्य केली; त्याचें कारण म्हणजे कै. आण्णासाहेब यांच्याविषयीं आम्हास पूर्वीपासूनच अत्यंत प्रेम व अभिमान वाटत असे, व अशा प्रसंगानें आम्हास त्यांच्याविषयीं वाटणारा आदरभाव सहज व्यक्त करतां येईल हें पाहून, तसेंच हा समारंभ आमच्या प्रिय जामाताच्या संस्थानांत होत आहे हें पाहून, आम्ही आपलें अगत्याचें आमंत्रण स्वीकारलें व अशा तऱ्हेनें आपण आम्हांस ही जी सुवर्णसंधि दिली, त्याबद्दल आम्ही आपले अत्यंत आभारी आहों.

ज्या मृतात्म्याच्या पार्थिव देहाचें छायाचित्र आपणां सर्वांसमोर आहे, त्या थोर पुरुषांबद्दल चार शब्द येथें सांगणें क्रमप्राप्त आहे. श्रीमत आण्णासाहेबांचा जन्म ता. १२ मे सन १८७३ मध्यें झाला. स. १८९१ मध्यें ते मॅट्रिक झाले. स. १८९७ मध्यें बी. ए. परीक्षा (अलाहाबाद विश्वविद्यालयाची) उत्तीर्ण झाले, व त्यांत संस्कृत विषयाचें पदकही त्यांनीं मिळविलें. यावरून, लहानपणापासून त्यांचा विद्याव्यासंग किती उच्च होता, हें दिसून येणार आहे. ते ता. २ एप्रिल १९०८ रोजीं गादीवर आले व ता. १० सप्टेंबर १९२७ रोजीं त्यांनीं आपला पार्थिव देह ठेविला. एकोणीस वर्षांच्या अवधींत कै. श्रीमंत आण्णासाहेब यांनीं लोकोपयोगी पुष्कळच गोष्टी करून आपलें नांव प्रजाजनांना प्रिय करून ठेविलें आहे. त्यांचा व आमचा संबंध अनेक प्रसंगीं आला व त्या वेळीं त्यांची साधी राहाणी, मनमिळाऊ स्वभाव, ईश्वरनिष्ठा, शिक्षणप्रेम, वगैरे गुणसमुच्चय आम्हास

साहजिक दिसून आला. दक्षिण महाराष्ट्रांतील सरदारांतर्फे स. १९१२ सालीं ते मुंबई कौन्सिलांतही निवडून आले होते. या सर्व गोष्टींवरून कै. आण्णासाहेब हे लहान-थोर सर्व लोकांमध्यें किती प्रिय होते व सार्वजनिक काम करण्याची त्यांना किती उत्सुकता होती, हें सिद्ध होणार आहे.

त्यांच्या अकालीं निधनामुळें राज्याची सर्व जबाबदारी राणीसाहेब यांच्यावर पडली, व आम्हांला सांगण्यास मोठा अभिमान आनंद वाटतो कीं, ती जबाबदारी, तसेंच आपल्या अल्पवयी मुलाच्या संगोपनाची व शिक्षणाची जोखीम, त्यांनीं मोठ्या कुशलतेनें पार पाडली. गेल्या दसऱ्याच्या दिवशीं श्रीमंत चिंतामणराव भालचंद्रराव ऊर्फ बाळासाहेब यांना राज्याधिकार प्राप्त झाला व त्या गोष्टीस उणेपुरे तीन महिने होतात न होतात, तोंच ब्रिटिश सरकारकडून त्यांना 'राजा' हा वंश-परंपरेचा बहुमानदर्शक किताब मिळाला, याबद्दल आमच्याप्रमाणेंच आपणां सर्वांना किती आनंद होत आहे, हें आम्ही पूर्ण जाणतों; व त्याबद्दल त्यांचें जाहीर-रीत्या अभिनंदन करतों. दसऱ्याच्या त्या मंगल प्रसंगीं श्रीमंत राजे बाळासाहेब यांनीं जें भाषण केलें, त्यांत त्यांना आपल्या मातापित्यांबद्दल वाटणारा आदर किती उच्च व थोर आहे हें दिसून येतें. ते म्हणाले: "परमपूज्य तीर्थरूप स्वानंदवासी श्रीमंत आण्णासाहेब व पुण्यशील मातोश्री आईसाहेब, या दोघांच्या कृपेनें परमेश्वर, साम्राज्य सरकार व माझे प्रिय प्रजाजन यांच्याविषयींचें माझें कर्तव्य पार पाडण्याचें शिक्षण व पूर्वपरंपरा मजकडून उल्लंघिली न जाईल अशा प्रकारचें मार्गदर्शन मला मिळालें आहे. आत्मवंचना न केल्यास, अन्य मनुष्यास कोणीही फसवूं शकणार नाहीं, अशी मला माझ्या मात्यापित्यांकडून शिकवण मिळाली आहे."

आतां, ज्या वाचनालयानें प्रस्तुतचा समारंभ घडवून आणला, त्या-बद्दलही चार शब्द बोलणें मी माझें कर्तव्य समजतों. राजाला प्रजेसंबंधीं जीं बहुविध कर्तव्यें करावीं लागतात, त्यांत प्रजेच्या बौद्धिक शिक्षणाची काळजी घेणें हें मोठें कर्तव्य आहे असें आम्ही समजतों. या दृष्टीनें कै. श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं आपल्या राज्यांत वाचनालयाची साखळी कशी गुंफिली, हें महशूर आहेच. कार्लाइलनें म्हटलें आहे कीं :— 'The true University

of these days is a collection of books'. विद्वान् माणसें या जगांतून जातील, पण त्यांचे विचार पुस्तकरूपानें अभंग व अनंत काल राहूं शकतील. त्याचप्रमाणें पुस्तकें वाचतांना काय हेतु असावा, याबद्दल एका विद्वानानें म्हटलें आहे कीं :—"The object of all reading should be the intense desire to get at the real truth." आपणां सर्वांस माहीत आहेच कीं, अमेरिकेंतील प्रसिद्ध दानशूर मि. अँड्र्यू कार्नेजी यानें वाचनालयें व ग्रंथसंग्रहालयें यांसाठीं कोट्यवधि रुपये देणगीदाखल दिले. ग्रंथसंग्रहालयांतील पवित्र स्थळीं बसलें असतां, माणसास साहजिकच सुविचार सुचतात. आपल्या ज्ञानाचा फायदा इतरांस सहज देतां येतो. या विषयासंबंधीं पुष्कळ बोलावेंसें वाटतें. पण, त्यास स्वतंत्र प्रसंगच पाहिजे. असो. येथील लायब्ररीचा रजतमहोत्सव (Silver Jubilee) होत आहे, हें पाहण्यास तिच्या स्थापनेच्या वेळचीं जीं माणसें असतील, त्यांना किती आनंद व धन्यता वाटत असेल, हें मीं निराळें सांगावयास नको. या उपयुक्त संस्थेचा फायदा संस्थानचा नोकरवर्ग व इतर ग्रामस्थही घेत आहेत, ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. आतां, कै. आण्णासाहेब यांचें जें छायाचित्र येथें लावण्यांत आलें आहे, त्यामुळें या संस्थेला तर तें एक अभिमानास्पद भूषणच मिळालें आहे; पण, त्याबरोबर आम्हाला अशी खात्री आहे कीं, त्या थोर विभूतीकडे नित्य पाहाण्यानें आपणां सर्वांसही प्रोत्साहन मिळून आपल्या संस्थेकडून शिक्षणप्रसाराचें काम अधिक सुलभ व विशाल होईल, व या ज्ञानदानाच्या पवित्र कार्यास श्रीमंत राजेसाहेब यांचीही पूर्ण सहानुभूति मिळेल, यांत शंका नाहीं.

आज आपण सर्व ज्या भालचंद्र मेमोरिअल हॉलमध्यें जमलों आहों, त्या हॉलचा उद्घाटन-समारंभही ता. २८ ऑगस्ट १९१९ रोजीं कै. श्री. आण्णासाहेबांच्या इच्छेप्रमाणें आमच्या अध्यक्षतेखालीं झाला होता, त्याचें स्मरण आम्हास या प्रसंगीं होत आहे.

आजच्या महोत्सवाला महाराष्ट्राचे नामवंत पुढारी व साहित्यसम्राट् श्रीयुत केळकर हे अध्यक्ष लाभले असल्यानें, आपणां सर्वांचा आनंद द्विगुणित

होणें साहजिकच आहे. मला माहीत आहे कीं, त्या साहित्यसम्राटाचें सुविचार-परिप्लुत व्याख्यान ऐकण्यास आपण सर्वजण आमच्याप्रमाणेंच उत्सुक आहांत.

आतां, पुन्हां एकदां श्रीमंत राजेसाहेब व या संस्थेचे चालक यांचे हार्दिक आभार मानून व या संस्थेची अशीच उत्तरोत्तर भरभराट होत जावो अशी श्रीप्रभुचरणीं प्रार्थना करून, आम्ही कै. श्री. आण्णासाहेब महाराज यांचें तैलचित्र अनावृत्त केलें असें जाहीर करतों.

---

## परिशिष्ट ३१

### मुंबई, दादर येथील जनरल एज्युकेशन सोसायटीच्या छबिलदास लल्लुभाई मुलांच्या हायस्कूलच्या वार्षिक बक्षिस-समारंभाच्या वेळचें श्रीमंतांच्या अध्यक्षीय भाषणांतील उतारा.

( शनिवार ता. ६।१२।४१ )

"I am sincerely thankful to Principal Joshi and the staff for inviting me to preside over the Prize Distribution Ceremony of this well-known School. Of course, I complied with the importunate request of the Principal with some hesitation, because, I am fully conscious of my own limitations in the region of education. Your Principal in his speech has made many a flattering remark about me, but I for myself take them only as an indication of his regard for me. I cannot claim to be an educationist or one fairly conversant with the modern trend of educational progress in its various aspects. No doubt, I have travelled far and wide, seen some educational institutions in India and abroad, met with savants and persons whose life was devoted to the sacred cause of education; but, this alone is not sufficient to enable me to contribute something tangible to the field of the present-day education. However, let me assure you that I shall try, if I could, to add my humble mite to the cause of education by way of advice to my young friends who are gathered here in such large number. It is to them I primarily look, because on them rests the responsibility of the future of our Motherland.

" Let me tell you that I cannot resist the temptation of turning my gaze to my young friends, I mean, the students of this School. I see before me many a radiant face giving promise of bright future. I was so pleased to see youngsters moving in an orderly fashion, when they went through the physical demonstration programme yesterday. It was a sight which, I think, I shall never forget. You will kindly excuse me if I refer here to the oft-repeated remark that the battle of Waterloo was won on the play-fields of Eton. My young friends, on you and you alone rests the responsibility of making yourself useful to the defence of our Motherland. So you will make it a first point to develop your physical condition, of course not losing sight of the educational side. They must progress *pari passu*. The ex-Madras Premier, Mr. Rajgopalacharier, has of late advised the Allahabad students that the students should not actively participate in politics so long as they are undergoing education. They may with advantage study works on politics. Politics embraces emotions and you know, when a man becomes emotional, he is at times not competent to decide accurately. Similar words were utterd by Mr. Kher, the ex-Bombay Premier. And I would therefore like to commend this piece of advice to you for your well-being.

" I would here like to put before you the utility of the habit of helpfulness. It is not upto you to wait for big opportunities, because they come seldom; but, little ones come all day over and if you first grasp them, they will create the habit of service, which is the crown of the selfless life. I would like to draw your particular attention to the precious words of advice of the late Dr. Besant. They are, " Trust in the love of God, render manly obedience to Law, which is the mark of a good citizen; protect the weak, teach the ignorant; be strong in right principles; be compassionate to the suffering and gentle to all; so shall you be worthy to be a son of your Motherland and to lift her name high among the nations of the world. My young friends, please treasure up the above advice and I trust that the hope expressed therein cannot but be fulfilled."

# परिशिष्ट ३२

Speech made by His Highness the Raja Saheb of Bhor on the occasion of his visit to Maharashtra Education Society's College, Poona, on Wednesday the 5th November 1947.

Shrimant Sardar Jagannath Maharaj Pandit, Principal Khadye, Secretary and Members of the Maharashtra Education Society and gentlemen,

I deem it a great pleasure and honour to have an opportunity to meet you all here and it is my prime duty to express my heartfelt thanks for this happy occasion to the Trustees and members of the Maharashtra Education Society. As one closely related to the Society, I was thinking of visiting and personally inspecting this College ever since its foundation; but, due to several factors, the thought could not be put into practice and would have remained so, but for the requests by Shrimant Jagannath Maharaj and the energetic Secretary of the Society. To-day, I have the satisfaction of personally going round the precincts of the College and seeing the various departments of the College, about which I merely used to hear a lot. It is a very befitting thing that this youngest child of the Society, imparting higher knowledge, should come into existence after the Primary Schools, and High Schools; for, it is a common fact that Wisdom-teeth appear later at a ripe age. Principal Khadye has just now given an idea of the difficulties and weathers encountered by the Society, but today's visit to this College convinces me that with Principal Khadye at the helm and the ceaseless efforts of his colleagues and mates, the Society will soon enter a safe port. This is quite apparent, since, even after considering the immense expenditure involved in running a full-fledged College, complete with up-to-date scientific apparatus and equipment, the members of the Society have chosen to pay

equal attention to Arts and Science--a union of which is alone able to equip the nation thoroughly.

A new era of independence has dawned in our Indian Dominion since 15th August 1947, and various upheavals in every sphere of the national life are following in its wake.

" The old order changeth, yielding place to new " ; but, this new order presents grave problems, the main of them being those concerned with education, the very corner-stone of a fully democratic and strong India. In spite of the very grave and bloody problems facing them, all the Governments-Central and Provincial--are trying to guide education along the right lines, and various bills are on the anvil in the Provincial Legislatures. Notable among these bills are the two in the Bombay Legislature viz., the Bombay Primary Education Act and the Poona University Bill. The foundation of Poona University now appears to be a settled fact and the educationists have full scope for practising the so far neglected ideals of education. As the Bombay Premier, Mr. Balasaheb Kher, puts it about Poona University ; " This is the first sweet fruit of the tree of liberty." The paucity of technical and scientific terms and books of science in Marathi or any of the other Provincial languages are two glaring defects which can be cured only by the united efforts of scholars with the motto " Facta Non Verba ". I fully trust that the Society will do its bit towards curing such and other like defects in the present system of education and inculcating the right view-point and the correct locus of education in the minds of the younger generation, on whose shoulders rests the giant task of raising the intellectual standard of the new independent nation of India.

Once more, I wish to express my thanks to the members of the Society for the warm welcome extended by them to me and my eager desire to see this youngest child of the Society

striding into boyhood and proving to be the brightest child of the real 'Alma mater,' the University of Poona.

Before concluding, let me assure you that I shall be ever sympathetic to the furtherence of the interests of the Society and shall try in my own way to offer guidance and help in the projects and problems of the Society. With these words and wishes, gentlemen, I conclude.

---

## परिशिष्ट ३३

श्री गणेश मोफत वाचनालय व ग्रंथालय, पुणें, या संस्थेच्या रौप्य-महोत्सवाच्या प्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलेलें भाषण.

सोमवार, तारीख २४ सप्टेंबर सन १९४५

सरदार मुजुमदार, प्रोफेसर काळे व सभ्य गृहस्थहो,

आज आपण आम्हांस आपल्या श्री गणेश मोफत वाचनालयाच्या व ग्रंथालयाच्या, रौप्य-महोत्सवाचें अध्यक्षस्थान दिल्याबद्दल आपले आभार मानणें हें आम्ही आपलें प्रथम कर्तव्य समजतों.

आपल्या मोफत वाचनालयाची व ग्रंथालयाची स्थापना सन १९१९ मध्यें झाल्याचें आपल्या अहवालावरून दिसतें. त्या वेळीं पुणें येथें अशा तऱ्हेच्या संस्था प्रत्येक पेठेंत स्थापन झाल्याचें आमच्या ऐकिवांत आहे. परंतु, त्यांपैकीं बऱ्याच संस्था आजमितीस नामशेष झालेल्या आहेत. त्यांस कारणें कांहींही असोत, त्यांचा नामनिर्देश करण्याचें कारण नाहीं. परंतु, आम्हांस नमूद करण्यास फार आनंद होत आहे कीं, आपल्या वाचनालयाचा व ग्रंथालयाचा रौप्य-महोत्सव करण्याचें सद्भाग्य आपणांस लाभलें आहे, व आपलें त्याबद्दल अभिनंदन करणें जरूर आहे.

संस्था स्थापन करण्यापेक्षां ती टिकविणें ही फार महत्त्वाची गोष्ट आहे; व आपल्या संस्थेचे सेक्रेटरी रा. हरि भालचंद्र देशपांडे व चालक यांनीं दीर्घोद्योगानें व चिकाटीनें ही संस्था चालविली आहे, हें त्यांना खास भूषणावह आहे. यायोगें त्यांनीं आपणांस ऐका सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें, 'प्रारब्धमुत्त-

मजनाः न परित्यजंति ' या श्लोकपादांतील 'उत्तमजन' पदवी प्राप्त करून घेतली आहे, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

हल्लींच्या काळीं व पूर्वींसुद्धां वाचनालयें व ग्रंथालयें यांना शिक्षणाचीं केंद्रें समजण्यांत येत होतें. कार्लाइलनें तर असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, 'A true university of modern days is a library of good books.' पाश्चिमात्य संस्कृतीचा प्रादुर्भाव झाल्यानंतरच वाचनालयांचा व ग्रंथालयांचा प्रसार हिंदुस्थानांत झाला असें नाहीं, तर पूर्वींच्या काळीं मुद्रणकला अस्तित्वांत नव्हती व ग्रंथ इतके सुलभ प्राप्त होत नव्हते, तरी देखील आपल्या देशांत वाचन-मंदिरें होतीं, व तीं इतकीं सुसपंन्न होतीं कीं, आपल्याकडील अेका वाचनालयांतून अेका चिनी पंडितानें सुमारें ( ४०० ) चारशें ग्रंथ उतरून नेल्याचें बेळगांवचे डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज लाड यांनीं परवां कोल्हापूर येथें केलेल्या भाषणांत सांगितल्याचें आपणां सर्वांना अवगत असेलच.

आतां, आपल्या वाचनालयाच्या २५ पंचवीस वर्षांच्या अहवालाचें निरीक्षण केल्यास, त्यावरून आपणांस असें समजून येअील कीं, सदरहू वाचनालयाची व ग्रंथालयाची संस्था चालकांनींच पक्षाभिनिवेशविरहित चालविली आहे. वाचनालयाची व्याप्ति ही नुसती ' वाचनालय ' इतकी संकुचित न ठेवतां, ज्ञान-संपादनाचीं अनेक द्वारें म्हणजे व्याख्यानें, नाट्यप्रयोग, गणेशोत्सव, शारदोत्सव, वगैरे समारंभ करून आपल्या वाचनालयाचें क्षेत्र त्यांनीं विस्तृत केल्याचें आमच्या निदर्शनास आलें आहे. तसेंच, आपण आपल्या वाचनालयातर्फें पुणें येथील व इतर ठिकाणच्या थोर व्यक्तींचा, मग त्या कोणत्याही पक्षाच्या अगर जातीच्या असोत, सत्कार-समारंभ केल्याचें दिसत आहे, व अशा रीतीनें आपण आपल्या वाचनालयाची व ग्रंथालयाची व्याप्ति व उपयुक्तता वाढविली असून, अनेक भिन्न मतांच्या व निरनिराळ्या क्षेत्रांत काम करणाऱ्या पुढारी व्यक्तींची सहानुभूति संपादन केल्याचें आमच्या निदर्शनास आलें आहे.

प्रोफेसर वामनरावजी काळे यांच्या तैल-चित्राचें अनावरण आपल्या वाचनालयांत आपण नामदार मावळणकर यांच्या हस्तें केलें, त्या वेळीं शुभ संदेश आम्हीं पाठविल्याचें आपल्या अहवालावरून दिसत आहे. तसेंच, कायदे-कौन्सिलमधील सभासदांचा सत्कार आपण केल्याचेंही आमच्या निदर्शनास आलें आहे.

आपल्या संस्थेचीं कार्याच्या दृष्टीनें प्रथमचीं १४।१५ वर्षें भरभराटीचीं गेलीं; परंतु, अलीकडे ८।१० वर्षें आपल्या संस्थेस द्रव्य-साहाय्य मिळवितां आलें नाहीं, व त्यामुळें चालकांना संस्थेचीं कार्यें स्वतःच्या खर्चानें पार पाडावीं लागतात, हें लक्षांत घेऊन व आपल्या संस्थेचें पक्षातीत लोकसंग्रहाचें कार्य विचारांत घेऊन, आम्हीं आपल्या संस्थेस रु. ५०० पांचशें देणगी दिल्याचें ह्या शुभ प्रसंगीं जाहीर करीत आहोंत.

आतां, ह्याच रौप्य-महोत्सवाच्या प्रसंगीं आपण आपले प्रथमपासूनचे सल्लागार श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्या तैलचित्राचें अनावरण करण्याचें ठरविलें, त्याबद्दल आम्हांस फार समाधान वाटतें; व प्रामुख्यानें हीच गोष्ट आपल्या आजच्या समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्यास आम्हास कारणीभूत झाली आहे, हें नमूद करण्यास आम्हांस संतोष वाटत आहे.

श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांचा व आमचा परिचय आज दोन तीन तपांचा आहे.त्यांच्या सार्वजनिक—व विशेषतः इनामदार लोकांच्या हितसंरक्षणांबद्दल केलेल्या—कामगिरीबद्दल, आम्हांस अभिमान वाटतो. त्यांची व्यापक वृत्ति व सर्वसंग्राहक बुद्धिमत्ता यांबद्दल आम्हांस नेहमींच कौतुक वाटतें. इतिहाससंशोधन व संगीतकला या कामीं प्रामुख्यानें त्यांनीं अहर्निश फार परिश्रम केले आहेत; व पुणें मुक्कामीं अशी संस्था क्वचितच असेल, कीं ज्या संस्थेशीं श्रीमंत आबासाहेब यांचा या ना त्या तऱ्हेनें संबंध आलेला नाहीं. श्रीमंत आबासाहेब यांच्या तैलचित्राचें अनावरण करून आपल्या संस्थेनें, श्रीमंत आबासाहेब यांनीं या संस्थेवर केलेल्या उपकारांच्या ऋणांतून, अंशतः उतराई होण्याचा प्रयत्न केला आहे, असें आम्हांस वाटतें; व आम्ही या प्रसंगीं त्यांच्या फोटोचें अनावरण मोठ्या आनंदानें केलेलें आहे.

आतांच श्रीमंत सरदार आबासाहेब ह्यांच्या अभिजात संगीतप्रेमाचा आम्हीं उल्लेख केला आहे. त्यांचा संगीताचा सखोल अभ्यास व प्रात्यक्षिक व दीर्घ अनुभव ह्यांचा उपयोग जनतेस व्हावा, हें केव्हांही इष्टच आहे व आम्हांस नमूद करण्यास आनंद वाटतो कीं, आबासाहेब हे ‘संगीत-संग्रह’ या नांवाचा बहुमोल ग्रंथ अत्यंत परिश्रमपूर्वक तयार करीत

असून, तो लौकरच पूर्ण होऊन जनतेपुढें येईल अशी आम्ही खात्री बाळगतों. आम्हांस सरदार मुजुमदार यांच्याबद्दल वाटणारा आदर व प्रेम यांचें अल्प प्रतीक म्हणून त्यांच्या 'संगीत-संग्रह' ग्रंथासाठीं रु. ५०० पांचशें देणगीदाखल दिल्याचें मोठया आनंदानें आम्ही जाहीर करतों. सदरील ग्रंथ म्हणजे संगीत-संबंधींचा ज्ञानकोशच होईल अशी आम्हास उमेद आहे.

श्रीमंत आबासाहेब यांचा फोटो संस्थेंत येणाऱ्या वाचकांना व चालकांना सदोदित कार्यप्रवण होण्यास स्फूर्तिप्रद होईल, असा भरंवसा वाटतो.

सभ्य गृहस्थहो, आम्हांला जें काय या प्रसंगीं सांगावयाचें होतें, तें आम्हीं सांगितलें आहे. आपल्या संस्थेची दिवसानुदिवस भरभराट होवो व तिचे सुवर्ण व हीरक महोत्सव पहाण्याचें भाग्य चालकांना लाभो, अशी श्री प्रभुचरणीं प्रार्थना करून व पुन्हां एकदां आपले आभार मानून, आम्ही आपली रजा घेतों.

## परिशिष्ट ३४

### अभिनंदनीय विवाह

केसरी, ता. २०-६-४१ इ.

गेल्या ता. १८ रोजीं सकाळीं सुमुहूर्तावर भोर येथें कुरुंदवाडाधिपति श्रीमंत चिंतामणराव भालचंद्रराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन व भोरकर श्रीमंत राजेसाहेब बाबासाहेब यांची कन्यका पद्मावतीराजे यांचा विवाह मोठया थाटानें साजरा करण्यांत आला. वधूवरें सुशिक्षित व खानदान कुळांतील असल्यामुळें हा समसमान संयोग शुभकरच होय, यांत शंका नाहीं. लवकरच कुरुंदवाड संस्थानची मुखत्यारी श्रीमंत बाळासाहेबांच्या हातीं येणार आहे. भावी काळांत ते आपल्या संस्थानच्या राज्यकारभारांत सपत्निक उत्साहानें भाग घेऊन प्रजेचा दुवा मिळवितील अशी आशा आहे. पण, या विवाहाचें मुद्दाम अभिनंदन करावयाचें, तें तो देशस्थ-कोंकणस्थ विवाह होय, म्हणून. ब्राह्मणांतील पोटजातींत परस्पर विवाह करणें पूर्णपणें शास्त्रीय असतांही, तसे विवाह कांहीं वर्षांखालीं विशेष होत

नसत. अलीकडे मात्र तसे विवाह पुष्कळच होतात व त्यामुळें ब्राह्मणांच्या जाती-जातींत निष्कारण वसत असलेली तेढ किंवा वृथा उच्चनीच भाव मोडण्यास चांगलीच मदत होत आहे. तथापि, हे विवाह मध्यम वर्गांतील पांढरपेशांत होतात. 'राजा कालस्य कारणम्' या न्यायानें पदवीनें, परंपरेनें, पराक्रमानें सर्वोच्च ठरलेल्या राजे लोकांच्यांतच किंवा संस्थानिकांच्यांत असे विवाह जेव्हां होतात, तेव्हांच असल्या सुधारणांवर पक्के शिक्कामोर्तब झाल्यासारखें वाटतें. मराठेशाहींत देशस्थ-कोंकणस्थ व देशस्थ-कऱ्हाडे यांच्यांत असे विवाह झालेले आहेत. सुप्रसिद्ध पहिले पेशवे पिंगळे यांच्या घराण्यांत व डुबरेकर बर्वे यांच्या घराण्यांत अशी सोयरीक झालेली आहे. नानासाहेब पेशवे यांनीं वाखरे घराण्यांतील देशस्थांची मुलगी दुसऱ्या लग्नाच्या वेळीं केली, हें प्रसिद्धच आहे. अशीं अनेक उदाहरणें काढून दाखवितां येतील. अगदीं अलिकडचें उदाहरण म्हणजे जमखंडीकर व बावडेकर घराण्यांतील शरीरसंबंध होय. असो. वरील दोन्ही राजघराण्यांनीं या वेळीं समाजाला आणखी एक अनुकरणीय उदाहरण घालून दिलें, हें अभिनंदनीय होय.

---

## परिशिष्ट ३५

ऐक्य; सातारा, ता. १३–७–१९४१.

राजाच्या घरचा साधा समारंभ

आनंद–लीला विवाह.

भोर संस्थानचे अधिपति राजा श्रीमंत सर रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब पंडित पंतसचिव यांचे द्वितीय चिरंजीव राजकुमार श्री. आनंदराव ऊर्फ बापूसाहेब यांचा विवाह सौ. कां. लीला ऊर्फ दुर्गा पुंडले यांच्याबरोबर शुक्रवार ता. ४–७–४१ इ. रोजीं सकाळीं ८ वाजून ३ मिनिटांनीं पुणें येथील राजेसाहेबांच्या 'लक्ष्मी विलास' निवासस्थानीं झाला.

### विवाहवैशिष्ट्य, साधेपणा

या विवाहाचें वैशिष्ट्य म्हणजे लग्नाच्या वेळीं थाटमाट, डामडौल व इतर फालतू समारंभ यांस अजीबात टाळा दिला होता. लग्न वैदिक पद्धतीस अनुसरून शांतपणानें पार पडलें. वधूवरांना आहेर, अभिनंदनपर तारा पुष्कळ आल्या. त्याचप्रमाणें अनेकांकडून शुभचिंतनाच्या तारा व पत्रें अजून येत आहेत. या प्रसंगानिमित्त संस्थानांतील सर्व शाळा, कोर्टें, कचेऱ्या वगैरेस एक दिवस सुट्टी देण्यांत आली होती.

### वधू-वर यांची माहिती

राजकुमार बापूसाहेब हे सुविद्य असून प्रकृतीनें सुदृढ आहेत. त्यांना फोटोग्राफीचा अत्यंत नाद आहे. पुणें येथील प्रसिद्ध नूतन मराठी विद्यालयांत हायस्कूल-शिक्षण पूर्ण करून ते यशस्वी रीतीनें स. १९३९ मध्यें मॅट्रिक परीक्षा पास झाले व कॉलेजशिक्षणासाठीं त्यांनीं सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें, यांत नांव दाखल केलें. पुढील वर्षी ते एफ. वाय. परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांनीं कॉलेज-मध्यें असतांना वर्षाचा यू. टी. सी. चा कोर्स यशस्वी तऱ्हेनें पार पाडलेला आहे. स. १९३७ मध्यें ते श्रीमंत राजेसाहेब यांच्याबरोबर इंग्लंड व कॉन्टिनेन्टवर प्रवास करून आलेले आहेत. वधू सौ. लीलाबाई या सुस्वभावी व सुविद्य असून इंग्रजी शिक्षण पुणें येथील कन्या शाळेंत घेत आहेत. त्यांचे वडील रा. श्रीधर विष्णु पुंडले हे पुणें जिल्ह्यांतील रावेत गांवचे इनामदार आहेत.

### अभिनंदनीय व अनुकरणीय उपक्रम

या लग्नानें इतरांना धडा घेण्याजोगा उपक्रम केला आहे, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. वरील लग्नप्रसंगीं कोणत्याही तऱ्हेच्या अनावश्यक व वायफळ गोष्टी करण्यांत आल्या नाहींत. जुनी वैदिक परंपरा न सोडतां वैदिक पद्धतीनें विवाह करून, पण रूढीनें प्रचलित झालेल्या अवास्तव समारंभास फाटा देऊन, अत्यंत गांभीर्यानें हा समारंभ पार पाडण्यांत आला. या अनुकरणीय उपक्रमा-बद्दल श्रीमंत राजेसाहेब हे खरोखरीच अभिनंदनास पात्र आहेत. आम्ही याबद्दल श्रीमंतांचें तर अंतःकरणपूर्वक अभिनंदन करितोंच, परंतु या आनंदप्रसंगानिमित्त उभय वधूवरांचेंही मनःपूर्वक सर्व प्रकारें शुभचिंतन करितों.

---

## परिशिष्ट ३६

श्रीमंतांना के. सी. आय्. इ. पदवी मिळाल्यानंतर ते तालुका-तपासणीस शिरवळास गेले. त्यासमयीं शिरवळ व त्याच्या आसपासच्या गांवांतील सर्व प्रजाजनांना त्यांनीं पदवीच्या आनंदाप्रीत्यर्थ भोजन दिलें. त्यानंतर समस्त गांवकऱ्यांनीं त्यांचा सत्कार केला. त्या समारंभाच्या वेळचें श्रीयुत ह. स. देशपांडे यांचें भाषण.

'लोकरंजनमेवात्र राज्ञां धर्मः सनातनः'।

श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव,
राजेसाहेब सं. भोर, के.सी.आय.इ.

श्रीमंत सरकार राजेसाहेब यांचें मी या सुप्रसंगीं आनंदानें स्वागत करीत आहें. श्रीमंत राजेसाहेब यांचें आजचें आगमन हें दोन दृष्टींनीं महत्त्वाचें होय. साम्राज्य सरकारकडून श्रीमंत राजेसाहेब यांना 'के. सी. आय. इ.' या पदवीनें भूषविलें गेल्यानंतरचें हें पहिलेंच आगमन आणि या मिळालेल्या बहुमानाच्या आनंदाप्रीत्यर्थ शिरवळ गांवच्या यच्चयावत् सर्व लोकांना भोजन देण्याकरितां म्हणून मुद्दाम झालेलें आगमन.

ह्या दोन दृष्टींनीं आजचें श्रीमंत राजेसाहेब यांचें येथील आगमन हें मीं वर म्हटल्याप्रमाणें अत्यंत महत्त्वाचें होय; आणि या आगमनाबद्दल मी मनःपूर्वक आनंद प्रदर्शित करितों.

मीं पूर्वीं एका महत्त्वाच्या प्रसंगीं म्हटल्याप्रमाणें आजही तेंच म्हणतों कीं, 'कारणावांचून कार्य होत नाहीं' या अबाधित सिद्धांताचें पुनरुच्चारण हें सहज व क्षम्य असतें. या शास्त्रीय सिद्धांताचें निरपवादत्व पदोपदीं मनास पटल्यावांचून राहात नाहीं. श्रीमंत राजेसाहेब यांच्या संस्थानच्या राज्यकारभारविषयक प्रगतिपर धोरणाच्या कारणाचेंच साम्राज्य सरकारकडून के.सी.आय. इ. ही अत्यंत महत्त्वाची मिळालेली पदवी हें कार्य होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

श्रीमंत सरकार गादीनशीन झाल्यानंतर प्रथमतः नऊ तोफांच्या सलामीचा मान, नंतर 'राजेसाहेब' हा किताब व दिल्लीच्या चेंबर ऑफ प्रिन्सेस ऊर्फ नरेंद्र मंडळांत कायमच्या सभासदत्वाचा मान आणि आतांची 'के. सी. आय. ई.' ही पदवी, इतक्या महत्त्वाच्या बहुमानाच्या गोष्टी साम्राज्य सरकारकडून श्रीमंत

राजेसाहेब यांनीं संपादिल्या हें आम्हा प्रजाजनांना निःसंशय अभिमानास्पद होय. म्हणूनच, मी या आतांच्या मिळालेल्या पदवीबद्दल श्रीमंत राजेसाहेब यांचें मनःपूर्वक अभिनंदन करितों.

के. सी. आय. ई. ह्या बहुमान-निदर्शक पदवीच्या कार्याच्या कारणाशीं अनुस्यूत असणाऱ्या अनेक गोष्टींपैकीं संस्थानच्या राज्यकारभारविषयक प्रगतिपर धोरणाचा मुख्यतः मीं उल्लेख केलाच; पण, श्रीमंत सरकार राजेसाहेब यांच्या ठिकाणीं स्वतःसिद्ध व निसर्गतःच संभवत असलेलें सौजन्य व समदृष्टि आणि आपल्या प्रजेबद्दल वसत असलेलें प्रेम, इत्यादि बहुमोल गुणही या कारणाशीं अनुस्यूत आहेत. त्याचेंच प्रात्यक्षिक आजचा भोजन-समारंभ होय.

भोजन हें अमूकच एका वर्गाला प्रिय असतें, असें नव्हे. सर्वांनाच तें प्रिय आहे. इतकेंच नव्हे, तर आवश्यकही आहे. पण, तें दुसऱ्या कोणीं आगत्यानें व प्रेमानें दिलें गेलेलें नसून, हें भोजन तर प्रत्यक्ष आपल्या राजानें येथें येऊन आगत्यानें व प्रेमानें दिलेलें आहे. ही अभूतपूर्व व अभिनव, अर्थात् पूर्वीं कधीं घडून न आलेली, गोष्ट होय. ह्या प्रेममय भोजनानें संतुष्ट झालेल्या सर्व लोकांच्या संतोषानें संतोषित झालेल्या श्रीमंत राजेसाहेब यांच्या मनास होणाऱ्या आल्हादाचें मी स्वागत करितों.

आज श्रीमंत राजेसाहेब यांजकडून दिल्या गेलेल्या भोजनाचें आणखी एक वैशिष्ट्य आहे. हें भोजन यच्चयावत् सर्व जातींच्या, वर्गांच्या व धर्मांच्या लोकांना दिलें गेलेलें आहे. हें तें वैशिष्ट्य होय. हें आपल्या प्रजेंतील सर्व वर्गांवर व जातीवर श्रीमंत सरकारचें समदृष्टिपूर्वक व प्रेमानें पहाण्याचेंच अभिनंदनीय असें प्रतीक आहे.

असो. श्रीमंत सरकार राजेसाहेब यांनीं येथें येऊन आपल्या प्रजाजनांच्या सर्व वर्गांना व जातींना प्रेमानें, आपलेपणानें भोजन देऊन आणि अशा रीतीनें प्रजाजनांवर आपलें असलेलें प्रेमच या भोजनसमारंभाच्या रूपानें व्यक्त केलें, ही अपूर्व गोष्ट होय व त्याबद्दल मी श्रीमंत सरकार राजेसाहेब यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

हरी सखाराम देशपांडे.

---

# परिशिष्ट ३७

## श्री. वि. गो. रानडे, कौन्सिलर, यांनीं नरेंद्रमंडळाच्या माहितीबद्दलचें ता. २-७-१९४० रोजीं केलेलें भाषण

सद्गृहस्थहो,

श्रीमंत राजेसाहेब हे नरेन्द्र मंडळाचे कायमचे सभासद झाल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्याकरितां आपण या ठिकाणीं आज जमलों आहोंत. या सन्मानाचें महत्त्व आपल्या लक्षांत यावें, म्हणून नरेंद्रमंडळ (Chamber of Princes) या संस्थेचा पूर्वेतिहास जरूरीपुरता व थोडक्यांत मी आपणांस सांगतों. स. १९१५ इ. पर्यंत हिंदुस्थानांतील राजे लोकांना ज्या संस्थेच्या आश्रयानें अगर ज्या ठिकाणीं एकत्र जमतां येईल, सर्वांना समान असलेल्या हितसंबंधांच्या गोष्टींबद्दल विचारविनिमय करतां येईल व त्याविषयींचें आपलें म्हणणें संयुक्तरीत्या साम्राज्य सरकारापुढें मांडतां येईल, अशी कायमची संस्था अथवा स्थान अस्तित्वात नव्हतें. या दिशेनें स. १९१६ इ. सालीं त्या वेळचे व्हाइसरॉय नेक नामदार लॉर्ड चेल्मसफर्ड यांनीं प्रथम उपक्रम केला. त्या वर्षापासून स. १९२१ इ. पावेतों, म्हणजे पांच वर्षें, दरसाल या देशांतील बहुतेक सर्व राजेरजवाडे एकदां एकत्र जमून सभा (Informal conferences) भरवीत असत. श्रीमंत राजेसाहेब हे त्या सभांपैकीं एका सभेस, आपले माजी सरकार हि. हा. श्री. रावसाहेब यांच्याबरोबर, उपस्थित होते. त्या सभांनंतरच व त्यांतूनच स. १९२१ इ. सालीं नरेंद्र-मंडळ ही संस्था अस्तित्वांत आली आहे. त्या वेळीं या संस्थेची जी घटना व नियम करण्यांत आले, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील सुमारें ६०० सहाशें संस्थानांपैकीं ज्यांना कमींत कमी कायमच्या नऊ तोफांच्या सलामीचा मान होता व ज्यांना संस्थानांतर्गत पूर्ण अथवा व्यवहारतः पूर्ण अधिकार होते, अशा १०८ एकशेंआठ संस्थानांना प्रत्येकीं १ एक जागा नरेंद्रमंडळांत कायमची देण्यांत आली. बाकीच्यांपैकीं १२८ एकशें-अठावीस संस्थानांचे १२ बारा गट करण्यांत येऊन ह्या प्रत्येक गटाचा एक प्रतिनिधि नरेंद्रमंडळांत यावा, या धोरणानें गटाला एक जागा देण्यांत आली. माजी हिज हायनेस सरकार यांना ११ अकरा तोफांच्या सलामीचा मान होता;

पण, तो वैयक्तिक होता. निदान ९ नऊ तोफांच्या सलामीचा वंशपरंपरा चालणारा मान त्यांना नसल्यानें, ते नरेंद्रमंडळाचे कायम सभासद झाले नाहींत. तथापि, नरेंद्रमंडळांत कायमचें सभासदत्व मिळविण्याबाबत त्यांनीं आपल्या प्रयत्नांत त्यानंतर मुळींच कसूर केली नाहीं. परंतु, त्यापुढें लवकरच ते कालवश झाल्यानें, तो प्रश्न तसाच राहिला. श्रीमंत राजेसाहेब गादीवर आल्यावर, त्यांची स. १९२३ इ. सालीं दक्षिणेंतील ६ सहा सातारा संस्थानांचा जो मध्यवर्ती गट नं. ३ आहे, त्या गटातर्फे प्रतिनिधि सभासद म्हणून नरेंद्र मंडळांत निवड झाली, व याप्रमाणें पुढें सात वर्षें म्हणजे स. १९३० इ. पावेतों ते सदरहू गटातर्फे नरेंद्र मंडळांत प्रतिनिधि-सभासद म्हणून त्यांनीं काम केलें आहे. तरी पण, नरेंद्र मंडळांत प्रतिनिधि-सभासद म्हणून बसणें ही वैयक्तिकरीत्या मोठ्या प्रतिष्ठेची गोष्ट आहे असें नाहीं, याची विस्मृति त्या अवधींत त्यांना कधीं झाली नाहीं. शिवाय, खरें पाहतां, नरेंद्र मंडळाच्या घटनेंत कायम सभासदा-संबंधीं जो नियम आहे, तो लक्षांत घेतां आपलें संस्थान पहिल्या प्रतीचें व व्यवहारदृष्ट्या पूर्ण अंतर्गत अधिकाराचें असल्यानें, त्यास कायमचें सभासदत्व मिळण्यास मुळींच हरकत नव्हती, असेंही त्यांना वाटत होतें. कारण, सभासदत्व मिळण्यास

(१) निदान नऊ तोफांच्या सलामीचा कायमचा मान असणें; अथवा,

(२) संस्थान पूर्णत: (निदान व्यवहारत: तरी) अंतर्गत अधिकाराचे असणें;

अशा प्रकारचा लायकीचा विकल्प ठेविला होता. आपल्या संस्थानास नरेंद्र मंडळाच्या स्थापनेच्या वेळीं दुसरा विकल्प लागू होता. पण, 'अथवा' याचा 'व' असा कांहींसा अर्थ केला गेला म्हणून असो किंवा ती विकल्पाची बाब तितकी नजरेआड झाली म्हणून असो, ज्या संस्थानांना लायकीचे वरील दोन्ही प्रकार अनुकूल होते, तेवढयांनाच नरेंद्र मंडळाचे कायम सभासद सुरु-वातीस करण्यांत आलें, अशी वस्तुस्थिति दिसून आली. म्हणूनच, स. १९२७ इ. सालीं जेव्हां आपल्या राजेसाहेबांना ९ नऊ तोफांच्या सलामीचा कायमचा मान अर्पण करण्यांत आला, तेव्हां त्यांनीं आपणास नरेंद्र मंडळाचे कायम सभासद करावें, म्हणून ने. ना. व्हाइसरॉयसाहेब यांच्याकडे आपलें पहिलें

विनंतिपत्र ( Representation ) स. १९२८ इ. सालीं पाठविलें; व त्यानंतरही वेळोवेळीं पुढें योग्य समयीं तशाच मार्गानें आपली इच्छा नेक नामदार यांना त्यांनीं कळविली आहे. अशीच परिस्थिति व मागणी इतरही कांहीं लहान संस्थानांची होती. या कारणानें नरेंद्र मंडळ हें हिंदुस्थानांतील सर्व संस्थानांची प्रातिनिधिक संस्था होत नव्हती. तशी ती व्हावी, म्हणून नरेंद्र मंडळाकडून एक पुनर्घटना कमिटी ( Reorganisation Committee ) व दुसरी सभासदत्वाची लायकी ठरविणारी कमिटी ( Criteria Committee ) अशा दोन कमिटया नेमण्यांत आल्या. त्या सर्व हकीगतींशीं सध्यां आपणांस कर्तव्य नाहीं. दुसऱ्या कमिटीनें सर्वानुमतें केलेल्या शिफारशींना नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांची मान्यता मिळून, त्यांनीं श्रीमंत राजेसाहेब यांना नरेंद्र मंडळाचे कायम सभासद केल्याविषयीं मे. रेसिडेन्टसाहेब यांचें पत्र ता. ४-७-१९४० इ. चें आलें आहे. सद्गृहस्थहो, याप्रमाणें याविषयींची हकीकत आहे. स. १९२८ इ. पासूनचे या बाबतचे श्रीमंतांचे मनोरथ व प्रयत्न सुफलित झाले असल्यानें, ही गोष्ट, म्हणजे कायमचें सभासदत्व, सर्वथैव अभिनंदनीय अशीच आहे. यामुळें, चेंबरमध्यें सतत काम करण्यास वाव मिळून, स्थायी समितीवर श्रीमंत निवडले जाण्याचा संभव आहे. शिवाय, ९ तोफांची सलामी आणि ‘ राजा ’ ही पदवी, हे दोन कायमचे मान यापूर्वी श्रीमंतांनीं मिळविले, त्याचप्रमाणें हा तिसरा वंशपरंपरा चालणारा मान त्यांनीं मिळवून “ स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम् ” । हें सुभाषित सार्थ केलें आहे. वास्तव, व्यक्तिशः व आपणां सर्वांतर्फे या सन्मानाबद्दल श्रीमंतांचें मी अभिनंदन करतों; व श्रीरामप्रभूकृपेनें यापुढेंही असेंच चढते-वाढते मान श्रीमंतांना प्राप्त व्हावेत व राजकुटुंबांतील सर्व मंडळीसह श्रीमंतांना दीर्घायुरारोग्याचा लाभ व्हावा अशी प्रार्थना करून, मी आपलें भाषण पुरें करतों.

---

## परिशिष्ट ३८

संस्थानिकांना कृतज्ञतापूर्वक श्रद्धांजलि.

ले.—ज. स. करंदीकर

' पूर्वज काय म्हणत असतील. '

कालाचा ओघ अत्यंत विचित्र आहे. एका काळीं जी घटना अभिनंदनीय व अभिमानास्पद मानली जाई, तिच्या अगदीं उलट घटना कालान्तरानें अभिनंदनीय मानली जावी, असली विपरीत उलटापालट काल करूं शकतो. महाराष्ट्राच्या इतिहासांत असा एक काळ होता कीं, त्या वेळीं वीर पुरुषांच्या पराक्रमाचें चीज जहागिरीच्या दानानें केलें जात असे, आणि अशी जहागीर संपादन करणें व शत्रूंच्या तोंडांवर ती राखणें, हें खऱ्या पराक्रमाचें अभिनंदनीय लक्षण समजलें जाई. हैदर आणि टिपू यांच्यासारख्या कडव्या शत्रूंच्या आक्रमक घाल्यापासून दक्षिण महाराष्ट्र आणि उत्तर कर्नाटक यांचें संरक्षण करण्यांत पटवर्धन सरदारांनीं अतुल पराक्रम गाजविला आणि अनेक वीर पुरुष बळी दिले, म्हणून पेशव्यांनीं पटवर्धन सरदारांना त्या भागांत जहागिरी देऊन हैदर व टिपू यांच्या छातीवर कट्यार रोखल्याप्रमाणें पटवर्धन सरदारांची त्या भागांत स्थापना केली. त्या वेळीं गोविंद हरी, गोपाळराव गोविंद, परशुराम रामचंद्र इत्यादिकांच्या पूर्वजांना स्वर्गांत केवढी धन्यता वाटली असेल; आणि आतां त्याच पटवर्धनांचे एक वंशज आपलीं संस्थानें सोडून देऊन विलिनीकरणांत पहिला क्रमांक कोण मिळवितो, याविषयीं अहमहमिकेनें स्पर्धा करीत असलेले पाहून, त्या पूर्वजांना काय वाटत असेल, याची कल्पनाही करवत नाहीं. पटवर्धनांचीं संस्थानें अनेक, म्हणून त्यांचा निर्देश वर केला आहे; पण, तो उभयपक्षीं समजावा. पटवर्धनांच्या पूर्वजांच्या मनाची जी स्थिति असेल, तीच स्थिति पंतसचिव, प्रतिनिधि, डफळे, निंबाळकर, भावे, घोरपडे इत्यादिकांच्या पूर्वजांच्याही मनाची असणार, हेंही क्रमप्राप्तच आहे.

### विलिनीकरणाचा पहिला धडा

बदललेल्या परिस्थितींत पूर्वीच्या कृतीच्या अगदीं उलट कृति देखील अभिनंदनीय ठरूं शकते; याचा एक दाखला प्रस्तुत काळीं कित्येकांच्या मनाला

समाधान देण्याला उपयोगी पडेल, म्हणून त्याचा उल्लेख करतों. मुंबईहून पुण्या-पर्यंत आगगाडीचा रस्ता करण्याच्या वेळीं बोरघाटांतून रस्ता कसा काढावा, याचें एंजिनिअरांना कोडें पडलें होतें. त्या वेळीं खंडाळ्याच्या पलीकडे ' रिव्हर्सिंग स्टेशन ' करून गाडी उलटवून पुढें नेण्याची युक्ति ज्या एंजिनिअरानें यशस्वी करून दाखविली, त्याचें त्या वेळीं त्या क्लृप्तीबद्दल अभिनंदन झालें, स्मारकही झालें आणि इतरत्र त्याचें अनुकरणही होऊं लागलें. कालांतरानें बोगदे खोदण्याच्या साधनांत सुधारणा झाल्यावर, ही ' रिव्हर्सिंग ' ची ब्याद त्रास-दायक वाटूं लागली. त्या वेळीं दुसरे कल्पक एंजिनिअर पुढें आले व त्यांनीं रिव्हर्सिंग सोडून त्याच्या ऐवजीं सरळ समोरचा रस्ता तयार करून दिला. अर्थातच, या कृतीबद्दल त्यांच्यावरही अभिनंदनाचा वर्षाव झाला. बदलत्या परिस्थितींत असे उलटसुलट चमत्कार होऊं शकतात. याच न्यायानें जहागिरीच्या संपादनाप्रमाणेंच जहागिरी सोडून देणें, हेंही सद्य:कालीन परिस्थितीच्या चष्म्यांतून पाहिल्यास, अभिनंदनीय ठरण्यास हरकत नाहीं. मात्र, संस्थानिकांच्या जुलुमांतून सुटून आपण सुराज्यांत येऊन पडलों, असें वाटून जे या घटनेचें स्वागत करीत असतील, त्यांनीं दुसऱ्या बाजीरावासंबंधीं जो आजवर इतिहास-कारांनीं अन्याय केला, तो पुसून काढण्यासाठीं, दुसऱ्या बाजीरावाच्या अभि-नंदनाचा एक ठराव पास केल्यास, आपणांस आजच्या परिस्थितीमुळें न्याय मिळाला या विचारानें त्याच्या आत्म्यास समाधान वाटेल; कारण, माल्कम-साहेबाच्या हातावर स्वराज्याचें उदक सोडून विलिनीकरणाचें पहिलें उदाहरण त्यानेंच घालून दिलें.

## दक्षिणेंत एक न्याय, तर उत्तरेंत वेगळाच

कालांतरानें परिस्थितीची उलटापालट झाल्यामुळें, परस्परविरुद्ध भासणाऱ्या घटना सारख्याच अभिनंदनीय ठरतात, हें आपण येथवर पाहिलेंच. पण, कालाची जादुगिरी याच्याहूनही अद्भुत आहे. वेगवेगळ्या काळीं व निराळ्या परिस्थितींत उलटसुलट गोष्टी स्वागतार्ह ठरल्या, तर त्यांत विशेष आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. परंतु, एकाच काळीं एका प्रांतांत एका घटनेचें कौतुक केलें जात असतां, त्याच वेळीं दुसऱ्या प्रांतांत त्या घटनेविरुद्ध भासणारी घटनाही कौतुकास्पद वाटावी आणि तिचें मोठ्या कडाक्यानें जाहीर अभिनंदन

केलें जावें, हा चमत्कार आजकाल घडत आहे. दक्षिणी संस्थानिकांनीं आपला एक गट करून संयुक्त पद्धतीनें आपआपलीं संस्थानें राखण्याचा केलेला प्रयत्न त्याज्य ठरविण्यांत आला आणि त्यांनीं विलिनीकरणाला संमति दिली, याबद्दल त्यांच्यावर स्तुतिसुमनांचा वर्षाव झाला. त्याच वेळीं तिकडे उत्तरेस संस्थानांनीं आपले संघ बनवून नवे नवे प्रांत बनविले आणि आपली एकजूट करून संस्थानी परंपरा राखली, याबद्दल ठिकठिकाणीं मोठ्या समारंभानें त्यांचें अभिनंदन करण्यांत येत आहे. इंग्रजींत 'एका माणसाचें जें अन्न, तेंच दुसऱ्याचें विष' (One man's food is another man's poison) अशी म्हण प्रचलित आहे; किंवा कालीदासानें 'विषमप्यमृतं भवेत्क्वचिदमृतं वा विषमीश्वरेच्छया।' असें जें म्हटलें आहे, त्याचेंच या वेळीं प्रत्यंतर येत आहे. कारण, जें संघराज्य नर्मदेच्या दक्षिण दिशेला घातक ठरतें, तेंच नर्मदोत्तर भागांत उपकारक ठरतें. यांत आपली कांहीं दिशाभूल तर होत नाहीं ना, याचा विचार महाराष्ट्रीयांनीं केलेला दिसत नाहीं.

## संस्थानांचा झालेला उपयोग

दुसऱ्या बाजीरावानें माल्कमसाहेबाच्या हातावर मराठी राज्याचें उदक सोडलें, ही घटना इतिहासांत जमा झाल्यानें, तिच्या युक्तायुक्ततेचा विचार आज करणें हें जसें निरर्थक आहे, तसेंच दक्षिणी संस्थानांचें विलिनीकरण इतक्यांतच इतिहासजमा न झाल्यानें त्याच्या युक्तायुक्ततेचा विचार करण्यालाही आज कोणी उत्सुक नसल्यानें, तो विचार आम्ही सोडून देतों. पण, ज्या संस्थानांच्या आश्रयाखालीं आपण कित्येक पिढ्या नांदलों व ज्या संस्थानिकांच्या स्वराज्यामुळें व सुराज्यामुळें आपणांस अनेक प्रकारचे लाभ घडले, त्या संस्थानिकांबद्दल कृतज्ञताबुद्धीनें शेवटची श्रद्धांजली देणें, एवढें तरी त्या त्या संस्थानांत नांदले-ल्यांचें कर्तव्य नाहीं काय? ज्यांच्या दुर्दैवानें, खट्याळ संस्थानिकांच्या कारकीर्दींत आपात्ति भोगण्याचें नशीबीं आलें असेल, त्यांनीं व्यक्तिशः या श्रद्धांजलींत वाटेकरी होऊं नये. परंतु, संस्थानी राज्य म्हणजे कुराज्य असें समीकरण मांडणें सत्य नव्हे व युक्तही नव्हे, असें आम्ही सांगूं इच्छितों. एवढेंच नव्हे, तर संस्थानें होतीं, म्हणूनच अनेक सुधारणा ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या गळ्यांत बांधतां आल्या; किंबहुना स्वराज्याची भूक वाढविण्यास आणि स्वराज्य चालविण्यास

पात्रता सिद्ध करण्यास संस्थानेंच उपयोगी पडलीं. किती तरी नव्या उद्योग-धंद्यांची वाढ होण्याला संस्थानांतील क्षेत्रच अनुकूल ठरलें. किर्लोस्करवाडी किंवा ओगलेवाडी संस्थानांतच उदयास येऊं शकली. एवढें एकच उदाहरण देखील, नमुन्याकरितां म्हणून, पुढें केल्यास पुरें होईल.

## कै. थोरले आप्पासाहेब यांचें उदार धोरण

असो. प्रस्तुतचा विषय तो नसल्यानें, त्याचा पाल्हाळ करीत बसत नाहीं. पण, ज्या संस्थानिकांच्या दूरदर्शीपणामुळें व उदार धोरणामुळें संस्थानांतील प्रजाजनांना विविध मार्गांनीं अलभ्य असा लाभ झाला, त्यांनीं त्यांच्याविषयीं कृतज्ञता व्यक्त करणें हें त्यांचें कर्तव्यच आहे. जमखिंडी संस्थानांतील प्रजाजनांना कै. श्री. थोरले आप्पासाहेब यांच्या शिक्षणविषयक उदार धोरणामुळें जो लाभ झाला, तो कल्पनातीत आहे. परशुरामभाऊ हायस्कूलांतून बिनखर्ची शिक्षण मिळण्याची सोय झाली नसती, तर कै. विठ्ठल रामजी शिंदे यांच्यापासून तों आजमितीला सर परशुरामभाऊ कॉलेजांत मोफत शिक्षण घेत असलेल्या नव्या विद्यार्थ्यांपर्यंत जितके विद्यार्थी उच्च शिक्षण घेते झाले, त्यांतल्या किती विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाचा इतका लाभ घेतां आला असता ? हा एक ठळक दिसणारा लाभ, म्हणून त्याचा उल्लेख केला. तसें पाहूं लागल्यास, कै. श्रीमंत थोरले आप्पासाहेब हे जुन्या काळांतले राजे असून, त्यांच्या अंगीं नव्या व जुन्या दोन्ही विद्यांविषयीं सारखाच अभिमान जागृत होता. त्यांनीं उभारलेलें रामतीर्थावरील वस्तुसंग्रहालय व पुस्तकसंग्रहालय अगदीं नमुनेदार होतें. वेद व शास्त्रें या प्राचीन विद्यांना त्यांनीं उत्तेजन दिल्यामुळें जमखिंडी संस्थान हें वेदविद्येचें व शास्त्रांच्या अभ्यासाचें आगर झालें होतें. ज्या ज्या नव्या सुधारणा १९ व्या शतकांत इतरत्र अंमलांत आल्या, त्यांचा लाभ त्यांच्या प्रजाजनांना मिळाल्याविना राहिला नाहीं. अलीकडच्या प्रजापरिषदांतून संस्थानिकांचा खाजगी खर्च वेगळा व नियमित असावा असे ठराव होत आले. पण, थोरल्या आप्पासाहेबांनीं हा नियम आपल्या कारकीर्दीच्या प्रारंभापासून आपण होऊन कसोशीनें पाळला होता.

## पश्चात्तापाची पाळी न येवो !

अशा परंपरेचा लाभ ज्यांना मिळाला, त्यांना आजमितीला तें संस्थान

हिंदुस्थानाच्या घटनेंत विलीन होत असल्यानें व पूर्वपरंपरा त्रुटित झाल्यानें, विषाद वाटणें साहजिक आहे. मात्र, हा विषाद केवळ भावनात्मक नव्हे. ज्यांना संस्थानें विलीन व्हावींत अशी अगदीं आतुरता लागून राहिली होती, त्यांनाही विलिनीकरणाचा अनुभव येऊं लागला व त्यांतलें सुख जाणवूं लागलें, म्हणजे इसापनीतींतल्या बेडकांनीं राजा मागितल्यावर जसा अनुभव आला, तसाच अनुभव येऊं लागेल, अशी भीति वाटते. तिचीं पूर्वचिन्हें आतांच दृग्गोचर होऊं लागलीं आहेत. भोर संस्थानांतले मंत्री गोपिनाथपंत यांनीं 'संस्थानी नोकरांचें काय होणार,' असा प्रश्न उपस्थित करून करुणा भाकली आहे. नोकरांचें काय होणार, या प्रश्नाबरोबरच 'मंत्र्यांचें काय होणार,' हाही प्रश्न विचारावा लागेलच. संस्थानांचें विलिनीकरण झाल्यावर जमखिंडी हायस्कुलांतल्या फीचा व माधुकरी विद्यार्थ्यांचा प्रश्न पुढें आल्यावांचून कसा राहील? औंध संस्थानांतील अन्नवस्त्राची, स्वावलंबनाची योजना किनपत टिकेल? प्रत्येक संस्थानांतून असे अनेक प्रश्न पुढें येऊन, ते डोकें भंडावून सोडतील आणि मग यांत आपण काय मिळविलें पाहिजे, असा विचार सुरू होईल.

तें कसेंही असो; पण, आज मितीला जी संस्थानी रियासत पंचत्व पावली आहे, तिच्याबद्दल हळहळ वाटणें हें नैसर्गिकच आहे. त्यांतून, ज्यांना त्या रियासतींत अंगाला चटके न बसतां उलट सुखानुभव घेतां आला आणि उत्कर्षाची पायरी चढतां आली, त्यांनीं तरी 'बरें झालें, जुनेंपुराणें सोंग गेलें तें' असे कृतघ्नतेचे उद्गार न काढतां, कृतज्ञतापूर्वक श्रद्धांजली अर्पण करावी, हेंच उचित होय.

---

## परिशिष्ट ३९

### हिंदुस्थान स्काउट असोसिएशनच्या पुणें येथील बॉय स्काउट व गर्ल स्काउट स्थानिक शाखांच्या मेळाव्याप्रसंगींचें

### हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, भोर, यांचें भाषण.

ता. १४ ऑक्टोबर १९४८

नामदार बाळासाहेब खेर, निमंत्रित पाहुणे मंडळी व मुलामुलींनो,

आजच्या समारंभास हजर राहण्याची संधि मिळाली, याबद्दल आम्हाला आनंद होत आहे. २५ वर्षांपूर्वी ८ सप्टेंबर १९२३ रोजीं नूतन मराठी विद्यालयाच्या चौकांत या संस्थेचे जे खेळ व प्रात्यक्षिक झालें, त्या समारंभाचे अध्यक्ष होण्याचा मान त्या वेळीं आम्हास मिळाला होता. संस्थेच्या कार्यकर्त्यांनीं त्यानंतर आम्हाला संस्थेचे अध्यक्ष होण्याविषयीं आग्रह केला. स्काउट चळवळीची आम्हाला तेव्हां फारशी माहिती नव्हती. तथापि, एखाद्या उपयुक्त अशा सार्वजनिक कार्यास हातभार लावावा, अशी ज्या वेळीं लोकांची इच्छा असते, तेव्हां त्यांची ती इच्छा मोडूं नये असा साधारण माझा स्वभाव असल्यानें, व विशेषतः लहान मुलांना नागरिकत्वाचें शिक्षण देण्याचें हें कार्य असल्यानें, प्रो. हर्डीकर, श्रीयुत डी. पी. जोशी, कै. डॉ. गोखले व डॉ. नातू वगैरे मंडळींच्या आग्रहानें आम्हीं पुणें बालवीर संस्थेचे अध्यक्ष होण्याचें कबूल केलें; व आजतागायत दरवर्षी संस्थेनें आम्हांला अध्यक्ष म्हणून निवडलें आहे. संस्थेचा व आमचा २५ वर्षांपूर्वी आलेला संबंध संस्थेनें असा कायम ठेवला आहे, याबद्दल आम्हाला आनंद होत आहे.

१९३८ सालीं ही संस्था हिंदुस्थान स्काउट संस्थेला जोडली गेली. येथील कार्यकर्त्यांच्या समतोलपणावर व कार्यनिष्ठेवर विश्वास असल्यानें, आम्हीं त्यांच्या धोरणास पाठिंबा दिला. त्यांनीं त्या वेळीं अनुसरलेल्या धोरणामुळें येथील संस्था अव्याहत कार्य करीत राहूं शकली. येथील पथक-मंदिराशीं आमचें नांव कसें निगडित झालें, याची माहिती डॉ. नातू यांनीं आपल्यासमोर ठेविलीच आहे. अशा संस्थांना जितकी मदत करावी, तेवढी थोडीच आहे. आम्हाला जेवढें शक्य होतें, तेवढें आम्हीं केलें आहे. संस्थेनें त्याबद्दल आमचा हें आभार-पदक देऊन गौरव केला, त्याबद्दल आम्ही संस्थेच्या चालकांचे हार्दिक आभार मानितों. जनतेनें व सरकारनें या संस्थेला सर्व प्रकारें जास्तींत जास्त साहाय्य करावें अशी आमची विनंति आहे.

बालवीरांना छावण्यांकरितां जागा असणें जरूर आहे, असें आतांच अहवालांत वाचण्यांत आलें. बोरिवली येथें नुकतेंच एका रमणीय उद्यानाचें

आपल्या ना. पंत प्रधानांनीं उद्‌घाटन करून या कार्याचा पाया घातला आहे. विद्यार्थ्यांकरितां व बालवीरांकरितां अशा छावण्यांची तरतूद आपलें सरकार करील अशी आम्हाला खात्री आहे. नामदार बाळासाहेबांसारखे शिक्षणमंत्री आपणांला लाभले आहेत, ही आपल्या प्रांताची भाग्याची गोष्ट आहे. शिक्षणाची सर्व बाजूंनीं वाढ व्हावी हा त्यांचा अविरत प्रयत्न आहे. आज संस्थेनें स्वस्तिक व कमलयुक्त असें जें आभार-पदक आम्हाला प्रेमाचें द्योतक म्हणून दिलें, त्याचा आम्ही आनंदानें स्वीकार करीत आहोंत. हें पदक तर मंगल असें आहेच; पण, तें मित्रांच्या व बालांच्या प्रेमाचेंच द्योतक आहे. बालवीरांना माझें असें सांगणें आहे कीं, त्यांनीं आम्हाला हें मंगल पदक देऊन आमचा गौरव केला, तसेंच आपल्या घरच्या माणसांशीं, शेजाऱ्यांशीं व आपल्या देशाशीं कृतज्ञतेनें व प्रेमानें राहून, राष्ट्राचें मंगल साधावें. सर्वांच्या आधीं आघाडीवर जाणारा तो स्काउट. तुम्हांला इतरांच्याकरतां रस्ता तयार करावयाचा आहे. नवा समाज व चैतन्यपूर्ण असें राष्ट्र तुम्हांस निर्माण करावयाचें आहे. आपल्या पंतप्रधानांसारख्या अनेकांनीं जिवाचें रान करून आपल्या देशास स्वातंत्र्य मिळवून दिलें आहे. तें सांभाळण्याची जबाबदारी पुढील पिढीवर म्हणजे तुमच्यावर आहे. नव्या दृष्टीचा व राष्ट्रीय वृत्तीचा समाज निर्माण होण्यास स्काउट शिक्षणाचा फार उपयोग होणार आहे, अशी आमची खात्री आहे. आपण येथें प्रात्यक्षिकाच्या वेळीं दाखविलेलें नैपुण्य नेहमींच्या व्यवहारांत उपयोगी आणाल अशी आम्हाला आशा आहे.

नामदार बाळासाहेब खेर, आपण आज वेळ काढून या संस्थेस भेट दिलीत व इतर पाहुणे मंडळींनींही संस्थेच्या निमंत्रणास मान देऊन या मुलामुलींना उत्तेजन दिलें, त्याबद्दल, संस्थेचे अध्यक्ष या नात्यानें, आम्ही आपले अत्यंत आभारी आहोंत.

स्काउट चळवळीवर विश्वास ठेवून तिला उत्तेजन द्या, अशी आपणां सर्वांस आमची विनंति आहे.

# परिशिष्ट ४०

## हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांचें श्रीगोपाल गायन समाज, संगीत महाविद्यालय, पुणें, या संस्थेच्या तिसाव्या वार्षिकोत्सव-समारंभाच्या वेळचें भाषण.

शनिवार ता. १६ ऑक्टोबर १९४८

उपस्थित बंधुभगिनी व छात्रगणहो,

श्रीगोपाल गायन-समाजाच्या चालकांनीं आम्हांस आज येथें उपस्थित होण्यास जी संधि दिली, त्याबद्दल प्रथम चालकांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानतों. संगीत विद्येचा प्रसार करणाऱ्या या श्रीगोपाल गायन-समाजाचें नांव कित्येक वेळां आमच्या वाचनांत व ऐकण्यांत आलें; पण, प्रत्यक्ष असा संबंध आजपर्यंत आला नव्हता. तो आजच्या या समारंभामुळें सहज आला. या लोकोपयोगी संस्थेच्या कार्यासंबंधीं व संस्थेच्या प्रगतीबद्दल आतांपर्यंतच्या वक्त्यांनीं बरीच माहिती सांगितली आहे. त्यावरून संस्थेचें कार्य, विशेष गाजावाजा न करितां, पण अव्याहत कसें चालू आहे, हें आपण जाणतच आहां; व त्याबद्दल संस्थेचे मुख्य चालक श्रीयुत गोविंदराव देसाई खरोखरच प्रशंसेस पात्र आहेत. अंगीकृत कार्य चिकाटीनें चालविण्यास जी धमक व धडाडी लागते, ती बव्हंशानें गोविंदरावांच्या ठिकाणीं अभिजात वसत असल्यामुळेंच, संस्थेला आजचें विलोभनीय स्वरूप प्राप्त झालें आहे. संस्था म्हटली कीं, तिच्या आयुष्यांत विघ्नें हीं यावयाचींच; पण, “ विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः। प्रारब्ध-मुत्तमजनाः न परित्यजंति ॥ ” या सुभाषिताप्रमाणें जो धीराचा मनुष्य असेल, तो न डगमगतां, त्यांतून मार्ग काढून पुढें जातो.

लोकजागृतीच्या अनेक साधनांपैकीं संगीत हें एक उच्च दर्जाचें साधन असल्यानें, त्याचा उपयोग मातृभूमीची सेवा करण्याकडे करावा, या उदात्त हेतूनें रा. गोविंदरावांनीं ता. १ जुलै १९१८ रोजीं पुणें येथें श्रीगोपाल गायन-समाज या संस्थेची स्थापना केली, व १९४७ सालांत आपण सर्व आज येथें जमलों आहों, ती इमारत बांधून संस्थेस कायमपणा आणिला. या कामीं श्रीमंत सरदार जगन्नाथ महाराज यांनीं सक्रिय साहाय्य केल्यामुळेंच इमारत झाली,

असें म्हणावयास हरकत नाहीं. पुढें या इमारतीच्या जागेबद्दल वाद उत्पन्न झाला. पण, रा. देसाई यांनीं अत्यंत परिश्रम घेऊन अखेर त्यांत जय मिळविला, हें नमूद करण्यास आम्हांस खरोखरच आनंद वाटतो.

स. १९३४ इ. सालीं संस्थेचा पहिला पदवीदान-समारंभ इचलकरंजी संस्थानचे अधिपति कै. श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें झाला, हें अत्यंत शुभ-सूचक व उचित असेंच झालें. कारण, दिवंगत बाबासाहेब यांना संगीताची अत्यंत आवड व उत्तम माहिती असल्यानें, त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ संस्थेला झाला, हें खरोखरच तिचें भाग्यच समजलें पाहिजे. स. १९३९ इ. सालीं श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांच्या हस्तें द्वितीय पदवीदान समारंभ झाला. श्रीमंत आबासाहेब यांच्याबद्दल आम्ही विशेष सांगण्याची जरूरीच नाहीं; कारण, संगीत व आबासाहेब म्हणजे पुरुष व छाया असाच संबंध आहे. ते कलेचे निष्ठावंत उपासक असून, त्यांनीं तिची जोपासना अत्यंत निरलसपणें केल्यानें, त्यांचें नांव भारतवर्षांत दुमदुमलें आहे.

या संस्थेचे आधारस्तंभ श्रीयुत देसाई यांच्या अंगांत तर निरनिराळे अनेक गुण वसत असल्याचें, आजवर त्यांनीं केलेल्या कामगिरीवरून, दिसून येतें. ते उत्तम संगीतज्ञ तर आहेतच; पण, प्रथितयश शाहीर व उत्तम कीर्तन-कारही आहेत. विशेष उल्लेख करण्याजोगी गोष्ट म्हणजे त्यांनीं १९४२ सालीं संस्कृत भाषेंत कीर्तन केलें व त्याबद्दल त्या वेळीं त्यांची मुक्तकंठानें जाणत्या लोकांनीं स्तुति केल्याचें कळतें. रा. गोविंदरावांनीं या संगीत शिक्षणाला रेखीव स्वरूप यावें, या दृष्टीनें एक अभ्यासक्रम आंखला व त्याच्या संगीत प्रथमा, मध्यमा व पदवी-परीक्षा अशा परीक्षाही घेण्याचें ठरविलें. अशा तऱ्हेनें या कलेच्या अभिवृद्ध्यर्थ कार्यक्रम आखल्यानें, पुष्कळांना त्याचा फायदा घेणें शक्य झालें. या संस्थेंतून शिकून तयार झालेल्या विद्यार्थ्यांपैकीं तिघांनीं निरनिराळीं संगीत विद्यालयें काढून संगीत विद्येच्या प्रसाराचें काम वाढीस लाविलें आहे; व ह्याबद्दल रा. देसाई हे खरोखरच प्रशंसेस पात्र आहेत.

यंदा प्रथमा परीक्षेस १२ विद्यार्थिनी व एक विद्यार्थी असे होते, व त्यांपैकीं ८ उत्तीर्ण झाले. रा. परांजपे हे वकील असल्याचें कळतें, व त्यांनीं कलेच्या

केवळ आवडीनें ही परीक्षा देऊन त्यांत यश मिळविलें, हें पाहून आम्हास विशेष कौतुक वाटतें. मध्यमा परीक्षेला बसलेल्या ६ विद्यार्थिनी उत्तीर्ण झाल्या. त्यांत कुमारी उषा वाटवे हिच्याबद्दल विशेष उल्लेख करावासा वाटतो. कारण, तिनें नाउमेद न होतां पल्ला गांठला, हें तिच्या चिकाटीचें फळ होय व अशाच उमेदीनें व चिकाटीनें ही विद्यार्थिनी अखेरचें यश संपादील असें आम्हांस वाटतें. उत्तीर्ण झालेल्या छात्रगणांचें आम्ही या प्रसंगीं अभिनंदन करितों; व त्यांची या कलेंत उत्तरोत्तर भरभराट होवो, अशी इच्छा प्रदर्शित करितों.

मागील वर्षी आपली प्रिय मातृभूमि स्वतंत्र झाली; व म्हणून, आतां आपण आपली भविष्य कालांत सर्वांगीण उन्नति कशी होईल, याकडे संपूर्णतया लक्ष पुरविलें पाहिजे. आतां सर्व क्षेत्रांत आपल्याला पूर्ण वाव मिळणारा असून, प्रगति कशी व किती झपाट्यानें होईल, ह्याकडे नजर पुरविली पाहिजे. तशांत, आपल्याला पुणें युनिव्हर्सिटीही प्राप्त झाली आहे. ह्या विश्वविद्यालयांत संगीताला ही योग्य तें स्थान प्राप्त होईल. संगीताचा अभ्यास वगैरे कसा असावा, त्याबद्दल विश्वविद्यालयानें जरूर ती माहिती मागविली असल्याचें समजतें. अशा तऱ्हेनें संगीत कलेच्या उत्कर्षाचा काल उज्ज्वल दिसूं लागला आहे. सुशिक्षित सुजनांचें लक्ष ह्या सात्त्विक कलेकडे जितकें जावयास पाहिजे होतें, तितकें आजपर्यंत गेल्याचें आढळून येत नाहीं. पण, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपली सर्वांगीण उन्नति होण्यास आतां अडथळा होणार नसल्यानें, इतर कलांबरोबर ह्याही, नादब्रह्म प्राप्त करून देणाऱ्या, संगीत कलेची अभिवृद्धि होईल ह्यांत शंका नाहीं. रा. देसाई व त्यांच्या सहकाऱ्यांनीं विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत संगीताचें स्थान कायम होईल, ह्याकडे सतत लक्ष द्यावें, व ते तसें देतील अशी आम्हास खात्री वाटते.

आजच्या ह्या शुभ प्रसंगीं, आम्ही आपली अल्पशी मदत म्हणून, या संस्थेला रु. ५०० पांचशेंची देणगी दिल्याचें जाहीर करतों; व शेवटीं, रा. देसाई व या संस्थेचे विश्वस्त व कार्यकर्ते ह्यांचे आभार मानून व प्रभू श्री रामचंद्र या संस्थेची भरभराट करो अशी प्रार्थना करून, आम्ही आपलें भाषण येथें संपवितों.

---

# परिशिष्ट ४१

## देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणोत्तेजक संस्था, पुणें, वाढदिवस-समारंभाच्या वेळचें श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण. ता. २-११-४८

सरदार श्रीमंत बाळासाहेब पुरंदरे, आबासाहेब मुजुमदार व उपस्थित सद्गृहस्थहो,

दरसालच्या वहिवाटीप्रमाणें आपल्या संस्थेचा वाढदिवस साजरा करण्यास येथें जमलेल्या आपणा सर्वांचें स्वागत करण्यास आम्हास फार आनंद वाटत आहे. या संस्थेच्या स्थापनेस चोवीस वर्षें झालीं आहेत. व्यक्ति काय किंवा संस्था काय, त्यांच्या वाढदिवसांचें एका दृष्टीनें महत्त्व असतें; व म्हणूनच, त्या दिवशीं समारंभ करण्याची पूर्वीपासूनच, केवळ आपल्यांतच नव्हे, तर सर्वत्रच प्रथा आहे. सामाजिक दृष्ट्या व रूढ भाषेत आपण जास वाढदिवस म्हणतों, त्यास पूर्वी व धार्मिक दृष्ट्या वर्धापन-दिन असें म्हटलें जात असे. व्यापारी लोकांत सालअखेर त्या वर्षांतील उलाढालीचा आढावा घेण्याची पद्धत आहे; त्याचप्रमाणें व्यक्ति अथवा संस्था यांनींही केलेल्या कामाचें समालोचन करून नव्या वर्षांतील कार्याचें धोरण ठरविणें, हाच या दिवसाचा उद्देश आहे. त्या दुहेरी दृष्टीनें आपण काय तें ठरवाल व ठरवितां, याची आम्हास खात्री आहे. वर्धापनाच्या दिवशीं अग्नि, वायु व विश्वेदेव वगैरेंचें पूजन करण्याचें धर्मशास्त्रानें सांगितलें आहे. व्यक्तीच्या शरीरांत जें महत्त्व अग्नि व वायु ऊर्फ प्राण या देवतांचें आहे, तेंच सर्वश्रेष्ठ कार्य त्या देवता बौद्धिक तेजस्विता व कर्तव्य या रूपानें संस्थेंत करीत असतात, हें आपणास माहीत आहेच. या देवतांबरोबरच विश्वेदेवांचें पूजन कां करावयाचें, तेंही उघडच आहे. विश्वेदेव म्हणजेच जनतारूपी जनार्दन. आपल्या कार्याच्या सिद्धीस जनतेचें सहकार्य तर हवेंच; पण, त्यास कोणाचाही विरोध नसावा, हीच अभिप्रेत व अवश्य असलेली गोष्ट त्या पूजनाच्या द्वारें सूचित केलेली आहे; व आपल्या संस्थेचें कार्यही त्याच धोरणानें चाललें आहे, याचें आम्हास समाधान वाटत आहे. व यापुढेंही तें तसेंच आपण चालवाल, याची आम्हास खात्री आहे. संस्थेच्या नांवांत देशस्थ, ऋग्वेदी, ब्राह्मण, असे शब्द असले, तरी ते जातीयतेचे वाचक म्हणून घातले

नाहींत. संस्थेचें कार्य तितक्या पुरतेंच म्हणजे मर्यादित नाहीं. संस्था जातिनिरपेक्ष कार्य करणारी आहे. या देशांत राहणाऱ्या सर्वांच्याच हिताकडे लक्ष देणारी, स्वतःच्या उन्नतीबरोबरच इतरांच्याही उत्कर्षाविषयीं कळकळ बाळगणारी, ज्ञानाचें संवर्धन हें ध्येय असलेली व या ध्येय-संपादनाच्या कार्यांत व्यापृत असलेल्यांचा यथाशक्ति परामर्ष घेणारी, अशी ही संस्था असल्यानें, तिला चिरस्थायित्व प्राप्त होऊन तिचें कार्य उत्तरोत्तर चढत्या-वाढत्या स्वरूपांत यशस्वी होवो, असेंच या सुमंगल दिवशीं कोणीही इच्छील; व आमची ही प्रभु श्रीरामचरणीं तीच प्रार्थना आहे.

सज्जनहो, आजच्या मंगल दिवशीं या संस्थेंत आपण संगीतकलाभिज्ञ व इतिहासप्रेमी सरदार श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांची तसबीर ठेवणार आहांत, ही सर्वथैव उचित अशीच गोष्ट आहे; व त्या तसबिरीचें उद्घाटन आमच्या हस्तें करविण्याचें योजून, त्या उचित व आनंददायक गोष्टींत आम्हासही अंशभागी करण्याचें आपण ठरविलेंत, याबद्दल आम्ही आपले फार आभारी आहोंत. सरदार आबासाहेब यांचा व या संस्थेचा संबंध किती आत्मीयतेचा आहे, तें आपण सर्वजण जाणत आहांत. ते या संस्थेचे सतत २४ वर्षें उपाध्यक्ष आहेत. यास्तव, त्याविषयीं निराळें अथवा आणखी कांहीं आम्ही सांगत नाहीं व आपला बहुमूल्य वेळही त्याप्रीत्यर्थ घेऊं इच्छीत नाहीं. निःस्वार्थ बुद्धीनें व प्रसंगीं येईल ती झीज सोसून, संस्थेच्या हिताचें वाटेल तें व पडेल तें कार्य करण्यास तत्पर असणारे ते आहेत. इतकें या समयीं त्यांच्याविषयीं सांगितल्यास, तें रास्त व पुरेसें होईल अशी आमची समजूत आहे; व आपणासही तें पटेल असा आमचा दृढ विश्वास आहे.

सरदार आबासाहेबांचे चिरंजीव डॉक्टर बाळासाहेब मुजुमदार, M. Sc., Ph. D., यांचें याच उत्तमोत्तम दिवशीं अभिनंदन करण्याची सुसंधि आम्हास व आपणा सर्वांस लाभत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. आजचा दिवस हा साडेतीन मुहूर्तांतला व पूर्ण मुहूर्ताचा असा दिवस असल्यानें, अभिनंदनाचा हा योग शुभसूचकच आहे असें आम्ही समजतों. त्यांना यापुढील त्यांच्या कार्यांत आम्ही सुयश चिंतीत आहोंत.

सद्गृहस्थहो, संस्थेचें आयुष्य व्यक्तीच्या आयुर्मर्यादेपेक्षां केव्हांही मोठें असतें; व तें, अर्थात्, संस्थेंतील व्यक्तींच्या बुद्धिमत्तेवर व कार्यकौशल्यावर अवलंबून असतें. यास्तव, अशा वर्धापनसमयीं संस्थेच्या चिरायुत्वास अनुलक्षून, पण त्या संस्थेशीं संबंध असलेल्या व्यक्तींस प्रत्यक्षतः उद्देशून, जें अप्रत्यक्षतः आशीर्वादात्मक व कार्योत्साहवर्धक असें वचन उच्चारलें जात असे, तेंच वाक्य या वेळीं आम्ही श्रीमंत आबासाहेब व त्यांचे चिरंजीव, या उभयतांना उद्देशून उच्चारीत आहोंत. तें वाक्य—

प्रस्थिताः दीर्घमध्वानं यूयं किमथ सीदथ ।

हें आहे. त्याचा अर्थ–संस्थेचें ध्येय उच्च व व्यापक आहे. तें गांठण्याचा मार्ग प्रदीर्घ आहे. तें ध्येय साध्य करण्याच्या हेतूनें आपण हा प्रवास अंगिकारला आहे. तर, आतां न दमतां व न थाबतां, या मार्गाचें आक्रमण करा व ध्येय हस्तगत करा. प्राचीनांच्या या स्फूर्तिदायक आशीर्वचनापेक्षां सरस असा वेगळा आशीर्वाद तो, या संस्थेला काय किंवा तिचे हितचिंतक श्रीमंत आबासाहेब व डॉ. बाळासाहेब यांना काय, आम्ही आणखी कोणता देणार ?

शेवटीं, या संस्थेला दिवसानुदिवस उत्कर्षाचा लाभ होवो, व सरदार श्रीमंत आबासाहेब व डॉ. बाळासाहेब यांना दीर्घायुरारोग्य व अंगीकृत कार्यांत यश प्राप्त होवो, अशी इच्छा प्रभु श्रीरामचंद्रचरणीं निवेदित करून आम्ही आपलें भाषण पुरें करतों.

## सार्वजनिक देणग्या

रुपये सन १९३९

५०० श्रीमंत राजेसाहेब यांच्या १९३९ पर्यंतच्या चरित्रप्रकाशनाबद्दल श्री. जोशी, माजी शाळाधिकारी.

३०० मुंबई प्रांतिक दुय्यम शिक्षक परिषद.

५०० पुणें येथील मुलींच्या हायस्कूलचा ( हुजूरपागा ) बक्षिस-समारंभ.

३०० सातारा शारीरिक शिक्षण परिषद.

१,६००

सन १९४०

१०००० व्हाइसरॉयसाहेब यांच्या वॉरफंडासाठीं.

२०० सेंट जॉन अँब्युलन्स फंड.

५०० रेडक्रॉस फंड, कोल्हापूर.

१०००० युद्ध-साहाय्यासाठीं व्हाइसरॉयसाहेब यांच्या वॉरफंडास.

४०० ग्रामोद्धारकार्य, खेड-शिवापूर केंद्र.

१०१ हलवा-प्रदर्शन, भोर.

३०० पुणें आरोग्य-मंडळ-रौप्य-महोत्सव.

४०० पुणें अनाथ हिंदू महिलाश्रम

२१,९०१

सन १९४१

१०० कै० हि० हा० श्रीमंत शंकरराव यांच्या १९१५ पासून १९२२ पर्यंतच्या इतिहासग्रंथ-प्रकाशनाबद्दल श्री० जोशी, माजी शाळाधिकारीं, यांस.

५०० श्रीमंत राजेसाहेबांनीं 'दुसरी इंग्लंडची सफर' हा ग्रंथ लिहिला, त्यांस मदत केल्याबल कै० रावसाहेब जोशी यांच्या कन्येस.

२०० परळी येथील हरिजन-विहीर.

१०,००० रणगाडा.

२५० बेळगांव रुपी प्राइज फंड.

५०० व्हाइसरॉयसाहेब यांच्या पत्नीनें सुरू केलेल्या फंडास.
५०० दिल्ली येथील महाराष्ट्रभवन.
१०० रेडक्रॉड फंड.
१५० वॉरफंड–तिकिटें.
१०१ चायना फंड.
१००० पाली येथील इंग्रजी शाळेस.
५० भोर, राष्ट्रीय सेविका समिति.

## सन १९४१

२०० डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या पुणें येथील मुलींच्या शाळेचा बक्षीससमारंभ.
१,००० भोर संस्थानच्या गरीब शेतकऱ्यांना साह्य देण्याकरितां.
३०० बॉम्बे प्रेसिडेन्सी हेल्थ एक्झिबिशन ( प्रदर्शन ), महाबळेश्वर.
५०० पुणें, वेद पाठशाळा, हीरकमहोत्सव.
२,००० पुणें दे० ऋ० ब्रा० संस्था.
३०० काशी येथील श्रीराम गोदुग्धालय.
१०० काशी येथील गोडबोले आखाडा.
५०० मुंबई, दादर, जनरल एज्युकेशन सोसायटी हायस्कूलचा वार्षिक बक्षिस–समारंभ.
२०० सदर शाळेंतील मुलांना मिठाईकरतां.
२०० दिल्ली येथील ऑल इंडिया कॅटल शो.
२६ पाली, महिला मंडळ.
२५ शिरवळ, मोफत वाचनालय.

१८,८०१

## सन १९४२

२०० पुणें, रेल्वे स्टेशनजवळील लेडी हेग कँटीनला मदत.
१०० स्वस्त धान्याचें दुकान, महाबळेश्वर.

१०० कुरुंदवाड ( सी. ) वाचनालय.
१०००० बनारस हिंदू युनिव्हर्सिटी.

१०,४००

सन १९४३

३००० वॉर फंडास मदत.
१००० महाराष्ट्र व्यायाम मंडळ, पुणें.
२०० श्री नाथीबाई दामोदर ठाकरसी कन्याशाळा, रौप्य-महोत्सव.
२५०० भांडारकर प्राच्य विद्या संशोधन संस्थेचा रौप्य-महोत्सव.

६,७००

सन १९४४

३०० सुधागड तालुका, पडघवली शाळेस.
२००० वॉरफंडास मदत.
१००० डॉ० भडकमकर यांचा सत्कार.
२०० श्री० सामक, शाळाधिकारी, भोर यांचा सत्कार.
५०० रॉयल इंडियन नेव्ही.
१००० पुणें, दे० ऋ० ब्रा० संस्थेस.
१०१ श्रीयुत चित्रावशास्त्री.
३००० कोल्हापूर येथील महाराष्ट्रीय ब्राह्मण कॅडेट वर्गास मदत.

८,१०१

सन १९४५

१००० श्री० दादासाहेब साने, ( सुधागड ) पाली, यांना देणगी.
१०० पाली शाळा, मुला-मुलींना खाऊसाठीं.
५०० श्री गणेश मोफत वाचनालय, रौप्य-महोत्सव, पुणें
५०० सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्या ‘संगीत संग्रह’ या ग्रंथासाठीं.

२,१००

## सन १९४६

३००० श्रीयुत तगारे M. A., B.T. शिक्षक, भोर हायस्कूल, यांच्या Ph. D. पदवीकरितां Thesis चें पुस्तक छापण्यास मदत.

४०० श्रीयुत तगारे यांना Ph. D. पदवीकरतां Thesis लिहिण्याच्या अभ्यासासाठीं.

२०० आदिवासी परिषद, पाली.

३०० इतिहास-संशोधन मंडळ, पुणें.

३,९००

## सन १९४७

३०० श्रीयुत कृ० वा० पुरंदरे यांना श्री शंकराजी नारायण यांच्या चरित्राच्या लेखनाबद्दल

३०० रा० कृ० वा० पुरंदरे यांचे चरित्र लेखनाचे श्रम लक्षांत घेऊन, तसेंच त्या ग्रंथाच्या छपाइकरतां त्यांस करावा लागलेला खर्च भागावा, म्हणून आणखी रु. ३०० ( तीनशें ) त्यांना देण्यांत यावयाचे आहेत, ते.

२००० महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी.

५०० दे० ऋ० श्रा० संस्था, पुणें.

१००० दे० ऋ० श्रा० संस्था, मुंबई.

१००० ऐलकें येथील कै. शेटे स्मारक.

५,१००

## सन १९४८

१५,००० महात्मा गांधी स्मारक निधि.

५००० भोर संस्थानांतील महात्मा गांधी स्मारक निधीकरतां.

८००० भोर संस्थानातील महात्मा गांधी यांच्या वधानंतर झालेल्या जाळ-पोळीमुळें निर्वासित झालेल्या लोकांना मदत.

२८,०००

तेरीज

| | |
|---|---|
| १६०० | सन १९३९ |
| २१९०१ | सन १९४० |
| १८८०१ | सन १९४१ |
| १०४०० | सन १९४२ |
| ६७०० | सन १९४३ |
| ८१०१ | सन १९४४ |
| २१०० | सन १९४५ |
| ३९०० | सन १९४६ |
| ५१०० | सन १९४७ |
| २८००० | सन १९४८ |

रु. १,०६,६०३ एक लक्ष सहा हजार सहाशें तीन रुपये.

सन १९४८.

संस्थान विलीन होण्याचें ठरल्यावर, कांहीं संस्थांनीं श्रीमंतांस मदतीबद्दल विनंति केली व श्रीमंतांस त्या संस्थेचें कार्य लोकोपयोगी वाटत असल्यामुळें खालीलप्रमाणें रकमा मंजूर केल्या; मात्र, विलिनीकरण समीप आल्यानें, सदरील रकमा विलिनीकरणानंतर देण्यांत याव्यात असें नमूद केलें.

५०,००० नानल क्षय–आरोग्य भवन, पुणें.

१०,००० पाली येथील 'वडेर हायस्कूल.'

१,००० पाली, समाज सेवा संघ.

५,००० पुणें बालवीर संस्था. ( श्रीमंत राजेसाहेब यांच्या शिफारसीप्रमाणें या संस्थेस रक्कम मिळाली. ता. ९ मार्च १९४८ इ. )

६६,०००

विलिनीकरण झाल्यानंतर निरनिराळ्या प्रसंगीं देण्यांत आलेल्या देणग्या खालीलप्रमाणें.

१०० परशुरामभाऊ कॉलेजचे प्रिन्सिपाल श्रीयुत करमरकर यांच्या सत्कार-समारंभास.

२०० पुणें, सेवासदन रेडक्रॉस समारंभ.

५०० गोपाळ गायन समाज, पुणें.

१००० रा. रघुनाथ केशव देशपांडे दरबार वकील हें एकाएकीं निधन पावले. त्यांनीं संस्थानांत सुमारें ४०–४२ वर्षे चांगलें काम केलें; सबब, त्यांच्या मुलाला रु. १००० एक हजार देण्यांत आले.

१८००

# परिशिष्ट ४३

## महत्त्वाच्या गोष्टींचा काल दर्शविणारी सनावली

### स. १९३९ इ. तें स. १९४० इ.

१९३९ ऑगस्ट १७ फेडरेशनमध्यें भोर स्टेट सामिल होण्यास कबूल असल्या-बद्दल पत्र पाठवून रेसिडेंट, कोल्हापूर, यांस कळविलें.

,, ,, १८ श्रीमंत राजेसाहेबांचा १७ वा राज्यारोहण दिन-समारंभ.

,, ,, ,, फॉरेस्ट व फ्रँचाइज कमिटयांची नेमणूक. रा. वा. ना. जोशी-कृत चरित्रग्रंथ श्रीमंतांना अर्पण करण्याचा समारंभ.

,, ,, २९ रेसिडेंट, कोल्हापूर, यांजकडून फेडरेशनमध्यें सामिल होण्यास मान्यता दिल्याबद्दल आभाराचें पत्र आलें.

,, ,, ३० युद्धास यथाशक्ती मदत करण्याचें श्रीमंत राजेसाहेब यांनीं साम्राज्य सरकारला आश्वासन दिलें.

,, सप्टेंबर ३ भोर कायदेमंडळानें साम्राज्य सरकारला युद्धांत यश मिळावें असा ठराव पास केला.

,, ,, ४ इंग्लंड व जर्मनी यांच्या दरम्यान युद्ध सुरू झाल्याबद्दल रेसिडेंट, कोल्हापूर, यांच्याकडून श्री. राजेसाहेब यांना तारेनें कळविण्यात आलें.

,, आक्टोबर ८ श्री. राजेसाहेबांचा ६२ वा वाढदिवस-समारंभ. या समारंभानिमित्त श्री. राजेसाहेबांनीं संस्थानच्या गरीब शेतकऱ्यांच्या हिताकरितां रु. १०००, एक हजाराची देणगी दिली.

,, ,, २० भोर कायदेमंडळानें युद्धांत जय मिळण्याची इच्छा प्रदर्शित करून साम्राज्य सरकारशीं राजनिष्ठा व्यक्त केल्याबद्दल आभाराचें रेसिडेंटकडून पत्र आलें.

१९३९ नोव्हेंबर ४ पुणें येथें नूतन मराठी विद्यालयांत मुंबई प्रांतिक दुय्यम शिक्षकांच्या परिषदेचें अधिवेशन ४ थें, या प्रसंगीं भरविलेल्या प्रदर्शनाचा उद्घाटन-समारंभ श्री. राजेसाहेब यांनीं केला.

„ „ २३-२४ श्री शंकराजी नारायण यांचा वार्षिक पुण्यतिथि-महोत्सव भोर येथें साजरा झाला.

„ डिसेंबर २ सातारा येथील शारीरिक शिक्षण परिषदेस श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले.

„ „ २२ पुणें येथील हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स या संस्थेचा वार्षिक बक्षिससमारंभ श्रीमंतांच्या हस्तें झाला.

१९४० जानेवारी ४ बॉम्बे बॅटेलियनच्या यू. टी. सी. च्या बक्षिस-समारंभास डेक्कन कॉलेजमध्यें श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले. ‘ राजा रघुनाथराव गोल्ड मेडल ’ यू. टी. सी. च्या प्राविण्य-परीक्षेंत उच्च दर्जाचें शिफारसपत्र मिळविणारांत पहिला येणाऱ्या विद्यार्थ्यास दरसाल देण्याकरितां रु. १५० ची देणगी दिली. यू. टी. सी. मध्यें श्रीमंत राजकुमार बापूसाहेब यांनीं भाग घेतला होता.

„ „ १० क्रिकेट क्लबवरील गार्डन पार्टीस श्री. राजेसाहेब हजर राहिले.

„ „ २५ भोर येथील महिला मंडळातर्फे तिळगुळाचें प्रदर्शन भरविण्यांत आलें.

„ „ २५ ले. क. के. ए. जी. इव्हॅन्स गार्डन, रेसिडेंट, कोल्हापूर, यांची भोरास भेट.

„ फेब्रुवारी २१ जॉइंट पोलीस फोर्सच्या योजनेबाबत नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब यांच्या भेटीस दिल्ली येथें दक्षिणेंतील

संस्थानिकांतर्फे डेप्युटेशन नेण्यांत आलें. त्यांत श्रीमंत राजेसाहेब होते.

१९४० मार्च २ कोल्हापूर येथें हि. हा. महाराजसाहेब, कोल्हापूर, यांनीं रेसिडेंट ले. क. के. ए. जी. इव्हॅन्स गार्डन यांस फेअरवेल बँक्वेट ( डिनर ) दिलें. श्रीमंत राजेसाहेब त्यास हजर राहिले.

,, ,, २१ खेड-शिवापूर येथील ग्रामसुधारणा केंद्रास श्री. राजेसाहेब यांनीं भेट दिली. तेथें देशमूख-संघाच्या मानपत्राचा स्वीकार केला, आणि शेतकीविषयक नैपुण्य दाखविल्याबद्दल तीन खेडूत व ९ विद्यार्थी यांना बक्षिसें दिलीं.

,, ,, २५ पुणें येथील आरोग्य-मंडळाच्या रौप्य-ज्युबिली समारंभाचें अध्यक्षपद श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वीकारलें.

,, ,, २७ श्री. राजकुमार बापूसाहेब एफ्. वाय्. परीक्षा पास झाले.

,, एप्रिल ८ हि. हा. शंकरराव मॅन्शन्सचा पाया-भरणीचा (भूमि-खनन) समारंभ झाला.

,, एप्रिल १६ श्रीराम क्रीडाभुवन, भोर, या संस्थेचा रौप्य-ज्युबिली-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

,, मे २९ युद्धावर जाणाऱ्या रिक्रूट्सच्या कुटुंबियांस पेन्शन देण्या-बद्दलचा जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला.

## १९४०–४१

,, जून ७ ले. क. पी. गेसफर्ड, रेसिडेंट, कोल्हापूर, यांनीं भोरास भेट दिली.

,, ,, ११ श्री. राजकुमार रावसाहेब मॅट्रिकची परीक्षा पास झाले.

,, जुलई २ श्री. राजेसाहेबांना नरेंद्रमंडळाचे कायमचे सभासद करून घेण्यांत आल्याबद्दल रेसिडेंटसाहेब, कोल्हापूर, यांनीं कळविलें.

१९४० जुलै १३ महायुद्धाचे साहाय्यार्थ उपाययोजना ठरविण्यासाठीं भोर येथें राजवाड्यांत भोरच्या प्रजाजनांची सभा श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाली; व श्रीमंतांनीं रु. १०,००० युद्धसाहाय्यार्थ नेकनामदार व्हाइसरॉयसाहेब यांच्या युद्धफंडास दिले.

,, ऑगस्ट ९ ने. ना. व्हाइसरॉयसाहेब यांच्या भेटीनिमित्त पुणें येथें गव्हर्नमेंट हाउसवर झालेल्या गार्डन पार्टीस श्री. राजेसाहेब हजर राहिले.

,, ,, १४ पुणें येथील अनाथ हिंदुमहिला-गृहाच्या इमारतीचा उद्घाटन-समारंभ श्री. राजेसाहेब यांनीं केला.

,, ,, १८ श्री. राजेसाहेबांचा आठरावा राज्यारोहण-दिन समारंभ भोर येथें साजरा करण्यांत आला.

,, ,, २८ शिरवळ येथें विजेचें सब-स्टेशन पॉवर हाउस श्री. राजेसाहेब यांच्या हस्तें सुरू करण्यांत आलें.

,, सप्टेंबर ८ राष्ट्रीय प्रार्थना-दिन भोर येथें पाळण्यांत आला.

,, ,, १५ श्री. राजेसाहेबांनीं बकिंगहॅम पॅलेसमध्यें झालेल्या बॉम्बच्या स्फोटांतून बादशहा व सम्राज्ञी सुरक्षितपणें वांचल्याबद्दल आनंद-प्रदर्शक तार व्हाइसरॉय साहेबांना केली.

,, नोव्हेंबर ११।१२ श्रीशंकराजी नारायण यांचा वार्षिक पुण्यतिथि-महोत्सव भोर येथें साजरा करण्यांत आला.

,, ,, २६ हि. हा. छत्रपति राजाराम महाराज, कोल्हापूर, यांचें निधन. जादा गॅझेट काढून दुःख प्रदर्शित केलें गेलें.

१९४१ जानेवारी १ श्री. राजेसाहेब यांना नवीन वर्षानिमित झालेल्या पदवी-दानांत के. सी. आय. इ. हा किताब साम्राज्य सरकारकडून देण्यांत आला.

१९४१ जानेवारी ५ राजा रघुनाथराव हायस्कूलचें वार्षिक संमेलन श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झालें.

,, ,, १० श्रीमंत राजेसाहेबांना मिळालेल्या के. सी. आय. इ. पदवीप्रीत्यर्थ भोर येथील अधिकारी वर्गानें गार्डन पार्टी दिली.

,, ,, १४ पुणें येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण संस्थेतर्फे श्रीमंत राजेसाहेबांना पदवीप्रीत्यर्थ अॅटहोम पार्टी दिली.

,, ,, १८ डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या मुलींच्या शाळेच्या वार्षिक संमेलनप्रसंगीं श्री. राजेसाहेब अध्यक्ष झाले.

,, ,, २२ जनरल सर जॉन इ. एस्. ब्रिड, नाइट कमांडर, सदर्न कमांड, यांनीं भोरास भेट दिली.

,, फेब्रुवारी ९ भोर येथील सर्व जातींच्या लोकांना श्रीमंत राजे साहेबांनीं नरेंद्र मंडळाचें सभासदत्व व के. सी. आय. इ. पदवी यांच्या प्राप्तीप्रीत्यर्थ जेवण घातलें.

,, ,, १८ दिल्ली येथें व्हाइसरॉय हाउसमध्यें झालेल्या Investiture Ceremony (पदकदान) ला श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले. व्हाइसरॉयसाहेबांनीं के. सी. आय. इ. पदवीचें पदक व सनद श्री. राजेसाहेबांना स्वतः दिली.

,, ,, २६ हि. हा. शंकरराव मॅन्शन्स—गेस्ट हाउस—चा उद्घाटन-समारंभ व नामकरण-समारंभ रेसिडेंट ले. क. पी. गेसफर्ड यांच्या हस्तें झाला.

,, ,, २७ हर हायनेस जिजीसाहेब मराठी शाळेचा उद्घाटन व नामकरण समारंभ ले. क. पी. गेसफर्ड यांच्या हस्तें झाला.

,, मार्च १ भोर संस्थानची शिरगणती झाली.

,, ,, ११ सुधागड तालुक्यांतील पाली येथें पदवी प्राप्तीनिमित्त तेथील लोकांना जेवण घालण्यांत आलें.

१९४१ मार्च १२ पाली येथील रहिवाशांनीं दिलेलीं मानपत्रें व सत्कार यांचा श्री. राजेसाहेबांनीं स्वीकार केला.

,, ,, १५ दिल्ली येथें लेडी डोरिन होप यांनीं उभारलेल्या ‘एअर क्रॅफ्ट’ फंडाच्या मदतीकरितां भरविण्यांत आलेल्या प्रदर्शनाच्या उद्‌घाटनास श्री. राजेसाहेब हजर राहिले. मदतीदाखल रु. २५० च्या पेंटिंगची खरेदी केली.

,, ,, १७-१८ नरेंद्रमंडळाच्या बैठकीस श्री. राजेसाहेब कायमचे सभासद या नात्यानें प्रथम हजर राहिले.

,, ,, २२ बनारस येथें बनारस युनिव्हर्सिटीचे संस्थापक पंडित मदन मोहन मालवीय ह्यांची श्रीमंत राजेसाहेबांनीं भेट घेतली.

,, ,, २३ भोर येथें प्रार्थना-दिन पाळण्यांत आला.
काशी येथें तेथील नोकर-वर्गातर्फे के. सी. आय. इ. पदवीबद्दल श्रीमंतांचा सत्कार करण्यांत आला.

,, ,, ,, काशी येथें श्री. चौंडेमहाराज यांनीं स्थापन केलेल्या श्रीसमर्थभवन व श्रीराम-गोदुग्धालय, या दोन संस्थांचा उद्‌घाटन-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या हस्तें झाला.

,, ,, २७ पवनमावळ तालुका सभेतर्फे कोळवण येथें श्रीमंतांना पदवीनिमित्त मानपत्र समर्पण करण्यांत आलें. पवनमावळ तालुक्यांतील पिरंगूट व कोळवण येथील प्रमुख सद्‌गृहस्थांना व कोळवण तालुक्याच्या रहिवाशांना पदवीनिमित्त भोजन देण्यांत आलें.

,, ,, २९ श्री. राजकुमार रावसाहेब एफ्. वाय्. ची परीक्षा पास झाले.

,, एप्रिल ३ शिरवळ येथील रहिवाशांना पदवीनिमित्त जेवण घातलें, व तेथील सत्कारसमारंभाचा श्री. राजेसाहेबांनीं स्वीकार केला.

,, ,, १६ नसरापूर येथील शिवगंगा नदीवरील पुलाचा उद्‌घाटन-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या हस्तें झाला.

१९४१ एप्रिल १६ नसरापूर येथील सर्व जातींच्या लोकांना पदवीप्रीत्यर्थ भोजन घालण्यांत आलें.

,, ,, १६ राजगड तालुक्यातर्फे देण्यांत आलेल्या मानपत्राचा श्री. राजेसाहेब यांनीं स्वीकार केला.

,, ,, १७ वेलें येथील रहिवाशांना पदवीप्राप्त्यर्थ जेवण घालण्यांत आलें.

,, ,, ,, श्रीरामनवमी उत्सव सुधारणा : या वर्षापासून सर्व जातींच्या लोकांना नवमीचे दिवशीं भोजन देण्याचें सुरू करण्यांत आलें.

,, मे २६ बॉम्बे प्रेसिडेन्सी बेबी अँड हेल्थ वुइक असोसिएशनच्या वार्षिक सभेचा समारंभ व सिनेमा शो महाबळेश्वर येथें श्रीमंतांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

## १९४१–१९४२

१९४१ जून १८ श्री. राजकुमारी पद्मावती राजे यांचा चिंतामणराव भालचंद्रराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन, राजेसाहेब, कुरुंदवाड ( सीनिअर ) यांजबरोबर विवाह भोर येथें झाला.

,, जुलै ४ श्री. राजकुमार बापूसाहेब यांचा विवाह रावेतचे इनामदार श्री. श्रीधर विष्णु पुंडले यांच्या कन्येबरोबर पुणें येथें झाला.

,, ,, २७ शिरवळ येथें भरलेल्या भोर संस्थान लोकपक्षाच्या परिषदेच्या डेप्युटेशनची भेट दिवाणसाहेब यांनीं पुणें येथें लक्ष्मी विलास बंगल्यांत घेतली.

,, ,, २८ डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशनच्या डेप्युटेशनची पुणें लक्ष्मीविलास बंगल्यांत श्रीमंत राजेसाहेब यांनीं भेट घेतली.

,, ऑगस्ट १८ श्री. राजेसाहेबांनीं भोर येथें केलेल्या भाषणांत युद्ध साहाय्यार्थ लोकांनीं कशा प्रकारें मदत करावी, हें विशद करून सांगितलें.

१९४१ ऑगस्ट १८ श्री. राजेसाहेबांचा १९ वा राज्यारोहण दिन-समारंभ झाला. भोर राजवाडयांतील पॅलेस लायब्ररीस 'एल्. सी. स्विफ्ट लायब्ररी', व म्युझिअमला 'सर विल्यम शेपर्ड म्यूझिअम' अशीं नांवें दिलीं.

,, ,, २७ राष्ट्रीय सेविका समितीचा वार्षिक समारंभ भोर येथें राजा रघुनाथराव हायस्कूलच्या पटांगणावर श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत आला. समितीचें नांव 'राणी लक्ष्मीबाई सेविका समिति' असें ठेवण्यांत आलें.

,, सप्टेंबर ७ भोर येथें श्री दत्तमंदिरांत दिवाणांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरवून प्रार्थना-दिन पाळण्यांत आला; व दोस्तांना युद्धांत जय मिळावा अशी प्रार्थना करण्यांत आली.

,, ,, २४ मि. जे. ए. मदन, मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांचे सल्लागार, यांनीं भोरास भेट दिली.

,, ,, २९ मुंबईचे गव्हर्नर सर रॉजर लम्ले यांनीं भोरास भेट दिली.

,, ,, ३० श्री. राजेसाहेब हे कुरुंदवाड येथें श्रीमंत राजेसाहेब, कुरुंदवाड, यांच्या राज्यारोहण-समारंभास गेले.

,, आक्टोबर १७ श्रीमंत राजेसाहेब कुरुंदवाड (सी.) यांचा, त्यांच्या राज्यारोहणनिमित्त, श्री. राजेसाहेब यांनीं भोर येथें सत्कार केला.

,, ,, १८ पुणें येथील वेदपाठशाळेचा हीरक-महोत्सव श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

,, ,, ३१ श्री शंकराजी नारायण यांचा वार्षिक पुण्यतिथि-महोत्सव भोर येथें साजरा करण्यांत आला.

,, नोव्हेंबर २४ कोल्हापूर येथें कै. छत्रपति राजाराम महाराज त्यांच्या कन्येच्या नामकरण-समारंभास श्रीमंत राजेसाहेब गेले होते. त्यांचें नांव 'पद्माराजे' असें ठेवण्यांत आलें.

१९४१ डिसेंबर २ भोर संस्थानची शेतकीविषयक पहाणी करण्याकरितां जोशी कमिटी नेमली.

,, ,, ६ दादर येथील जनरल एज्युकेशन सोसायटीच्या छबिलदास हायस्कूलचा बक्षिस-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

,, ,, ८ परळी येथें हरिजनांकरितां बांधण्यांत आलेल्या विहिरीचा उद्घाटन व नामकरण समारंभ श्रीमंतांनीं केला. विहिरीचें 'सीताकुंड' असें नांव ठेविलें.

,, डिसेंबर ११ श्री. राजेसाहेब यांच्या तैलचित्राचें अनावरण लोकनायक अणे यांच्या हस्तें पुणें येथील दे. ऋ. ब्राह्मण संस्थेंत झालें.

,, ,, २४ भोर येथें राजवाड्यांत ए. आर. पी. ची माहिती भोरचे नागरिकांना पुणें येथील ए. आर. पी. चे इन्स्ट्रक्टर मि. डी. पी. जोशी यांनीं दिवाणांच्या अध्यक्षतेखालीं भरविलेल्या सभेंत दिली.

१९४२ जानेवारी १४ मकर संक्रांतीनिमित्त भरलेल्या तिळगुळाच्या कचेरींत 'रॉयल कारोनेशन अँड माय सेकंड ट्रिप टु युरोप' या श्री. राजेसाहेबांनीं लिहिलेल्या पुस्तकाचा प्रकाशन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झाला.

,, ,, १६ हि. रॉ. हा. ड्यूक ऑफ कॅनाट यांच्या निधनानिमित्त भोर स्टेट गॅझेट काढून दुःख प्रदर्शित करण्यांत आलें.

,, ,, २१ बनारस हिंदु युनिव्हर्सिटीच्या रौप्य ज्युबिली-समारंभास श्री राजेसाहेब हजर राहिले, व रु. १०,००० दहा हजारांची देणगी दिली.

,, ,, २३ श्री. राजेसाहेब यांनीं पंडित मदनमोहन मालवीय यांची भेट घेतली.

१९४२ फेब्रुवारी ४ कुरुंदवाड येथें भालचंद्र मेमोरिअल हॉलमध्यें स्टेट लायब्ररीच्या रौप्यज्युबिलीनिमित्त श्री. आण्णासाहेब पटवर्धन यांच्या फोटोचें अनावरण श्रीमंत राजेसाहेब यांनीं केलें.

श्री. राजेसाहेब कुरुंदवाड यांनीं लायब्ररीचें नांव 'राजा रघुनाथराव पंतसचिव लायब्ररी' असें ठेविलें.

,, ,, ९ सुधागड तालुका सभेतर्फे आलेल्या डेप्युटेशनची दिवाण यांनीं भेट पुणें येथें घेतली.

,, ,, १० रेसिडेंट ले. क. पी. गेसफर्ड यांनीं नसरापूर येथील शिवगंगा नदीवरील पुलाचें 'इव्हॅन्स गॉर्डन ब्रिज' असें नामकरण केलें.

,, ,, ,, ले. क. पी. गेसफर्ड यांनीं भोरजवळील मांगिरा ओढयावरील पुलाचें 'गेसफोर्ड ब्रिज' असें नामकरण केलें.

,, मे ११ भोर संस्थान प्रातिनिधिक कायदेमंडळाच्या निवडणुकी झाल्या.

,, ,, ३० श्री. सौ. विजयादेवी पटवर्धन, राणीसाहेब, कुरुंदवाड, (श्रीमंत राजेसाहेब यांची कन्या) या मॅट्रिक परीक्षेंत उत्तीर्ण झाल्या.

## १९४२–४३

१९४२ जून ६ श्री. राजकुमार रावसाहेब इंटरमिजिएट परीक्षा पास झाले.

,, जुलई २३ भोर येथील नोकरवर्गास महागाईभत्ता देण्याचें श्री. राजेसाहेबांनीं मंजूर केलें.

,, सप्टेंबर १ हिंदुस्थान सरकारच्या हुकुमाप्रमाणें संस्थानमध्यें वेळ एक तास पुढें करण्यांत आली.

,, ,, ६ महायुद्धांत दोस्तांना जय मिळावा, म्हणून संस्थानांत प्रार्थनादिन पाळण्यांत आला.

१९४२ सप्टेंबर १९ डेक्कन मर्चन्ट्स को-ऑपरेटिङ्ग् बँक, मुंबई, या संस्थेचा रौप्य ज्युबिली-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

,, ऑक्टोबर ६ भोर संस्थानांतील रयतेचे प्रमुख पुढारी व सरकारी अधिकारी यांची धान्य-पुरवठा करण्याच्या कामीं मिश्र कमिटी नेमण्यांत आली.

,, ,, २१ धान्यपुरवठा-कमिटीची बैठक श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं भोर येथें झाली.

,, ,, २३ नॅशनल वॉर-फ्रंटतर्फे भोर येथें दिवाणांच्या अध्यक्षतेखालीं श्री. सौ. गंगूताईसाो पंतसचिव वाचनालयांत सभा झाली.

,, नोव्हेंबर १५ भोर संस्थान प्रातिनिधिक कायदेमंडळाचें पहिलें अधिवेशन भोर येथें कौन्सिल हॉलमध्यें भरलें. या अधिवेशनाचें उद्घाटन श्री. राजेसाहेब यांनीं केलें, आणि उद्घाटनाच्या भाषणांत एक वर्षांत लोकनियुक्त मंत्री नेमण्याची व रु. २५,००० दरवर्षी खाजगी खर्चास कमी घेण्याची घोषणा केली.

,, ,, १९-२० श्रीशंकराजी नारायण यांचा वार्षिक पुण्यतिथि-महोत्सव भोर येथें साजरा करण्यांत आला.

,, ,, २२ इजिप्तमध्यें दोस्तांना मिळालेल्या यशाबद्दल भोर येथें प्रार्थना करण्यांत आली.

,, डिसेंबर १३ सुधागडमधील पुढारी व व्यापारी यांच्या धान्य-नियंत्रणाबाबत आलेल्या डेप्युटेशनची दिवाणसाहेबांनीं भेट घेतली.

,, डिसेंबर १४ श्रीमंत राजेसाहेबांनीं पुणें येथील बालविकास मंदिरास भेट दिली.

१९४३ जानेवारी ४ पुणें येथील भांडारकर ओरिएन्टल रीसर्च इन्स्टिटयूट, या संस्थेचा रौप्यज्युबिली-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

१९४३ फेब्रुवारी १३ मे. रेसिडेंट ले. क. एडवर्ड्स यांची भोरास भेट :— श्री. राजेसाहेबांनीं ले. क. एडवर्ड्स यांच्या भेटीनिमित्त युद्ध-साहाय्य-फंडास रु. ३००० ची देणगी दिली.

,, एप्रिल ९ युवराजकुमार श्री. चिमणाजीपंत उर्फ आबासाहेब यांचा उपनयन-समारंभ भोर येथें झाला.

,, ,, ११ सुधागड तालुक्यांतील लोकांच्या, धान्यनिर्यातीस परवाना मिळाण्याबद्दल विनंति करण्याकरितां आलेल्या, डेप्युटेशनची श्रीमंत राजेसाहेब यांनीं भेट घेतली.

,, मे २१ 'टयुनिशिया डे' भोर संस्थानांत पाळण्यांत आला.

## १९४३-४४

१९४३ जुलई ३ दक्षिणी संस्थानिकांची श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें दक्षिणी संस्थानांचें समायीक हायकोर्ट व जाइंट पोलीस फोर्स या विषयांवर वाटाघाट करण्याकरितां बैठक झाली.

,, ऑगस्ट १८ श्री. राजेसाहेबांचा २१ वा राज्यारोहणदिन-समारंभ भोर येथें झाला.

,, सप्टेंबर ३ पंचम युद्धदिनानिमित्त सार्वजनिक प्रार्थनादिन भोर येथें पाळण्यांत आला.

,, ,, १५।१६ डेक्कन स्टेट्स फुड-कॉन्फरन्सला कोल्हापूर येथें दिवाण व कौन्सिलर हजर राहिले.

,, ,, २३ संस्थानच्या दौलतीकडील व खाजगीकडील नोकरवर्गाच्या महागाईभत्यांत वाढ केली.

,, आक्टोबर ४ नसरापूर येथील मिशनरी मि. लिप्ट्रॉट यांनीं धान्य-व्यवस्था समाधानकारक असल्याचें कळवून श्रीमंतांचें अभिनंदन केलें.

,, ,, १० महाराष्ट्रीय मंडळ, पुणें, या संस्थेस मुंबईचे गव्हर्नर सर जॉन कॉलव्हिल यांनीं भेट दिल्यावेळीं मंडळाचे

अध्यक्ष या नात्यानें श्री. राजेसाहेब यांनीं त्यांचें स्वागत केलें व आभार मानले आणि संस्थेस रु. १००० एक हजाराची देणगी दिली.

१९४३ ऑक्टोबर १५-१६ नरेंद्रमंडळाच्या बैठकीस श्रीमंत राजेसाहेब दिल्ली येथें हजर राहिले.

,, ,, १९ ने. ना. लॉर्ड लिन्लिथगो यांस निरोप देण्याचा समारंभ दिल्ली येथें झाला, त्यास श्री. राजेसाहेब हजर राहिले.

,, ,, २० ने. ना. लॉर्ड वेव्हेल, नवे व्हाइसरॉय, यांच्या स्वागताच्या समारंभास श्रीमंत राजेसाहेब दिल्ली येथें हजर राहिले.

,, नोव्हेंबर ९-१० भोर येथें श्रीशंकराजी नारायण यांचा वार्षिक पुण्य-तिथि-महोत्सव झाला.

,, ,, ११ भोर येथें कौन्सिल हॉलमध्यें फुड-कंट्रोलच्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां श्रीमंतांच्या अध्यक्षतेखालीं भोर संस्थानांतील प्रमुख लोकांची सभा झाली.

,, ,, १५ लोकनियुक्त मंत्र्यांची श्री. राजेसाहेब यांनीं नेमणूक केल्याचें जाहीर केलें.

,, डिसेंबर ६ हि. हा. महाराजासाहेब, संस्थान देवास (ज्यु.) चे अधिपति निवर्तल्यामुळें भोर येथें सुट्टी देण्यांत येऊन, जादा गॅझेटद्वारें दुःख प्रदर्शित करण्यांत आलें.

,, ,, २१ कोल्हापूर येथील रेसिडेन्सीचे सेक्रेटरी व डेक्कन स्टेट्सचे डायरेक्टर ऑफ फुड सप्लाइज यांनीं भोरास भेट देऊन फुड-कंट्रोलबाबत संस्थानच्या दिवाणांबरोबर वाटाघाट केली.

१९४४ जानेवारी ६ भोर संस्थानात व्यापारी कंपन्या 'कार्पोरेशन्स' स्थापन करण्याबाबत तालुक्यांतील प्रमुख लोकांबरोबर संस्थानच्या अधिकाऱ्यांनीं पुणें येथील लक्ष्मीविलास बंगल्यांत चर्चा केली.

१९४४ जानेवारी २३ महाराष्ट्र चित्रकार मंडळाच्या १३ व्या वाढदिवसानिमित्त बक्षिस-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

,, ,, ३० सुधागड तालुक्यांतील पडघवली येथील 'कै. केशव रामचंद्र दिवेकर शाळा' या इमारतीच्या उद्घाटनाचा व नामकरणाचा समारंभ श्रीमंतांच्या अध्यक्षतेखालीं झाला. श्रीमंतांनीं शाळेस रु. ३०० तीनशेंची देणगी दिली.

,, फेब्रुवारी १३ हि. हा. महाराजसाहेब, देवास (सीनिअर), यांनीं भोरास भेट दिली. तन्निमित्त श्री. राजेसाहेबांनीं रु. ३००० ची देणगी कोल्हापूर येथील क्याडेटच्या वर्गांतील महाराष्ट्र ब्राह्मणांच्या मदतीस म्हणून वॉर पर्पजेस फंडाला दिली.

,, एप्रिल १३ कोल्हापूर येथील रेसिडेन्ट ले. क. सी. जी. एन. एडवर्ड्स यांनीं भोरास भेट दिली. त्या भेटीप्रीत्यर्थ श्री. राजेसाहेबांनीं वॉर पर्पजेस फंडाकरितां रु. २००० ची देणगी दिली.

,, ,, १६ भोर येथील श्री लक्ष्मी टेक्स्टाइल मिलचा उद्घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला.

,, ,, २० पुणें येथें दे. ऋ. ब्रा. संस्थेच्या परिषदेचें श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें उद्घाटन झालें.

,, ,, २१ पुणें येथील दे. ऋ. ब्रा. संस्थेच्या परिषदेच्या वेळीं दे. ऋ. ब्रा. परिचय ग्रंथ श्री. राजेसाहेब यांना अर्पण करण्यांत आला. या संस्थेस श्रीमंतांनीं रु. १००० एक हजाराची देणगी दिली.

,, ,, ,, पुणें बालवीर संस्थेचा २५ वा वार्षिक उत्सव Mr. F. G. Pearce यांच्या अध्यक्षतेखालीं झाल्या वेळीं श्री. राजेसाहेबांनीं उद्घाटनाचें भाषण केलें.

‘ श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी कन्या शाळा ’ या संस्थेचा बक्षिस-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. त्या शाळेस श्रीमंतांनीं रु. २००० दोन हजारांची देणगी दिली.

१९४४ जून ११ भोर हायस्कूलचे हेडमास्तर व शाळाधिकारी श्री. विष्णु केशव सामक, बी. ए., यांचा सत्कार राजा रघुनाथ-राव हायस्कूलच्या विद्यार्थ्यांनीं केला. त्या समारंभाचें अध्यक्ष-स्थान श्री. राजेसाहेब यांनीं स्वीकारलें. श्री. सामक यांस रु. २०० दोनशेंचा आहेर केला.

,, ,, १२ साहित्यसम्राट् श्री. न. चिं. केळकर यांचा, त्यांच्या वयास ७० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल, भोर येथें श्री. राजेसाहेब यांनीं सत्कार केला.

,, जून १६ डॉ. रामकृष्ण हरी भडकमकर, M.A., M.D. यांचा भोर येथें श्रीमंत राजेसाहेब यांनीं, त्यांच्या वयास ६० वर्षें पूर्ण झाल्याबद्दल, सत्कार करून रु. १००० एक हजारांचा आहेर केला.

,, जुलई १४ श्रीमंत राजकुमार रावसाहेब यांच्या नाकाचें ऑपरेशन मुंबई येथें झालें.

,, ,, ७ श्रीमंत राजेसाहेब यांनीं नेक नामदार सर जॉन कॉलव्हिल यांची पुणें येथें गव्हर्नमेंट हाउसवर भेट घेतली.

,, ऑगस्ट १८ श्रीमंत राजेसाहेबांचा २२ वा राज्यारोहण दिन-समारंभ भोर येथें साजरा करण्यांत आला. श्रीमंत राजेसाहेबांनीं The Royal Indian Navy and its Benevolent Association या संस्थेस रु. ५०० पांचशेंची देणगी दिली.

श्री. राजेसाहेब यांच्या हस्तें भोर स्टेट बँकेचा उद्घाटन समारंभ भोर येथें झाला.

१९४४ सप्टें. १० नेक नामदार सर जॉन कॉलव्हिल यांच्याकडे पुणें येथें श्रीमंत राजेसाहेब गव्हर्नमेंट हाउसवर लंचला गेले होते.

,, ,, ,, कोल्हापूरचे रेसिडेंट मि. जे. एच्. थॉम्सन यांस पुणें येथें बंगल्यावर श्री. राजेसाहेब यांनीं डिनर दिलें.

,, ऑक्टोबर ११ हर हायनेस चिमणाबाईसाहेब, बडोदें, यांजकडे श्री. राजेसाहेब पुणें येथें लंचला गेले होते.

,, ,, १६ मुंबईचे गव्हर्नर सर जॉन कॉलव्हिल यांची भोरास भेट.

,, ,, १७ कोल्हापूरचे रेसिडेन्ट मि. जे. एच. थॉम्सन यांची भोरास भेट.

,, ,,२९-३० भोर येथें श्रीशंकराजी नारायण यांचा पुण्यतिथि-महोत्सव.

,, डिसेंबर २२ हिर्डस मावळ भागांतील रयत लोकांतर्फे आलेल्या डेप्युटेशनची श्री. राजेसाहेब यांनीं पुणें बंगल्यावर भेट घेतली.

,, ,, २४ महाराष्ट्र चित्रकार मंडळातर्फे टिळक स्मारक मंदिरांत भरविण्यांत आलेलें प्रदर्शन पहाणेस श्री. राजेसाहेब गेले होते.

१९४५ जाने. १ रिक्रुट भरतीच्या प्रचारासाठीं श्री. राजेसाहेब यांनीं कोळवण व पिरंगूटला भेट दिली.

,, ,, १८ श्री. राजेसाहेब यांनीं कोल्हापूर येथें मि. जे. एच. थॉम्सन, रेसिडेंट, यांची भेट घेतली.

,, ,,२०-२१ श्रीमंत राजेसाहेब यांची कुरुंदवाड (सी.) ला भेट.

,, फेब्रु.१४-१५ मुंबई येथे ताजमहाल हॉटेलमध्यें जॉइंट हायकोर्टाच्या प्रश्नाबाबत झालेल्या बैठकीस श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले.

,, ,, १६ मुंबई येथें गव्हर्नमेंट हाउसवर नेक नामदार गव्हर्नरसाहेब यांचेकडे श्रीमंत राजेसाहेब लंचला गेले होते.

मुंबई येथें सर कावसजी जहांगीर हॉलमध्यें भरलेल्या आर्ट एक्झिबिशनचा उद्घाटन समारंभ नेक नामदार गव्हर्नर यांच्या हस्तें झाला. त्यास श्रीमंत राजेसाहेब हजर राहिले.

| | | | |
|---|---|---|---|
| १९४५ | मार्च | १२ | कोल्हापूरचे रेसिडेंट ले. क. हार्वे यांना श्रीमंत राजेसाहेब यांनीं पुणें बंगल्यांत डिनर दिलें. |
| ,, | ,, | १५ | पाली येथें भोर स्टेट बँकेच्या शाखेचा उद्‌घाटन-समारंभ श्रीमंत राजेसाहेब यांनीं केला.<br>पाली हायस्कूलला श्रीमंत राजेसाहेब यांनीं भेट देऊन दर-साल रु. १००० एक हजार (ग्रँट) देणगी देण्याचें जाहीर केलें. |
| ,, | एप्रिल | ४ | पुणें येथील विद्वत्परिषदेचें स्वागताध्यक्षपद श्री. राजेसाहेब यांनीं स्वीकारलें; पण, आयत्या वेळीं त्यांना हजर राहतां न आल्यामुळें, त्यांनीं आपलें भाषण पाठविलें, तें सरदार मुजुमदार यांनीं वाचलें. |
| ,, | ,, | ५ | युवराज-कुमारी श्री. विमलाराजे मुंबई युनिव्हर्सिटीची मॅट्रिकची परीक्षा पास झाल्या. |
| ,, | ,, | ,, | कोल्हापूरचे रेसिडेंट ले. क. हार्वे यांची भोरास भेट. |
| ,, | ,, | ,, | रिक्रूट-भरतीच्या प्रचारासाठीं श्रीमंत राजेसाहेब यांची नसरा-पुरास भेट. |
| ,, | ,, | ६ | रिक्रूट-भरतीच्या प्रचारासाठीं श्रीमंत राजेसाहेब यांची वेल्ह्यास भेट. |
| ,, | ,, | १८ | कोल्हापूरचे रेसिडेंट ले. क. हार्वे यांस पुणें बंगल्यांत डिनर दिलें. |
| ,, | मे | ५ | महायुद्ध-समाप्ति व विजय-दिन. |
| ,, | ,, | २७ | हिंदवी स्वराज्य स्थापनेचा त्रिशत सांवत्सरिक दिन श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं बनेश्वर व चेलाडी येथें साजरा झाला. |
| ,, | जून | १५ | पंडित हृदयनाथ कुंझरू, भारत सेवक समाजाचे अध्यक्ष, श्रीमंतांच्या भेटीस पुणें येथें आले होते. |

| | | | |
|---|---|---|---|
| १९४५ | जुलई | ६ | श्री. राजकुमार रावसाहेब, एल्एल्. बी. परीक्षा पास झाले. |
| ,, | ,, | २५ | दि ऑनरेबल डॉ. ना. भा. खरे, व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाच्या कॉमनवेल्थ रिलेशन्स खात्याचे सभासद, यांनीं भोरास भेट दिली. |
| ,, | ,, | २५ | पुणें गव्हर्नमेंट हाउसवर नेक नामदार सर जॉन कॉलव्हिल व लेडी कॉलव्हिल यांच्याकडे लंचला श्रीमंत राजेसाहेब गेले होते. |
| ,, | ऑगस्ट | १८ | श्रीमंत राजेसाहेब यांचा चोविसावा राज्यारोहण-दिन समारंभ. |
| ,, | ,, | १९ | जपानबरोबरच्या युद्धांत दोस्तांना विजय प्राप्त झाला, त्या-बद्दल विजयदिन साजरा करण्यांत आला. |
| ,, | सप्टेंबर | २४ | श्रीगणेश मोफत वाचनालय व ग्रंथालय, पुणें, या संस्थेच्या रौप्य ज्युबिली-महोत्सव-समारंभाचें अध्यक्षस्थान श्री. राजे-साहेब यांनीं स्वीकारलें. या संस्थेस रु. ५०० पांचशेंची देणगी दिली. सरदार आबासाहेब मुजुमदार यांच्या 'संगीत संग्रह' या पुस्तकास रु. ५०० पांचशेंची देणगी दिली. |
| ,, | ऑक्टोबर | १३ | पंडित हृदयनाथ कुंझरू यांस श्रीमंत राजेसाहेब यांनीं भोजनास बोलाविलें. |
| ,, | नोव्हेंबर | २४ | कोल्हापूर येथें दक्षिणेंतील संस्थानांचें समाइक हायकोर्ट स्थापन करण्याच्या योजनेस भोर संस्थानची संमति असल्या-बद्दल श्रीमंत राजेसाहेब यांनीं रेसिडेंट, कोल्हापूर, यांना कळविलें. |
| ,, | ,, | १२ | श्रीमंत राजेसाहेब यांना दक्षिणेंतील संस्थानांतर्फे नरेंद्र-मंडळाच्या स्थायी समितीवर सभासद म्हणून निवडण्यांत आलें. |
| ,, | डिसेंबर | २३ | पुणें कँप सब-एरिया स्पोर्टस् ग्राउंडवर महाराष्ट्र व्हिक्टरी गेम्स केल्या, त्या वेळीं यशस्वी खेळाडूंना श्री. राजेसाहेब यांनीं बक्षिसें वाटलीं. देणगी रु. १०१ एकशें एक दिली. |

१९४६ जाने. १ पुणें येथें गव्हर्नमेंट हाउसवर व्हाइसरॉय व लेडी वेव्हेल यांच्या आगमनानिमित्त मुंबईचे गव्हर्नर सर जॉन कॉलव्हिल यांनीं दिलेल्या डिनर पार्टीस श्रीमंत राजेसाहेब गेले होते.

,, ,, २४ श्री. सरदार मुदलीयार यांना ७६ वें वर्ष लागलें, त्या निमित्त सत्कार-समारंभास रु. २०० दोनशेंची देणगी श्रीमंत राजेसाहेब यांनीं दिली.

,, फेब्रुवारी ६ भोर संस्थानचें जादा गॅझेट प्रसिद्ध करून नवीन राजकीय सुधारणा दिल्याचें जाहीर करण्यांत आलें.
भोर संस्थानच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष, म्हणून श्रीयुत न. चिं. केळकर, बी. ए., एल्‌एल्‌. बी., यांची एक वर्ष मुदतीनें नेमणूक करण्यांत आली.

,, ,, १५ भोर संस्थानमध्यें कागदोपत्रीं व राजकीय पत्रव्यवहारामध्यें फसली सन चालू होता. त्या ऐवजीं राजशक ( छत्रपति श्री शिवाजीमहाराज यांच्या स्मरणार्थ ) सुरू करण्यांत आल्याचें संस्थानच्या गॅझेटद्वारां प्रसिद्ध करण्यांत आलें.

,, ,, १७ भोर स्टेट हायकोर्ट ॲक्ट भोर संस्थानला ता. १-३-४६ पासून लागू असल्याचें गॅझेटमध्यें प्रसिद्ध करण्यांत आलें.

,, मार्च ३ कोल्हापूर येथील रेसिडेंट ले. क. सी. डब्ल्यू. हार्वे, सी. आय. इ., जी. बी. ई., एम्. सी. यांना श्रीमंत राजेसाहेब यानीं पुणें येथें लंचला बोलाविलें होतें.

,, ,, १२ नेक नामदार व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यांची व्हाइसरॉय हाउसमध्यें दिल्ली येथें भेट.

,, ,, १२-१४ नरेंद्र मंडळाच्या स्थायी समितीच्या बैठकीस श्री. राजेसाहेब, नियुक्त सभासद म्हणून, हजर राहिले.

,, एप्रिल ९ ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांचा पुण्यतिथिमहोत्सव नोव्हेंबरमध्यें व्हावयाचा, तो, प्लेगमुळें तहकूब केलेला,

समारंभ या दिवशीं करण्यांत आला, व शंकराजी नारायण पारितोषिकें देण्यांत आलीं.

१९४६ एप्रिल ११ भोर इंडस्ट्रीज कं. लि. या कारखान्यांतील Twin-Tex भागाचा उद्घाटन-समारंभ श्री. राजेसाहेब यांच्या हस्तें झाला.

,, ,, २३ श्री. सौ. विजयादेवी, राणीसाहेब, कुरुंदवाड ( सीनियर ), यांना द्वितीय कन्यारत्न झालें. ता. ५-५-४६ रोजीं कन्येचें नांव शोभनाराजे ठेवलें.

,, जून ९-१० मुंबई येथें स्थायी समितीची बैठक. श्रीमंत राजेसाहेब हजर होते.

,, सप्टेंबर १४ श्रीमती भागीरथीबाई पुराणिक यांचें इंदूर येथें निधन.

,, ,, १५ सरदार श्री. आबासाहेब मुजुमदार यांचा षष्ट्यब्दपूर्ति-समारंभ.

,, ऑक्टोबर २२ कै. दत्तोपंत आपटे स्मृतिदिन-समारंभ. रा. पुरंदरे यांनीं चिंचवड संस्थानसंबंधीं निबंध लिहिणेबद्दल स्मारक मंडळाच्या कार्यास रु. ३०० तीनशें रुपये देणगी श्रीमंत राजेसाहेबांनीं दिली.

,, ,, २५ भोर येथील राजा रघुनाथराव हायस्कूलमधील शिक्षक रा. ग. वा. तगारे, एम्. ए., बी. टी., यांनीं ‘ अपभ्रंशाचें ऐतिहासिक व्याकरण ’ नांवाचा ग्रंथ तयार केला. त्यासाठीं मुंबईच्या विश्वविद्यालयानें रा. तगारे यांना पीएच. डी. ही बहुमानाची पदवी दिली.

हें पुस्तक छापण्यासाठीं रा. तगारे यांच्या विनंतीप्रमाणें डे. कॉलेज पोस्ट-ग्रॅज्युएट संस्थेला रु. ३००० तीन हजार देणगी, व अभ्यासासाठीं रु. ४०० चारशें रा. तगारे यांना देणगी दिली.

,, नोव्हेंबर १६ नवीन घटनेप्रमाणें कायदेमंडळाची निवडणूक.

,, ,, १७ पालीस भेट.

१९४६ नोव्हें. १८ पाली-सिद्धेश्वर रस्त्याची सुरुवात.

१९४७ फेब्रु. ४ नरेंद्र मंडळाच्या नरेंद्रांच्या स्थायी समितीच्या सभासदत्वाचा राजीनामा श्रीमंत राजेसाहेबांनीं दिला.

,, मार्च १ श्रीयुत गो. बा. पोतनीस यांची मुख्य मंत्री व शं. ल. लिमये यांची मंत्री याप्रमाणें नेमणूक.

,, ,, ,, पाली येथें प्रजा सभेचें अधिवेशन श्रीयुत शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखालीं.

,, ,, २ शिंगरे रुग्णालय, उद्घाटन-समारंभ.

,, ,, २६ पाली हायस्कूल व कौशिक क्रीडांगण यांचा उद्घाटन-समारंभ.

,, ,, ३१ हर हायनेस श्रीमंत ताराबाईसाहेब महाराणी, कोल्हापूर, यांनीं आपले भाचे देवास सिनियरचे महाराज यांजला दत्तक घेतलें. त्यानिमित्त रु. ५०० पांचशेंचा आहेर केला, व रु. ७००० सात हजार किंमतीचा (नर) हत्ती नजर केला.

,, मे २५ नवीन कायदे मंडळाचें पहिलें अधिवेशन.

,, जून १ श्रीमंत छत्रपति शहाजी महाराज यांचा कोल्हापूर येथें राज्याभिषेक-समारंभ. त्यानिमित्त रु. ७००० सात हजार किंमतीचा ( मादी ) हत्ती नजर केला.

,, ,, १३ भोर स्टेट बँकेच्या शिरवळ शाखेचें उद्घाटन.

,, ऑगस्ट १ कोल्हापूर समाईक हायकोर्ट रद्द झालें.

,, ,, ९ श्रीमंत राजेसाहेब यांना हि. हा. पदवीची प्राप्ति.

,, ,, १५ हिंदुस्थान स्वतंत्र जाहला.

,, ,, १८ हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांच्या राज्यकारभाराचा रौप्य महोत्सव. संस्थानांत जबाबदारीची राज्यपद्धति सुरू केली. या प्रसंगीं रु. ४०,००० चाळीस हजारांची सारासूट

देण्यांत आली व सर्व नोकरांस व पेन्शनरांसही एक महिन्याचा पगार व पेन्शन बोनस म्हणून देण्यांत आलें.

१९४७ऑगस्ट १८ भोर संस्थाननें संपूर्ण जबाबदार राज्यपद्धतीच्या राज्यकारभाराबाबतचा कायदा लागू केला व नवीन मंत्र्यांची नेमणूक.

,, ,, २० पुणें येथें दे. ऋ. ब्रा. संस्थेमध्यें श्रीमंत राजेसाहेब यांचा सत्कार. श्रीमंत राजेसाहेबांनीं सदर संस्थेस रु. ५०० पांचशेंची देणगी दिली.

,, ,, २२ Instrument of Accession या करारावर सही करून हिंद राज्याच्या आधिपत्यास मान्यता देण्यांत आली.

,, ऑक्टोबर ८ मंत्र्यांकडून राजीनामा.

,, ,, ११ मुंबई येथें दे. ऋ. ब्रा. संस्थेमध्यें श्रीमंत राजेसाहेब यांचा सत्कार. श्रीमंत राजेसाहेब यांनीं रौप्य महोत्सवाच्या स्मरणार्थ रु. १००० एक हजारांची देणगी संस्थेस दिली.

,, ,, १४ साहित्यसम्राट् श्रीयुत न. चिं. उर्फ तात्यासाहेब केळकर यांचें निधन.

,, ,, १७ संघराज्यास मान्यता.
भोर येथें संघराज्याच्या करारावर आठ राजेलोकांनीं सह्या केल्या.

,, ,, २१ श्रीमंत राजेसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं महाराष्ट्र मंडळांत श्रीयुत तात्यासाहेब केळकरांच्या निधनाबद्दल दुखवट्याची सभा.

,, नोव्हेंबर ५ महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीस भेट व रु. २००० दोन हजारांची देणगी.

,, ,, २७ श्री शंकराजी नारायण यांच्या पुण्यतिथि-महोत्सव प्रसंगीं श्रद्धीभूत श्री शंकराजी नारायण यांचें चरित्र प्रकाशित करण्यांत आलें. पुणें येथील भारत इ. सं. मंडळांतील इतिहासप्रेमी रा. कृ. वा. पुरंदरे यांनीं ऐतिहासिक कागद-पत्रांच्या

आधारें हें चरित्र लिहिलें. त्याबद्दल रु. ३०० तीनशेंचें श्री शंकराजी नारायण पारितोषिक त्यांना देण्यांत आलें.

१९४७ डिसें. १५ भोर म्युनिसिपालिटीच्या जनरल बॉडीचें विसर्जन केलें व नवीन निवडणुकी करण्याचा हुकूम केला.

,, ,, १८ संस्थानच्या विलिनीकरणास श्रीमंत राजेसाहेब यांनीं मान्यता दिल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेब यांना येलकें येथें मानपत्र व वै. ह. भ. प. धों. अ. शेटे ह्यांच्या स्मारकाची कोनशिला बसविणेचा समारंभ; व येलकें गांवचें 'शिवाजी नगर' असें नामकरण करण्यांत आलें; व शेटे स्मारकास रु. १००० एक हजार देणगी जाहीर केली.

,, ,, २० मिरज येथें संघराज्याचा उद्घाटन-समारंभ.

,, ,, २१ 'हिंदी प्रांतांत आपलीं संस्थानें, प्रजेची तशी इच्छा असल्यास, विलीन करण्यास मान्यता आहे' असा ठराव मिरज येथें राजेलोकांनीं केला.

१९४८ जाने. १० श्रीमंत रायराजे, हैदराबाद, यांच्या पुणें येथील बंगल्याची वास्तुशांत.

,, ,, १८ मुंबई येथें हिंदी सरकारचे संस्थानी खात्याचे मंत्री सरदार वल्लभभाई पटेल यांनीं संघराज्यांत सामील झालेल्या दक्षिणेंतील राजेलोकांची भेट घेऊन विलिनीकरणाच्या प्रश्नावर वाटाघाट केली.

,, ,, २६ मिरज येथें घटनासमितीचे अध्यक्ष, श्री. कमलनयन बजाज, यांनीं बैठक भरवून संस्थानांच्या समितींत विलिनीकरणास अनुकूल असा ठराव पास केला.

,, ,, ३० दिल्ली येथें महात्मा गांधींचा खून.

,, फेब्रु. ६ श्रीमंत राजेसाहेबांनीं भोर संस्थानचा कायदा व सुव्यवस्था हीं खातीं ताब्यांत घेऊन गांधीवधामुळें झालेल्या दंगलीपासून

संस्थानचें संरक्षण करावें अशी मुंबई सरकारचे गृहमंत्री व दक्षिणेंतील संस्थानांचे कोल्हापूर येथील रीजनल कमिशनर यांना तारेनें विनंति केली.

१९४८ फेब्रु. ७ श्रीयुत सोनटक्के, ॲडिशनल डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, यांनीं भोर संस्थानचा कायदा व सुव्यवस्था खातें ताब्यांत घेतलें. दंगलींतील जळितामुळें निर्वासित झालेल्या लोकांना मदत देण्यासाठीं श्रीमंत राजेसाहेबांनीं रु. ८००० आठ हजार मंजूर केले.

,, ,, १२ कै. महात्मा गांधी यांना, भोर येथें सर्व नागरिकांची सभा होऊन, श्रद्धांजली अर्पण करण्यांत आली. श्रीमंतांकडून रु. १५००० पंधरा हजार महात्मा गांधींच्या स्मारक-निधीस व भोर संस्थानमधील स्मारकासाठीं रु. ५००० पांच हजार देण्यांत आले.

,, ,, १९ मुंबई येथें मुख्य प्रधान नामदार बाळासाहेब खेर यांच्या अध्यक्षतेखालीं विलिनीकरणास मान्यता असलेल्या संस्थानाधिपतींची बैठक, संस्थानांच्या अधिपतींनीं विलिनीकरणाच्या करारावर मान्यतेच्या सह्या केल्या व नंतर मुंबईचे गव्हर्नरसाहेब ह्यांनीं सर्व राजेलोकांस पार्टी दिली.

,, ,, २६ युवराजकुमारी श्रीमंत विमलाराजे यांचा श्री. बाबासाहेब लोकूर, एम्. ए., एल्एल्. बी., यांच्याबरोबर पुणें येथें विवाह झाला.

,, मार्च ६ श्रीमंत राजेसाहेब यांची ' वडेर हायस्कूल ' यास भेट व श्री. दादासाहेब साने यांच्या तैलचित्राचें अनावरण श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झालें.

वरील संस्थेस दरबारनें कॅश बॅलन्स रिझर्वमधून रु. १०,००० दहा हजार द्यावेत असा ठराव यापूर्वींच केला होता, तें जाहीर केलें.

१९४८ मार्च ६ पाली-सिद्धेश्वर रस्त्याचें उद्घाटन व सिद्धेश्वर येथें श्रीमंत राजेसाहेब यांचा सत्कार.

,, ,, ७ श्रीमंतांनीं विलिनीकरणास मान्यता दिल्याबद्दल व आजपर्यंतच्या त्यांच्या प्रगमनशील राज्यकारभाराबद्दल सुधागड तालुक्यातर्फे श्रीमंतांस मानपत्र व समाजसेवा संघ, पाली, या संस्थेचा रौप्य महोत्सव-समारंभ व श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें रा. चं. गो. आगाशे, रा. आबासाहेब आठवले व रावसाहेब रानडे यांच्या छायाचित्रांचें अनावरण.रु.१००० एक हजार समाजसेवा संघास देणगी जाहीर करण्यांत आली.

,, ,, ८ भोर येथें प्रत्यक्ष विलिनीकरणाचा कार्यक्रम : मे. बर्वे, आय. सी. एस्., पुण्याचे कलेक्टर, यांनीं वाड्यापुढें श्रीमंतांच्याबरोबर पोलीस व स्वार-शिबंदीची सलामी घेतली व राष्ट्रीय निशाण मे. बर्वे यांनीं उभारलें. नंतर मे. बर्वे यांनीं पंतप्रधान श्रीयुत बाळासाहेब खेर यांचा संदेश वाचून दाखविला. त्यानंतर श्रीमंत राजेसाहेब यांचें भाषण झालें. त्याच दिवशीं सायंकाळीं विलिनीकरणाबाबत मे. बर्वे यांच्या अध्यक्षतेखालीं सभा झाली. सदर सभेनें भोर संस्थान हिंदी संघराज्यांत सामील झालें; सबब भोर संस्थानच्या प्रजेचें हिंदी संघराज्याबद्दल निष्ठाप्रदर्शन व हि. हा. श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वार्थत्याग करून संस्थान हिंदी प्रांतांत विलीन करण्यास मान्यता दिल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेब यांचें अभिनंदन, असे दोन ठराव पास केले.

,, ,, ,, सुधागडचें विलिनीकरण: हिंद सरकारचे प्रतिनिधि मे. कॅप्टन साळवी यांनीं सुधागडचा चार्ज घेतला व सायंकाळीं सभा झाली. त्यांत संस्थानच्या राजवटीबद्दल आभार व कृतज्ञताप्रदर्शक व हिंदी संघराज्याशीं एकनिष्ठा व्यक्त करणारा ठराव पास झाला.

# परिशिष्ट ४३ वें.

## विलिनीकरणाच्या सुमारास श्रीमंत राजेसाहेबांच्या निकटवर्ती अधिकारी व कामगार यांची यादी.

१ रावसा० लक्ष्मण रघुनाथ साने, माजी दिवाण.

२ डॉ० भालचंद्र शंकर जोशी.

३ रा० विनायक सुबाराव पारखी.

४ रा० महादेव रामचंद्र पुरंदरे.

५ कै. रा० रघुनाथ केशव देशपांडे, दरबार वकील.

६ रा० त्रिंबकराव नारायण देशपांडे, मुखत्यार.

७ रा० रंगनाथ विश्वनाथ बीडकर, ना. हु. खा. कामगार.

८ वे. रा० मोरेश्वर शतानंद पारखी.

९ रा० काशीनाथ सदाशिव एकबोटे.

१० रा० अनंत नारायण वाकनीस.

———

# ( नवी ) प्रस्तावना

या चौथ्या खंडाच्या ३०० प्रती बांधून तयार झाल्यानंतर, कांहीं गोष्टी त्यांत लिहिण्याच्या राहून गेल्या, त्या लिहाव्यात व मागील इतिहासाशीं संबंध असलेल्या इतरही नव्या गोष्टी लिहाव्यात व तसेंच ता. १७ सप्टेंबर १९४९ इ. हा दिवस श्रीमंतांच्या ७२ व्या वाढदिवसाचा असल्यानें, तोंपर्यंतची हकीगत याच खंडांत लिहावी असें मला वाटल्यावरून, मीं श्रीमंतांना त्याविषयीं विचारिलें. त्याप्रमाणें परवानगी त्यांनीं दिल्यानंतर, ही पुढील हकीगत या चौथ्या खंडांत लिहिण्यांत येत आहे.

दि. १७।९।१९४९ इ. } **वि. गो. रानडे**

चित्रांक १.

भोर स्टेट बँकेच्या पुणें येथील शाखेचा उद्घाटनसमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांच्या हस्तें झाला.




पुढील रांग खुर्चीवरः डावीकडून उजवीकडे—श्रीयुत वाळिंबे, श्रीयुत न. भू. थोपटे, श्रीयुत शिंगरे, श्रीमंत राजसाहेब, श्रीयुत बावडेकर, श्रीयुत वा.-ग. रानडे व श्रीयुत लोणकर

मागील रांग उभेः डावीकडून उजवीकडे—( १ ) श्रीयुत चंदनमल शेट. ( २ ) श्रीयुत आगाशे, भोर स्टेट बँकेचे मॅनेजर

[ खं. ४ सं. पा. ३३२

# (नवी) अनुक्रमणिका

## — (नवी) चित्रानुक्रमणिका —

**चित्रांक २.**

हर हायनेस श्री. सौ. जिजीसाहेब मॅन्शन



( महात्मा गांधी याच्या कार्याच्या पुरस्कारार्थ मुंबई सरकारास श्रीमंतांनीं अर्पण केलेल्या रामबागेंतील तीन बंगल्यांपैकीं दुसरा म्हणजे जुना बंगला. ) न. प्र. सं. पा. ३

## श्रीशिवछत्रपतींच्या हिंदवी स्वराज्य-स्थापना-कल्पनेच्या त्रिशत-सांवत्सरिक

# स्मारक-स्तंभाचें उद्घाटन

ता. २६-३-१९४९

छत्रपति श्रीशिवाजीमहाराज यांच्या मनांत हिंदवी स्वराज्य-स्थापनेची कल्पना प्रादुर्भूत होऊन, तत्संबंधीं त्यांनीं श्रीरायरेश्वरासमोर आपल्या अनुयायांसह आणाभाका केल्या. या गोष्टीस सन १९४५ इ. सालीं तीनशें वर्षे झाल्यानें, त्या संकल्पाचा त्रिशत-सांवत्सरिक महोत्सव वरील वर्षाच्या मे महिन्यांत महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं साजरा केला गेला. भोरच्या परिसरांतील भूभाग हा शिवाजी-महाराजांच्या स्वराज्य-स्थापनेच्या कार्यांतील प्राथमिक प्रयत्नाचें व पराक्रमाचें ठिकाण असल्यानें, श्रीमंतांनींही त्या वेळच्या आपल्या संस्थानांतील नसरापूर-नजीकच्या बनेश्वर या निसर्गरम्य व पवित्र ठिकाणीं ता. २७ मे १९४५ इ. रोजीं तन्निमित्त मोठा उत्सव-समारंभ केला; व त्याचाच एक भाग म्हणून, नसरापूरपासून सुमारें एक मैलावर उत्तरेस व पुण्यापासून २२ मैल अंतरावर पुणें-बंगलोर रस्त्यालगत असलेल्या चेलाडी-नाक्याजवळच्या ठिकाणीं स्मारकस्तंभ उभारण्याचें ठरवून, त्याच दिवशीं श्रीमंतांनीं आपल्या हस्तें सदर स्तंभाच्या पायाची शिला बसविली. पुढें रु. २०००० वीस हजार खर्चून स्तंभाची उभारणी झाली, याची हकिगत मागें दिलेली आहे. खं. ४ पा. १५३. स्तंभाचें उद्घाटन मुंबई प्रांताचे पंतप्रधान नामदार बाळासाहेब खेर यांच्या हस्तें व्हावें, अशी श्रीमंतांची इच्छा होती. तो सुयोग शनिवार ता. २६ मार्च सन १९४९ इ. रोजीं जुळून आला. समारंभास त्या ठिकाणीं भोर व पुणें या ठिकाणची इतिहासप्रेमी प्रतिष्ठित मंडळी, तसेंच नसरापूर येथील व आसपासच्या प्रदेशांतील हजार दीड हजार मावळी शेतकरी लोक जमले होते. समारंभाकरितां मंडप उभारला होता. त्या ठिकाणीं श्रीमंतांसह नामदारसाहेब दुपारीं साडेपांच वाजतां आल्यावर, जमलेल्या मंडळींनीं त्यांचें स्वागत केलें. नामदार खेर व श्रीमंत राजेसाहेब स्थानापन्न झाल्यावर, श्रीमंतांनीं खालीलप्रमाणें भाषण केलें.

# श्रीमंतांचें भाषण

नामदार पंतप्रधान बाळासाहेब, उपस्थित निमंत्रित सुजन, तसेंच मत्प्रिय बांधवहो,

आज ह्या सुदिन-समारंभाचें वर्णन कसें करावें, हेंच मला कळत नाहीं. आमच्या विनंतीस मान देऊन आज आपले लोकप्रिय पंतप्रधान नामदार बाळासाहेब खेर आले व त्यांच्या शुभ हस्तें ह्या हिंदवी स्वराज्य-स्थापन-स्मारक-स्तंभाचें काम आतां पूर्ण झाल्याचें जाहीर करण्याचा हा सुयोग लाभला, याबद्दल प्रथम आम्ही त्यांचे हार्दिक आभार मानतों. नामदार खेर ह्यांना किती कामें आहेत, ह्याची आपणांपैकीं बहुतेकांस संपूर्णतया जाणीव आहेच. हल्लीं त्यांच्यामागें अदाजपत्रकाचें व विधिमंडळाच्या महत्त्वाच्या अधिवेशनाचें काम असतांही, त्यांनीं वेळांत वेळ काढून मुंबईहून येथें येण्याची जी तसदी व श्रेय घेतलें, त्याबद्दल आम्ही व्यक्तिशः त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. नामदार खेर ह्यांच्या अंगीं वसत असलेल्या– लोककार्यासाठीं सतत झीज सोसण्याच्या–गुणांमुळेंच त्यांनीं हें दगदगीचें काम पत्करलें असावें असें आम्हांस वाटतें. त्यांच्या ठायीं अभिजात असलेल्या विनय, विनम्रता, सौजन्य, लोकहिततत्परता, जाज्वल्य देशप्रीति, ऐतिहासिक उच्च परंपरेचा तीव्र अभिमान, ह्या व अशाच इतर विविध व अभिजात अशा गुणांच्या समुच्चयामुळें ते आज एका महत्त्वाच्या प्रांताचे पंतप्रधान झाले आहेत. आम्हांस माहीत आहे कीं, त्यांना गुणवर्णन म्हणजेच स्तुति वाटते; व स्तुति तर त्यांना आवडत नाहीं. पण, आम्ही जें वर थोडक्यांत वर्णन केलें, तें केवळ त्यांच्या ठिकाणीं वसत असलेल्या उत्कट सहिष्णुतेच्या गुणावर विसंबूनच.

ह्या स्तंभाच्या बांधणीचा आरंभ जरी आपला देश परसत्तेखालीं असतांना झाला, तरी योगायोग असा कीं, त्या कामाची परिपूर्णता मात्र देशाला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यावर होत आहे. जणूं हिंदवी स्वराज्य-स्मारकस्तंभाला परतंत्र हवेंत सतत राहणें मानवणार नसल्यानेंच, हिंदवी स्वातंत्र्य प्राप्त झालें. ह्या प्रसंगीं आपल्या मातृभूमीला ज्या थोर विभूतीमुळें—म्हणजे पूज्य महात्मा गांधीजींमुळें—

स्वातंत्र्य लाभलें, त्याची आठवण झाल्याविना राहत नाहीं. महात्मा गांधी म्हणजे सत्य, अहिंसा, त्याग व जाज्वल्य देशप्रेम, ह्यांची मूर्तिच होय. त्यांनीं आपल्या अतुल स्वार्थत्याग, चिकाटी व कार्यकौशल्य ह्या गुणांच्या योगें बलाढ्य अशा परकीयांपासून निःशस्त्र देशाला स्वातंत्र्याचा लाभ करून दिला. आपल्या पूर्वजांनीं आपली मायभू जशी मोगलांपासून सोडविली, तसेंच ह्या महात्म्यानें ब्रिटिश सत्तेपासून स्वातंत्र्य मिळविलें. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर महात्माजींचें अस्तित्व अत्यंत जरूर होतें; पण, ईश्वरी इच्छा निराळीच असल्यानें, त्यांच्या कुशल मार्ग-दर्शनाला आपण सर्व पारखे झालों आहोंत. महात्माजी अमर आहेत. शिव-रायांच्या वेळीं जसे त्यांचे खंदे सहकारी होते, तसेंच महात्माजींना हिंदुस्थानचे पंतप्रधान पंडित जवाहिरलाल, सरदार वल्लभभाई पटेल, आजचे आमचे सन्मान्य पंतप्रधान बाळासाहेब, यांच्यासारखे धीरवीर व त्यागी सेनानी लाभले व त्या-मुळेंच ही स्वातंत्र्याची घटना घडून आली, यांत शंका नाहीं.

शेवटीं, एका महत्त्वपूर्ण घटनेचा आम्हांस उल्लेख करावासा वाटतो. तो हा कीं, गेल्या वर्षी मार्च महिन्यांत आमचें भोर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें व अशा तऱ्हेनें संस्थानचें स्वतंत्र अस्तित्व राहिलें नसलें, तरी तें आपल्या या विशाल व स्वतंत्र देशाचा एक भाग झाल्याचें पाहून आम्हांस एक प्रकारें समाधान वाटत आहे. एकंदर देशाच्या आत्यंतिक हितासाठीं वैयक्तिक स्वार्थ-त्याग करण्यास केव्हांही तयार असलेंच पाहिजे. आम्हांस आशा आहे कीं, एकजिनसी झालेल्या ह्या प्रदेशाला व त्यांतील लोकांना स्वातंत्र्याचें पूर्ण सुख प्रभू श्रीराम-कृपेनें लाभून त्यांची भरभराट होईल.

भोर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झाल्यानें, पूर्वीच्या ह्या संस्थानांतील लोकांना उपयोगी व्हावें ह्या हेतूनें, आम्ही, आजच्या ह्या सुप्रसंगाचा फायदा घेऊन, मोठ्या आनंदानें असें जाहीर करतों कीं, भोर येथील रामबागेंतील हि. हा. शंकरराव मॅन्शन्स, (खं. ४ पा. ९६) जुना बंगला ( हर हायनेस श्री. सौ. जिजीसाहेब मॅन्शन) न. प्र. सं. पानें अनुक्रमें न ३ व न ४ व तिसरा बंगला—ज्या तिन्ही इमारतींची अंदाजी किंमत दोन लाख रुपये आहे—पूज्य महात्मा गांधी ह्यांचें कार्य पुढें चालविण्यासाठीं अगर तत्सम लोकोपयोगी सार्वजनिक कामासाठीं मुंबई सरकारच्या ताब्यांत देत आहोंत. त्यांचा उपयोग कसा व कोणत्या विशिष्ट

कामासाठीं करावयाचा, हें नामदार खेर व मुंबई सरकार यांनीं ठरवावयाचें आहे. आमच्या या देणगीचा उपयोग ह्या प्रदेशांतील लोकांना होवो व ह्यामुळें त्यांना लोकोपयोगी कामें करण्यास निरंतर उत्तेजन मिळो, एवढीच आम्ही प्रभू श्री रामचंद्राजवळ प्रार्थना करतों.

ह्या स्मारकस्तंभाचें उद्घाटन आजच्या आपल्या सन्मान्य मुख्य प्रधानांच्या हस्तें व्हावें अशी आमची फार दिवसांची इच्छा होती; व ती आज ईशकृपेनें पुरी होत आहे, हें पाहून आम्हांस अत्यंत बरें वाटत आहे.

आतां, शेवटीं, नामदार खेर यांना, स्तंभाचें काम पूर्ण झाल्यानें, त्याचें उद्घाटन करून तो सर्वांना खुला झाल्याचें जाहीर करण्याबद्दल व (Here came Swarajya) ' स्वराज्याचें आगमन ' हें स्तंभाचें (Guide Book) ' मार्गदर्शक पुस्तक ' प्रसिद्ध करण्याबद्दल विनंति करतों; व आपणां सर्वांचे, तसेंच सन्मान्य नामदार पंतप्रधान खेर ह्यांचे, पुन्हा एकदां मनःपूर्वक आभार मानून आम्ही आमचें भाषण संपवितों.

वरीलप्रमाणें श्रीमंतांचें भाषण झाल्यावर, नामदार बाळासाहेब यांनीं, श्रीमंतांसमवेत स्मारक-स्तंभाकडे जाऊन, त्याच्या तळाशीं जोत्यावर बसविलेल्या फलकाचें अनावरण करून सुमारें ६ वाजतां स्तंभाचें उद्घाटन केल्याचें जाहीर केलें. नंतर, श्रीमंतांनीं नामदार खेर यांना जरीचा हार घालून पुष्पगुच्छ अर्पण केला. त्या ठिकाणीं श्रीमंतांसह नामदारसाहेबांचें छायाचित्र घेण्यांत आल्यावर, नामदारसाहेब पुन्हा मंडपांत आले व त्यांनीं खालील आशयाचें भाषण केलें.

## नामदार बाळासाहेब खेर यांचें भाषण

सभ्य स्त्री-पुरुष व शेतकरी मावळे बंधुजन हो,

आजच्या समारंभाचें अध्यक्षस्थान मला देऊन आजचा हा उद्घाटन-समारंभ माझ्या हस्तें घडवून आणल्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांचे मी प्रथम अंतःकरणपूर्वक आभार मानतों. श्रीमंतांनीं आपली ही इच्छा मला ३-४ महिन्यांपूर्वी कळविली होती; पण, त्या वेळीं मला वेळ नव्हता, म्हणून इकडे येतां आलें नाहीं. तथापि, त्यासंबंधीं बरेच दिवस राहून गेलेलें हें आनंदाचें व महत्त्वाचें काम एकदां उरकलें जावें असें मलाही वाटत असल्यानें, मीं या संधीचा फायदा

घेतला व या निमित्तानें, आपणां सर्वांच्या भेटीचा लाभही झाला. श्रीशिव-छत्रपतींच्या हिंदवी स्वराज्याच्या संकल्पाचें स्मारक म्हणून, मोठा खर्च करून, श्रीमंतांनीं हा स्तंभ उभारण्यांत मोठेंच ऐतिहासिक कार्य केलें आहे; व त्याबद्दल श्रीमंतांचें मी मनःपूर्वक आनंदानें अभिनंदन करतों. स्तंभ आपणांस दिसतच आहे. त्याची रचना तर उत्तमच असून, या ठिकाणापासून शिवचरित्राशीं निकट संबंध असलेलीं प्रसिद्ध ऐतिहासिक स्थानें, म्हणजे रायरेश्वर, राजगड, तोरणा, पुरंदर, सिंहगड, पुणें, इत्यादि महत्त्वाचीं ठिकाणें, कोणत्या दिशेला व किती अंतरावर आहेत, तेंही त्यावर स्पष्ट दाखविलें आहे, हें विशेष आहे.

तो स्तंभ सव्वासत्तावीस फूट उंचीचा, पायाशीं चौकोनी, मध्यें अष्टकोनी, त्याच्यावर गोलाकृति व शेवटीं कलशनारिकेलयुक्त, अशा स्वरूपाचा आहे. स्तंभावरील चौरसाच्या चारी बाजूंस शिवकालीन आयुधें, हिंदवी स्वराज्य-शपथ व शिवछत्रपतींचें शिक्का मोर्तब यांचे शिलापट्ट असून, अष्टकोनी भागाच्यापुढें आलेल्या मेहेरपींत चार भाषांत स्तंभाचें वैशिष्ट्य लेखनिविष्ट केलें आहे.

श्रीमंतांचें घराणें शिवछत्रपतींच्या अष्टप्रधानमंडळांत तिसऱ्या स्थानाचें आहे. अष्टप्रधानांत प्रथम तीन पंत होते. पंतप्रधान, पंत अमात्य व पंतसचिव, हे ते तीन होत. पंत प्रतिनिधि हें पद मागाहून त्यांत आलें. यावरून, अष्ट-प्रधानमंडळांत सचिवपद ह्या स्थानाची महती आपणांस कळून येणार आहे. हें पद मिळविणाऱ्या हल्लींच्या सचिव घराण्याचे मूळ पुरुष शंकराजी नारायण यांनीं छत्रपति राजाराममहाराजांच्या वेळीं स्वराज्य-रक्षणाच्या कामीं केलेले प्रयत्न व दाखविलेलें शौर्य, हीं त्यांच्या स्वामिनिष्ठेची तर निदर्शक आहेतच; पण, विशेष हें कीं, आपल्या शब्दाच्या, म्हणजेच सत्याच्या परिपालनाकरितां-म्हणजे, ताराबाई यांस त्यांच्या बाजूनें लढूं असें वचन दिलें असल्यामुळें त्यांच्या बाजूला लढणें योग्य असतांना, शाहूमहाराज हे खरे वारस असून राज्याकरितां दक्षिणेंत आले असतां त्यांच्या विरुद्ध लढणें हेंही योग्य नसल्यामुळें—शंकराजी नारायण यांनीं सन्यासाश्रम स्वीकारला, ही इतिहासांत चिरस्मरणीय अशीच गोष्ट आहे. त्यांच्या या कृत्यावरून माझ्या मनांत अगदीं अलीकडील एक गोष्ट येत आहे. सचिव गादीच्या संस्थापकांनीं जी स्वार्थनिरपेक्षता प्रकट केली, त्याच प्रकारची स्वार्थत्यागाची वृत्ति, हिंदुस्थानचें संघटन व सामर्थ्य वाढावें म्हणून, त्यांच्या

वंशजांनीं, म्हणजेच श्रीमंत राजेसाहेब यांनीं, आपलें संस्थान मुंबई प्रांतांत समाविष्ट करण्याच्या बाबतींत आनंदानें सत्वर मान्यता देण्यांत दर्शविली; हीच ती गोष्ट होय. याबद्दल मीं पूर्वीं त्यांचें अभिनंदन केलेंच आहे; व आज पुन्हां त्याचा उच्चार करण्यास मला आनंद वाटत आहे.

इतकेंच नव्हे, तर आज आणखी एका गोष्टीबद्दल मला त्यांचें विशेष अभिनंदन करणें जरूर वाटत आहे. त्यांनीं आपल्या भाषणांत महात्मा गांधींच्या कार्याच्या पुरस्कारास्तव अथवा तत्सम अन्य कार्याकरितां उपयोगी पडावें, म्हणून रामबागेंतील आपले हिज हायनेस शंकरराव मॅन्शन्स या नांवाचे, जुन्या व नव्या बंगल्यांसह, असे तीन बंगले मुंबई सरकारास देऊं केले आहेत. वास्तविक, सामिलनाम्याच्या करारांत अशा प्रकारचें कोणतेंही बंधन त्यांच्यावर नव्हतें व नाहीं. अशा स्थितींत त्यांनीं आपण होऊन स्वेच्छेनें जी ही देणगी महात्माजींच्या कार्याप्रीत्यर्थ दिली आहे, ती खरोखरच कौतुकावह आहे; व म्हणूनच, मी जाहीरपणें या देणगीबद्दल त्यांचें विशेष रीतीनें हार्दिक अभिनंदन करतों.

सभ्य स्त्रीपुरुषहो, ज्या स्मारक-स्तंभाच्या उद्घाटनानिमित्त आपण या ठिकाणीं जमलों आहोंत, तो शिवछत्रपतींचा काळ व हल्लींचा काळ, यांच्या दरम्यान तीनशें वर्षें लोटलीं आहेत. या कालांत केवढ्या मोठया घडामोडी झाल्या, कसलीं अभ्युतरम्य स्थित्यंतरें घडून आलीं व कादंबरींतील कल्पनेलाही मागें टाकणाऱ्या घटना किती अल्प काळांत सत्यसृष्टींत अवतीर्ण झाल्या, ह्यांचा विचार केल्यास, मन आश्चर्यचकित होतें. काळ हाच क्रांति घडवून आणतो. क्रांति हेंच जगाचें लक्षण आहे व क्रांति हाच जगाच्या उत्क्रांतीचा, मानवी सुधारणेचा व सुखाचा साधनमार्ग आहे. ब्राह्मणांचा काल गेला; नंतरचें क्षात्रयुगही समाप्त झालें; व आतांची वैश्यशाही जाऊन, यापुढें शेतकरी, कामकरी, वगैरे दलित वर्गाची लोकशाही येणार, हें कालाच्या घटनेचें चक्र निश्चित आहे. उत्क्रांतीचें साध्य एकच असलें, तरी कालमानाप्रमाणें साधनांत बद्दल असणार व होणार. आपणांस जी क्रांति घडवून आणावयाची आहे, ती गोष्ट शांततेच्या एकमेव मार्गानें मिळवावयाची आहे; अत्याचाराच्या मार्गानें ती मिळवावयाची नाहीं. शिवाजी महाराज व महात्मा गांधी यांचें ध्येय एकच होतें. दोघांनाही स्वराज्य पाहिजे होतें. दोघांची स्थिति साधनसामुग्रीच्या बाबतींत समान होती. कोठें शिवाजीचें तुटपुंजें बळ व कोठें दिल्लीपतीचा प्रचंड प्रभाव !

कोणीकडे वैश्यकुळांत जन्मलेले, दुर्बल शरीराचे व निष्कांचन गांधी व कोणी-कडे ब्रिटिशांचें अलोट सामर्थ्य व बडेजाव ! ऐहिक साधनें याप्रमाणें दोघांच्याही जवळ नसलीं, तरी छत्रपति शिवाजी व महात्मा गांधी या दोघांच्या ठिकाणीं हेतूची शुद्धता व ध्येयासंबंधीं निःसीम निष्ठा, हीं मात्र खरोखरीच सारखींच होतीं; व त्यांच्याच बळावर दोघांनींही आपलें साध्य आपल्या हयातींतच मिळविलें. कालमानाप्रमाणें दोघांच्या साधनांत भिन्नता होती व असणारच. सत्य व अहिंसा यांच्या जोरावर दुर्बल मनुष्य बलवान् प्रतिपक्षासमुद्धां जिंकू शकतो. नरक व विनाश यांकडे नेणाऱ्या द्वेषाच्या व अत्याचाराच्या मार्गानें जी कधींही साध्य झाली नसती, ती गोष्ट, म्हणजे इंग्रज राज्यकर्त्यांकडून देशाचें स्वातंत्र्य प्राप्त, करून घेणें, ही प्रेमाच्या व शांततेच्या मार्गानें जाऊन अल्पकाळांत घडवून आणतां येते, हें महात्माजींनीं दाखवून दिलें आहे; व आज आतांच आपण ज्याचें उद्घाटन केलें, तो स्मारकस्तंभ चालू व भावी पिढयांच्या लोकांना सुख शांति व आनंद यांप्रत नेणाऱ्या या प्रेमाच्या मार्गाचा दर्शक होवो, असें मी इच्छितों. शेवटीं, या स्तंभाचें गाइड बुक, 'हियर केम स्वराज्य' हें प्रसिद्ध केल्याचें मी जाहीर करतों.

याप्रमाणें नामदारसाहेबांचें भाषण झाल्यावर, 'वंदे-मातरम्' हें राष्ट्रगीत होऊन समारंभ आटोपला. नंतर, नामदारसाहेब व श्रीमंत राजेसाहेब वगैरे मंडळी पुण्याकडे जाण्यास सायंकाळीं सुमारें ७-३० वाजतां निघाली.

या समारंभाच्या कार्यक्रमांतीलच एक भाग म्हणून, त्याच दिवशीं रात्रीं सुमारें नऊ वाजतां श्रीमंतांनीं आपल्या लक्ष्मीविलास बंगल्यांत नामदारसाहेबांना मोठया थाटाचें भोजन दिलें. त्या वेळीं मिस्टर व मिसेस् बर्वे, मिस्टर व मिसेस् यार्दी, श्रीमंत राजेसाहेब व राणीसाहेब, फलटण, कुरुंदवाड सीनिअरचे श्रीमंत राजेसाहेब व राणीसाहेब, पुण्याचे डॉ. लागू, श्रीयुत दादासाहेब कुमठेकर वगैरे निमंत्रित मंडळी उपस्थित होती.

## ने. ना. महाराजसिंग, गव्हर्नर, यांच्या हस्तें बक्षीस-समारंभ

ता. १३।१।४९ दादर, मुंबई, येथें जनरल एज्युकेशन सोसायटीच्या मुलींच्या शाळेचा बक्षीस-समारंभ नेक नामदार राजा सर महाराजसिंग, गव्हर्नर साहेब, मुंबई, यांच्या अध्यक्षतेखालीं सायंकाळीं ५-३० वाजतां झाला. त्यास श्रीमंतांची स्वारी गेली होती. नेक नामदारसाहेब यांच्याबरोबर त्यांची बहीण,

राजकुमारी अमृत कुवर, हेल्थ मिनिस्टर, दिल्ली, ह्या आल्या होत्या. प्रथम सर्वांचें छायाचित्र घेण्यांत आलें. नंतर, ते स्थानापन्न झाल्यावर, ईशस्तवन, स्वागतपर गीत व इतर विविध करमणुकीचे कार्यक्रम झाले. नंतर, श्रीमंत राजेसाहेब यांनीं सोसायटीचे अध्यक्ष या नात्यानें प्रास्ताविक भाषण केलें. नंतर, मि. अक्षीकर यांनीं आलेले संदेश वाचून दाखविले व अहवालाचें वाचन मिसेस् ताराबाई यांनीं केलें. नंतर, नेक नामदारसाहेब यांचें अध्यक्षीय भाषण झाल्यावर, श्रीमती राजकुमारी अमृत कुवर यांच्या हस्तें बक्षिसें देण्यांत आलीं. आभार-प्रदर्शक भाषण मि. अक्षीकर यांनीं केलें, त्यांत श्रीमंत राजेसाहेब यांनीं रु. १००० एक हजार रुपये देणगी शाळेस दिल्याचें त्यांनीं जाहीर केलें. नंतर, राष्ट्रगीत होऊन समारंभ समाप्त झाला.

## ने. ना. महाराजसिंग, गव्हर्नर, यांची पुणें, महाराष्ट्र व्यायाम-मंडळास भेट

नेक नामदार गव्हर्नरसाहेब यांनीं पुणें, महाराष्ट्र व्यायाम-मंडळ, या संस्थेस ता. २१।७।४९ इ. रोजीं भेट दिली. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं संस्थेचे अध्यक्ष म्हणून त्यांचें स्वागत केलें, व श्री. आर. बी. फडके, चेअरमन, ह्यांची नेक नामदारसाहेबांस ओळख करून दिली. पुढें, छायाचित्र घेण्यांत आल्यावर, निरनिराळ्या प्रकारचे व्यायामाचे खेळ दाखविण्यांत आले. नंतर, श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वागतपर भाषण केलें व आर. बी. फडके यांनीं अहवाल वाचून दाखविला. त्यानंतर ने. ना. गव्हर्नरसाहेब यांनीं भाषण केलें व संस्थेला स्वतःची दोनशें रुपये देणगी दिल्याचें जाहीर केलें. संस्थेचे सेक्रेटरी श्री. आठवले यांनीं इतर लोकांच्या देणग्या वाचून दाखविल्यावर, सरदार श्रीमंत जगन्नाथ महाराज पंडित यांनीं आभारप्रदर्शक भाषण केलें. शेवटीं, मंडळाचें प्रार्थनागीत होऊन समारंभ समाप्त झाला.

चित्रांक ३.

रामबागेंतील नवा लहान बंगला



( महात्मा गांधी यांच्या कार्याच्या पुरस्कारार्थ मुंबई सरकारास श्रीमंतांनीं अर्पण केलेल्या तीन बंगल्यांपैकीं तिसरा, हि. हा. श्री. शंकरराव मॅन्शन्सच्या पश्चिमेस असलेला हा आहे. ) न. प्र. सं. पा. ४

# किरकोळ भेटी, समारंभ, वगैरे

ता. २६।७।४९ इ. रोजीं नेक नामदार गव्हर्नरसाहेब व राणी महाराजसिंग यांना श्रीमंत राजेसाहेबांनीं पुणें येथें लक्ष्मीविलास बंगल्यांत लंचला (दुपारचे भोजनास) बोलाविलें होतें. भोजनोत्तर हारतुरे समर्पण केल्यावर, सर्वांचें एकत्र छायाचित्र घेण्यांत आलें.

ता. ८।१।४९ इ. रोजीं सकाळीं ११-४५ वाजतां श्रीमंत राजेसाहेब हे पुणें, पर्ण-कुटीवर ( लेडी ठाकरसी यांचा पुणें येरवडा-टेकडीवरील बंगला ) नेक नामदार श्रीयुत चक्रवर्ती राजगोपाळाचार्य, गव्हर्नर-जनरल, इंडिया, ह्यांस भेटण्यास गेले होते.

त्याच दिवशीं दुपारीं ३ वाजतां टिळक रोडवर मराठा चेंबर ऑफ कॉमर्सतर्फे केलेल्या नेक नामदार गव्हर्नर-जनरल यांच्या स्वागत-समारंभास श्रीमंतांची स्वारी गेली होती.

ता. २३।४।४९ इ. रोजीं सकाळीं ११ वाजतां कौन्सिल हॉल, मुंबई, येथें दक्षिणेंतील संस्थानिकांची परिषद होती. त्याकरितां Mr. V. P. Menon, Adviser to the States Ministry, Government of India व जॉईंट सेक्रेटरी Mr. N. M. Buch हे येणार होते. त्या परिषदेकरितां श्रीमंत राजेसाहेब मुंबईस गेले होते. सभेच्या सुरुवातीस मि. मेनन यांनीं सर्व संस्थानिकांना उद्देशून थोडेसें भाषण केलें व एका खोलींत पृथक् पृथक् एक एक संस्थानिकास त्यांनीं बोलाविलें. त्याप्रमाणें श्रीमंत राजेसाहेब यांना बोलाविलें होतें. त्यांचेबरोबर रावसाहेब साने हेही गेले होते. मि. मेनन यांनीं ज्या वेळीं संस्थानिकांना भेटावयास बोलाविलें, त्या वेळीं नामदार मुरारजी देसाई, Revenue Minister, Government of Bombay, Mr. N. M. Buch, Joint Secretary, States Ministry, Mr. M. D. Bhat, Chief Secretary to the Government of Bombay, हेही खोलींत हजर होते.

ता. २४।४।४९ इ. रोजीं मुंबई येथें सायंकाळीं ५ वाजतां कौन्सिल-हॉलमध्यें पंतप्रधान नामदार खेर व मिसेस् खेर यांनीं जनरल के. एम्. करिअप्पा, कमांडर-इन्-चीफ, यांना गार्डन पार्टी दिली, त्यास श्रीमंतांची स्वारी गेली होती. बरोबर डॉ. जोशी हे होते.

ता. ६।५।४९ इ. रोजीं दुपारीं २ वाजतां श्रीमंतांची स्वारी पुणें वाड्यांत श्रीमंत सौ. विमलादेवी यांच्या मुलीच्या बारशानिमित्त गेली होती. सदरहू सुप्रसंगीं न्यायमूर्ति लोकूर, मिसेस् लोकूर, श्री. बाळासाहेब लोकूर, सरदार बापूसाहेब विंचूरकर, सरदार पुरंदरे, वगैरे मंडळी उपस्थित होती. मुलीला पाळण्यांत घालून छायाचित्र घेण्यांत आलें; व तिचें नांव 'ज्ञानदेवी' व टोपण नांव 'गीता' असें ठेवण्यांत आलें.

ता. ३०।६।४९ इ. रोजीं श्रीमंत राजेसाहेब हे नेक नामदार गव्हर्नर-साहेब व राणी महाराजसिंग यांस भेटण्यास पुणें गव्हर्मेंट हाऊस येथें गेले होते.

नेक नामदार गव्हर्नरसाहेब हे परत-भेट म्हणून श्रीमंत राजेसाहेब यांजकडे पुणें बंगल्यावर ता. २।७।४९ इ. रोजीं आले होते.

श्रीमंत राजेसाहेब यांनीं A Short History of the Bhor State हें पुस्तक नेक नामदारसाहेब यांजकडे नंतर पाठवून दिलें होतें. त्याचें उत्तर त्यांच्याकडून ता. १३।७।४९ रोजीं खालीलप्रमाणें आलें.

( Governor of Bombay. )

Government House,
Ganeshkhind.
Poona. 3.
July 13, 1949.

My Dear Raja Saheb,

Many thanks for your letter dated yesterday. It is very good of Your Highness to send to me "A SHORT HISTORY OF THE BHOR STATE." I shall read it with interest and pleasure and in happy recollection of the State's able, cultured and widely travelled Ruler.

With renewed thanks and every good wish,

Yours sincerely,
Mahāraj Singh.

His Highness
The Raja Sahib of Bhor.

ता. २१।७।४९ रोजीं श्रीमंत राजेसाहेब, हे श्रीमंत रावसाहेब यांच्या-सह, गव्हर्मेंट हाऊस, पुणें, येथें ने. ना. गव्हर्नरसाहेब यांजकडे लंचला ( दुपारचें भोजन ) गेले होते.

सोमवार ता. १५-८-४९ रोजीं सकाळीं ८-२० वाजतां मे. व्यास, कमिशनर, मध्यभाग, पुणें, यांच्या ऑफिसांत स्वातंत्र्य-दिनानिमित्त Flag Hoisting चा समारंभ झाला, त्यास, तसेंच, त्यानंतर भांबुर्डा पोलीस हेड-कार्टर्सवर पोलीस व होमगार्डस् यांची परेड झाली, त्यासही श्रीमंत राजेसाहेब गेले होते. दुपारीं ४-३० वाजतां मे. कमिशनरसाहेब यांच्या बंगल्यात स्वातंत्र्य-दिनानिमित्त ( At Home ) पार्टी होती, त्यासही श्रीमंताची स्वारी गेली होती.

मिस्टर व्यास, कमिशनर, मध्यभाग, मुंबई प्रांत, हे शनिवार ता. २०।८।४९ इ. रोजीं श्रीमंताकडे लक्ष्मी विलास बंगल्यांत सपत्नीक दुपारच्या भोजनास आले होते.

## पुणें विद्यापीठाचा पहिला पदवीदान-समारंभ

कुलपति ने. ना. राजा महाराजसिंग, मुंबईचे गव्हर्नर, यांच्या हस्तें सोमवार ता. २२-८-४९ इ. रोजीं विद्यापीठाच्या सभागृहांत दुपारीं ४ वाजतां झाला. त्यास हि. हा. श्री. राजेसाहेब गेले होते.

श्रीयुत एल्. एम्. नाडकर्णी, मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांचे प्रायव्हेट सेक्रेटरी, व मिसेस नाडकर्णी हे सोमवार ता. ५।९।४९ इ. रोजीं दुपारीं श्रीमंताकडे लक्ष्मी-विलास बंगल्यांत भोजनास आले होते.

नामदार श्रीयुत जी. व्ही. मावळंकर, स्पीकर, इंडिअन डोमिनिअन पार्लमेंट, व त्यांचे स्नेही श्रीयुत मेथा हे सोमवार ता. १२।९।४९ इ. रोजीं श्री. राजेसाहेब यांच्याकडे लक्ष्मी-विलास बंगल्यांत दुपारीं भोजनास आले होते. भोजनोत्तर पानसुपारी वगैरे झाल्यावर श्रीमंतासमवेत नामदारसाहेब यांचें छाया-चित्र घेण्यांत आलें.

# दुःखदायक गोष्टी

## ( १ ) श्रीयुत श्रीपाद केशव भिडे यांचें निधन

श्रीयुत श्रीपाद केशव भिडे, बी. ए., हे आपल्या वयाच्या ७६ व्या वर्षी ता. २९ मार्च १९४७ इ. रोजीं निधन पावले. तें ऐकून श्रीमंत राजेसाहेबांना फार वाईट वाटलें. मरणापूर्वी सुमारें दोन वर्षें अर्धांगवायूच्या विकारानें ते आजारी होते. ह्या आजारांत श्रीमंत राजेसाहेब हे मधून मधून त्यांच्या समाचारास जात होते व त्यांना आर्थिक मदतही करीत होते.

स. १८९४ इ. सालीं भोर शाळेमध्यें शिक्षक म्हणून हल्लींच्या श्रीमंतांच्या वडिलांनीं त्यांची प्रथम नेमणूक केली. पुढें त्यांच्याच कारकीर्दींत श्रीयुत भिडे हे हेडमास्तर झाले. नंतर, श्रीमंतांकडे त्यांची खाजगी शिक्षक म्हणून नेमणूक करण्यांत येऊन, त्यांना पुण्यास पाठविण्यांत आलें. त्या वेळीं श्रीमंत हे मॅट्रिकच्या क्लासांत होते. श्रीमंतांनीं स्वतंत्र तनखा करून घेतल्यानंतर, कै. भिडे हे प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून त्यांचें काम करूं लागले व श्रीमंत भाऊ-साहेब यांसही शिकवूं लागले. श्रीमंत गादीवर आल्यानंतर श्रीमंतांचीं मुलें श्रीमंत राजकुमार बापूसाहेब, श्रीमंत राजकुमार रावसाहेब व श्रीमंत सौ. पद्मा-वती राजे ह्यांसही ते, आजारी पडेतोंपर्यंत, शिकवीत होते; व ते हुजूर कामगार या हुद्याचे कामही करीत होते. त्यांची शिकविण्याची पद्धत उत्तम प्रकारची असल्यामुळें, विद्यार्थी पास होत व त्यांच्या मनांत कै. भिडे यांच्या संबंधानें कायमची सद्भावना वसत असे. त्यांचा स्वभाव निर्गर्वी, संतोषी व आनंदी असे. श्रीमंतांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास व मर्जी असून, ते त्यांना 'गुरुजी' ह्या नात्यानें मान देऊन वागवीत असत.

## ( २ ) श्रीयुत रघुनाथ केशव देशपांडे, दरबार वकील, पुणें, यांचें निधन

श्रीयुत रघुनाथ केशव देशपांडे, पुणें दरबार वकील, हे ता. १ एप्रिल सन १९४८ इ. रोजीं कैलासवासी झाले, हें ऐकून श्रीमंत राजेसाहेब यांना दुःख झालें. त्या वेळीं त्यांचें वय ६५ वर्षांचें होतें. रघुनाथराव हे स. १९०३ इ. मध्यें तालुके नसरापूर येथील मामलेदार कचेरींत कारकून म्हणून नेमले गेले. तेथून स. १९०५ इ.च्या सुमारास पुणें येथील कचेरींत त्यांची बदली

करण्यांत आली. श्रीमंत राजेसाहेब यांच्या वडिलांनीं पुणें वकीलाच्या हुद्यावर, कै. रा. वासुदेवरावजी दसपुत्रे यांच्यानंतर, त्यांची नेमणूक केली. त्याच हुद्याचें रूपांतर ' दरबार वकील, पुणें ' असें करण्यांत येऊन, त्या जागेवर रघुनाथरावजी यांची नेमणूक श्रीमंत राजेसाहेब यांनीं स. १९२२ इ. सालीं आपण गादीवर आल्यावर केली; व तेव्हांपासून पेन्शन घेईपर्यंत ते या जागेवर होते. ब्रिटिश सरकारकडे लिहून त्यांस थर्डक्लास ( तिसरा वर्ग ) सरदार म्हणून नेमण्यांत आलें व त्या जागेवरही ते पेन्शन घेईपर्यंत होते. सरदार असल्यामुळें, त्यांस हत्यारें परवान्याशिवाय बाळगण्याचा अधिकार होता. श्रीमंतांनीं त्यांस इतरांच्या बरोबर संस्थानचें मेडल ( पदक ) देऊन त्यांचा दरबारांत गौरव केला. त्याचप्रमाणें श्रीमंतांच्या शिफारशीवरून बादशहाचे रौप्यजुबिलीचे वेळीं ने. ना. व्हाइसरॉयसाहेब यांचेकडूनही रघुनाथराव यांस बहुमानाचें मेडल देण्यांत आलें होतें. रघुनाथरावजी हे ता. १।१२।४७ इ.पासून सेवानिवृत्त झाले व त्यांस पेन्शन देण्यांत आलें. श्रीमंतांनीं वेळोवेळीं सांगितलेलीं महत्त्वाचीं खाजगी, सरकारी व इतर कामें त्यांनीं श्रीमंतांचें पूर्ण समाधान होईल अशा प्रकारें बजाविलीं; इतकेंच नव्हे, तर श्रीमंतांकडून विचारण्यांत आल्यावेळीं ते आपला सल्ला ( Advice ) निर्भीडपणें देत असत. अशा प्रकारें श्रीमंतांची व संस्थानची नोकरी त्यांनीं इमानेइतबारें व एकनिष्ठपणें शेवटपर्यंत केली.

---

# एकंदर सार्वजनिक देणग्यांची एकूण बेरीज

| | | |
|---|---|---|
| श्रीमंत राजेसाहेब यांस स्वतंत्र नेमणूक झाल्यापासून म्हणजे सन १९०४ इ.पासून, ते गादीवर येईतोंपर्यंत, म्हणजे स. १९२२ पर्यंत, खंड १, संदर्भ पान २३४ | रु. | ७,३८४ |
| सन १९२२ इ. सालापासून सन १९३९ पर्यंत खंड ३, संदर्भ पान ९४३ | रु. | २,१४,१०० |
| सन १९३९ इ. सालापासून सन १९४९ अखेर खंड ४ था, संदर्भ परिशिष्ट ४२ | रु. | १,७४,४०३ |
| | रु. | ३,९५,८८७ |
| त्यानंतर ता. १७ सप्टेंबर सन १९४९ पर्यंत मुंबई, दादर, जनरल एज्युकेशन सोसायटी | रु. | १,००० |
| वे. शा. सं. भातखंडे गुरुजी-सत्कार, पुणें वेदपाठशाळा | रु. | १०० |
| ले. क. साठे यांनीं Forces Welfare Week Fund चालू केला होता, त्यास | रु. | १०० |
| मुंबई मराठी साहित्य संघ व पुणें विद्यापीठ फाईन आर्टस फॅकल्टी यांचे मदतीकरतां सुरू असलेल्या ' नवनाटय हार ' यांस | रु. | ३०० |
| | | ३,९७,३८७ |

किरकोळ देणग्या लिहिण्यांत आलेल्या नाहींत, त्या धरून एकंदर देणग्यांची बेरीज रुपये अदमासे ४,००,००० चार लाखांपर्यंत झाली आहे. या देणग्यांपैकीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं बऱ्याचशा आपल्या खाजगी रकमेंतून दिल्या आहेत.

चित्रांक ४.



... महाराज यांच्या हिंदवी स्वराज्य-स्थापनेच्या कल्पनेच्या त्रिशतसांवत्सरिक स्मारक-स्तंभाचें उद्‌घाटन.
स्तंभाचे उजवे बाजूस—१. श्रीयुत दादासाहेब कुमठेकर, २. नामदार श्री. बाळासाहेब खेर, पंतप्रधान, मुंबई,
३. श्रीयुत यार्डी, कलेक्टर, पुणें, ४. श्रीमंत राजेसाहेब, ५. ना. खेर यांचे चिरंजीव. [ न. प्र. छं. पा. ५

# संस्थान विलीन झाल्यानंतरचा महत्त्वाचा पत्रव्यवहार

भोर येथें श्रीमंत राजेसाहेब यांनीं वाचनालयाची इमारत बांधली आहे व त्या स्वरूपानें श्रीमंतांच्या प्रथम पत्नीचें कायमचें स्मारक व्हावें अशी भोरच्या नागरिकांची इच्छा असल्यानें, श्रीमंतांनीं सदर इमारतीस ' कै. श्री. सौ. गंगुताईसाहेब पंतसचिव वाचनालय ' असें नांव दिलें आहे. ( खं. १ पा. १८९ पहा ). वस्तुस्थिति अशी असल्यानें, संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें असलें, तरी आपल्या पत्नीचें हें लोकोपयोगी स्मारक कायम राहावें असें श्रीमंतांना वाटणें साहजिक असल्यानें, सदर इमारतीच्या, वार्षिक व विशेष प्रसंगीच्या, दुरुस्तीसंबंधींच्या खर्चाची, तसेंच वार्षिक ग्रँटची, पूर्ववत् तजवीज मुंबई सरकारकडून व्हावी याविषयीं श्रीमंतांनीं खालीलप्रमाणें मे. कलेक्टर, पुणें, यांना पत्र पाठविलें आहे.

Laxmi Vilas, Nathan Road,
Poona, 15th Feb. 1949

My Dear Mr. Yardi,

You may perhaps be knowing that there is a library named after my first wife–Shrimant Sou. Gangutaisaheb at Bhor. Since its inception, an annual contribution from the State treasury was paid. Now, on account of the integration of the State, it has become necessary to know the exact present position in regard to such libraries.

The Bhor Library is housed in a solid building, which of course would require timely repairs to keep the building intact. The building was built out of State funds and this building is not included in the list of my private property submitted to the Government. As the building is permanently associated with the name of my first departed wife; it is naturally my wish that *the name should continue as it is in future.* Government should also provide necessary funds for its annual and special repairs. Had the State continued as before, the Darbar would naturally have provided the necessary funds in its annual budget for annual and special repairs and the yearly contribution. If these two points are vouchsafed, I think, the Bhor library will continue its useful life in

the cause of the diffusion of knowledge to the public with the assured annual grant from the Govt. and with the subscription realized from the persons taking advantage of that institution. I hope and trust that you will kindly look into this matter at your early convenience and I should feel personally grateful and satisfied if the Government kindly see its way to comply with my above request.

Yours sincerely,
Sd/- R. S. Pant Sachiv
Raja of Bhor

भोर संस्थानचा बहुतेक मुलूख सह्याद्रि पर्वताच्या पूर्व, पश्चिम असलेल्या डोंगराच्या रांगांत असल्यानें त्यांत ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचीं अशीं लेणीं, शिलालेख, देवालयें, किल्ले वगैरे स्वरूपांचीं ठिकाणें आहेत. त्यांच्या संरक्षणाची व डागडुगीच्या खर्चाची व्यवस्था संस्थानकडून शक्य ती होत असे. तरी, आतां संस्थान विलीन झालें असल्यानें, पूर्ववत् वरील जुन्या स्मारकांचें रक्षण व्हावें, या सदिच्छेनें श्रीमंतांनीं खालीलप्रमाणें पत्र लिहून हिंदुस्थान सरकारच्या पुराणवस्तु संशोधन व संरक्षण खात्याचें लक्ष या महत्त्वाच्या बाबींकडे वेधलें आहे.

Laxmi Vilas, Nathan Road,
Poona, 25th Feb. 1949

To

The Secretary, States Department,
Government of India, *New Delhi.*

Sir,

The Bhor State in the Deccan is now merged with the Province of Bombay since 8th March 1947 A.D. The State territory surrounded by the three Districts of Poona, Satara and Kolaba and situated, as it, is in the Western Ghats of the Sahyadri mountains, is hilly and as such possesses some rock-cut caves of the early Buddhistic period and also some stone-inscriptions, Virgals, forts, temples etc., all of historic importance and for the reason of that deserving preservation. Although the State had no archaeological department, it took care to preserve the ancient relics in its territory by providing for and carrying out needful and possible repairs to them, when necessary, through its Public Works Department.

As archaeology is the province of the Government of India and as the provincial Govts. are not entrusted with any powers in that respect, it is thought necessary to draw the kind attention of the Govt. of India to the following, among others, ancient relics to enable them to do the needful for their preservation.

CAVES

1. Pandavdare :—It is a rock-cut cave in a hill called Nenadi (Layangiri) to the west of Shirwal, a small town about 9 miles to the east of Bhor. Layangiri is mentioned in a copper-plate dated 780 A.D. conferring the grant of the village of Ving, situated between Shirwal and Bhor, by Raja Dhruva of the Rashtrakuta dynasty. The above villages of Ving and Shirwal are mentioned in another copper-plate also dated 1079 A.D. of Raja Khambdev of the Chalukya dynasty. Both the copper-plates are kept in the Palace Museum in the Palace at Bhor. For Block prints and free translation of the plates vide pages 2 to 5 and Appendix 1 pages 1 to 11 of the accompanying pamphlet A and page 71 of the pamphlet B.

2/3. The other rock-cut caves, also of the earlier Buddhistic period, are situated in the Sudhagad Taluka ( now absorbed in the Kolaba district) near the Villages of Thanala or Nadsur and Khadsambla or Nenavali. The one faces the west, while the other faces the east.

4. Bhrugurishi :—It is a one-cell rock-cut cave, near the village of Gomashi, also in Sudhagad Taluka. It faces the west and enshrines a small statue of Buddha in cross-legged sitting posture.

5. Pargaon :—These are petty rock-excavations some 7 miles to the south of Shirwal.

For an account of the Nadur and Nenavali caves and Pargaon excavations see pages 58 to 62 and pages 70 & 71 respectively of the accompanying phamphlet B.

INSCRIPTIONS

Two inscriptions on small slabs, one in Marathi & the other in Persian are on a door of the Rohida or Vichitragad fort, their date being 1056 A.D.

Other two inscriptions are discovered from a well, built near the rise of the Neera river, known as Neerabav, just below the Darmandap, a fine plateau between Hirdoshi and Varandha, top of the Sahyadri mount. Their date is Shaka 1710–11 (A.D. 1788-89). The inscriptions are mentioned on pages 5 & 6 of the accompanying pamphlet A and the fort Rohida is referred to on pages 41 to 44 of the accompanying pamphlet B; while, Neerbav is described on page 70 of the same pamphlet B.

## VIRGALS

These are referred to on page 8 and the succeeding third Block print of the accompanying pamphlet A.

## FORTS

1. Rajagad fort :—It was the first capital of Shivaji the Great, founder of the Maharatta Empire, till he removed it to Rajagad.

2. Torna or Prachandgad fort :—Shivaji began his career of capturing the hill-forts of Maval from the hands of Mahamedans by first taking possession of the Torna fort.

A detailed description of the Rajgad and the Torna forts is given on pages 27 to 34 and pages 35 to 40 and page 71 respectively of the accompanying pamphlet B.

## TEMPLES

Temples of Ram and Sita, referred in the Chalukya Khamb copper-plate above of Shak era 1001, are almost in the bed of river Neera, as also the big Kundas constructed in the bed of the same river nearby.

A reference to these temples and Kundas will be found as made on page 5 of the accompanying pamphlet A.

## MEMORIAL PILLAR

The Swarajya-Stambha or pillar, erected in 1946 A.D. by H. H. Raja Shrimant Sir Raghunathrao Pandit Pant Sachiv K.C.I.E., Raja of Bhor, to commemorate the tercentenary of the initiation or announcement of Hindavi Swarajya by Chhatrapati Shiwaji the Great in the year 1645 A.D. stands on a site known as Cheladi, situated about a mile to the north of

Nasarapur and some 22 miles from Poona on the Poona-Bangalore road. See accompanying pamphlet B pages 7 to 24 including Preface.

There are other Old and Historic forts in the State e.g. Vitandgad or Tikona (P. 26 of B), Kathingad or Tung (pages 25 & 75 of B), Sudhagad & Sarasgad (P. 59 & pages 72, of 73 B) and also some temples of old times e.g. Raireshwar & Nageshwar (p. 69, 54, 46 of B and pages 12 to 17 of pamphlet C), Kedareshwar & Manajai near Shirwal (p. 70 of B), Baneshwar near Nasarapur (p. 69 of B), Shiva temple in the Inam village of Ranza (p. 72 of B), Dhaneshwar near Velhe, Wagheshwar near Kolvan (p. 76 of B), Rameshwar on a hill near the Inam village of Uddhar (p. 71 of B) in Sudhagad. All these merit solicitous attention of a lover of antiquities. But, particular care is taken to select and pointedly bring to the attention of the archaeological department only those among them that deserve immediate consideration and care.

In view of the urgency & importance of what is written above, I hope you will, at your early convenience, do the needful by directing the attention of the Superintendent of Archaeology, Western Circle, Poona, to these ancient relics.

Yours sincerely,
Sd/- R. S. Pant Sachiv
Raja of Bhor.

Enclosures :—

1. The Bhor Museum Guide, Marked A.
2. Here came Swarajya, Marked B.
3. Ambavade, its Beauties and Interests, Marked C.

Copy for information, with compliments to

1. The Chief Secretary to Govt. of Bombay, Bombay.
2. The Collector of Poona & Chief Administrator for Bhor State, Poona.

---

भोर येथे राजवाड्यांत म्युझियममध्यें कांहीं वस्तु आहेत; तसेंच, कांहीं हस्तलिखित व दुर्मिळ अशा पोथ्या व ग्रंथ लायब्ररींत आहेत. त्यांपैकीं महत्त्वाच्या

वस्तु व ग्रंथ नवीन स्थापन झालेल्या पुणें युनिव्हर्सिटीला देणगीदाखल देण्याचें श्रीमंत राजेसाहेब यांनीं योजिलें आहे.

या पत्रव्यवहारावरून, संस्थान विलीन झालें असलें, तरी जनतेच्या हिताच्या दृष्टीनें इष्ट, अवश्य व शक्य तें सर्व श्री. राजेसाहेब यांनीं केलें आहे, हें दिसून येणार आहे.

---

# उपसंहार

इतिहासप्रदीपेन मोहावरणघातिना ।
लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत्संप्रकाशितम् ॥

भा. आदि. अ. १ श्लो. ८७

## सचिव कुलास शब्दसुमनांजलि समर्पण

### चरित्रलेखन व अभिप्राय

श्रीमंत राजेसाहेब यांच्या चरित्रलेखनाच्या कामीं लेखकानें चरित्रासंबंधीं प्रत्येक बाबीवार व तपशीलवार असें आपलें स्वतःचें मत दिलें नाहीं. त्याचीं कारणें दोन आहेत. एक—मतप्रदर्शनास जेवढी दांडगी बौद्धिक तयारी असावी लागते, तेवढी लेखकाच्या ठिकाणीं नाहीं; दुसरें—चरित्रग्रंथ-खंडांत निवेदन केलेल्या गोष्टींच्या काळांत स्वतः लेखकाचा त्या गोष्टींच्या घडणीशीं थोडा-फार संबंध आला असल्यानें, त्याच बाबींच्या विषयीं अधिकारयुक्त म्हणून अभिप्राय त्यानेंच देणें सर्वथा अयुक्त होणार. सबब, ग्रंथावर, म्हणजेच श्रीमंत राजेसाहेब यांच्या 'राजे' या नात्याच्या कामगिरी-संबंधीं, तिऱ्हाईत अशा वर्तमानपत्रकर्त्यांनीं जे आपले अभिप्राय प्रदर्शित केले, ते शेवटीं देण्यांत आले आहेत.

### इतिहासाचें महत्त्व

इतिहास-लेखनाचा प्रधान उद्देश भावी पिढयांनीं मागील पिढयांच्या बऱ्यावाईट कृत्यांपासून बोध घ्यावा, त्यांच्या सत्कृत्यांचें अनुकरण करावें, चुकांची पुनरावृत्ति होऊं देऊं नये व प्रत्येक पिढी मागच्यापेक्षां प्रगत होऊन मानव सुखी व्हावा, हा असतो. तथापि, सत्यसृष्टींत हें साध्य सिद्ध होतें कीं कसें, याविषयीं

मतभेद आहे. इतिहासाच्या अध्ययनानें मानव सुधारला नाहीं. मानवानें भौतिक सुधारणा पुष्कळ केली आहे व पुढेंही करणार असला, तरी अध्यात्मिक वा नैतिक क्षेत्रांत तो स्थिरावस्थेंतच आहे. स्वार्थास मोहक शब्दांनीं परार्थाचा बाह्यतः वेष कसा द्यावा, ही कला मात्र त्यानें अवगत केली आहे. पाश्चिमात्य विद्वानांनींच प्रचलित मन्वंतरांतील भौतिक सुधारणा ( Civilization ) बाबत Adieu, Europe, thy place is in the cemetry असें आपलें मत व्यक्त केलें आहे. तात्पर्य,'मणिना भूषितः सर्पः किमसौ न भयंकरः ।' अशी सध्यांच्या प्रगत म्हटल्या जाणाऱ्या मानवाची मनोरचना व वागणूक आहे; म्हणून, इतिहासाचें लेखन व वाचन, म्हणजे काळाचा, श्रमाचा व पैशाचा अपव्यय करणें आहे, असें शॉपेनहार-सारखे युरोपीय तत्त्वज्ञानी म्हणतात. व्यास महर्षींलाही त्याच अर्थाचे ' ऊर्ध्वबाहु-र्विरौम्येव न च कश्चिच्छृणोति माम् । ' असे उद्गार काढावे लागले आहेत. बुद्धि कुशाग्र झाली, तर त्यानें हृदयाचा पालट होतोच असें अनुमान करतां येत नाहीं. ' जानामि सत्यं न च मे प्रवृत्तिः । ' असें म्हणणाऱ्या दुर्योधनाची गोष्ट बाजूला ठेवली, तरी ' प्रज्ञाचक्षु ' म्हटला जाणारा धृतराष्ट्रहि ' उपदेशें मन रमतें पुत्रप्रेमासवें परि भ्रमतें । ' असें म्हणतो; तेव्हां, इतिहास हा विषय निरर्थक आहे असें सकृद्दर्शनीं तरी भासतें. असें असलें, तरी वाल्मीकि-व्यासादींनीं इतिहास लिहिलेच आहेत. 'न हि दुर्योधनो राज्यं मधुरेण प्रदास्यति।' ही मनोमय खात्री असून, दुर्योधनादींना अनीतीपासून परावृत्त करण्यास शिष्टाईचा उपाय ज्ञात्यांनीं अवलंबिलाच आहे; इतकेंच नव्हे, तर हल्लींसुद्धां पुरातन वस्तूंचें व गोष्टींचें उत्खनन व संशोधन करून व इतिहास लिहून मनुष्यजातीस उपदेश केला जातच आहे. तेव्हां, वरीलसारखीं निराशेचीं वचनें हीं इषारेवजाच आहेत, तीं लक्षार्थानेंच वाचलीं पाहिजेत, असें ठरतें; शिवाय, मानव नैतिकदृष्ट्या मुळींच सुधारला नाहीं, असेंही म्हणतां येत नाहीं. रानटी अवस्थेंतल्यापेक्षां त्याची आजची नीतिमत्ता निःसंशय वरच्या पातळीवर आहे. रानटी अवस्थेंत नीतीची त्यांस कल्पनाच नव्हती. ती सध्यां येऊन, उच्चही झाली आहे व कार्यवाहींतही येत आहे. ' अमृतं वै सत् । ' सत्कृत्य निरर्थक होणें शक्यच नाहीं. मात्र, तें क्रमा-क्रमानेंच फलप्रद होणार. कारण, ' उन्नति ' म्हणजेच चढण. त्यांतही वैयक्तिक उन्नतीपेक्षां समाजाची उन्नति ही हळूहळूच घडून येणारी गोष्ट आहे. कारण,

स्वार्थप्रियता व गतानुगतिकत्व हे मानवी स्वभावांतील स्थायीभाव असले, तरी त्यांस 'राजा कालस्य कारणम्।' (भारत) तसेंच, 'यः श्रेष्ठतामश्नुते तस्य वाचमनुवदन्ति' (श्रुति) व 'मम वर्त्मानुवर्तन्ते।' (गीता) या दोन कारणांनीं मधूनमधून चालना मिळते व तसा मनोभावनेंत व क्रियेंत बदल होत जातो. क्रमानें होणारी उन्नति म्हणजेच उत्क्रान्ति. ती टिकाऊ होते. या दृष्टीनें इतिहासाच्या महत्त्वाच्या व उपयुक्ततेच्या कल्पनेची जाणीव आपल्या पूर्वजांना फार प्राचीन काळापासून असल्याचें स्पष्ट दिसतें. अध्ययनाच्या हेतूनें नारद हे सनत्कुमाराकडे शिष्यभावानें गेले असतां, 'तूं आतांपर्यंत काय व किती शिकलास तें अगोदर सांग, म्हणजे त्याच्यापुढील व इतर कांहीं विषय असल्यास, ते शिकवीन' असें सनत्कुमार म्हणाले; तेव्हां, नारदानें आपण ज्या कांहीं विद्यांचें अध्ययन केलें होतें, त्याचा पाढा वाचला. त्यांत 'इतिहास-पुराणं पंचमं वेदानाम्।' म्हणजे इतिहास मी शिकलों आहें असें म्हटलें आहे. (छां. अ. ७ खं. १ मंत्र १). यावरून, इतिहास हा वेदकाळीं मान्यतेस चढला होता, हें स्पष्ट दिसत आहे. इतकेंच नव्हे, तर इतिहासाचें अध्यापनही श्रेयस्कर असें गणलें गेलें होतें. 'य इममध्येति स सूर्यलोके कामचारी भवति। य इमं श्रावयति ब्राह्मणान्स मेधावी भवति, शतं वर्षाणि जीवति, स्वर्गलोके महीयते।' असें वेदमंत्रांत म्हटलें आहे. सूर्य ही बुद्धिदेवता आहे व आरोग्यदेवताही आहे. शिवाय, 'शतायु' या शब्दाचा अर्थ 'शंभर' इतकाच नसून 'अनेक' या अर्थाचा तो शब्द आहे. 'आत्मा वै पुत्रः' या वचनाप्रमाणें 'वंशजरूपानें संस्कृतिसंवर्धन उन्नत होत जाणें' याचेंच नांव अनेक वर्षें जगणें वा अमर होणें. तात्पर्य, व्यक्ति काय, समाज काय, किंवा राष्ट्र काय, त्याची उन्नति होण्यास इतिहासाचें म्हणजे संस्कृतीचें लेखन, अध्ययन व अध्यापन इष्ट व अवश्य आहे, हें ठरतें. इतिहास स्फुर्ति व चैतन्य उत्पन्न करतो, याविषयीं कार्लाइलचें खालील वचन संस्मरणीय आहे.

Admiration for one higher than oneself, no nobler feeling than this, dwells in the heart of a man; it is to this hour, and at all hours, the vivifying influence in man's life.

आतां, इतकें मात्र खरें कीं, स्वभावाचा स्थायीभाव बदलण्यास दांडगी इच्छाशक्ति व तदनुरूप प्रयत्नसातत्य यांची आवश्यकता असते. 'प्राक्तनं न

प्रत्यक्षाधिकम् । दोषः शाम्यत्यसंदेहं प्राक्तनोऽद्यतनैर्गुणैः । ' हीं वचनें यासंबंधांत लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत.

' इतिहास ' या शब्दाच्या यौगिक अर्थानें कालची गोष्ट, आजच्या दृष्टीनें भूतकालीन होऊन, इतिहासाच्या कक्षेंत येते; व त्याप्रमाणें, भोर संस्थान आतां राहिलें नसल्यानें, श्रीमंतांच्या पूर्वजांच्या चरित्राप्रमाणेंच, श्रीमंतांचें चरित्रहि ( हा भाग अगदीं अलीकडील असल्यानें ' इतिहास ' या शब्दाच्या रूढार्थांत तो बसत नसल्याचें मान्य केलें, तरी ) आतां इतिहासजमाच झालें आहे; व त्या दृष्टीनेंच यापुढें सर्वांच्याच संबंधांत लेखकानें आपला त्रोटक अभिप्राय, केवळ दिग्दर्शक म्हणून, नमूद करण्याचा प्रयत्न केला आहे.

## ( १ ) ' पुण्यश्लोक ' शंकराजी नारायण

सचिवपद संपादक व भोर गादीचे संस्थापक
( इ. स. १६९० ते १७०७ )

" यन्नाम श्रूयते पश्चात्सततं जनतामुखे ।
उपयुक्ततरे कार्ये पुण्यश्लोकः स उच्यते ॥ "

' राजारामचरितम् ' या ग्रंथाचे कर्ते केशव पंडित यांनीं त्यांच्यासंबंधीं

" नारायणसुते श्रीमच्छंकरे लोकशंकरे ।
राज्यैकदेशं निदधे कारीदुर्गसमाश्रयम् ॥ १ ॥
स. ४ श्लो. ११।१२

असें वर्णन केलें आहे, त्या शंकराजी नारायणाच्या पूर्वजांच्या दैनंदिन आयुष्यक्रमाचें वृत्त उपलब्ध नाहीं, ही उणीव मोठीच आहे.

' अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः ।
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥ १ ॥

अशा प्रकारच्या सव्यसाची पुत्राचा लाभ होणें, ही काकतालीय गोष्ट नाहीं. " नादत्तमुपतिष्ठते " या न्यायानें, पूर्वजांपैकीं कोणाच्या तरी महनीय तपस्येचेंच तें फल असणार, हें निर्विवाद आहे. ' अकृताभ्यागम ' या तत्त्वाप्रमाणें, सुप्रजेचा लाभ होण्यास मातृपितृकुल तदनुरूप सत्कर्मीच असावें लागतें, ही मुख्य व प्रथमची गोष्ट लक्षांत घेणें अवश्य आहे. श्रीशंकराजी नोकरींत शिरल्यावेळीं त्यांच्या मांगदरी येथील घराण्याची सांपत्तिक स्थिति व त्यांचें

पराक्रमाच्या काळचें वयही मध्यमच दिसतें. नोकरींत प्रविष्ट झाल्यापासून अवघ्या १०।१२ वर्षांत अष्टप्रधानमंडळांतील ३ रें सचिवपद त्यांनीं स. १६९० इ. सालीं मिळविलें. वास्तव, मांगदरीच्या मध्यम स्थितींतल्या मुलानें मध्यम वयांत महत्पद मिळविणें, ही निःसंशय अलौकिक गोष्ट आहे. जन्म व कर्म याप्रमाणेंच, त्यांच्या मृत्यूचीही गोष्ट अलौकिकच झाली. श्रीशंकराजींची स्वधर्मनिष्ठा प्रखर होती, म्हणूनच, स्वतः ब्राह्मण असतांही,

'शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते ॥'

या वचनानुसार, धर्मावर आलेलें संकट दूर करण्यास त्यांनीं तरवार हातीं घेतली, व स्वकर्तव्याचा काळ संपला कीं, श्रीपरशुरामाप्रमाणें, सत्कीर्ति मागें ठेवून, आयुध खालीं ठेवलें व तपोवन गांठलें. यावरून, त्यांच्या नांवामागें लेखकानें योजिलेलें 'पुण्यश्लोक' हें पद सार्थ आहे, असें दिसून येणार आहे. अशा अलौकिक पुरुषाच्या चरित्रापासून अमूकच बोध घ्यावा असें सांगणें कठीण असतें. अशांचें सर्वच चरित्र स्फूर्तिदायक असतें. त्यांचे गुण आपल्या अंगीं बाणण्याची ईर्षा धरून यथाशक्ति तसा प्रयत्न करावा, एवढा बोध यापासून घेणें आहे.

## (२) 'भाग्यवान' श्री नारो शंकर

(इ. स. १७०७ ते १७३७)

"पै जीवाचे कसी उतरली । ते दासी की गोसावीण झाली ।
सीसे वेची तया मविली । वहीं जेवी ।"

ज्ञानेश्वरी अ. १८ श्लो. ४५ ओ. ९१२.

तात्पर्यार्थ—मालकाच्या कसोटीस उतरेल, तो नोकर श्रेष्ठपदीं चढतो; स्वामीकार्यीं मृत झालेल्यास मालक इनामपत्र देऊन तसा दसरीं दाखला ठेवतो.

वरील ओळींतील पहिले दोन चरण श्रीशंकराजींच्या चरित्रास लागू असून, त्या पुढील दोन चरणांच्या सार्थतेचें स्थूलतः उदाहरण म्हणजे त्यांच्याच चिरंजीवाचें चरित्र. शंकराजींची उज्ज्वल कामगिरी व स्वहितनिरपेक्ष स्वामिनिष्ठा, यांची दखल घेऊन छत्र. श्रीशाहूनें त्यांच्या मुलास, ते अगदीं अल्पवयी होते, तरी सचिवपदीं स्थापन केलें.

"अत्युत्कटैः पापपुण्यैरिहैव फलमश्नुते ।
यदि नात्मनि पुत्रेषु नोचेन्नप्तृषु दृश्यते ॥"

श्रीशंकराजींनीं स्वधर्म व स्वदेश यांच्या रक्षणाप्रीत्यर्थ श्रमसाहस करून जें उत्कट पुण्य संपादन केलें, त्यांचें फल त्यांना दीर्घकाल व सुखानें चाखावयास मिळालें नसलें, तरी त्यांचे एकुलते एक प्रिय पुत्र नारो शंकर यांना तें मिळालें; व त्यांना पूर्ण तीस वर्षे शांततेनें त्याचा उपभोगही घेतां आला. इतकेंच नव्हे, तर सचिव कुलाचें दैवत–श्रीराम–हेंही आंपण होऊन त्यांच्याकडे येणें व वयाच्या अवघ्या दुसऱ्या वर्षी श्रेष्ठपदीं स्थापना होणें, हें सुदैवत्वाचें लक्षण आहे; म्हणूनच, लेखकानें त्यांच्या संबंधांत 'भाग्यवान' हें उपपद योजिलें आहे. तात्पर्य,

**'पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यं नेच्छन्ति मानवः।'**

सत्कृत्यें न करतां चांगलें फल मिळावें अशी इच्छा करणें व्यर्थ आहे. जीवनयात्रा सुखाची होण्यास ईशभक्तिपूर्वक सन्मार्ग अचारला पाहिजे, हाच या चरित्रापासून बोध घेणें आहे.

## ( ३ ) 'कुलदीपक' श्री. चिमणाजी नारायण

( इ. स. १७३७ ते १७५७ )

**'प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्।'** रघु०

श्री. चिमणाजीपंत हे शंकराजींच्या दत्तक पुत्राचे औरस पुत्र व श्री. नारो शंकरांचे दत्तक पुत्र.

**'विद्वानेव विजानाति विद्वज्जन परिश्रमम्।'**

सत्ता अथवा संपत्ति जे स्वकष्टानें मिळवितात, त्यांनाच तिची खरी किंमत कळते. सामान्यतः कोणत्याही कुलांत कुलाचें नांव राखणाऱ्या अशा ( लागोपाठ तीन ) पिढ्या निपजत नाहींत. आयत्या पीठावर रेघा ओढणारी औरस संततिसुद्धां कुलांगार होण्याची भीति असते. दत्तक पुत्र तर सत्प्रवृत्त निघणें म्हणजे कपिलाषष्ठीचाच योग. सामान्य कुटुंबासंबंधीं ही स्थिति. मग, सत्ता व संपत्ति मुबलक असणाऱ्या राजघराण्यांतील पुरुषाविषयीं बोलावयासच नको. पण, श्री. चिमणाजीपंत त्यास अपवाद ठरले. त्यांनीं नवीन जरी कांहीं मिळविलें नाहीं, तरी असलेलें गमावलें नाहीं; उलट, त्यास आपल्या २० वीस वर्षांच्या शांततेच्या काळांत स्थैर्य आगलें. चिमणाजीपंतांनीं भोर या गांवीं आपला वाडा बांधून तें राजधानीचें ठिकाण ( स. १७४० इ. ) करून, परंपरा चालत आलेल्या गादीस स्थिर पद प्राप्त करून दिलें; इतकेंच नव्हे, तर तेथ-

पासून ' भोरचे पंतसचिव ' हें नामाभिधान सुरू होण्याचें श्रेय मिळविलें. या कारणास्तव त्यांच्या नांवास ' कुलदीपक ' हें विशेषण जोडलें आहे. तात्पर्य, घराण्याच्या प्राप्त लौकिकांत भर घालणें जमलें नाहीं, तरी आहे त्याचें रक्षण करणें इतकें तरी व्हावें, हा यापासून बोध घेणें आहे.

## ( ४ ) ' ईश्वरभक्त ' श्री. सदाशिव चिमणाजी

( इ. स. १७५७ ते १७८७ )

" खलः करोति दुर्वृत्तं तद्वै फलति साधुषु ।
दशाननेन हृता सीता बंधनं च महोदधेः ॥ "

श्री शंकराजींचे हे पणतु. यांच्या ठिकाणीं कुलागत सर्व सद्‌गुण होते. तथापि, राजा असो कीं सामान्य मनुष्य असो, त्याच्याकडून प्रत्यक्ष वा प्रकट असें कारण घडलें नसलें, तरी अभावित अशीं संकटें त्याच्यावर येतातच. तीच स्थिति या राजपुरुषाची झाली. पुणें-कोल्हापूर व पुणें-हैदराबाद यांच्या आपसांतील वैमनस्यामुळें निजामी फौजेनें, श्री. ताराबाईच्या चिथावणीवरून, पेशव्याच्या मुलुखांत लुटालूट व जाळपोळ केली; व त्याबरोबरच भोरची पेठही लुटून ( स. १७६३ इ. ) फार नुकसान केलें. तरी पण, या आपत्तीनें न डगमगतां,

' कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे । '

हा संतांचा उपदेश स्मरून, भोरची ग्रामदेवता श्रीभोरेश्वर, याचें देवालय बांधणेस ( स. १७८३ इ. ) त्यांनीं सुरुवात केली व इतर अशींच धर्मकृत्यें केलीं. म्हणूनच, त्यांना ' ईश्वरभक्त ' या शब्दानें लेखकानें गौरविलें आहे. तात्पर्य, आपला दोष नसतांही, सांसर्गिक रोगांच्या साथीप्रमाणें, संकटें येणारच हें जाणून, राजकारणांत कसाहि बरा वाईट प्रसंग आला, तरी ईशभक्तींत खंड न पडूं देणें, हा बोध यापासून घेणें आहे.

## ( ५ ) श्री. रघुनाथ चिमणाजी

( इ. स. १७८७ ते १७९१ )

" ईशे रतिः कुलीनत्वं वित्तं शीलं च सुप्रजाः ।
दीर्घमायुर्भोगशक्तिर्महतस्तपसः फलम् ॥ "

श्रीमंत रघुनाथ चिमणाजी यांना मागील तीन पिढ्यांत नसलेला औरस संततीचा लाभ झाला. इतकेंच नव्हे, तर वरील श्लोकांत निर्दिष्ट केलेल्या सुखसाधन सप्तकापैकीं सहा त्यांना अनुकूल असूनहि, राज्याधिकारप्राप्तीनंतर ते अवघ्या चारच वर्षांत निधन पावल्यानें, राज्योपभोग त्यांना अल्पकाळच घेतां

चित्रांक ५.



छत्रपति श्री शिवाजी महाराज यांच्या हिंदवी स्वराज्य स्थापनेच्या कल्पनेच्या त्रिशतसांवत्सरिक स्मारक–स्तंभाचें उद्‌घाटन केल्यावर नामदार बाळासाहेब खेर भाषण करीत आहेत. [ न. प्र. सं. पा. ६

आला; व त्यामुळें त्यांच्या गुणांचा व कर्तृत्वाचा परिपोष होण्यास अवसरच मिळाला नाहीं.

### ( ६ ) ' सरळस्वभावी ' श्री. शंकरराव रघुनाथ

( इ. स. १८९१ ते १७९८ )

' न राज्ञा मृदुभावेन राज्यभारः समुह्यते । '

श्रीमंत शंकरराव ऊर्फ पहिले बाबासाहेब हे स्वभावानें ऋजु म्हणजे सरळ होते. जग सरळ असेल, तरच त्यांत ऋजुवृत्ति मनुष्याचा निभाव लागणार. जगांत कुटिलपणाच जास्त आहे. म्हणूनच,

' जयाचा जो व्यवहार । त्यांत असावें खबरदार ॥ '

असा समर्थांना जनतेला उपदेश करावा लागला. सामान्य व्यवहाराची ही गोष्ट. मग, राजकारणासारख्या अनेक भानगडीच्या व बहुविध प्रकृतींच्या मनुष्यांशीं संबंध येणाऱ्या बाबतींत तर किती सावधपणें वागणारा नेता पाहिजे, तें स्पष्ट सांगितलें पाहिजे असें नाहीं.

' परस्परस्योत्सादनाय यतन्ते राजसेवकाः । '

व व्यवहार तर ' सत्यासत्यमिथुनीभूत ' असा. तेव्हां, राजा चतुर व दक्ष नसेल, तर सर्वत्र अव्यवस्था माजते. अशीच स्थिति श्री. बाबासाहेबांच्या वेळीं, ते भोळसर असल्यानें, राज्यांत झाली. त्यांच्या जीवावरच प्रसंग येण्यापर्यंत मजल गेली. तथापि, अशाहि वेळीं,

' प्रायेण हि सुवृत्तानामस्थायिन्यो विपत्तयः । '

या वचनाप्रमाणें, त्यांचीं संकटें शेवटीं ईशकृपेनें दूर झालीं. यावरून, व्यवहारांत दक्ष असलें पाहिजे; निदान, स्वतः सद्वृत्त असावें, म्हणजे प्रसंगीं ईश्वरी मदत मिळणेचा संभव असतो, हा बोध यापासून घेणें आहे.

### ( ७ ) श्री. चिमणाजी शंकर

( इ. स. १७९८ ते १८२७ )

व

### ( ८ ) श्री. रघुनाथ चिमणाजी

( इ. स. १८२७ ते १८३६ )

" लोकेषु निर्धनो दुःखी ऋणग्रस्तस्ततोऽधिकम् ।
धनेन सहितं तस्य यतस्तेजो विनश्यति ॥ "

'राज्याभिलाषिणः पुत्रो भ्राता वा न प्रियः पिता।'
'घोराः स्वार्थप्रयुक्तास्तु ज्ञातयो नो भयावहा।'

श्री. चिमणाजीपंत ऊर्फ पहिले नानासाहेब व श्री. रघुनाथराव ऊर्फ पहिले रावसाहेब, हे दोघेही दत्तक पुत्र व दोघांनाही, राज्यकारभार ते स्वतः पाहूं लागले, कीं त्यांच्या दत्तक मातुश्रीपासून फार त्रास झाला. श्री. नानासाहेबांना तर तिनें त्यांच्या सावकारांकडूनच राजवाड्यांत कांहीं दिवस अटकेंत ठेवलें. 'राज्ययोग' हा एका दृष्टीनें सुयोग, तर तोच, आपत्तीस कारण झाल्यानें, कधीं कधीं कांहीं काळ कुयोगच ठरतो असें झालें. 'न जाने संसारः किममृतमयो वा विषमयो।' असें यामुळेंच म्हटलें आहे. तथापि, दोघांनींहि अशा विपरीत काळांत आपली नीति सोडली नाहीं; म्हणून, संकटांचें निरसन होऊन, शेवटीं सुखाचे दिवस त्यांनीं पाहिले. 'छिद्रं प्रजातमपि शीलयुतस्य दैवान्मुक्तामणेरिव गुणाय भवत्यवश्यम्।' या श्लोकाप्रमाणें संकटांनींच त्यांचे गुण उज्ज्वल दिसून आले. तात्पर्य, शक्य तों ऋण काढूं नये. निदान, अशा प्रसंगीं गृहकलह तरी नसावा. कारण, गृहकलहानें परक्यांना त्यांत हस्तक्षेप करण्यास व स्वार्थ साधण्यास अवसर मिळतो, हाच बोध यांत घेण्यासारखा आहे.

## (९) 'उदारधी' श्री. चिमणाजी रघुनाथ
### (इ. स. १८३६ ते १८७१)

"तरी जैसीचि घरींची संपत्ति। आणि तैसीचि औदार्य धैर्यवृत्ति।
भा परत्रा आणि कीर्ति। का नोहावे॥"

—ज्ञाने. अ. १८ श्लो. ७८ ओ. १६५२.

श्री. चिमणाजीपंत ऊर्फ दुसरे नानासाहेब यांची कारकीर्द पुण्यश्लोक शंकराजींच्या नंतर, त्यांच्याच प्रमाणें, अल्पकालीन, पण अनेक दृष्टींनीं उज्ज्वल व उठावदार अशी झाली. हे दत्तक होते, तरी त्यांच्या दत्तक मातुश्री अथवा दत्तक आजी यांच्याकडून त्यांना त्रास पोंचला नाहीं. संस्थानास सुरुवातीस पुष्कळ कर्ज झालें होतेंच; तशांत, स. १८५८ इ. त भोरची बाजार पेठ जळाली व स. १८६९ इ. त खुद्द राजवाडा दग्ध झाला; तरी, ते धीराचे पुरुष होते. कर्जाचें निवारण करून, पेठ व राजवाडा ह्यांची त्यांनीं पुन्हा प्रस्थापना केली. इतकेंच नव्हे, तर राजधानीस नळाचें पाणी (स. १८६३ इ.) आणणें, नीरा नदीस घाट बांधून गांवास सुरक्षित करणें, बागा तयार करणें, वगैरे कामांनीं राज-

चित्रांक ६.



दादर, मुंबई, येथील जनरल एज्युकेशन सोसायटीच्या मुलींच्या शाळेचा बक्षीस–समारंभ.
डावीकडून उजवीकडे पुढील रांग, खुर्चीवर–३. श्रीमती अमृत कुवर, ४. ने.ना.सर महाराजसिंग मुंबईचे गव्हर्नर,
५. श्री. राजेसाहेब. मागील रांग ( उभे )–१. श्रीमती ताराबाई. [ न. प्र. सं. पा.८

धानीची शोभा व सुखसोयी यांत त्यांनीं भर घातली. आधुनिक पद्धतीप्रमाणें राजकारभाराच्या खात्यांची पुनर्रचना करून संस्थानी प्रजेसही सुख दिलें. ' पात्रे त्यागी गुणे रागी ' असे ते असल्यानें, वरील ओळींत श्री ज्ञानेश्वरानीं म्हटल्या-प्रमाणें, त्यांची कारकीर्द कीर्तिरूपानें चिरस्मरणीय झाली. तात्पर्य, धीरोदात्तता, उदारता व सत्पात्रीं दान हीं कीर्तीचा लाभ करून देतात हाच बोध यांत घेणें आहे.

## ( १० ) ' दैववान ' श्री. शंकरराव चिमणाजी

( इ. स. १८७१ ते १९२२ )

" नष्टोऽतिमानात्कौरव्यो सर्वमत्यन्तगर्हितम् । "

" समयासारिखा समयो येना । नेम सहसा चालेना । नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥ अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहूनि चालावें । हटनिग्रही न पडावें । विवेकी पुरुषें ॥ "

(१०) श्रीमंत शंकरराव ऊर्फ दुसरे रावसाहेब यांचा जन्म, औरस संतति नसणें हें संस्थानच्या अस्तित्वास बाधक होतें, अशा संधिकालांत झाला, म्हणून विशेष आनंददायक झाला. राज्याधिकारसूत्रेंही वयांत आल्यावेळींच त्यांच्या हातीं आलीं. त्यानंतर ४ वर्षांतच औरस पुत्राचा व यथाकाल नात-वंडांचाही लाभ झाला. सचिव कुलांत त्यापूर्वी कन्याप्राप्तीचें सुख कोणासही मिळालें नव्हतें, तेंही त्यांना मिळालें. काटकसरी स्वभावामुळें व आधिभौतिक आपत्तीहि विशेष न आल्यानें, द्रव्यसंचयही त्यांना बराच करतां आला. त्यांनीं राज्यकारभारांतही कांहीं नवीं खातीं सुरू करून, जुन्यांत पुष्कळ सुधारणा केल्या. ब्रिटिश सरकारशीं त्यांचें नेहमीं सहकार्य असे. साम्राज्य सरकारनेंही त्यांना H. H. पदवी देऊन त्यांच्या गुणांचें व ४८ वर्षांच्या यशस्वी व दीर्घ कारकीर्दीचें चीज केलें. म्हणूनच, त्यांना 'दैववान ' असें म्हटलें आहे. श्री. रावसाहेब यांच्या स्वभावांत अनेक सद्गुण होते. परंतु, ' मर्यादायां स्थितो धर्मः।' ह्या वचनांतील तात्पर्यार्थाकडे त्यांचें लक्ष न पोंचल्यानें, व विशेषतः बदलत्या विचारक्रान्तीच्या लोकशाहीच्या काळाप्रमाणें, आपल्या काटकसरी धोरणास, पुराणप्रियतेस व स्वमताभिमानी वृत्तीस त्यांना इष्ट व अवश्य तें वळण न देतां आल्यानें, 'तानमान चुकत गेला। कोणी पुसेना त्याला।' ह्या समर्थवचनाप्रमाणें, शेवटीं त्यांना मनस्ताप भोगावा लागला. तात्पर्य, स्वभावांत अतिरेकीपणा नसावा, कालमान ओळखून वागावें, तरच सुख लागतें, हा बोध यापासून घेणें आहे.

## ( ११ ) ‘ समयज्ञ ’ श्री. रघुनाथराव शंकरराव

(इ. स. १९२२ ते ता. ८ मार्च १९४८ इ. रोजीं संस्थान विलीन होईपर्यंत )

**‘ अतिरिच्यते हि सुजन्मा कश्चिज्जनकं निजेन चरितेन । ’**

श्रीमंत रघुनाथराव ऊर्फ दुसरे बाबासाहेब यांनाही पुत्र, कन्या व नातु, नाती यांचा लाभ असून, तीं सर्व विद्याप्रेमी आहेत. स्वतः त्यांना राज्याधिकार वयाच्या ४४ व्या वर्षीं मिळाला असला, तरी प्रभूनें त्यांना दीर्घ आयुष्य व आरोग्य दिल्यानें, इच्छेप्रमाणें कर्तृत्वास अवसर मिळाला. वडिलांप्रमाणें त्यांची बुद्धिमत्ता तीक्ष्ण नसली, तरी वाचन, विद्वत्संग व प्रवास यांच्यायोगें ती उणीव त्यांनीं भरून काढली. तसेंच, तीर्थरूपाप्रमाणें, प्रकृतीमानामुळें काम सतत करण्याची दांडगी शक्ति नसली, तरी खातेनिहायच्या कामाची कार्यकारी मंडळांत त्यांनीं वांटणी करण्याचें प्रथमपासून कालोचित धोरण ठेवल्यानें, तोही कमीपणा राहिला नाहीं. राज्यकारभाराच्या संबंधांतही त्यांची कारकीर्द वडिलांच्याप्रमाणेंच साम्राज्य सरकारशीं पूर्ण सहकारी होऊन, शिवाय नव्या कालमानाप्रमाणें प्रगतिपर व प्रजेच्या वाढत्या आकांक्षांस क्रमाक्रमानें चढता वाढता मान देणारी ती झाल्यानें, वरिष्ठ सरकारकडून मानसन्मान व प्रजेचें प्रेम अशीं दोन्हीं त्यांनीं मिळविलीं. संस्थानाधिपतीला ९ तोफांची सलामी, ‘ राजा ’ व ‘ हिज हायनेस ’ ह्या दोन पदव्या असे तीन कायमचे व शिवाय, ‘ सर ’ या उपपदासह के. सी. आय. ई. ची वैयक्तिक पदवी असे मान मिळवून प्रजेकडूनही वेळोवेळीं धन्यवाद त्यांनीं मिळविले आहेत.

श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या संस्थानिक बंधूंचेंही प्रेम व विश्वास संपादन केला होता. त्यांनीं श्रीमंतांना आपल्या दक्षिणी संस्थानांच्या मध्यवर्ती गटातर्फे स. १९२३ ते १९३० इ. पर्यंत नरेंद्रमंडळांत निवडून दिलें होतें; इतकेंच नव्हे, तर हिंदुस्थानच्या संयुक्त राज्यघटनेची वाटाघाट लंडन शहरीं चालू होती, त्या वेळीं संयुक्त पार्लमेंटरी कमिटीपुढें दक्षिणेंतील छोट्या संस्थानांची बाजू मांडण्यास श्रीमंतांचीच निवड त्यांच्या संस्थानिक बंधूंनीं स. १९३३ इ. सालीं केली होती. प्रकृतीच्या व कौटुंबिक अडचणींच्या कारणानें श्रीमंतांना तें काम करतां आलें नाहीं, ही गोष्ट वेगळी. तरी पण, श्रीमंत राजेसाहेब हे नरेंद्रमंडळाचे कायमचे सभासद स. १९४० इ. सालीं झाल्यावर त्यांनाच स. १९४५ इ. सालीं त्यांच्या संस्थानिक बंधूंनीं आपल्यातर्फे नरेंद्रमंडळाच्या राजेलोकांच्या स्थायीसमितीवर निवडून दिलें.

वडिलांप्रमाणें स्वमताभिमान, काटकसरीचें धोरण व परंपरेविषयीं आवड, हीं त्यांच्या ठिकाणीं असलीं, तरी या तिन्ही बाबतींत त्यांनीं अतिरेक होऊं दिला नाहीं. इतरांचें म्हणणें ऐकून त्यांतील ग्राह्याचा स्वीकार करणें, कार्यक्षमतेस बाध न येईल अशीच काटकसर ठेवणें व 'देशे काले च पात्रे च।' म्हणजे सत्पात्रीं-प्रसंगीं थोडें सढळच-दातृत्व अवलंबिणें, तसेंच जुन्यांतील चांगलें राखून त्यांत नव्यांतील चांगल्याची भर घालणें, अशीच त्यांची प्रथमपासून प्रवृत्ति असल्यानें, राजेपण व लोकशाही यांचा त्यांना उत्तम मिलाफ करतां आला. म्हणून, सुरुवातीचा श्लोक त्यांच्या बाबतींत सार्थ असल्याचें दिसून येईल. वरील श्लोकाप्रमाणें वडिलांच्यापेक्षां त्यांचें चरित्र श्रेष्ठ ठरलें.

श्रीमंत राजेसाहेब गादीवर आले, त्या वेळीं संस्थानचें वातावरण शांततेचें नव्हतें. पूर्वीच्या कारकीर्दीपासून चालत आलेल्या प्रजेच्या अनेक व बहुविध तक्रारींचें निरसन न झाल्यानें, त्यांचीं मनें अस्वस्थ होतीं; शिवाय, ब्रिटिश मुलखांत झालेल्या सुधारणांप्रमाणें, राज्यकारभारांत आपण अंशभागी असावें असेंही रयतेला वाटूं लागलें होतें. लोकांच्या मनाची व आकांक्षेची ही स्थिति ध्यानीं घेऊन, श्रीमंतांनीं क्रमाक्रमानें, पण शक्य तों सत्वर, तक्रारींचीं कारणें दूर केलीं. विषमतादर्शक कर काढून टाकणें, सरकारी कामकाजाच्या संबंधांत अस्पृश्यतेचें बंधन दूर करणें, वगैरे कृत्यांनीं सर्व प्रजेस समान वागविण्याचें आपलें धोरण त्यांनीं अमलांत आणल्यानें, लोकांना त्यांच्या उदार मनाची खात्री पटली. शिवाय, कायदेमंडळ, तालुका लोकल बोर्डस्, म्युनिसिपालिटया, वगैरे स्थानिक स्वराज्य संस्थांची स्थापना करून, श्रीमंत राजेसाहेब यांनीं राज्यकारभाराशीं रयतेचा प्रत्यक्ष संबंध आणण्याची योजना केली. इतकेंच नव्हे, तर यथाकाल त्या संस्थांच्या घटनांत प्रगतिपर सुधारणा केल्यानें, त्यांच्याविषयीचें प्रजेच्या मनांतील प्रेम, आदर व निष्ठा वृद्धिंगत झाली; इतकी कीं, त्यांच्या वयास स. १९३८ इ. सालीं साठ वर्षें पूर्ण होत असल्यानें, त्यांच्या वयाचा हीरक महोत्सव ऊर्फ डायमंड ज्युबिली प्रजाजनांनीं स्वयंस्फूर्तीनें साजरी करून, श्रीमंतांनीं त्या कालापर्यंतच्या आपल्या १६ वर्षांच्या कारकीर्दींत घडवून आणलेल्या सुधारणांबद्दलची प्रजेनें आपली कृतज्ञता व्यक्त करून त्यांचें अभिनंदन केलें. त्यानंतरहि आस्ते आस्ते रयतेस जास्त जास्त हक्क देण्याचें धोरण तसेंच

चालू ठेवून, स. १९४७ इ. सालीं त्यांच्या कारकीर्दीस २५ वर्षे पूर्ण होत असल्यानें, तन्निमित्तच्या रजत महोत्सव प्रसंगीं श्रीमंतांनीं रयतेस संपूर्ण स्वराज्याचे हक्क बहाल केले. पुढें, ब्रिटिश हिंदुस्थानांत सुरू झालेल्या नव्या लोकशाहीच्या मन्वंतरांत, संस्थानांनीं आपआपसांत संघ केल्यावांचून त्यांचा टिकाव लागणें शक्य नाहीं, असा मतप्रवाह वाहूं लागल्यानें, दक्षिणेंतील आठ संस्थानांनीं जो आपला संघ तयार केला, त्यांत श्रीमंतांनीं प्रामुख्यानें भाग घेऊन भोर येथें ता. १७।१०।४७ इ. रोजीं संघाची स्थापना केली. परंतु, नंतर संघराज्य प्रत्यक्ष अस्तित्वांत येऊन कार्यकारी होण्याच्या सुमारास, अनपेक्षित अशा घटना फारच जलद घडून आल्या व लोकशाहीचे वारे मोठ्या व जोरदार प्रमाणावर वाहूं लागले. संघराज्यापेक्षां हिंदी राज्यांत संस्थानांचें विलिनीकरण हेंच जास्त श्रेयस्कर असें प्रजेस वाटूं लागलें; तेव्हां, त्यासही श्रीमंतांनीं इतर संस्थानिकांच्या बरोबर आपली मान्यता दिली. तात्पर्य, बदलत्या काळाचा ओघ लक्षांत घेऊन व प्रजेच्या कल्पना व इच्छा यांचा विचार करून, प्रत्येक समयास साजेसें असेंच आपल्या राज्यकारभाराचें धोरण शेवटपर्यंत श्रीमंतांनीं ठेवलें.

भोर संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झाल्याचा निदर्शक असा जो कार्यक्रम भोर येथें ता. ८ मार्च स. १९४८ इ. रोजीं सकाळीं झाला, त्यास श्रीमंत स्वतः उपस्थित होते. त्यानंतर, ता. २६ मार्च १९४९ इ. रोजीं नाम. बाळासाहेब खेर, पंत प्रधान, मुंबई प्रांत, यांच्या हस्तें नसरापूरजवळील चेलाडी नाक्या-नजीक उभारलेल्या श्री शिवछत्रपतीच्या स्वराज्य--स्थापना- कल्पनेच्या त्रिशत सांवत्सरिक स्मारक-स्तंभाचा जो उद्‌घाटन-समारंभ झाला, त्या वेळीं श्रीमंत राजे-साहेब यांनीं हि. हा. शंकरराव मॅन्शन्स व त्यासन्निध असलेले, हर हायनेस श्री. सौ. जिजीसाहेब मॅन्शन व एक लहान बंगला असे, दोन बंगले—तिन्ही मिळून अदमासे रुपये दोन लाख किमतीचे—महात्मा गांधींचें कार्य पुढें चालवि-ण्यास अथवा तत्सम लोकोपयोगी सार्वजनिक कार्याकरतां मुंबई सरकारास दिल्याचें जाहीर केलें. महात्माजींच्या स्मारक फंडास रुपये पंधरा हजार त्यांनीं पूर्वीं दिलेच होते. यावरून, हिंद सरकारशीं अंतःकरणपूर्वक परंपरागत पूर्ण सहकार्यानें वागण्याचें त्यांचें धोरण स्पष्ट दिसून येत आहे.

कोणत्या वेळीं कसें वागावें हें जाणून तसें वर्तन करणें हा विशेष गुण

त्यांच्या ठिकाणीं असल्यानें, 'समयज्ञ' हें उपपद त्यांच्या नांवामागें योजिलें आहे.

तात्पर्य,

'धर्मो भवत्यधर्मो वै ह्यधर्मश्च भवेद्धर्मः ।
देशकालप्रभावेण देशः कालश्चतौ प्रभू ॥ १ ॥'
'दीर्घदृक्कालवर्ती च सुखमाप्नोत्यसंशयम् ।'

या वचनाप्रमाणें देशकालानुरूप वर्तन करणें हेंच श्रेयस्कर, हा बोध यापासून घेणें आहे.

सारांश,

श्री. शंकराजींच्या पश्चात जे पुरुष पंत सचिवपदीं अधिष्ठित झाले, त्यांना, छत्र. श्रीशाहूच्या कारकीर्दींत पेशवे हेच मुख्य प्रधान व सेनापति झाल्यानें, आपली तरवारबहाद्दरी दाखविण्याची संधि कोणालाच मिळाली नाहीं. स्वतःच्या प्रांतांत बंदोबस्त राखणें व अष्टप्रधान मंडळांतील सदस्य या नात्यानें येणारें काम पार पाडणें, येवढेंच त्यांचें कार्यक्षेत्र झालें. अशा स्थितींत

'यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकिता ।
एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयम् ॥'

या सुभाषितांत वर्णन केल्याप्रमाणें, सत्ता, संपत्ति व तारुण्य ह्या त्रिदोषाची बाधा सचिव कुलापैकीं कोणास झाली असती, तर ती आश्चर्याची गोष्ट असें कोणी म्हटलें नसतें. तसें होणें अनिष्ट असलें, तरी मनुष्यस्वभावास सोडून झालें असें कोणी म्हटलें नसतें.

तथापि, कोणाचीहि कारकीर्द वैयक्तिक स्वभावदोषामुळेंच अनर्थकारक झाली नाहीं, हीच नवलाची व कौतुकाची गोष्ट आहे असेंच कोणीहि म्हणेल. त्यास कारण एकच म्हणजे आतांपर्यंतच्या कोणाच्याहि ठिकाणीं अविवेकिता हा महान दोष नव्हता, हें होय. संस्थानच्या सुरुवातीपासून ते अखेरपर्यंत झालेले सर्वही म्हणजे अकराही पुरुष विवेकी असणें ही खरोखर अभिनंदनीय गोष्ट आहे. 'देणें ईश्वराचें ।' समर्थ.

तथास्तु । शुभं भवतु ।

वि. गो. रानडे

# हि. हा. श्रीमंत राजेसाहेब, यांचे चरित्रावरचे वर्तमानपत्रांचे अभिप्राय

## श्री. राजेसाहेब यांच्या चरित्राचे पहिले तीन खंड स. १९३९ इ. सालीं प्रसिद्ध झाले. त्या वेळचा सदर चरित्रखंडासंबंधीं अभिप्राय खालीं दिला आहे.

***The Progress of Education, April 1940***

**Volume XVI, No. 10**

## REVIEWS AND NOTICES

**श्रीमंत रघुनाथराव पंडित पंतसचिव, राजेसाहेब, संस्थान भोर, यांचें चरित्र** —By Vasudeo Narayan Joshi, Ex-Shaladhikari, Bhor State.

This is a biography of the present ruler of Bhor State, in three bulky volumes, each with about 350 pages. The volumes are extremely well printed, nicely illustrated and handsomely bound. Volume I is devoted chiefly to the early life of the Rajasaheb, his days of boyhood and youth. The particularly valuable part of this volume, however, is contained in the first 20 pages which give a short history of the founder of the State-Shankaraji Narayan–who first came to the forefront in the days of Rajaram, and his son, Naro Shankar; volume II begins with the Rajasaheb's accession to the Gadi in 1922 and is a fairly detailed review of his administration from 1922 to 1936; volume III describes chiefly the later life of the Rajasaheb. The book under review is thus much more than mere life of a Prince. It is the story of a small but important State near Poona, extending over sixty years, and is a valuable possession to a student of administration. As a life-story it may perhaps attract only the few who know well the Rajasaheb and his family and who have the privilege of working with him. It is the life of a good-natured gentleman, fairly well educated and, as evidenced from his numerous speeches published in the volume, anxious to improve the condition of his people. That he has not been able to do all he wished to do is not the peculiarity of Bhor State or its ruler. The environment of an Indian State—particularly a small State like Bhor—is a

handicap not easily overcome. With the income of a few lakhs, and the need of maintaining an expensive establishment equal, if not superior, to that of the Viceroy, the Prince cannot find the wherewithal for the uplift of his people and seldom has he the capacity for long-term planning and the ability to carry it out in the face of financial and other difficulties.

"One may legitimately ask" says Prof. D. V. Potdar in the foreword, "what can be the use of publishing the life of a ruler of a small State like Bhor? For, it must be admitted that the volumes will not have many readers outside the limits of Bhor State. But, none can deny the advantages of having ready at hand all information about the State and its ruler. It helps the Prince and his people to act with knowledge and responsibility." Prof. Potdar, with historian's instinct, rightly regrets that similar biographies are not available of the earlier rulers of Bhor State.

---

**हि. हा. श्री. राजेसाहेब यांच्या चरित्राचा ४ था खंड चालू सालीं प्रसिद्ध झाल्यानंतर चरित्राचे खंड वर्तमानपत्रें व मासिकें यांच्या संपादकाकडे पाठविण्यांत आले होते. त्यावर त्यांचे प्रसिद्ध झालेले अभिप्राय खालीं दिले आहेत.**

**केसरी, पुणें, मंगळवार ता. २९ मार्च १९४९.**

## राजा रघुनाथराव पंडित पंतसचिव यांचें चरित्र–( भाग ४ )

( लेखक व प्रकाशक—रावसाहेब वि. गो. रानडे, भोर.)

भोरचे राजेसाहेब श्री. रघुनाथराव पंडित पंतसचिव यांच्या चरित्राचे तीन भाग यापूर्वी कै. श्री. वा. ना. जोशी यांनीं प्रसिद्ध केले होते. त्यानंतरचा हा चौथा भाग भोरचे माजी दिवाण रावसाहेब रानडे यांनीं परिश्रमपूर्वक लिहिला आहे. या भागांत भोर संस्थान भारतांत विलीन होईपर्यंतचा सर्व भाग आला आहे.

एखाद्या सत्ताधीशाचें चरित्र व एखाद्या सामान्य व्यक्तीचें चरित्र, यांत फरक आहे. सत्ताधाऱ्याच्या चरित्रांत त्याच्या प्रजेच्या सामुदायिक जीवनाचें प्रतिबिंब उमटणें अपरिहार्य असतें. विशेषतः हिंदी संस्थानिक म्हटला म्हणजे

त्याचा एकतंत्री कारभार डोळयापुढें उभा राहून, त्याच्या नियंत्रणाखालीं असलेल्या सहस्रावधि प्रजेशीं त्याचें जीवित निगडित झालें असल्यानें, त्याच्या चरित्राचा ठसा संस्थानच्या सामुदायिक जीवनावर सहजच उठतो, आणि यासाठीं अशीं चरित्रें वाचनीय असतात. आतां हिंदी संस्थानिक कालोदरांत जमा झाले असून भावी पिढीला इतिहासावरूनच त्यांची ओळख होणें शक्य आहे.

श्री. राजे पंतसचिव हे युवराज असल्यापासून प्रजेच्या हिताकडे त्यांचें लक्ष होतें व प्रत्यक्ष अधिकार-स्वीकार केल्यानंतर त्यांनीं आपले संकल्प प्रत्यक्ष कृतींत आणिले. संस्थानांत लोकजागृतीची लाट याच सुमारास उठली. राजेसाहेबांनीं आपल्या राज्यारोहणाच्या दरबारांतच जुने अन्यायमूलक अनेक कर होते, ते रद्द केले. जंगलखात्यांत सुधारणा करून गायरानें विस्तृत केलीं. हिरडयाची मक्तेदारी बंद केली व नोकरांचे पगार, पेन्शन यांसंबंधीं नियम केले. शाळा व दवाखाने नव्हते ते घातले. नवे रस्ते केले, जुने दुरुस्त केले.

संस्थानांत प्रजापक्षानें चळवळ सुरू केली ही गोष्ट सत्य असली, तरी मॉन्टफर्ड सुधारणा जाहीर झाल्या, त्या वेळीं राजेसाहेब अधिकारारूढहि झाले नव्हते; परंतु, तेव्हांहि त्यांनीं ' हिंदी संस्थानिकांनीं कालाचीं पावलें ओळखून अधिकारन्यास करण्यास सिद्ध झालें पाहिजे ' असें सूत्र आपल्या रोजनिशींत लिहून ठेवलें होतें व अधिकारारूढ होतांच या ध्येयाप्रमाणें ते आचार करूंहि लागले, ही गोष्ट प्रस्तुत चरित्रावरून ध्यानीं येईल.

श्री. बाबासाहेब यांनीं स. १९२२ सालीं राज्यकारभार हातीं घेतला व नंतर पांच वर्षांनीं म्हणजे १९२८ मध्यें कायदेमंडळ स्थापन केलें. या कायदेमंडळांत लोकनियुक्त सभासद नव्हते. तथापि, त्यांनीं नेमणुका अशाच केल्या कीं, प्रजा-परिषदेच्या पुढाऱ्यांनींहि त्याला मान्यता दिली. त्या वेळीं 'केसरी'नें असें म्हटलें आहे कीं, " राजेसाहेबांनीं स्वतः नेमलेले दहाहि सदस्य असे आहेत कीं, त्यांच्याहून अधिक चांगले सभासद निवडणुकींतहि येणें शक्य नाहीं व नव्हतें. संस्थान प्रजा परिषदेंतील जहालांतील जहाल अशा पुढाऱ्यांनीं प्रांजलपणें बोलून दाखविलें कीं, " श्रीमंतांनीं दिलें, तें आमच्या अपेक्षांच्या बाहेर दिलें."

हीच प्रगतिपर दृष्टि त्यांनीं कायम ठेवून, इ. स. १९३२, १९४३ व १९४६ अशा क्रमानें प्रजेच्या हातीं अधिकांत अधिक सत्ता देत देत, स. १९४७

मध्यें मोर स्टेट कायदा करून संपूर्ण स्वराज्याचे हक्क त्यांनीं प्रजेस बहाल केले व लोकमान्य पुढारी श्री. न. चिं. केळकर यांच्या हातींच राज्यकारभार सुपूर्त केला. त्या वेळीं राजेसाहेबांनीं आपणास जी तैनात ठरवून घेतली, ती आज मध्यवर्ति सरकारलाहि आक्षेपार्ह वाटली नाहीं हें ध्यानीं घेण्याजोगें आहे.

श्री. बाबासाहेब हे सुसंस्कृत, न्यायप्रिय, प्रागतिक विचाराचे असल्याचें त्यांच्या चरित्रावरून लक्षांत येतेंच; परंतु, त्यांनीं शाळा, दवाखाने, रस्ते, यांसाठीं लक्षावधि रुपये खासगींतून दिले, ही गोष्टहि लक्षांत घेतली पाहिजे. दोन वेळां युरोपचा प्रवास केल्यानें, प्रवासानें येणारा दूरदर्शीपणा त्यांच्यांत पुरा उतरला आहे. या सर्व दृष्टीनें श्रीमंतांचें चरित्र वाचनीय झालें आहे.

पुस्तकाची छपाई उत्तम आर्ट कागदावर करून अनेक प्रसंगींचे फोटो देऊन अंतरंगाबरोबर बाह्यांगहि आकर्षक केलें आहे.

विलिनीकरणानंतर संस्थानिकांच्या मागील व्याप कमी झाले असून, त्यांच्यामागें दगदगीचीं कामें फारशीं राहिलेलीं नाहींत. अशा स्थितींत त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा संघ राज्यकर्त्यांनीं अवश्य घेतला पाहिजे.

रा. गो. भि.

---

लोकशक्ति, पुणें, ता. २५-४-१९४९.

**संस्थानें व संस्थानिक यांच्या जीवनाचें चित्रण करणारा ग्रंथ**

**हिज हायनेस राजा श्रीमंत सर रघुनाथराव पंडित पंतसचिव, के. सी. आय. ई. यांचें चरित्र**

[ ( चार खंड ) प्र. रावसाहेब वि. गो. रानडे, पहिल्या तीन खंडांचे लेखक:—श्री. वा. ना. जोशी व चौथा खंड:—ले. रा. सा. वि. गो. रानडे ]

देशी संस्थानांच्या घटनेंत स्वातंत्र्यानें फार मोठी क्रांति केली आहे. या क्रांतीमुळें संस्थानांच्या अधिपतींचे मूळ व सहज गुण प्रगट झाले असून, पारतंत्र्यामुळें राष्ट्रांतील किती लोकांना काळोखांत ठेवलें होतें याचा प्रत्यय आपणांस पहावयास मिळाला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संस्थानाधिपतींच्या अंगच्या लोकोपयोगी गुणांचा विकास पारतंत्र्याच्या पिंजऱ्यांत पिचत असतां होत नव्हता, आणि सर्व राजे जनताद्रोही आहेत अशीच अवस्था इंग्रजांच्या स्वार्थी राजनीतीनें करून

ठेवली होती. पण, स्वातंत्र्य आल्यानंतर संस्थानिकांतहि चैतन्य–संचार झाला; व त्यांना देशासाठीं कांहींतरी करावें याची स्फूर्ति झाली. या स्फूर्तिनुरूप अनेक अधिपति वागत आले आहेत, वागत आहेत. परंतु, पूर्वीच्या काळांतहि आपल्या प्रजेच्या हितासाठीं कांहीं तरी करीत असावें, या तळमळीनें वागणारे कांहीं संस्थानिक होते. अशा जनहितरत अधिपतींपैकींच राजा श्रीमंत सर रघुनाथराव पंडित पंतसचिव हे होते. त्यांच्या २५ वर्षांच्या कारकीर्दीचा इतिहास त्यांच्या चरित्राच्या निमित्तानें प्रसिद्ध केला आहे. या चतुःखंडात्मक चरित्राचीं एकूण २७ प्रकरणें असून प्रत्येक खंड सुमारें ५००।६०० पृष्ठांचा आहे. पहिल्या खंडांत पांच प्रकरणें असून त्यांत भोरच्या संस्थापकाची व संस्थापनेची थोडक्यांत माहिती व राजे सर रघुनाथराव यांचें बालपण, शिक्षण, अधिकाराची पूर्वतयारी व शिरवळ तालुक्याचे अधिकार यांचें चित्रण करण्यांत आलें आहे. सर रघुनाथराव यांनीं नेमणूक घेतल्यापासून तों अधिकार ग्रहण करीपर्यंतहि लोकांच्या हिताच्या दृष्टीनेंच ते कसे वागत, याचें वर्णन या भागांत आढळतें.

दुसऱ्या भागांत, १८ जुलै १९२२ रोजीं श्रीमंत बाबासाहेबांनीं अधिकाराचीं सूत्रें हातीं घेतलीं, यानंतर लोकशाही पद्धतीच्या दृष्टीनें काय काय फरक केले, लोकहिताचीं कोणतीं कार्यें केलीं, कारभार सुधारण्याचे कोणते उपक्रम केले, अस्पृश्यता-निवारण, ग्रामोद्धार वगैरे कामांत त्यांनीं संस्थानांतील प्रजेचें पाऊल पुढें कसें पडेल याबाबतचे प्रयत्न, वगैरेंची माहिती वाचावयास मिळते. १९२३ पासून १९३० पर्यंत नरेंद्र-मंडळांत केलेल्या कामगिरीचें वर्णन व भोरकरांना मिळालेले इतर मानसन्मान, 'राजा' ही पदवी केव्हां मिळाली वगैरे माहिती या भागांत मिळते.

तिसऱ्या भागांत अधिपतींच्या खाजगी वैयक्तिक जीवनांतील सुखदुःखाचे प्रसंग आणि अधिपतींच्या जीवनांतील गुणांचे इतर पैलू यांचें चित्रण आहे. या भागांत १८ पासून २८ प्रकरणें आहेत. या भागांत श्रीमंतांचे १९३९ पर्यंतचें चरित्र आहे व तोंपर्यंतच्या चरित्र–प्रकाशनाची माहिती तिसऱ्या खण्डांत देण्यांत आली आहे.

चौथ्या खंडांत युरोपांतील युद्धास श्रीमंतांनीं केलेलें साहाय्य, भोर घटना परिषद व राज्यकारभार-पद्धतींत केलेल्या सुधारणांपासून तों संस्थानाचें

संघराज्य व विलीनीकरण याची माहिती आढळते. या खंडांतील २७ व्या प्रकरणांत श्रीमंतांच्या चरित्राचें थोडक्यांत सिंहावलोकन करण्यांत आलें आहे.

या चरित्राच्या निमित्तानें सर रघुनाथराव यांच्या वैयक्तिक गुणदोषांचें जसें चित्र पहावयास मिळतें, त्याप्रमाणेंच एका संस्थानांतील चळवळीचें चित्रहि पाहावयास मिळतें. संस्थानिक आणि प्रजा यांच्यामधील संघर्षाचें चित्रगहि पहावयास मिळतें. संस्थानी चळवळींतील निरनिराळे पैलू आणि निरनिराळी अवस्था ज्यांना अभ्यासावयाची आहे, त्यांनाहि हें पुस्तक उपयुक्त वाटेल. याहि-पेक्षां या पुस्तकाचा विशेष असा आहे कीं, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संस्थानाचीं सूत्रें हिंदी संघराज्याला हितकारक कशीं होतील, याचा विचार करून, श्रीमंतांनीं आपला मान व स्थान यांच्याबद्दलच्या कल्पनांना बाजूस सारून, अधिपतींनीं संघराज्य किंवा विलीनीकरण याबाबत जितकें उदार धोरण दाखवितां येईल तितकें दाखविलें आहे, याची कल्पना स्पष्टपणें या चरित्रांत आहे.

अधिपतींच्या अंगच्या गुणांचा कळसाध्याय, त्यांनीं आपला पावणे दोन लाख किंमतीचा राजवाडा (हि. हा. शंकरराव मॅन्शन्स व दोन बंगले) सार्वजनिक विधायक कार्यासाठीं दिला, यांत पहावयास मिळतो. लोकशाहीच्या विकासाला आमचे बरेचसे सरंजामदार आड येत होते कां ब्रिटिशांनींच त्यांना तसें ठेवलें होतें, याचें सर रघुनाथराव यांच्या चरित्रापुरतें उत्तर "नैतिकदृष्ट्या पाहतां, प्रजेकडून आलेल्या पैशांतील बराचसा भाग प्रजेच्या कल्याणाकरितां खर्च झाला पाहिजे; व तसें न करणें म्हणजेच कृतघ्नपणा आहे, असें मला वाटतें." या श्रीमंतांच्या उद्गारांत आहे.

## आजची म्हण—लोकांना मानतो राम, तरच राजा बनतो राम

सदर चरित्राला महामहोपाध्याय पोतदार यांनीं पुरस्कार लिहिला असून, त्यांतहि त्यांनीं भोरचें वैशिष्ट्य आणि संस्थानी आंदोलनांतील क्रांतिविकास यांतील भोरचें स्थान, याचें वर्णन करून श्रीमंतांच्या गुणांचा योग्य परामर्ष घेतला आहे.

सदर ग्रंथाची छपाई, चित्रें आणि बांधणी हीं बाह्यांगें उत्कृष्ट असून, त्याबद्दल मुद्रक व प्रकाशक अभिनंदनास पात्र आहेत.

चित्रमयजगत्, पुणें, ता. १-५-१९४९.

## राजा श्रीमंत सर रघुनाथराव पंडित पंतसचिव यांचें चरित्र.

खंड १, २, ३, ४ [ ले. वा. ना. जोशी व रावसाहेब वि. गो. रानडे एम्. ए., एल्एल्. बी., भोर ] हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर सरंजामशाहीचे अवशेष असलेलीं लहानमोठीं संस्थानें ' उदिते तु सहस्रांशौ ' या उक्तीप्रमाणें अंतर्धान पावावीं हें स्वाभाविकच आहे; पण, अशा आत्मविलोपाला स्वयंस्फूर्तीनें मान्यता देऊन ज्यांनीं समयसूचकता दाखविली, अशा दक्षिणी संस्थानिकांत भोरच्या राजेसाहेबांचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला पाहिजे. श्रीमंत रघुनाथराव पंतसचिव हे आतां ' पूर्वींसारखे ' राजे नाहींत व संस्थानिकहि नाहींत, तथापि त्यांच्या मागें त्यांच्या संस्थानांचा २५० वर्षांचा तेजस्वी इतिहास उभा आहे. या ऐतिहासिक पार्श्वभूमीवरून श्रीमंतांच्या या चतुःखंडात्मक चरित्रग्रंथाचें अवलोकन केलें पाहिजे. महाराष्ट्रीय संस्थानिकांपैकीं, श्रीमंत औंधकरांनीं लिहिलेलें अर्वाच्य आत्मचरित्र वजा केल्यास, बडोद्याचे सयाजीराव गायकवाड व कोल्हापूरचे छत्रपति शाहूमहाराज यांचीं विस्तृत चरित्रें लिहिलेलीं दृष्टीस पडतात. त्यांतल्या त्यांत श्री. दा. ना. आपटे यांनीं लिहिलेल्या सयाजीरावांच्या त्रिखंडात्मक चरित्राची प्रस्तुत चरित्रग्रंथाशीं तुलना करतां येईल. प्रस्तुत चरित्राचे पहिले तीन खंड १९३९ सालीं प्रसिद्ध झाले व चवथा नुकताच प्रकाशित झाला आहे. भोर संस्थानचे शाळाधिकारी कै. वा. ना. जोशी यांनीं पहिले तीन खंड लिहिले असून, चवथ्या खंडाला माजी दिवाण रावसाहेब रानडे यांच्यासारखा अभियुक्त लेखक लाभला आहे. त्यामुळें पहिल्या तिहींपेक्षां तो अधिक व्युत्पन्न झाला आहे. शिवाय, त्यांत १९३९ पासून विलिनीकरणापर्यंतचा वृत्तांत आला असल्यामुळें, त्याला विशेष महत्त्वहि आहे. या काळांतच राजेसाहेबांनीं लोकशाहीच्या दिशेनें धडाडीचीं पावलें टाकलीं; पण, पुढाऱ्यांच्या सत्तालोलुपतेमुळें, लोकराज्याचा कसा खेळखंडोबा झाला याचें यथार्थ चित्रण या खंडांत पहावयास सांपडतें. २७ व्या प्रकरणांत श्रीमंतांच्या पाव शतकाच्या कारकीर्दीचें मुद्देसूद व सारसंकलनात्मक विवेचन आलें असलें, तरी लेखकानें तें हात राखूनच केलें आहे हें सांगावयास नकोच. आतां यापुढच्या काळांत संस्थानिकांचीं हीं चरित्रें ऐतिहासिक म्हणूनच गणलीं जाणार व त्या दृष्टीनेंच त्यांच्या गुणावगुणांकडे व त्यांतील गौरवातिरेकाकडे पाहिलें पाहिजे. तपशीलवार माहितीच्या दृष्टीनें भरघोस असलेला हा चरित्रग्रंथ उत्कृष्ट छापला असून, भरपूर चित्रामुळें तो अधिकच आकर्षक झाला आहे. पुस्तकाला प्रा. पोतदार यांचा सौहार्दपूर्ण पुरस्कार आहे. पृ. १५२०.

---

दैनिक सकाळ, पुणें, ८-५-१९४९.

## भोरकरांनीं २५ वर्षांच्या कारकीर्दीत न्यायदानांत सुधारणा केल्या,—संस्थानचे इतिहासाच्या अभ्यासास मदत करणारे चार चरित्र-खंड

## राजा श्रीमंत रघुनाथराव पंडित पंतसचिव, राजेसाहेब, संस्थान भोर, यांचें चरित्र

( खंड १ ते ३ : लेखक : श्री. वासुदेव नारायण जोशी,—खंड चौथा, लेखक : रा. सा. विनायक गोविंद रानडे, एम्. ए., एल्एल्. बी., पृष्ठसंख्या एकंदर १७१५, किंमत दिलेली नाहीं. )

### इतिहासाचे अभ्यासास उपयुक्त

भोर संस्थानच्या अधिपतींच्या चरित्राचे पहिले तीन खंड १९३९ मध्यें प्रसिद्ध झाले आणि चवथा १९४९ मध्यें प्रसिद्ध होत आहे. चारहि खंडांतून राजेसाहेबांच्या चारित्र्याबद्दलची साद्यंत, सचित्र आणि सर्वसंग्राहक माहिती आलेली आहे. इतरांप्रमाणें आज भोर संस्थानहि हिंदुस्थानांत विलीन झालें असल्यानें, या चरित्रग्रंथाला ऐतिहासिक स्वरूप प्राप्त झालेलें आहे. भोर व भोरकर यांच्या अभिमान्यांना आणि संस्थानांच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यांना हे चरित्रात्मक चार खंड वाचनीय, अभ्यसनीय आणि संग्रहणीय वाटल्याशिवाय राहणार नाहींत. श्रीमंतांच्या बालपणापासूनच्या आजकालपर्यंतच्या या कथनांत त्यांच्या खाजगी, सामाजिक, राजकीय, औद्योगिक, शैक्षणिक अशा अनेकविध राज्यकारभारांतील गोष्टींचा योग्य तो परामर्ष घेण्यांत आलेला आहे.

चरित्राचें केवळ सारच चाखून पहावयाचें असेल, त्यांची उत्तम सोय श्री. रावसाहेब रानडे यांनीं, युवराज असतांपासून आतांपर्यंतचें श्रीमंत राजेसाहेबांच्या पंचवीस वर्षांच्या कारभाराचें आणि कारकीर्दीचें, सिंहावलोकनात्मक सत्ताविसावें प्रकरण लिहिलें आहे, तें वाचून पाहिलें असतां होण्यासारखी आहे.

### गुणांप्रमाणेंच दोषांचें वर्णन

एवढें मोठें चरित्र, पण त्यांत श्रीमंतांचें यथातथ्य म्हणजे गुणदोषयुक्त व्यक्तिवर्णन आलेलें आहे. संस्थानिकांचीं जीं कांहीं प्रशंसनीय चरित्रें आतां-

पर्यंत प्रसिद्ध झाली आहेत, त्यांत याच चरित्रग्रंथाला मानाचें स्थान लाभल्याशिवाय राहणार नाहीं.

## विलीनीकरणास मान्यता दिली

संस्थानें आणि संस्थानिक यांच्या पूर्वापार चालत आलेल्या ऐश्वर्याच्या दृष्टीनें विलिनीकरणाची वावटळ म्हणजे मोठीच अनिष्टापत्ति. पण, कालाची पावलें, प्रजेची मनीषा, सर्व देशाच्या हिताचें महत्त्व आणि त्यापुढें वैयक्तिक विशिष्टपणाचें लघुत्व लक्षांत घेऊन श्रीमंत भोरकरांनीं मार्च, १९४८ ला विलीनीकरणाला सक्रिय साहाय्य केलें.

## कारकीर्दीत केलेल्या सुधारणा

नरेंद्र मंडळांतील एक जागा अडवून बसायची, ही त्यांची वृत्ति कधींच नसल्यानें, तेथें गेल्यावर भाटघरच्या धरणानें आपल्या प्रजेचें वैयक्तिक नुकसान कसें होणार आहे हें त्यांनीं पटवून दिलें आणि आपण मानाची जागा स्वीकारली, ती प्रजाहित-दक्षतेच्या जाणीवेनेंच ही गोष्ट सिद्ध केली. १९२३-२४ सालीं राजेसाहेबांनीं अबकारी कॉम्पेन्सेशनचा प्रश्न हातीं घेऊन त्यांत विलक्षण चिकाटी दाखविली. त्याचा परिणाम १९२९ मध्यें संस्थानच्या उत्पन्नांत रु.६६,१२०-८-९ची भर पडण्यांत झाला. मागील कारकीर्दीपासून रेंगाळणाऱ्या तक्रारी दूर केल्या. १९२८ मध्यें लोकमतनिदर्शनार्थ कायदेमंडळ स्थापन केलें. १९३८ मध्यें राजेसाहेबांनीं लोकनियुक्ततेच्या प्रजेच्या हक्कांत अवश्य ती वाढ केली, अत्यवश्यक व राज्यसत्तानिदर्शक असे थोडेच अधिकार स्वतःकडे राखून ठेविले आणि बाकीचे लोकांचे हक्क लोकप्रतिनिधींचे स्वाधीन केले. शेती, उद्योगधंदे, व्यापार वगैरेंच्या स्थापनेस आणि वाढीस उत्तेजन दिलें, न्यायदान खातें आणि पोलीस खातें सुधारलें.

संस्थानचे इतिहासाच्या अभ्यासकांना हे चारही खंड माहितीपूर्ण व उपयुक्त वाटतील.

---

*

**दैनिक लोकमान्य, मुंबई, ता. ३-७-१९४९.**

## श्रीमंत रघुनाथराव पंडित पंतसचिव यांचें चरित्र

( लेखकः—वा. ना. जोशी व रावसाहेब वि. गो. देशपांडे; प्रकाशक-वि. बा. देशपांडे, पर्सनल क्लार्क, नि. राजेसाहेब भोर ( तीन खंड) व वि. गो. रानडे, माजी दिवाण भोर ( चवथा खंड ); पृष्ठें:—पहिले तीन खंड मिळून ९८५ + परिशिष्ट पृष्टें १९१ व चवथा खंड पृष्टें ४०६ + परिशिष्ट पृष्टें १६९, किंमत दिलेली नाहीं. )

भोर संस्थानचे अधिपति राजे श्रीमंत रघुनाथराव शंकरराव ऊर्फ बाबासाहेब पंडित पंतसचिव यांचें सचित्र व सांगोपांग चरित्र श्री. वा. ना. जोशी आणि रावसाहेब वि. गो. रानडे या दोघांनीं मिळून लिहिलें आहे. चरित्राचे पहिले तीन खंड श्री. जोशी यांनी लिहिले असून, चवथा खंड श्री. रानडे यांनीं लिहिलेला आहे. सर्व खंड मिळून एकंदर ग्रंथाची पृष्ठसंख्या सुमारें १४०० इतकी झालेली आहे. त्याखेरीज तीनशेंवर पृष्टें परिशिष्टांनीं व्यापलीं आहेत.

दोघांहि चरित्र-लेखकांचा श्रीमंतांशीं निकट परिचय आलेला असल्यामुळें त्यांच्या हातून हें चरित्र सविस्तरपणें व आत्मीयतेनें लिहिलें गेलें आहे. 'संस्थानिक' हें अधिकारपद आतां हिंदुस्थानच्या समाजरचनेंतून लुप्त झालें असल्याकारणानें, सुविद्य व प्रजाहितदक्ष असा संस्थानाधिपति असे तरी कसा ? ही जिज्ञासा पुढें कोणाला उत्पन्न झाली, तर ती समाधानकारकपणें तृप्त करण्याची कामगिरी या विस्तृत चरित्रानें करून ठेवली आहे.

हिंदी संस्थानिक हा शब्द उच्चारला म्हणजे त्याच्या विलायतेच्या सफरी, त्याच्या अंतःपुरांतील अनेक प्रकरणें, त्याचे रेसचे घोडे, त्याची प्रजेवर दडपशाही, त्याच्या न्यायखात्यामध्यें बेबंदी, असल्या अनेक गोष्टींनीं भरलेलें विद्रुप चित्र उभें राहात असे. या चित्राला अपवादभूत होणारे आणि आपल्या वर्तनानें प्रजेला सुखसमाधान देणारे असे भोरचे संस्थानाधिपति आहेत, हा ठसा हें सबंध चरित्र वाचून वाचकाच्या मनावर उमटतो. श्रीमंत रघुनाथरावांना नाद आहे, पण तो इतिहास व तत्वज्ञान यांचे ग्रंथ वाचण्याचा. त्यांनीं प्रवास खूप केला आहे, पण, तो रेसचे घोडे विकत घेण्यासाठी नसून, ज्ञानार्जनासाठीं. त्यांच्या कारकीर्दींत

ताप सोसावा लागला. त्यांच्यामध्यें उधळेपणा आहे, पण तो दान करण्यासाठीं, असे त्यांचे अनेक गुण हें चरित्र वाचून मनावर ठसतात.

चरित्र अत्यंत सुबोध भाषेनें आणि रसाळ शैलीनें लिहिण्यांत आलेंआहे. गुळगुळीत स्पर्शरमणीय आर्टपेपरवर तें छापलें आहे आणि तीनशेंवर दृष्टिरमणीय चित्रांनीं तें आकर्षक केलेलें आहे. चरित्राला महामहोपाध्याय द. वा. पोतदार यांचा पुरस्कार आहे. त्यांनीं आपल्या पुरस्कारांत या चरित्राची मुक्त कंठानें प्रशंसा केली आहे. महाराष्ट्रांतील प्रथम श्रेणीच्या इतिहास–पंडितानें मोकळया मनानें प्रशस्तिपत्र दिलेल्या चरित्र-ग्रंथाची याहून आणखी मोठी शिफारस ती कोणती ?

**द. पा. खां.**

---

दै. प्रभात, पुणें—ता. ३१-८-४९.

## एका प्रगमनशील राजाचें वाचनीय चरित्र

"राजा श्रीमंत रघुनाथराव पंडित, राजेसाहेब, संस्थान भोर, यांचें चरित्र" हा त्रिखंडात्मक ग्रंथ १९३९ सालींच भोर संस्थानांतील माजी शाळाधिकारी श्री. वासुदेव नारायण जोशी यांनीं लिहिला व राजेसाहेबांचे पर्सनल क्लार्क श्री. विनायक बापूजी देशपांडे यांनी प्रसिद्ध केला. नंतर, दहा वर्षांनीं श्रीमंतांचे माजी दिवाण रावसाहेब विनायक गोविंद रानडे एम. ए.,एलएल. बी. यांनीं श्रीमंतांच्या चरित्राचा चौथा खंड लिहून प्रसिद्ध केला आहे; आणि हें चरित्र त्यांनीं विलीनीकरणाअखेरपर्यंत नेऊन पोहोंचविलें आहे. श्री. जोशी यांनीं लिहिलेल्या त्रिखंडात्मक चरित्रांत प्रो. दत्तो वामन पोतदार यांनीं पुरस्कार लिहिला होता. अर्थात्, आतांहि हा चौथा खंड प्रसिद्ध करतांना महामहोपाध्याय यांचाच पुरस्कार श्री. रानडे यांनीं घेतला आहे. ग्रंथ मोठया आकाराचा असून, पहिले तीन खंड सुमारें चार-चारशें पानांचे आहेत; आणि हा शेवटचा खंड तर पांचशेंहूनहि जास्त पानांचा आहे. कागद, छपाई, बांधणी इत्यादि बाबतींत कसलीच कमतरता ठेवलेली नसल्यामुळें ग्रंथाला मोठेंच आकर्षण उत्पन्न झालेलें आहे. प्रत्येक खंडांत भरपूर चित्रें घातलेलीं असल्यामुळें या आकर्षणांत भरच पडलेली आहे. चौथ्या खंडाच्या शेवटीं कांहीं महत्त्वाचीं परिशिष्टें जोडलेलीं असल्याकारणानें ग्रंथाची

चित्रांक ७.



ने. ना. सर महाराजसिंग, मुंबईचे गव्हर्नर, यांची पुणें, महाराष्ट्र व्यायाम मंडळास भेट.

पहिली रांग, खुर्चीवर, डावीकडून उजवीकडे—१. श्रीयुत फडके, कार्यकारी मंडळाचे चेअरमन, ५. सरदार श्री. जगन्नाथ महाराज, ६. ना. म. सोमण, अध्यक्ष, मुं. ले. जि. कौ., ७. हि. हा. श्री. राजेसाहेब, भोर, ८. ने. ना. गव्हर्नर साहेब, ९. सरदार दस्तुर, पारशी धर्मगुरु, १०. श्रीयुत ल. ब. भोपटकर, मंडळाचे उपाध्यक्ष, १२. राजकुमार श्री. रावसाहेब भोर, मागें उभी रांग—उजवीकडून डावीकडे—३. श्रीयुत आठवले, मंडळाचे सेक्रेटरी. [ न. प्र. सं. पा. ९

उपयुक्तताहि वाढली आहे. श्रीमंत सर रघुनाथराव पंतसचिव हे सार्वजनिक जीवितांत विशेषत्वेंकरून पुढें आलेले किंवा विद्या, कला इत्यादि बाबतींत विशेष नांव कमावलेले असे कोणी गृहस्थ नव्हेत. मग, यांचें चरित्र तें काय असावयाचें? असें कोणाला वाटण्याचा संभव आहे. परतु, हे चार खंड पाहिले म्हणजे अशाहि ग्रंथांची आवश्यकता भाषेला आहे हें मान्य करावें लागेल. दैववशात् ज्या ठिकाणीं श्रीमंत आरूढ झाले, त्या ठिकाणचा महिमा फार मोठा होता; आणि त्याच्या जबाबदाऱ्याहि विशेष दगदगीच्या होत्या. अर्थात्, हीं सर्व कामें राजेसाहेबांनीं कशीं काय पार पाडलीं आणि लक्षावधी लोकांच्यां हिताची तत्परता कशी काय ठेवली, यांकडे कोणाचेंही लक्ष जाणार. राजकुलांत जन्म झाला म्हणून हें काम त्यांच्याकडे आलें हें खरें. पण, हातीं आलेलें काम त्यांनीं कसें केलें हाही एक महत्त्वाचा प्रश्न असतो. या दृष्टीनें पाहतां श्रीमंतांचें चरित्र म्हणजे भोर संस्थानचा गेल्या २५ वर्षांचा इतिहास होय. प्रजापक्षाच्या बाजूनें कोणी या संस्थानचा २५ वर्षांचा इतिहास लिहिला, तर तो तंतोतंत असाच होईल असें मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. परंतु, श्रीमंतांच्या बाजूनें त्या इतिहासाचें रूप कसें दिसेल हें मात्र या ग्रंथावरून चांगलें दिसून येतें. युवराज म्हणून थोडा बहुत कारभार पाहूं लागल्यापासून तों संघराज्यांत भोर संस्थान विलीन होईपर्यंतच्या सर्व काळाचा हा चित्रपट फार मनोरंजक वाटेल, भोर संस्थानांतील प्रजेला अलीकडे अलीकडेच बोलतां येऊं लागलें आहे; आणि आनंदाची गोष्ट ही कीं, बोलूं लागलेल्या प्रजेचें मनोगत लक्षांत घेऊन आपल्या राज्यकारभाराचें सुकाणू प्रजेच्या हिताच्या बाजूनें वळवावयास हवें, हें ओळखण्याचा चाणाक्षपणा आणि स्वाभाविक उदारपणा श्रीमंतांच्या ठिकाणीं पुरा दिसून आला. श्रीमंतांच्या वडिलांचें धोरण थोडें प्रतिगामी स्वरूपाचेंच असे; आणि त्यांच्या राजकीय वैचारिक बैठकीला चिकटपणा फार होता. सर रघुनाथराव यांचा कॉलेजचा अभ्यासक्रम जरी शेवटपर्यंत गेला नाहीं, तरी उच्च शिक्षणाचे सर्व संस्कार प्रत्यक्षरीत्या व परोक्षरीत्या त्यांच्या मनावर झाले. विद्याभिरुची, राजकीय औदार्य, प्रजांचे हक्क, राज्यकारभाराची कसोटी या सर्व बाबतींत त्यांचें धोरण स्पष्ट निराळें होतें, आणि कारभाराचीं सूत्रें हातीं आल्याबरोबर तर रघुनाथराव यांनीं इंग्रज सरकार आणि आपली प्रजा या दोघांनाहि दाखवून दिलें कीं, गादीवर एक निराळा माणूस

आला आहे ! श्री. जोशी यांच्या पहिल्या तीन खंडांत या विषयाचा भरपूर तपशील दिलेला आहे. परंतु, ज्यांना हा अवाढव्य ग्रंथ सर्वच्या सर्व वाचावयास सवड नसेल, त्यांनीं श्री. रानडे यांनीं लिहिलेल्या चौथ्या खंडांतील २७ वें प्रकरण अवश्य वाचावें. ग्रंथकर्त्यांची शिफारसहि तशीच आहे. सर रघुनाथराव हे युवराज होते, तेव्हांच्या वेळच्या हकीगतीसह गेल्या पंचवीस वर्षांच्या त्यांच्या कारकीर्दीचें सिंहावलोकन श्री.रानडे यांनीं या २७ व्या प्रकरणांत केलेलें आहे, आणि हें प्रकरण जो कोणी वाचील त्याला हाच निकाल द्यावा लागेल कीं, सर रघुनाथराव पंतसचिव यांनीं प्रजेच्या हिताची दक्षता खरोखरच फार चांगली ठेवली होती. प्रजेच्या पुढाऱ्यांनीं कित्येक वेळां अशाच प्रकारचें वर्तन केलें कीं, श्रीमंतांना विषाद वाटावा; परंतु, त्या वर्तनाकडे दुर्लक्ष करून प्राप्त परिस्थितींत प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें काय करतां येण्यासारखें आहे, यावर श्रीमंतांनीं आपली दृष्टी अचल ठेवली होती हें या इतिहासावरून दिसून येतें; आणि याचा परिणाम असा झाला कीं, प्रथम प्रथम जरी प्रजेचे पुढारी आणि राजेसाहेब यांच्यांत थोडा दुजाभाव उत्पन्न झाला, तरी पुढें हे सर्व गैरसमज नाहींसे होऊन तेच प्रजेचे पुढारी राजेसाहेबांच्या सन्निध मंत्रिपणाचें काम करूं लागले; आणि, राज्य-कारभारांतील अडचणी लक्षांत घेऊन, प्रजांच्या आकांक्षा श्रीमंत कशा पुऱ्या करीत आले आहेत याचें यथार्थ ज्ञान या मंत्रिमंडळींनाहि झालें. उभयतांचा सलोखा होऊन संवराज्य चालू होईल असें वाटत होतें. परंतु, विलीनीकरणाची लाट फार जोरानें आली आणि तिच्यापुढें मान लवविणें हें कालमहात्म्याला अनुसरून आहे असें ओळखल्याबरोबर श्रीमंतांनीं एकदमच विलीनीकरणाची तयारी दाखविली. या सर्व प्रसंगीं सर रघुनाथराव यांनीं दाखविलेला मनाचा समतोलपणा, क्षमाशीलत्व आणि प्रसंगावधान हीं खरोखरच लक्षांत घेण्याजोगीं होतीं. श्री. रानडे यांनीं श्रीमंतांनीं केलेल्या कामाचा मुबलक तपशील या प्रकरणांत दिलेला आहे. आज विलीनीकरणांत गडप होऊन गेलेल्या लोकांना श्रीमंतांच्या त्या कामाचें आतां स्मरणहि राहणार नाहीं. परंतु, याला कांहीं इलाज नाहीं. विलीनीकरणाच्या प्रसंगीं श्रीमंतांच्या मनांत झालेली कालवाकालव २९९ पानावर फार ठळकपणानें उमटली आहे. सुधागड तालुक्याच्या लोकांनीं श्रीमंतांना मानपत्र दिलें, तो विलीनीकरणाच्या आदला दिवस होता. दुसऱ्या

दिवसापासून भोरचा इतिहास साफ बदलणार होता. भोरचा राजवंश जाणार होता, राज्य जाणार होतें, आणि राजा व प्रजा हेहि संबंध मावळणार होते. अशा प्रसंगीं मानपत्राला उत्तर देणें आणि तें मनाचा समतोलपणा राखून देणें हें काम खरोखरीच कठीण होतें. परंतु, त्यांनीं हा प्रसंग फार हळुवारपणानें आणि थोर समंजसपणानें निभावून नेला. भोर संस्थानच्या सर्व कारभाराचा व तिजोरीचा ताबा घ्यावयास आलेल्या सरकारी अधिकाऱ्यांशीं भलेपणानें वागणें, त्यांचा मानमरातब ठेवणें आणि संसाराच्या दौलतीची झाडून झडती देणें हें काम अव-मानाचें आहे असें एखाद्या सामान्य मताच्या संस्थानिकाला वाटलें असतें. परंतु, अखिल भारताला स्वातंत्र्य मिळालेलें आहे आणि म्हणून आलेल्या समुद्राच्या भरतींत आजूबाजूच्या सर्व सरोवरांनीं व तडागांनीं खुषीनें लुप्त झालें पाहिजे, हा इतिहासप्रणालीचा बोध श्रीमंतांच्या मनावर चांगला ठसलेला असल्याकारणानें त्यांनीं हीं सर्व कामें मोठ्या खेळीमेळीनें आणि सहज सलोख्यानें करून टाकिलीं आणि आपल्या संस्थानचा आणि प्रजांचा शेवटचा निरोप घेतला. सत्तरीच्या घरांत असलेल्या श्रीमंतांना या काळांत मानसिक दगदग पुष्कळच झाली असेल.परंतु, तिचा परिणाम प्रकृतीवर होऊं न देण्याची दक्षता घेण्याइतपत नैतिक पत त्यांच्या अंगीं आहे, हें पाहून समाधान वाटतें. असो. श्री.रानडे यांनीं श्री. जोशी यांच्याप्रमाणेंच हा चौथा खंडहि फार कसोशीनें लिहिलेला आहे.राज्यकारभाराची प्रणाली एकदा ठरलेली असल्याकारणानें ग्रंथांत वर्णन केलेल्या प्रसगांना तेंचतेंचपण प्राप्त होणें अटळ आहे.याला श्रीमंतांचाहि इलाज नव्हता व चरित्रकाराचाहि नव्हता. श्रीमं-तांच्या घरगुती बाबतींतील व प्रवासांतील बारीकसारीक बाबीसुद्धां ग्रंथांत अंतर्भूत झालेल्या असल्याकारणानें हे खंड अनेक ठिकाणीं बेचव वाटण्याचा संभव आहे, आणि लेखकांनीं असला तपशील कशाला सांगितला असेंहि कांहीं वाचक मनाशीं म्हणतील. परंतु, हें श्रीमंतांचें चरित्र आहे आणि श्रीमंत स्वतः राज्य-कारभार करणारे राजे होते, या दोन्ही गोष्टी एकत्र केल्या म्हणजे हा दोषही लेखकाला चुकवितां आला नाहीं हें बरोबर वाटतें. श्री. रानडे यांना संस्कृत सुभाषितांची पेरणी करण्याची हौस जरा जास्त आहे हें मात्र लक्षांत येतें. श्रीमंतांचें प्रत्येक कृत्य रघुवंश, महाभारत किंवा गीता यांतील एखाद्या सुभाषिता-प्रमाणें घडलेलें आहे असे दर पांच सात ओळींत दाखविल्यानें, त्या कृत्याला

काहीं निराळी शोभा येते असें वाटत नाहीं. हा दोष श्रीमंतांच्याहि ध्यानांत आलेला आहे. पण, प्रास्ताविक शब्दांत तो त्यानीं केवळ सौजन्यानें निभावून नेलेला आहे. हा एक दोष सोडला तर रा. रानडे, यांचें लिखाण वाचनीय झालें आहे. विशेषत: श्रीमंतांच्या स्वभावाचें जें परीक्षण त्यांनीं केलें आहे, तें अतिशय नि:स्पृहपणाचें असून त्यांच्या मार्मिकतेचें दर्शक आहे. श्रीमंतांच्या ठिकाणची त्यांची निष्ठा विशेष प्रखर असली, तरी तिला अंधत्व मात्र आलेलें नाहीं हेंहि या प्रकरणावरून दिसून येतें. पहिल्या तीन खंडांचे लेखक श्री. जोशी हे तर आतां कैलासवासीच आहेत. त्यांनीं सुरू केलेलें काम श्री. रानडे यांनीं या उतारवयांत मोठ्या हिमतीनें तडीस नेलें, याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत आणि एवढ्या मोठ्या कामाला लागणारीं प्रचंड साधनें श्रीमंतांनीं त्यांस उपलब्ध करून दिलीं, याबद्दल तेहि स्तुतीस पात्र आहेत.

---

' सह्याद्रि ', पुणें ऑक्टोबर १९४९

## परिचय-परामर्श

### हिज हायनेस राजा श्रीमंत सर रघुनाथराव पंडित पंतसचिव, के. सी. आय. अी. यांचें चरित्र, खंड ४ था.

( लेखक—रावसा. विनायक गोविंद रानडे, सन १९४९, पृ. ४० + ४०६ + १५९ ).

शिवाजीच्या अष्टप्रधानांतील सचिवपदधारी भोर संस्थानाधिपतींपैकीं शेवटचे राजा सर रघुनाथराव यांच्या चरित्राचा, स. १९३९ पासून मार्च १९४८ मध्यें भोर संस्थानचें विलीनीकरण होअीपर्यंतचा, चौथा खंड हा पूर्वीच्या ३ खंडांप्रमाणेंच मोहरेदार कागद, ठळक टाईप, किंमती कागदावरील सुंदर चित्रें आणि सुबक बांधणी, यांनीं युक्त असून, राजघराण्यांत साधनसुलभतेमुळें ऐतिहासिक अचूक दैनंदिनी ठेवण्यांत येतात, तशा प्रकारच्या माहितीवरून तो लिहिण्यांत आल्याचे सर्व गुण त्यामध्यें स्पष्टच दिसतात. प्रस्तुत खंडाचे लेखक हे जवळ जवळ ४० वर्षें संस्थानच्याच नोकरींत वाढलेले असे व्यासंगी विद्वान् असल्यामुळें साहाजिकच त्यांच्या व्यासंगाचा आणि संपूर्ण माहितीचा

चित्रांक ८.



ने. ना. सर महाराजसिंग, मुंबईचे गव्हर्नर, हे सहकुटुंब श्रीमंत राजेसाहेब यांच्याकडे लक्ष्मीविलास, पुणें, येथें दुपारीं भोजनास आले होते.

डावीकडून उजवीकडे पुढील रांग–१. श्री. सौ. विजया देवी, राणीसाहेब, कुरुंदवाड (सी.), २. लेडी महाराजसिंग, ३. श्रीमंत राजेसाहेब, ४. ने. ना. महाराजसिंग, ५. ने. ना. साहेब यांची कन्या.

मागील रांग–१. रा. सा. साने, २. ने. नामदार साहेब यांचे ए. डि. सी. ३. राजकुमार श्रीमंत रावसाहेब, ४. डॉ. जोशी.

[ न. प्र. सं. पा. १०

चित्रांक ९.



श्रीमंत राजेसाहेब यांची नात श्रीमंत सौ. विमलदेवी यांच्या कन्येचें बारसें.
डावीकडून उजवीकडे—१. श्रीमंत सौ. विमलदेवी (उभ्या), २. श्रीमंत राजेसाहेब (खुर्चीवर) व मांडीवर पतवंड, ३. श्रीयुत बाळासाहेब लोकूर, नातजावई ( उभे ).

पुरावा पानोपानीं आढळतो. विशेषतः असंबद्ध अशी कालक्रम पद्धति न स्वीकारतां त्यांनी विषयवार प्रकरणें लिहिण्याची पद्धति अंगीकारल्यानें ग्रंथांत एक प्रकारचा घाटदारपणा आणि संदर्भसुलभता आलेली आहे. १९३९ ते १९४८ हा काल, प्रथम महायुद्धामुळें आणि नतर स्वराज्यप्राप्ति आणि विलीनीकरण यांमुळें, कांहींसा आणीबाणीचा आणि क्रान्तिकारक समजला जातो. अशा काळांत एका संस्थानाशीं निगडित असणाऱ्या एका राजकीय व्यक्तीच्या या इतिहासांत, त्यामुळें साहजिकच महाराष्ट्राच्या आणि हिंद भूमीच्या दृष्टीनें, महत्त्वाच्या अशा कांहीं चिरपरिणामी घटनांचें जवळून दर्शन होतें, हा या ग्रंथाचा विशेष आहे. कोणत्याहि कारणानें असो, बहुधा पुण्याशीं असलेल्या भोरच्या सान्निध्यामुळेंहि असेल, भोरमधील कैक घटना, विशेषतः कै० तात्यांसाहेब केळकरांच्या महत्त्वाच्या व्यक्तीच्या तद्विषयक कारभाराशीं झालेल्या साहचर्यामुळें, अगदीं नजीकच्या अशा वाटतात. श्रीमंत भोरकरांच्या कारकीर्दीसारखें इतकें सविस्तर, इतकें प्रामाणिक आणि इतकें त्वरेनें प्रकाशित झालेलें चरित्रवर्णन अन्य कोणत्याहि संस्थानिकाचें आमच्या पाहण्यांत नाहीं. श्रीमंत भोरकरांच्या एतद्विषयक अभिरुचीला जसें या अभिनंदनीय घटनेचें श्रेय दिलें पाहिजें, तसेंच तें त्यांच्या परिसरांतील श्री. रानडे यांच्यासारख्या परिश्रमी लेखकांनाहि दिलें पाहिजे; आणि श्रीछत्रपति शिवाजी महाराजांच्या प्रारंभिक स्वराज्यांकुर-बालकाचा पहिला पाळणा जेथें हालला, त्या भूमीचें स्मरण, उचित स्मारकाची योजना करून, चिरस्थायी करण्याइतके सहृदय आणि स्वाभिमानी असणारे भोरचे अधिपति, हे प्रसंग आला असतां, आपल्या प्रजेला महत्तर स्वराज्यांत सामील होण्यास आनंदानें संमति देण्याइतके भारत-मनस्कहि आहेत, हें सप्रमाण आणि साधार जनतेसमोर मांडणारा ग्रंथ म्हणून प्रस्तुत खंड लोकांच्या कौतुकाचा आणि आदराचा विषय होईल अशी आम्हांस आशा वाटते.

दि. वि. काळे

*" The Bharat Jyoti ", Sunday October 2, 1949*

# THE RAJA OF BHOR:

## An Appraisal

Life of H. H. Raja Shrimant Sir Raghunathrao S. Pandit Pant Sachiv K.C.I.E., Raja of Bhor : Four Volumes, Marathi.

The first three volumes are written by the late V. N. Joshi, Ex-Shaladhikari of Bhor : while, the fourth volume is written by Rao Sahib V. G. Ranade, M.A.,LL B , Ex-Dewan of Bhor.

The biography proper of the Raja Saheb is prefaced in Vol. I by a geographical account of the Bhor State and a brief sketch of the lives of the ten rulers of Bhor who preceded the Raja Saheb. The State came into being in 1690 as a reward for the very meritorious, loyal and valorous services rendered by Shankaraji Narayan, the founder of the Sachiv Dynasty,in the cause of the then Mahratta Raj at the time of Rajaram Chhatrapati, the second son of Shivaji, the founder of the Marhatta Empire. The volume also gives an account of the early life of the Raja Saheb, his education, social activities, travels and his work as Assistant Judge, Assistant Collector and Sub-Divisional Magistrate of the Shirwal Taluka till July 1922, when he came to the Gadi.

Vol. II begins with and gives the story of the doings of the Raja Saheb as a ruler and the same account is carried on in Vol. III upto about the end of 1939. These two volumes deal with the various reforms introduced by the Raja Saheb in almost all the departments of the State, the beginning made by him in associating his subjects with the administration of the State by instituting for the first time Representative institutions like the Legislative Council and Local Self-Government Bodies like Local Boards, Municipalities etc. The Raja Saheb's policy of treating all his subjects equally in

**चित्रांक १०.**

**नामदार श्रीयुत जी. व्ही. मावळंकर, स्पीकर, इंडिअन डोमिनिअन पार्लमेंट, हे ता. १२।९।४९ इ. रोजीं दुपारीं श्री. राजेसाहेब यांच्याकडे पुणें लक्ष्मीविलास बंगल्यांत भोजनास आले होते.**



पुढील रांग—डावीकडून उजवीकडेः ना. मावळंकर, श्री. राजेसाहेब, श्रीयुत मेथा ( नामदार यांचे स्नेही )

मागील रांग—डावीकडून उजवीकडेः रावसाहेब साने, राजकुमार श्री. रावसाहेब, रावसाहेब रानडे. न. प्र. सं. पा. १२

